

# अपरूप हिरे

मणिभद्र नांवाचा एक व्यापारी देश देशांतरात व्यापार करीत शेवटी अवंती राज्यात येऊन पोंचला. तो हिऱ्यांचा व्यापारी होता. तो अवंती नगरी आला तेव्हां त्याच्या जवळ एकच एक उत्तम मूल्यवान हिरा उरला होता. बाकीचे हिरे सामान्य होते. तो मूल्यवान हिरा अपरूप होता, त्याची अंगठी घालणारा मोठा भाग्यवान होईल असे मणिभद्र सर्वांना सांगे.

अवंतीच्या राजाला ही बातमी कळली व त्याने मणिभद्राला बोलावून विचारले– "कायरे, तुझ्याकडे एक अपरूप हिरा आहे असे तू सांगतोस तर सर्वांत आधी तू मलाकां नाही तो दाखविलास? तू दहा जणांना तो दाखवीत फिरलास व माझ्याकडे आलासच नाही?

राजाने ते विचारल्यावर मणिभद्राचा चेहरा उतरला. कारण त्या पूर्वी एक तास त्याच्याकडे अवंतीच्या सेनापतीने निरोप पाठविला होता, आणि तो हिरा त्यालाच विकला पाहिजे असे धमकावले ही होते. परंतु त्याची इतकी मोठी किंमत सेनापती देऊ शकेल की नाही याची मणिभद्रला शंका होती.

मणिभद्र नम्रपणे राजाला म्हणाला– "महाराज! माझा जन्म अवंतीनगरीत झाला आणि येथेच मी लहानाचा मोठा झालो. काही वर्षांपूर्वी व्यापारानिमित्ते मी परदेशी गेलो आणि नुकताच स्वदेशी परतलो. आपल्या दर्शनास यावे असा विचार करून मी निघणार तेवढ्यांत आपला निरोप आला!"

अवंतीचा राजा ऐटीत आपल्या मिशांवर हात फिरवीत म्हणाला– "आमच्यासाठी तुझ्या जवळ जो अपरूप हिरा आहे, तो तू आणलास असशील!"

श्री स. ना. श्रीखंडे



मणिभद्र प्रसंगावधान राखून म्हणाला– "मी तो हिरा नाही आणला. आपली आज्ञा मिळतांच घाईत आणायला विसरलो."

"तरमग घरी जाऊन तो हिरा घेऊन ये!" राजा म्हणाला.

मणिभद्र "वांचलो!" असे मनांत म्हणत राजाकडून निघाला. राजवाड्यांतून बाहेर पडला असेल नसेल समोर त्याला अवंती राज्याचे प्रधान भेटले. म्हणाले– "तू महाराजांना कसला हिरा देणार, मला माहीत नाही. तो अपरूप हिरा मलाच दिला पाहिजेस. नाहीस तर तू या राज्यात कसा राहतोस हे मी पाहीन!"

मणिभद्र काळजीत पडला. कारण सेनापती बल प्रयोग करून, राजा अधिकार पदांत आणि प्रधान आपले सर्व चातुर्य पणास लावून माझ्या जवळचा हिरा आपलासा करून घ्यायच्या प्रयत्नात आहेत. आपण या तिघांच्या कचाट्यातून स्वतःची सुटका कशी करून घ्यायची?

प्रधानाला काहीतरी समाधान होण्यासारखे उत्तर देऊन मणिभद्र घरी गेला. नंतर एक आठवडाभर राजाला प्रधानाला किंवा सेनापतीला भेटलाच नाही.

आठव्या दिवशी राजाचा हेर त्याला धरून राजाकडे घेऊन गेला. राजा थोडा रागानेच व्यापाऱ्याला टाकून बोलला. मणिभद्रने काही न बोलतां मुकाट्याने एक अंगठी काढून दाखविली. त्या अंगठीत एक सुंदर हिरा बसविला होता.

एकच क्षणभर राजाच्या चेहऱ्यावर आनंदलहरी उमटली. दुसऱ्या क्षणाला त्याने आपले ओंठ घट्ट दाबून विचारले– "खरोखरच अपरूप हिरा आहे ना?"

मणिभद्रने होकारार्थी मान हलविली. राजाने त्याला काही तरी सामान्य इनाम देऊन निरोप दिला. व्यापारी घरी निघाला तेव्हां वाटेतच प्रधान त्याची वाट पहात असलेला दिसला.

होतों." असे म्हणत मणिभद्रने आपल्या खिशातून एक अंगठी काढून दाखविली.

त्या अंगठीत सुद्धा एक हिरा मढविलेला होता.

प्रधानाने अंगठीकडे सशंक होऊन पाहिले व म्हणाला–"अस्सल हिरा अंगठीत मढवून महाराजांना दिलास! हा हिरा कमी प्रतीचा दिसतो आहे, अपरूप हिरा तो हा नव्हे!"

मणिभद्र ते म्हणणे आवडते नाही अशी मुद्रा करून म्हणाला–"मालक, हाच तो अपरूप हिरा! पाहिजे तर कोण्या रत्न पारख्याला दाखवून विचारून पहा!"

ते ऐकून प्रधानाचा विश्वास बसला. अंगठी घेऊन व्यापाऱ्याला काही तरी इनाम देऊन पाठवून दिले.

मणिभद्र घरी गेल्यावर पाहातो तों सेनापती वाट पहात बसला होता. राजाला आणि प्रधानाला त्याने अंगठी दिली तशीच एक अंगठी मणिभद्रने सेनापतीला दिली.

अशातऱ्हेने तिघांच्या त्रासांतून तो वांचला परंतु मणिभद्रचा तो आनंद फार दिवस टिकला नाही. राजा, प्रधान व सेनापति एका ठिकाणी मेजवानी निमित्ते भेटले. त्यावेळी तिघे ही आपापली अंगठी घालून आले होते.



बोलतां बोलतां तिघांची दृष्टी अंगठ्यांवर गेली व कोणाच्या अंगठीतला हिरा अपरूप हिरा आहे या विषयी तर्कवितर्क सुरू झाले. तिघांनी मणिभद्रला बोलावून विचारले–

"काय रे, तुझ्याजवळ एकच एक हिरा होता ना? पण आम्हां तिघांना अपरूप हिऱ्याची म्हणून प्रत्येकाला हिऱ्याची अंगठी कशी दिलीस? या अंगठ्यांत अपरूप हिरा मढवलेली अंगठी कोणती?"

मणिभद्र पेंचात पडला. तरीपण तो लगेच स्वतःला सावरून म्हणाला– "महाराज, अधिकार, हुशारी आणि शक्ती अनुक्रमे असणाऱ्या आपणां तिघांशी थट्टा-










मस्करी करण्याचे साहस मी करीन का? तीन ही अंगठ्या अपरूप हिऱ्याच्याच आहेत!

"तू आहेस व्यापारी, तुझ्या बोलण्याचा काय विश्वास?" राजाने विचारले.

तेव्हां मणिभद्र म्हणाला–"राजधानीतल्या कोणत्याही रत्नपारख्या कडून अंगठ्यांतल्या हिऱ्यांची पारख करून घ्यावी!"

दुसऱ्या दिवशी राजाने एका रत्नपारख्याला बोलाविले. त्याने अंगठ्यांतल्या हिऱ्यांची पारख करून ते कळल्यावर राजा, प्रधान व सेनापती तिघांच्या मनाचे समाधान झाले. रत्नपारखी तेथून निघाला आणि सरळ मणिभद्राच्या घरी गेला. त्यावेळी व्यापारी आपल्या बायकोसह कोठेतरी जाण्याच्या तयारीत दिसला. सामानाची बांधाबांध करीत होता.

"तू सांगितलेले काम कोणत्याही प्रकारचे विघ्न येऊ दिल्याशिवाय पार करून आलो, मला तू एक अपरूप हिरा देईन म्हणाला होतास, त्याचे काय?" हंसत रत्नपारख्याने मणिभद्रला विचारले.

मणिभद्र त्याला एक अंगठी देत म्हणाला–"ही अपरूप हिऱ्याची मढवलेली अंगठी आहे! जव्हेरी व रत्नपारखी हे भाऊ-भाऊ असतात, नाही का? म्हणून तू मला जी मदत केलीस त्याबद्दल मी तुझा फार-फार आभारी आहे!"

अशा तऱ्हेने तू तो अपरूप हिरा स्वस्तांत कोणाच्याही हातात तू पडू दिला नाहीस व तो सुरक्षित आपल्या जवळ संभाळून ठेवलास तर! मग गाव सोडून जाण्याची गरज?" रत्नपारख्याने विचारले.

मणिभद्र दुःखी आवाजांत म्हणाला–"राजा, प्रधान, आणि सेनापती यांच्या कोपांतून मी कसा वांचलो हे मी आतांच आपल्या बायकोला सांगितले, राजाज्ञेचे पालन, करतांना त्याला मदत करणाऱ्या प्रधानाला व सेनापतीला आपल्या मालकाशी चढाओढ करायची सुचते. अशा राजाचे राज्य कधी न कधी संकटात सापडल्या शिवाय राहिले तरच आश्चर्य! म्हणून हे राज्यच मी सोडून जातो आहे!"






# तीन मांत्रिक

## [ ७ ]

[पिंगळने पडक्या देवळाची पांच दारे एकामागून एक पार केली. प्रत्येक दारावर त्याला अडथळे आले. परंतु त्याने त्या दारातील पिशाच्चांना एकामागून एक ठार केले. परंतु सहाव्या दारा जवळ पद्मपादचे मायावी रूप घेऊन एक राक्षस आला. त्याने त्याला फार त्रास दिला. त्याने पिंगळला देवळा बाहेर हवेत उडविले. त्यानंतर...]

पद्मपादला पाहिल्या बरोबर पिंगळला जिवांत जीव आल्यासारखे झाले. आतां आपल्याला प्राण-भय नाही हे ओळखले. इतक्यात पद्मपादने पिंगळला खाली पडूं न देतां जमिनीवर पडूं न देतां वरच्यावर दोन्ही हात पुढे करून उचलून धरले आणि जमिनीवर उभे केले.

"पिंगळ, काय झाले रे? तुला तसे फारसे लागले बिगले नाही ना?" पद्मपादने विचारले.

"लागलं बिगलं काय ते मागाहून पाहू या मी जिवंत आहे, हेच केवढे भाग्य माझे?" असे म्हणत पिंगळने मागे वळून देवळाकडे पाहिले. तो पहात होता तेव्हांच आतांपर्यंत पूर्णपणे वाळून गेलेली नदी व नदीचे पात्र पुन्हां "भुस्स" म्हणून पाण्याने भरू लागले.

पद्मपाद पिंगळच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाला–"पिंगळ, या खेपेस आपण



हारलों रे! महामायिकाचे शिष्य नदी पाण्याने पुन्हा भरू लागले आहेत. देऊळ त्यात बुडून जाणार परंतु आपण ठरविलेल्या दिवशी नदीचे पाणीं अटवू शकूं. प्रथम तुला जे काही अनुभवावे लागले ते प्रथम सांग."

पिंगळने पहिले दार ओलांडल्या पासून सहावे दार येईपर्यंत त्याला कोण-कोणत्या अडचणींना तोंड द्यावे लागले व जे जे अनुभव आले व जेंजें घडले ते सर्व सांगितले.

"त्या सहाव्या दारावर इतके हुशार भूत असेल असे मला वाटलं नव्हतं. अकस्मात् तुझ्यासारखे रूप मला दिसले. 'थांब, थांब, तू कोण आहेस?' असे विचारणाऱ्याचा आवाजही अगदी तुझ्या सारखाच! एकच क्षणभर मी 'किंकर्तव्य-विमूढ' अवस्थेत राहालो. तेवढ्यात डोळ्यां-समोर डोळे दिपून गेल्यासारखी चकचकीत गदा मला दिसली. मी डोळे मिटून घेतले. माझ्या पाठीवर व डोक्यावर काजवे चमकूं लागतील एवढ्या मोठ्याने घाव पडू लागले. कोणीतरी बळकट हातांनी मला उचलून आकाशांत फेंकले. परंतु खाली आपटण्या–आधी तू अलगद मला वरच्यावर धरलेस आणि वांचविलेस" पिंगळ म्हणाला.

"अस्सं!" असे म्हणत पद्मपादने लाल डोळ्यांनी पाण्यात बुडत चाललेल्या देवळा कडे पाहिले. म्हणाला–"पिंगळ, महामायि-काचे शिष्य इतका नीच पणा करतील याची मला कल्पना ही नव्हती. तू चांगला ओळखत असूनही ते माझे रूप घेऊन तुला फसवूं शकले. त्या पूर्वी तुला भिववण्या-साठी उपयोगात आणलेल्या प्रत्येक दुष्ट शक्तीला तू जिंकले होतेस. ते पाहून मला फार आनंद झाला होता!" व तुझा चतुरपणा सुद्धा लक्षात आला.

पिंगळ म्हणाला ते ऐकून पिंगळला फार आनंद झाला. त्याचा उत्साह द्विगुणित झाला. "बर आतां पुढं काय करायचे? देऊळ तर पुन्हां पाण्यात बुडू लागले आहे!" पिंगळ म्हणाला.

"आज आपण करण्यासारखं कांहींच नाही. आजपासून तीन दिवसांनी पुन्हां महामायिकाच्या समाधीत प्रवेश करू शकशील. तो पर्यंत आपण येथेच रहाव-याचे आहे. तोंपर्यंत आपल्याला विरंगुळा म्हणून ..." असे म्हणत पद्मपादने हातातली गदा हवेत फिरवीत काही तरी मंत्र म्हटला लगेच त्या निर्जन स्थानी एक उंच वसुंदर इमारत उभी राहली.

पिंगळ आश्चर्य चकित होऊन त्या इमारतीकडे पहात असतां पद्मपादने त्याचा हात धरला व त्याला त्या इमारतीकडे घेऊन गेला. ते दोघे त्या इमारतीच्या अंगणात इमारती जवळ पोंचे पर्यंत इमारतीचे दार उघडले गेले आणि दोन आजानु बाहू बाहेर आले आणि पद्मपाद व पिंगळला त्यांनी लवून नमस्कार केला.

पिंगळने त्यांच्याकडे आश्चर्य करीत विचारले–"पद्मपाद, हे कोणरे?"

"हे आपली तीन दिवस करमणूक करायला आलेले मायावी राक्षस आहेत. आपण येथे माशा मारीत बसणे शक्य नाही, होय ना? या पिशाच्च मल्लांना कुस्ती, लाठी काठी फिरविणे, तलवारी द्वंद्व वगैरे खेळ करायला लावून आपण आपले



मनोरंजन करून घेऊं या." पद्मपाद म्हणाला.

पिंगळ व पद्मपाद त्या महालात गेले. ते एका दाराने एका मोठ्या दालनात शिरत असतां, पिंगळला तेथें अनेक पहेलवान दिसले. ते कसरत करीत होते, तो त्यांच्याकडे पहात म्हणाला–"हे सर्व मिळून आपल्याला काही अपाय तर करणार नाहीत ना?"

"तसं भिण्याचं मुळीच कारण नाहीरे, पिंगळ!" असे म्हणत पद्मपाद पुढे निघाला आणि त्याने त्याला समोर दिसलेल्या एका मल्लाला काही तरी हळूच सांगितले. ते तेथून लगेच निघून गेले.



पिंगळ व पद्मपाद त्या दालनात मोठ-मोठ्या रेशमी गाद्या गिर्द्या होत्या त्यांना टेकून बसले. काही वेळाने सोन्याच्या ताटांत निरनिराळ्या प्रकारची पक्वान्ने वाढून घेऊन काही अप्सरे सारख्या अती सुंदर स्त्रिया आल्या. त्यांना पाहताच पिंगळ पद्मपादला म्हणाला–"या गंधर्व स्त्रिया आहेत का रे किंवा त्यांचे रूप घेऊन आलेल्या पिशाचिनी आहेत?" माझा फारच गोंधळ उडून गेला आहे मला सुचतच नाही.

पद्मपाद 'शू:' असे म्हणत पिंगळाला गप्प रहायला सांगून म्हणाला–"पिंगळा! इतक्या मोठ्याने बोलू नकोस. पिशाचिनींला काय वाटेल, कोण जाणे! आपली सेवा करायला आलेल्या पिशाचिनीच असल्या तरी आपण असे घाबरून चालणार नाही. ते बरोबर नाही. त्यांना हे तीन दिवस आपण गंधर्व स्त्रियाच मानून चालू या."

त्यानंतर पद्मपाद व पिंगळने जेवून घेतले. तितक्यात त्या दोघां आजानुबाहू मल्लांनी काही मल्ल पिशाचांना, योध्यांना तिकडे आणले. त्यांनी निरनिराळी रूपे धारण करून कुस्ती व खड्गयुद्ध करून पिंगळ व पद्मपादाची करमणूक केली.

अशा तऱ्हेने तीन दिवस निघून गेले. चवथ्या दिवशी पद्मपादने तो महाल व त्यात राहणारे मायारूप धारण करणारे मल्लांना व सुंदर स्त्रियांना आपल्या मंत्र-बलाने अदृश्य केले. या पूर्वी तो नदीच्या काठी समाधी घेऊन बसला होता तेथे आला. शांतपणे चहूकडे पाहिले.

पद्मपादने पाण्यात बुडालेल्या देवळाकडे बोट दाखविले व म्हणाला–"पिंगळा, आतां मी नदीचे पाणी आटवतो बरं का! या खेपेस तू महामायिकाच्या देवळात प्रवेश करते वेळी तू कोणत्या गोष्टी लक्षात ठेवल्या पाहिजेस ते पुन्हां सांगण्याची गरज नाही."

"पद्मपाद, ते सर्व तू आतां सांगण्याची गरज नाही. तेव्हां खाल्लेला मार आणि त्यामुळे अंगाला येत असलेल्या कळा अद्याप नाहीशा झालेल्या नाहीत. मी काही विसरलोच असेन तरी तुझ्या रूपात मला फसविले होते त्या महामायिकाची मुखाकृती मी विसरणार नाही. या खेपेस मी त्याचा शेवट केल्याशिवाय राहणार नाही." पिंगळ म्हणाला.

पद्मपादने मंत्राचा जप सुरू केला आणि काही वेळाने सर्व पाणी आटून गेले. पिंगळ निर्भयपणे सरळ देवळाच्या पहिल्या दारा-जवळ गेला आणि सापाने फडा काढल्या बरोबर त्यावर आपला हात ठेवला. तो सांप जागच्या जागी मरून पडला त्या पाठोपाठ कर्ण कठोर आवाजात प्रश्न ऐकू आला.

"माझे नाव पिंगळ, मी अवंती नगरीचा कोळी आहे." असे म्हणत पिंगळने दोन्ही दारे ढकलली. दारे सताड उघडली गेली. एक आजानुबाहू देहधारी काळा कभिन्न माणूस तलवार उपसून पुढे आला. तो पिंगळचा गळा धरायला गेला, पण पिंगळनेच त्याचा गळा धरला आणि तो आजानुबाहू राक्षस तत्काळ मरून जमिनीवर पडला. सर्व अगदी मागच्या खेपेस झाले होते तसेच झाले.



पिंगळ एका मागून एक पांच ही दारे पार करून गेला आणि सहाव्या दारा-जवळ आला तेव्हां दाराच्या बाजूला पिंगळची आई अश्रू ढाळीत अगदी दीन होऊन त्याला म्हणत असलेली दिसली–"पिंगळा! कशाला हे सर्व कष्ट सहन करतो आहेस रे? मागे फिर! तो पद्मपाद मला ठार करण्याच्या प्रयत्नात आहे!"

पिंगळ क्षणभर थक्क होऊन तिच्याकडे पहात राहिला. त्याला गेल्या खेपेस घडलेल्या सर्व गोष्टी आठवू लागल्या. मागच्या खेपेस पद्मपादच्या रूपात दिसलेले पिशाच होते. तेच आतां आईचे रूप घेऊन



मला फसवायला आलेले असले पाहिजे! पिंगळला असें वाटले.

"दारातून बाजूला हो प्रथम! तू कोण आहेस हे मला माहीत आहे. माझ्या आईच्या रूपात आली असलीस तरी मला फसवू शकणार नाहीस!" असे म्हणत पिंगळने दाराच्या बाजूला असलेली एक तलवार उचलली आणि पुढे निघाला. ती पिशाचिनी मोठ्याने किंकाळी फोडून एकदम अदृश्य झाली.

पिंगळ मोठ्याने हसला आणि तलवार फेंकून देऊन दार जोराने ढकलले आणि आत गेला, समोर रेशमी पडदे वाऱ्याने फडफड करीत असलेले दिसले. त्या पातळशा पडद्या पाठीमागे एक उच्च आसन चकाकत असलेले दिसले.

पिंगळने रेशमी पडदा बाजूला सारला आणि आत गेला रत्नमाणिक्यांच्या कांतीत दैदीप्यमान होणाऱ्या सिंहासनावर महामायिक योगनिद्रेत असल्या सारखा डोळे मिटून बसला होता. पिंगळला क्षणभर असे वाटले की महामायिक जिवंतच आहे. तो श्वास घेण्या करितां छाती वर करून एकेक पाऊल पुढे टाकीत महामायिकाच्या अगदी जवळ जाऊन पोचला. त्याची दृष्टी महामायिकच्या उजव्या हाताच्या बोटांवर होती. पिंगळला एका बोटांत चकाकणारी अंगठी दिसली.

पिंगळ धीर करून पुढे गेला आणि त्याने महामायिकाच्या बोटातली अंगठी काढली. आता त्याला हव्या होत्या त्या आणखी दोन वस्तू! एक हिरे माणिक्याने मढवलेली मूठ असलेली तलवार. ती महामायिकाच्या कंबरेला अडकविलेली होती. त्याने ती महामायिकाच्या कंबरेतून काढून घेतली आणि आपल्या कंबरेला अडकविली. आतां उरलां तो भूगोल मात्र! तो कुठे दिसतो कां. म्हणून पिंगळने चौफेर हिंडून पाहिले परंतु त्याला काही दिसला नाही नंतर तोपुढे गेला तेव्हां एक प्रकाश त्याच्या कडे येत असलेल दिसला.

पिंगळने एकदा चारी बाजूला नजर फिरवून पाहिले. त्याला एक बाजूला पायऱ्या दिसल्या. त्या पायऱ्यांच्या तळाला एका उंच चौकीवर गोल चंद्रा सारखा चकाकणारी एक गोल वस्तू दिसली. तोच भूगोल होता आणि चकाकत होता. पिंगळ त्याच्या जवळ गेला आणि भूगोलात पाहिले. त्यात निरनिराळे देश त्यांची सरहद्द, त्या त्या देशात कामात गर्क असलेले त्या त्या देशाचे लोक पिंगळला स्पष्ट पणे दिसले.

महामायिकाच्या समाधीतून त्याला मिळवायच्या होत्या त्या तीनही वस्तू पिंगळला मिळाल्या होत्या. तो भूगोल खांद्यावर घेऊन अगदी शेवटी म्हणून महा-मायिकाला सिंहासनावर बसलेला पाहून बाहेर निघाला.

पिंगळ महामायिकाच्या समाधीच्या खोलीतून बाहेर येणार इतक्यात कानाला गोड वाटणारे बारीक आवाजांत कोणी गात असल्याचा आवाज ऐकू आला– "शाबास पिंगळ! तुझे धैर्य व साहस, हुशारीची आम्ही सर्वच प्रशंसा करतो." हे शब्द पिंगळला ऐकू आले. तो आवाज महामायिकाचाच असावा असे वाटून पिंगळने मागे वळून पाहिले. परंतु चेहऱ्यावर किंवा कोणत्याही अवयवांवर हालचाल झाल्याचे चिन्हही दिसले नाही.

पिंगळ सर्व दारे ओलांडून बाहेर आल्याबरोबर पद्मपादने आनंद व उत्साहाने टाळ्या वाजविल्या व म्हणाला– "पिंगळा, आपण यशस्वी झालो. आतां या जगात आपल्या बरोबरीचा कोणी उरला नाही." असे म्हणत पुढे धांवतच आला.

त्याच वेळी नदीच्या खोल डोहातून ज्वालामुखी फुटावा तसा मोठा आवाज ऐकू आला. त्याच वेळी ताड वृक्षा एवढी जाडजूड व उंच जलधारावर उडू लागली. पद्मपादनी पाहतांच दचकून एक पाऊल मागेउडी मारून गेला. (क्रमशः)



# शक्तिहीन राक्षस

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि स्मशानाच्या दिशेने मौन पणे चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला– "राजा, तू इतके श्रम करीत आहेस त्याला कारण काय, असेल हे मला कळत नाही. काहीतरी अशक्य असे काम करून शक्ती संपन्न अशा मुनीकडून शाप मिळवून तू या संकटांत तर पडला नाहीस? खरे मुनी तात्कालिक रागवश होऊन शाप द्यायला निघाले तरी त्या शापापासून मुक्त होण्याचा मार्गही सांगतात. परंतु मुक्ती मिळविणे शापग्रस्त व्यक्तीच्या बौद्धिक बलावर आणि परिस्थिती अनुकूल असण्यावर अवलंबून असते. त्याचे उदाहरण म्हणून कित्येक शास्त्रें शिकून निष्णात झालेल्या रत्नदीप नावाच्या तरुणाची गोष्ट मी तुला



सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

रत्नदीप नावाच्या एका तरुण युवकाने सर्व शास्त्रांचे अध्ययन करून दक्षिणेकडील आपल्या गांवी जात असतां एका घनदाट अरण्यात एका मुनीला पाहिले. त्या मुनीला पाहतांच रत्नदीपच्या मनांत एक विचार आला. आपण काशीत अनेक गुरूंची सेवा करून व मेहनत करून जे ज्ञान संपादन केले आहे त्यामुळे अशक्य अशी मंत्रशक्ती साध्य करू शकलों नाही. परंतु तशी मंत्रशक्ती तपश्चर्या करून प्राप्त करतां येईल. त्या साठी या मुनीची सेवा करणे आवश्यक आहे.

त्या मुनींकडे शिष्य असा कोणीच नव्हता. एका झाडाखाली एका झोपडीत ते मुनी रहात होते. शेजारच्या एका डोंगरी ओढ्यावर स्नान करून ते आपल्या झोपडीत परत येत असतां रत्नदीपने त्यांना साष्टांग प्रणिपात केला व उठून तो कोण वगैरे सांगितले व तो कोणत्या हेतूने त्यांच्याकडे आला होता ते सांगितले मुनी त्यांच्याकडे प्रेमादराने पहात हंसले.

त्या दिवसापासून रत्नदीप मुनीची सेवा करू लागला. सहा महीने लोटले या अवधीत मुनी रत्नदीपशी एका शब्दाने ही काही बोलले नाहीत, झोपडी समोरच्या एका झाडाखाली पद्मासन घालून समाधी घरून ते बसत असत, रत्नदीपन त्यांना दोन तीनदां तपोनिष्ठ होण्यास एखादा मंत्र सांगावा अशी विनंती केली. मुनी स्मित करून गप्प झाले.

हळू-हळू रत्नदीपच्या मनांतील श्रद्धा भक्ति भावना कमी होऊ लागली. एवढेच नव्हे तर तो त्या मुनींचा द्वेष ही करू लागला. हा गृहस्थ कोणता तरी मोठा गुन्हा करून राजाच्या शिपायांची नजर चुकवून या दाट अरण्यात लपून तर बसला नसेल, असेंही रत्नदीपला वाटले.

एके दिवशी मुनी ध्यानमग्न होऊन बसले असतां रत्नदीपने त्यांचे खांदे धरून खूप जोराने हलविले व म्हणाला—"मी गेले सहा महिने तुझी सेवा करतो आहे, एकदां सुद्धां तू तोंड उघडून माझ्याशी बोलला नाहीस, आजपर्यंत तू आपल्या तप:शक्तीचा प्रताप मला दाखविला नाहीस. तू खरोखरचा मुनीच आहेसना?"

मुनीचे ध्यान भंग झाले. त्याने रागाने डोळे लाल करून रत्नदीपकडे पाहिले व म्हणाला—"अरे मूर्खा! माझी तप:शक्ती कशी आहे, हे तू आतांच पहा तर! तू केवळ स्वार्थ बुद्धीने तू माझ्याकडे येऊन राहिलास. ती गोष्ट मानवमात्रास नैसर्गिक अशीच आहे. त्या बद्दल मी तुला दोष देत नाही. परंतु आतां तू जसा वागलास ते राक्षस स्वभावा प्रमाणे होते. म्हणून तू यापुढे राक्षसच होशील. परंतु तुला राक्षसां सारखी शक्ती मात्र नसेल. त्या रूपात तू काही पुण्यकार्य केलेस तर तुला मानवरूप प्राप्त होईल."

दुसऱ्या क्षणाला रत्नदीप राक्षस झाला आणि त्या जंगलाच्या दुसऱ्या भागात जाऊन पडला.

एके दिवशी वीरसेन नावाची एक शूरवीर व्यक्ती देशाटन करीत त्या अरण्यमार्गाने जात असतां रत्नदीप राक्षस झाडावरून अकस्मात उडी मारून त्याच्या



समोर उभा राहिला व म्हणाला—"कायपण हृष्ट पुष्ट माणूस आहे, माझे केवढे भाग्य!"

राक्षसाला पाहून वीरसेन थोडा देखील भ्याला नाही व तलवार उपसून म्हणाला—"तुझे तुकडे-तुकडे करून टाकतो. प्रथम त्या गोष्टीस तू तयार आहेसना?"

राक्षस हंसून म्हणाला—"तू माझ्या पायाच्या नखा एवढा सुद्धा नाहीस. पण तुझे साहस पाहून मात्र मी तुला शाबासकी देतो. मी डोळे मिटून पुन्हा उघडायच्या आत तू मला सांपडणार नाहीस इतका दूर तू निघून गेलास तर मी तुला सोडीन!"












"तू मला जिवंत सोडायला तयार असलास तरी मी मात्र तुला जिवंत सोडणार नाही." या शब्दांत वीरसेनाने राक्षसालाच उलट दटाविले. ते उत्तर ऐकून राक्षसाचा सर्व ताठरपणा विरघळून गेला. तो म्हणाला—"तू माझ्या दरडावण्याला भिशील असे मला वाटले होते. मला राक्षसा सारखा मोठा आकार मात्र आहे, बाकी त्याच्या सारखी शक्ती मात्र माझ्यात् नाही. कोणी भित्रा मिळाला तर त्याला मारून आपले पोट भरेल या विचाराने मी ते बोललों."

"तुझा देह इतका मोठा आहे, पण तुझ्या अंगात शक्ती नाही असे म्हणतोस, हे कसे काय?" वीरसेनाने विचारले.

"कधी काळी मी मानवच होतो. एका मुनीच्या शापानें मला हे रूप प्राप्त झाले. माझ्या मुळे कोणत्याही मानवाचे नुकसान होऊ नये, म्हणून त्या मुनीने मला राक्षसाची शक्ती दिली नाही. तुझ्या माहितीत कोणी भित्रा असेल तर सांग!" राक्षस म्हणाला.

"तुला या जगात भित्रे कमी आहेत असे वाटेल का?" वीरसेनाने विचारले.

"होय रे! मी या जंगलात कोणाला पाहिले तर ती व्यक्ती धैर्याने माझ्याशी बोलेल. मुनीने दिलेल्या शापाची गोष्ट त्यांना माहीत झाली की काय, कोणास ठाऊक?" राक्षस म्हणाला.

"तसं काही नाही. साहसी लोकच या अरण्यात पाऊल टाकतात. तुला भित्रे लोकच हवे असतील तर तुला मानव वस्तीतच गेले पाहिजे." वीरसेन म्हणाला.

राक्षसाने वीरसेनचे आभार मानून जंगल सोडले आणि एका गावी जाऊन राहू लागला. तेथे त्याला सोमू नावाचा एकजण भेटला. राक्षसाला पाहूनही तो थोडादेखील भ्याला नाही.

राक्षसाने आश्चर्यचकित होऊन त्याला विचारले—"मला पाहून तुला भीती वाटत नाही का?"

"मला मरणाची भीती नाही. मुळात मी काही खायला नाही म्हणून मरतो आहे!" सोमू रागाने म्हणाला.

"या गावात मरणाची भीती कोणास आहे सांग पाहू!" राक्षस म्हणाला.

"त्या भीमूला मरणाची भीती वाटते!" सोमू म्हणाला.

राक्षस लगेच त्या भीमूकडे गेला. परंतु भीमू सुद्धा राक्षसाला पाहून भ्याला नाही.

जिवंत राहण्याची अनेक औषधे दररोज खाऊन खंगत चाललो आहे. तू मला गिळून टाकलेस तर ही पीडा कायमची जाईल!" भीमू म्हणाला.



राक्षसाने विश्वास सोडला आणि विचारू लागला—"तू जिवंत रहावास, असा विचार करणारे, तुला माहीत असलेल्या लोकांत कोणी नाहीत काय?"

"माझा इलाज करणाऱ्या दीक्षितांना माझ्या जगण्यावर फार विश्वास आहे, असे मला वाटते. माझ्या जवळून त्यांनी खूप पैसे उकळले आहेत. पुढेही उकळतांयावेत यासाठी ते माझा आजार बरा होऊ देत नाहीत, असा मला संशय आहे." भीमू म्हणाला.

राक्षस दीक्षित नावाच्या वैद्याकडे गेला. राक्षसाला पाहून तेही मुळीच न भितां म्हणाले—"मला बायको म्हणजे पंचप्राण! तिच्यासाठीच मी मेहनत करून पैसे मिळवतो आहे. कालच ती सर्व पैसे घेऊन माहेरी निघून गेली. तेव्हां तू मला खाऊन आपली भूक भागव!"

राक्षस हताश झाल्यासारखा म्हणाला—"माझ्यात ती शक्ती नाही. कोणी भित्रा मला पाहून भ्याला तर त्याला खायचा विचार मी करीत आहे. मला मुक्त करण्यासाठी कोणी देवाची पूजा केली तर माझ्यामुळे देवाची पूजा झाली या पुण्यलाभाने तरी मला राक्षस रूपातून मुक्ती मिळेल. तेव्हां कोणी भित्रा मला मुक्त करण्यासाठी मिळत नाही."

"या गावात कमालीचा चिक्कू म्हणून गोपू नावाचा एक प्रसिद्ध भित्रा आहे.



त्याला जीवितावर फार प्रेम आहे!" राक्षस गोपूकडे गेला. गोपू राक्षसाला पाहून थरथर कापू लागला.

राक्षस त्याला म्हणाला–"माझ्या वतीने चार दिवस शंकराच्या देवळात जाऊन अभिषेक कर. मी तुला त्रास देणार नाही."

गोपू म्हणाला–"अभिषेक करावयाचा म्हणजे पैसे खर्च होणार ते मला शक्य नाही."

"तर मग मी तुला खाऊन टाकतो!" राक्षस म्हणाला.

"मला तू खाणारच असशील तर खा पण पैसे खर्च होता कामा नयेत!" गोपू

पैसे खर्च करावे लागणार म्हणतांच त्याला एकाएकी साहस आले.

"आपल्याला या राक्षस रूपांतून मुक्ती नाही तर!" असा विचार करीत राक्षस आणखी एका गावी जायला निघाला.

जातांना तो निघाला होता त्याच गावाच्या वेशी जवळ पोंचला असेल, तेथे राक्षसाला उत्साहाने गाणे म्हणत उड्या मारीत फिरत असलेला सोमू दिसला. राक्षसाने त्याला विचारले–"आतां मोठा आनंदाने नाचतो आहेस की?"

सोमू राक्षसाला पाहून थरथर कांपत म्हणाला–"मला काही करू नकोस, मला आणखी जगायचे आहे. भीमू मला त्याचे सर्व धन वैभव देतो, म्हणतोय. त्याने विचार त्याला फार दिवस जगणे शक्य नाही, तेव्हां माझ्या सारख्यावर उपकार करावे से वाटले. ही सर्व तुझी कृपा आहे!" असे म्हणत सोमूने हात जोडून नमस्कार केला.

हे सर्व कसे काय झाले हे कळावे म्हणून राक्षस भीमूच्या घरी गेला. त्याला पाहतांच पायांपासून डोक्यापर्यंत भीमूचे अंग हादरले.

"तुला सुद्धां जगण्याची इच्छा होऊ लागली आहे म्हणावयाची!" राक्षस

"तू त्या दीक्षितांला काय दिलेस कोणास ठाऊक, पण त्याने थोड्या वेळापूर्वी घाईघाईने येऊन त्याने मला एक गोळी दिली. त्या गोळीने अर्धाअधिक त्रास कमी झाला मेहरबानी करून मला काही दिवस जगू दे!" भीमू म्हणाला.

राक्षस दीक्षितांकडे गेला. त्याला जगायची इच्छा झाली. भीमूला औषध देऊन परतल्यावर त्याची बायको परत आलेली दिसली. माहेरच्या वाटेने अर्धी वाट चालून गेल्यावर तिला पश्चात्ताप झाला, म्हणे. ती परतल्या नवऱ्याचे पायधरून क्षमा मागू लागली. त्यामुळे दीक्षितांना जिवंत राहण्याची इच्छा उत्पन्न झाली!

राक्षसाला आतां भितरे मिळाले. पण त्यांच्यांत झालेला बदल ज्यामुळे झाला त्यामुळे त्यांना काही करण्यास त्याचे मन मानेना. तेथून तो पुन्हा सोमूच्या घरी जावे व त्याच्याशी बोलावे असा विचार करून निघाला, पण क्षणार्धात त्याचे शरीर आकुंचन पावून पहिले रत्नदीपाचे रूप त्याला आले. वेताळ येथवर कथा सांगून म्हणाला–"राजा, मुनीच्या शापाने राक्षस झालेला रत्नदीप कोणतेही पुण्यकार्य केल्या शिवाय कसाकाय राक्षस रूप घालवू शकला? याप्रश्नाचे उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्या पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला-"राक्षसा कोणतेही पुण्यकार्य केले नाही, असे म्हणणे बरोबर नाही. त्याला वाटले असते तर जगण्याची इच्छा असलेल्या तिघांना त्याला खाऊन टाकतां आले असते. पण तसे त्याने केले नाही. किती पूजा अभिषेक केले असते तरी तिघां जिवंत माणसांना न खाणे हे पुण्यकार्य मोठे नाही का? त्या पुण्याचा परिणाम म्हणून त्याचे राक्षस रूप जाऊन त्याला मूलरूप प्राप्त झाले."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग झाले, वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि पुन्हां जाऊन झाडाला लोंबकळू लागला. (कल्पित)



# कलेचा पुरस्कार

कलिंगपूरच्या जमिनदाराला कलाकार म्हटला की त्याला मुळीच आवडत नसे कोणी कवी आहे म्हटलं की त्याला तुरुंगात टाकावे असे तो म्हणे. कोणी उत्तम गाणे म्हणून दाखवितो, म्हटले की तो दोन्ही कानावर हात ठेवीत असे.

जमिनदाराची ही विचित्र वागणूक व स्वभाव पाहून इतर जमिनदारांमध्ये त्याचा मान कमी होईल की काय ही भीती त्याच्या दिवाणाला वाटे. असे असून ही एकदां जमिनदाराने "एका चांगल्या चित्रकाराला माझ्याकडे पाठवा!" असे आपल्या दिवाणाला सांगितले.

जमिनदारात हा बदल घडून आलेला पाहून दिवाणाला फार आनंद झाला व त्याने एका निष्णात चित्रकाराला जमिनदाराकडे पाठविले व म्हणाला–"जमिनदाराकडे जाणाऱ्या कलाकारात तूच पहिला! तू त्याच्याकडून कशी शाबासकी मिळवितोस, हे पाहूया!"

एका तासाने तो चित्रकार परत येऊन दिवाणाला, म्हणाला–"आपल्या जमिनदाराला कलेची आवड नाही म्हणणारे अगदी कमी समजूत असलेले आहेत, म्हणायचे त्यांनी एक तासभर बसून त्यांच्या पूर्वजांच्या कोळिष्टके आणि धुरशी लागलेल्या तसबिरी काढवून पुसविल्या. त्याबद्दल पारितोषिक म्हणून दिले-पुरे दहा रुपये!"

ते ऐकल्यावर दिवाणाच्या तोंडाबाहेर एक शब्दही पडला नाही. —श्री स. ना. साने





# लोकरीत

धर्मू कष्ट करी मजूर होता. दिवसभर मेहनत करून तो जो कमाई करून आणी त्यावर संसाराचे गाडे चालू होते.

त्याचा संसार म्हणजे सुदाम्याचा संसार होता. आपल्या गरीबीमुळे एवढा मोठा संसार चालविणे त्याला कठीण जात होते. त्या शिवाय चार मोठ्या मुली असल्यामुळे चार लहान मुलगे काम करू लागे पर्यंत थांबणे शक्य नव्हते, कारण मुलीचे वय लग्नाचे झाले होते.

मुलींची लग्ने करणे धर्मूच्या शक्ती बाहेर होते. तो कामावरून सायंकाळी घरी परत आला की त्याची बायको पार्वती मुलींच्या लग्नाची गोष्ट काढीत असे.

धर्मू बायकोकडे हताश नजरेने पाही, एवढेच त्याला शक्य होते.

त्याची लहान मुलं आपल्या मोठ्या बहिणींच्या लग्नासाठी चार पैसे मिळवायला व त्यासाठी लागणारे कष्ट करायला सिद्ध झाले. लहान मुलांकडे पाहून, त्यांना इतक्या लहान वयात कामाला लावणें धर्मूला मान्य नव्हते. त्याने त्यांना नको म्हटले, परंतु मुले ऐकेनात व बापाच्या बरोबर कामावर जायला तयार झाली.

धर्मूच्या परसातल्या कडुलिंबाच्या झाडावर गृहदेवता-पतिपत्नी रहात असत.

त्यांच्यापैकी पुरुष बायकोला एके दिवशी म्हणाला–"आपण दोघं या घराच्या आणि त्यांच्या परसांतील झाडाच्या आश्रयाला राहातो आहों, नाही का? परंतु आपण इतक्या गरीब धर्मूला कोणत्याही प्रकारचे सहाय्य केले नाही. काही तरी मदत केली तर बरें होईल, होय ना?"

ते ऐकून बायकोला सुद्धां धर्मूची कीव आली व म्हणाली–"होय, काही तरी



मदत करणे बरे होईल. यांचे कुटुंब किती दुर्दैवी आहे! यांचे भाग्य पालटले आणि यांना ही गरीबी भोगू लागू नये. आपण कोणत्या प्रकारे यांना मदत करणे बरोबर होईल?"

"थोडेसे पैसे आणून आशा जागी टाकावे की धर्मूची त्यांवर नजर पडेल. ते मिळाले तर त्याचे कष्ट कमी होतील. कोणत्याही प्रकारची काळजी न करतां त्याला आपल्या मुलींची लग्ने करतां येतील." पुरुष देवता म्हणाला.

त्याच्या बायकोने होकार दिला. दोघांनी एके दिवशी रात्री धर्मूच्या परसांत विहिरी जवळ पैशांची एक पिशवी टाकली.

सकाळी उठतांच धर्मू परसात गेला तेव्हां त्याला ती पिशवी दिसली. त्याने पिशवीचे तोंड उघडून पाहिले. त्याचा डोळ्यांवर विश्वास होईना. डोळे फाडफाडून पाहू लागला. आनंदातीरेकाने मोठ्याने ओरडला. तो आवाज ऐकून घरातली सर्व मंडळी धावत आली. सर्वांची नजर पैशांच्या पिशवीवर पडली.

सर्वात आधी धर्मूचा मोठा मुलगा, तो त्याच्या चौघांमुलींच्या पाठीवर झालेला मोठा होता—बापाला म्हणाला—"बाबा, आपण या पैशाच्या भांडवलावर मोठा व्यापार करू या आपले दारिद्र्य कायमचे जाईल."

धर्मूची मोठ्या मुलाच्या पाठीवर झालेली तीन मुले आपल्या मोठ्या भावाकडे रागाने पहात म्हणाली—"ते नाही चालायचे! आम्ही ते पैसे खर्च करून चांगले कपडे शिवून घेतो उरलेले पैसे खर्च करून शहरात जाऊन कोणत्या तरी गुरू कडे विद्याभ्यास करू."

मुलांनी असे म्हटल्यावर धर्मूची बायको ओरडली—"थांबा रे, जरा!" त्यांना रागावून ती पुढे म्हणाली—"मला कित्येक दिवसांपासून सोन्याचे दागिने करून घ्यावेसे वाटत होते. परंतु गरीबीमुळे आजपर्यंत ते शक्य झाले नाही. मी हे पैसे खर्च करून दागिने करविते."

धर्मू सर्वांना गप्प रहायला म्हणून हाताने खूण करून म्हणाला—"हे पैसे खर्च करून आपण एक चांगलेसे घर बांधूया नंतर थोडेसे शेत विकत घेऊ या. तेव्हां कोठे गावात आपल्याला मान वर करून हिंडतां फिरतां येईल. म्हणून मी सांगतो ते ऐका आणि या पैशावर कोणीही नजर ठेवू नका!"

धर्मूपासून थोड्या अंतरावर लग्नाचे वय झालेल्या चौघी मुली उभ्या होत्या. पण त्यांच्यापैकी एकही काही बोलली नाही. परंतु त्यांच्या मनांत, त्यांच्या लग्नाविषयीं कोणीच काही कसा बोलत नाही, ही गोष्ट सारखी येत होती.

कडुलिंबाच्या झाडावर बसून हे सर्व ऐकत असलेल्या गृहदेवतांना, धर्मूचे, त्याच्या बायकोचे आणि मुलांचे विचार ऐकून फारच आश्चर्य वाटले.

पुरुष बायकोला म्हणाला—"ऐकल्यासना यासर्वांच्या काय इच्छा आहेत त्या? आतापर्यंत मुलींच्या लग्नाची गोष्ट कोणी काढली नाही. प्रत्येकाला आपली इच्छा पूर्ण करून घ्यायची गोष्ट तेवढी सुचते आहे. मुलींच्या सख्या आईला सुद्धा मुलींच्या लग्नाची गोष्ट आठवली नाही. ती आपली जबाबदारी विसरली. तिला दागिन्यांचा मोह आहे. याला लोकरीत म्हणायचे की काय हेच कळत नाही!"

गृहदेवतातली बाई फार काळजींत पडली. ती म्हणाली—"होय, हा सर्व



पैशाचा मोह आहे पैसा नव्हता तोंपर्यंत सर्वांची एक वाच्यता होती. कोणालाही स्वतःचा स्वार्थ असा नव्हता. सर्वांना मुलींचे लग्न कसें होईल याचीच चिंता होती. पैसा समोर येताच ती गोष्ट विसरून सर्व आपापली इच्छा पुरी कशी होईल, याच स्वार्थाला बळी पडले. तर मग एक गंमत करूया!"

मध्यंतरी धर्मू, त्याची बायको व मुलगे, आपापली इच्छा पूर्ण व्हावी या साठी भांडत होते.

परंतु पिशवीतील सर्व नाणी बदलून दगडाची झाली. ती पाहून सर्वांची तोंडे फिक्की पडली व सर्व एक दुसऱ्यांचा चेहरा पाहू लागली.

धर्मूची बायको हंबरडा फोडून म्हणाली— "आपण पैसे पाहून मोहात पडलो, परंतु हे सर्व दगडाचे पैसे आहेत. मंत्रातंत्रांची माहिती असलेल्या कोणीतरी आमल्याला अशा तऱ्हेने फसवून खेळ केला आहे!"

सर्वांनी निराश होऊन माना खाली घातल्या. प्रथम धर्मूची बायको स्वतःला आवरून म्हणाली—"आपण सर्व हे खरे पैसे समजून यांच्या करितां परस्परांशी भांडलो व आपला हट्ट धरून बसलो समोर लग्नाचे वय झालेल्या मुली आहेत. आपल्यापैकी एकालाही त्यांची आठवण झाली नाही!"

धर्मू आपली खाली झालेली मानवर करू शकला नाही. म्हणाला—"ती गोष्टच पार विसरलों!"

मुलगे लाजेने आईला म्हणाले—"काय वाटेल तितकी मेहनत् करून आम्ही पैसे मिळवू व आपल्या बहिणींचा विवाह किती लवकर करता येईल हे पाहूं! आतांपर्यंत भांडलो ते विसरू या!"

कडुलिंबाच्या झाडावरून गृहदेवता हे सर्व पहात व ऐकत होते. धर्मूच्या कुटुंबात पैशामुळे जे भांडण उपजले होते ते नाहीसे होऊन सर्वांत एक वाच्यता आली, या बद्दल गृहदेवतांना आनंद झाला.





# धोक्याची सूचना

ब्रह्मदत्त काशीयेथे राज्य करीत असतां वारणासी येथे सेनक नांवाचा एक साधू रहात असे. बोधिसत्वांनी अनेक अवतार धारण केले, त्यांत या साधूच्या रूपे एक अवतार धारण केला होता. व तेथे रहात होता.

त्याच समयी शहराच्या जवळपासच्या एका गावी भिक्षा मागून आपला उदर-निर्वाह चालविणारा एक ब्राह्मण होता. तो शेजारच्या गांवांत भिक्षा मागून एका जंगलाच्या वाटेने आपल्या गावी परत येत होता. तेव्हां त्याला कोणी असे म्हटलेले ऐकू आले—"अरे, ब्राह्मणा, आज तू घरी गेला नाहीस तर तुला नक्की मरण येईल. तू घरी गेलास तर-तर तुझ्या बायकोचे मरण निश्चित समज!"

ब्राह्मण ती वाणी ऐकून चारी बाजूला पाहू लागला. परंतु कोणी दिसला नाही. ती विचित्र सूचना देणारे कोणी भूत किंवा यक्षतर नाहीं, अशी शंका त्याच्या मनात आली. व तो गर्भगळीत होऊन खाली बसला.

घाबरून जाऊन तो ब्राह्मण जितके लवकर जमेल, तेवढे लवकर घरी पोंचावे म्हणून ठरवून निघाला. तसे केले तर आपली बायको मरेल आणि जंगलातच राहलों तर आपणाला मरण येईल त्या शंकेने तो किंकर्तव्यविमूढ परिस्थितीत तो जागच्या जागी उभा राहिला. काय करावे न समजून काळजीत पडला.

ब्राह्मण त्या संकटमय परिस्थितीत जंगल पार करून शहरांतल्या एका रस्त्याने चालत असतां बोधिसत्व सेनक हे एका जागी पुष्कळ लोकांना धर्मबोध करीत असलेले दिसले. ते एका उंच स्थानी बसून बोलत होते आणि लोक चारी बाजूला

जमिनीवर बसून बोधिसत्व सांगत होते ते श्रद्धा भक्तिपूर्वक ऐकत होते.

तो दुर्दैवी ब्राह्मणतिकडे गेला व लोकांच्या मागे उभा राहिला. प्राणभीतीनें बोधिसत्व सांगत होते ते तो श्रद्धापूर्वक ऐकत नसूनही त्यांना पाहून निश्चेष्ट उभा होता.

काही वेळाने बोधिसत्वांनी आपले भाषण संपवितांच सर्व लोकांनी टाळया वाजविल्या. मात्र ब्राह्मण जागच्या जागी हालल्या डुलल्या शिवाय दगडाच्या मूर्ती-सारखा उभा होता.

बोधिसत्वांनी आपल्या उच्च आसना-वरून त्या ब्राह्मणाला पाहिले आणि त्याला आपल्या जवळ यायला हाताने खुणावले.

ब्राह्मणाने जवळ जाऊन मान खाली घालून बोधिसत्वांना नमस्कार केला.

बोधिसत्वांनी त्याला विचारले–"असे कोणते संकट तुझ्यावर येऊन पडले आहे?" की तू इतक्या काळजीत मग्न आहेस.

ब्राह्मणाचे डोळे पाणावले. त्याने जंगलात जी अशरीर वाणी झाली त्या विषयी सांगितले.

बोधिसत्वांनी त्याला विचारले–"ती अशरीर वाणी झाली त्या वेळी तू काय करीत होतास?"

"मी एका झाडाखाली बसून पिशवी सोडून त्यांत खायला ठेवले होते ते काढून खाल्ले." ब्राह्मण म्हणाला.



"तू ती पिशवी बंद करून ठेवलीस त्यात अन्न उरले होते ना? त्याच्या बरोबर प्यायचे पाणी ठेवले नव्हते कां. जेवण झाल्यावर तू पाणी कोठे प्यालास? बोधि-सत्वांनी विचारले.

"शेजारीच एक ओढा होता. तेथे जाऊन तहान भागविली." ब्राह्मण म्हणाला.

"तू खाल्ल्यावर पिशवीत अन्न उरले होते ना?" बोधिसत्वांनी विचारले.

"महाराज, पिशवींतले अर्धेच अन्न मी खाल्ले. उरलेले अर्धे पिशवीत राहू दिले." ब्राह्मणाने उत्तर दिले.

बोधिसत्वांनी एक क्षण स्तब्ध राहाल्यावर विचारले–" तू तहान भागविण्यासाठी ओढ्याजवळ गेलास तेव्हां पिशवीचे तोंड दोरीने घट्ट बांधले होतेस का?"

"ते मी ओढ्यावरून परतल्यावर केले. त्या नंतर पिशवी घेऊन मी निघालो." ब्राह्मण म्हणाला.

"पिशवीचे तोंड घट्ट बांधून ठेवण्यापूर्वी त्या पिशवीत काय आहे, तू पाहिलेंस का?" बोधिसत्वांनी विचारले.

ब्राह्मण त्यावेळी काय-काय झाले हे आठवण्यासाठी दोन मिनिटे थांबल्यावर म्हणाला–"नाही, मी तसे केले नव्हते!" मी काय आहे हे पाहीले नाही.

बोधिसत्व त्या अवधीत काय झाले असेल, या विषयी विचार करण्यासाठी काही वेळ थांबून त्या ब्राह्मणाला म्हणाले–










"तू झाडाखालून निघण्यापूर्वी तुझ्यावर व तुझ्या बायकोवर येणाऱ्या घोर प्रसंगा विषयी सूचना ऐकू आली. होय ना?" ती तू सांगीतलीस तशीच.

"होय महाराज! मी दहाबारा पावले सुद्धा चालून गेलो नसेन. कोणीतरी स्पष्ट आवाजांत ती विचित्र धोक्याची सूचना केली." ब्राह्मण म्हणाला.

"म्हणजे, तू झाडा जवळून निघण्यापूर्वी काही तरी घडले असावे. बहुत करून एखादा सांप खाद्यपदार्थाच्या मोहाने पिशवीत शिरला असावा. ते ज्याने पाहिले अशा यक्षाने किंवा वृक्षदेवतेने तुला धोक्याची सूचना केली असावी. तू त्या दिवशी घरी गेला नसतास तर खाण्यासाठी पिशवीचे तोंड सोडले असतेस आणि आत हात घातला असतास. सांप तुला नक्कीच चावला असता व तुझ्या मरणाला कारण झाला असता. तसे न करतां तू सरळ घरी गेला असतास तर तुझ्या बायकोने पिशवीची दोरी सोडून पिशवीत काय आहे हे पाहण्यासाठी पिशवीत हात घातला असता व तिला साप चांवल्याने मरण आले असते." बोधिसत्व म्हणाले.

नंतर त्यांनी ती पिशवी ते बसले होते त्या जागे जवळच ठेवायला सांगितली. तेव्हां लोकांच्या गर्दीत एक गारुडी होता तो पुढे आला व त्याने पिशवी सोडली. आंतून 'फूस्स' करून एक नागसाप बाहेर आला.

लगेच गारुड्याने त्या सांपाची मुंडी शिताफीने पकडली व त्याला दूर घेऊन गेला.

तेव्हां बोधिसत्व ब्राह्मणाला म्हणाले– "आता तुला मुळीच भिण्याचे कारण नाही. तू निर्भयपणे घरी जा."

ब्राह्मण बोधिसत्वांचे आभार मानून घरी निघाला. त्यावेळी त्याचे मन हलके झाले होते.





## छत्रपति शिवाजी-१

मोगल साम्राज्याला धडकी बसविणारा वीरशिवाजी इ. स. १६२७ (१६३०१) मध्ये जन्मला. शिवाजीच्या वडिलांचे नाव शहाजी. शहाजी राजे विजापूर दरबारात एक जहागीरदार होते. शिवाजीचे बालपण पुण्यास त्यांच्या मातोश्री जीजाबाई आणि कौटुंबिक-मित्र दादाजी कोंडदेव यांच्या देखरेखी खाली गेले.

बालपणीच शिवाजीने धैर्य साहसाची कामे करून आसपास राहणाऱ्या मावळे लोकांची मने आकर्षित केली होती. हळू-हळू मावळे शिवाजीला आपला नायक म्हणून मान देऊ लागले.





शिवाजी एवढा शूर, वीर व साहसी होता, परंतु त्याला त्या गोष्टीचा तिळमात्र गर्व नव्हता. त्याला धर्माचा फार अभिमान होता. त्या काळात-प्रजे मध्ये ऐक्य भावना व धर्मभावना उद्दीपित करणारे साधू स्वामी समर्थ रामदास हे होते. शिवाजीच्या मनांत समर्थांविषयी अत्यंत आदरभावना



थोड्याच दिवसात शिवाजीने एक छोटेसे सैन्य उभे केले. सर्व सैनिकांची शिवाजीवर अनन्यभक्ती होती. त्यांची मदत घेऊन शिवाजीने विजापूर सुलतानाचे लहान मोठे किल्ले सर करायला सुरवात केली. ते कळल्यावर विजापूरच्या सुलतानाने शिवाजीला चिरडून टाकण्यासाठी आपला बहाद्दूर सरदार अफझल खान याला पाठविले.

अफझल खानाच्या अवाढव्य सैन्याला शिवाजीच्या लहानग्या सैन्याने छापे मारुन नामोहरम केले. शिवाजीने अफझल खानाशी एकांतात बोलणी करण्यासाठी दूताकरवी निरोप पाठविला. अफझल खानाने ते मान्य केले. ठरल्यावेळी ठरल्या जागी दोघे शत्रू समोरासमोर येऊ लागले.





शिवाजीने प्रेमालिंगन करण्यासाठी म्हणून हात पुढे केले. अफझलखानाने शिवाजीचा गळा आपल्या काखेत दाबून टाकण्याचा प्रयत्न केला. शिवाजीने तो बेत प्रथमच ओळखून, त्यासाठी सिद्ध होऊन गेला असल्यामुळे, डाव्या हातात लावून ठेवलेल्या वाघनखांनी अफझलखानाची आतडी बाहेर काढून त्याला ठार केले.

शिवाजीने आतां मोगलांचा मुलुख जिंकायला सुरवात केली. तेव्हां औरंगजेब बादशाहने त्याचा मामा व मुख्य सेनापती शाइस्ताखान याला एक-एक मोठे सैन्य देऊन शिवाजीवर पाठविले. शाहिस्ताखानने शिवाजीने जिंकलेले किल्ले जिंकायचा विचार करुन पुण्याला तळ टाकला. शिवाजी शाहिस्तेखान उतरला होता तेथे गेला.





शिवाजी निवडक वीस जणांबरोबर शाहिस्तेखानांवर तुटून पडला. शिवाजी तलवार उपसून शाहिस्तेखान झोपला होता तेथे गेला. शाहिस्तेखान खिडकी द्वारे पळून जाऊ लागला. परंतु त्या गडबडीत शिवाजीची तलवार लागून शाहिस्तेखानाची तीन बोटे कापली गेली.

औरंगजेबाच्या बाजूने राजा जयसिंगने शिवाजीशी सलोख्याची बोलणी सुरु केली. सर्व तऱ्हेने शिवाजीच्या रक्षणाची हमी देऊन जयसिंगाने शिवाजीला आग्याला औरंगजेबाशी बोलणी करण्यास जाण्याचे कबूल करविले. शिवाजी आपला थोरला मुलगा संभाजी याच्यासह आग्याला गेला. तेथे कबूल केल्या प्रमाणे त्याचा योग्य सत्कार झाला नाही.





पितापुत्रांना एका वाड्यात नजरकैदेत ठेवण्यात आले. आपला हाडवैरी कैद झाला याबद्दल औरंगजेबला परमानंद झाला. शिवाजीने आजारी पडल्याचे सोंग केले. तो पेटारे भरून पक्वान्ने गोर गरिबांना वाटू लागला. कदाचित् ते पुण्य कार्य केल्याने तब्येत सुधारेल असे जाहीर करण्यात आले.

एकेदिवशी तब्येत सुधारल्याचे सांगून पक्वान्नांचे करंडे भरभरुन सरदार नबाबांकडे पाठविण्यात येऊ लागले. शिवाजी संभाजी एका मोठ्या पेटाऱ्यात बसून निघून गेले. पाहरेकऱ्यांना संशय आला नाही. औरंगजेबाला ती गोष्ट फार उशिरां कळली.





संन्याशांचा वेष करुन शिवाजी व संभाजी आग्र्याच्या बाहेर निघून गेले गावाच्या शिवेवर शिवाजीचे अनुयायी घोडे घेऊन सिद्ध होते. काही दिवसांनी शिवाजी व मुलगा संभाजी पुण्यास सुखरूप आपल्या कुटुंबियांस येऊन भेटले. शिवाजीला शांत करण्यासाठी औरंगजेबाने शिवाजीला 'राजा' ही पदवी दिली.

# पटणारा सल्ला

किसन ऐन तारुण्यात होता. आजानुबाहू देह-ऐटदार मिशा, पाहणाराला यमदूतच वाटावा असे भयंकर रूप तो आपल्या गावात राहून भाजीपाल्याचा मळा चालवी. स्वतः भाजीपाला घेऊन बाजाराला जाई आणि तो विकी. एकदां तो भाजीपाला विकून पैशाची पिशवी कंबरेला खोचून परत घरी निघाला तेव्हां त्याचा एक मित्र त्याला म्हणाला–"किसन, दिवस बरे नाहीत. चार चोरांची नजर पडणार नाही, अशा तऱ्हेने पैशाची पिशवी कपड्यात झांकून ठेवली पाहिजे." त्याने सल्ला दिला. किसन मिशा पिळीत म्हणाला–"माझ्या जवळून चोरी ?" म्हणत आपल्या गावी निघाला.

वाटेत त्याला तहान लागली. तेथे एक विहीर दिसली त्यात उतरून पाणी पिऊन आला आणि शेजारीच एकधर्मशाळा दिसली त्यात विश्रांतीसाठी जाऊन बसला. तेव्हां एक काटकुळा माणूस त्याच्या जवळ येऊन म्हणाला–"आळस जाईल, अंग जरा चोळून देऊ का ?"

किसनने होकार दिला. त्या काटकुळ्या माणसाने अंग चोळीत मानेजवळच्या एक दोन शिरा दाबल्या. किसन बेशुद्ध होऊन पडला.

अर्ध्या तासाने किसनला शुद्ध आली. किसन घाबऱ्या-घाबऱ्या पैशाची पिशवी हुडकत असतां, तो काटकुळा माणूस येऊन म्हणाला–"ही पहा, तुमची पिशवी. पैसे बरोबर आहेतकी नाहीत नीट पहा. गावात पैशाच्या पिशवी विषयी सल्ला देणाऱ्याचे नांवकाय कोणास ठाऊक, मला माहीत नाही मला सल्ला सदाशिव म्हणतात. मी देतो तो सदा पटणारा सल्लाच देतो !"

किसनने हंसून त्याला एक रुपया इनाम दिले.





# चिंचेचे पोते

एका गावात एक व्यापारी रहात असे. त्याचे कुटुंब फार मोठे होते पण तो व्यापार करी तो लहान होता. म्हणून शक्य तोंवर व्यर्थ खर्च करीत नसे. फार कमी खर्चांत घराचा खर्च भागवीत असे.

तो मधून-मधून शहरात जात असे आणि दुकानांत ठेवायला जो माल लागे तो आणीत असे. परंतु तो माल गाडीत घालून हमरस्त्याने आणीत नसे. कारण हमरस्त्यावर जकातीचानाका होता व जकात भरावी लागे. जे लोक त्या रस्त्याने जात त्यांना गावा पलीकडे जातांना जकात भरावी लागे. तो कर आणि गाडीचे भाडे मिळून मोठी रक्कम होई. म्हणून तो व्यापारी खांद्यावर उचलून नेता येईल एवढाच माल शहरात विकत घेऊन आपल्या गावी परत येत असे. तो माल तो पोत्यांत घाली आणि आडवाटेने ते पोते उचलून घेऊन गावी परत येत असे.

आडवाटेने म्हणजे जंगलांतून यावे लागे. एक तर जास्त चालावे लागे, शिवाय चोरांची व रान जनावरांची भीती ही होती. जंगलांत भुते सुद्धा असतात असे लोक सांगत, तरी तो व्यापारी धीर करून त्याच वाटेने येत असे.

एके दिवशी तो व्यापारी जंगलांतील वाटेने माल विकत घेऊन घरी आपल्या गांवी येत होता. एका उंबराच्या झाडा-खालून जात असतां एक भूत अकस्मात त्याच्या समोर येऊन उभे राहिले. ते म्हणाले—"मी तुला गिळतो!" आणि पुढे-पुढे येऊ लागले.

तो व्यापारी क्षणभरच घाबरला. नंतर स्वतःला सावरून दरडावून म्हणाला—"ए भुता! तूच का, मला वाटले की दाभणसिग तर नाही? मला दाभणसिंगाची तेवढी भीती वाटते!"

"कोण रे तो दाभणसिग? मी कधी त्याचे नावसुद्धा ऐकले नाही! तो माझ्यापेक्षा भयंकर आहे का?" भुताने विचारले.

"तो दाभणसिग सामान्यपणे या जंगलात रहात नाही. पण तू त्याच्या जवळ जाण्याचा विचार करू नकोस. तू म्हणजे सामान्य भूत! माझ्या सारख्याला गिळणेच तुला शक्य आहे! दाभणसिंगाचे तसे नाही! तो भोसकून-भोसकून ठार करतो. तो म्हणजे मोठा क्रूर आहे!" व्यापारी म्हणाला.

आपल्या समोर हा भीत नाही, व थरथर कांपत नाही, उलट आपल्यापेक्षा भयंकर अशा दाभणसिंगा विषयी सांगून आपल्याला घाबरवून सोडीत आहे, हा विचार करून भुताला याचा भयंकर राग आला.

"ठीक, मला तावडतोब तो कोण दाभणसिग आहे, त्याला दाखव." भूत म्हणाले.

"तो गावात राहतो. त्याने तुला पाहिले की तुला व मला दोघांना जागच्या जागी ठार करील. म्हणून मी माझ्या पोत्यात तुला बसवितो व तो राहतो तेथे घेऊन जातो. तू पोत्याच्या भोकांतून पहात रहा, बोलूचालू नकोस!" व्यापारी म्हणाला.

व्यापाऱ्याने पोत्यातले सर्व सामान बाहेर काढले भुताला आत बसविले आणि



पोत्याचे तोंड घट्ट बंद करून ठेवले. तो जकात नाक्या वरून, काही माहीतच नाही, अशा ऐटीत पुढे जाऊ लागला. तेवढ्यात पाठीमागून आवाज आला– "कोणरे तो? थांब, पोत्यात काय आहे दाखव पाहू?" विचारणारा जकात नाक्यावरचा अधिकारी होता.

व्यापाऱ्याने पोते खाली उतरवून ठेवले व म्हणाला–"काही नाही मालक, चिंचेचे पोते आहे!"

जकात अधिकाऱ्याने पोते तराजूत ठेवले आणि दाभणाने चार पांच जागी टोचून पाहिले. "चिंचे सारखेंच वाटते आहे! चारमण आहे! चार पावल्या म्हणजे एक रुपया झाला. त्या सर्वांचा मिळून जकात भर!" जकात अधिकारी त्याला म्हणाला.

व्यापारी पोते उचलून घेऊन दुसऱ्या वाटेने जेथे त्याचा माल उतरवून ठेवला होता तेथे जंगलांत गेला. त्याने पोत्याचे तोंड सोडले आणि भुताला बाहेर येऊ दिले. पाहिलेस दाभणसिंगाचा प्रताप? मी रुपया दिला म्हणून तू जिवंत सुटलास!" व्यापारी भुताला म्हणाला.

"बापरे! भोसकून-भोसकून त्याने मला ठार मारले! तू खोटे बोललास म्हणून वांचलों! तुझ्यावर मी कोणता उपकार करू, बोल!" भूत म्हणाले.

"माझं कुटुंब मोठे आहे! तुला शक्य असेल तर मला धन दे!" व्यापारी म्हणाला.

"एवढेच ना! या झाडाच्या बुधांत धन पुरून ठेवले आहे! खणून काढून घे!" असे सांगून भूत नाहीसे झाले.

व्यापाऱ्याने झाडाच्या बुंधात खणून पाहिले तर त्याला धनाचा खूपच मोठा सांठा सांपडला. ते पोत्यात घालून जंगलाच्या वाटेनेच तो आपल्या गावी आला. त्या दिवसापासून तो सहकुटुंब सुखाने राहू लागला.





# भ्रम-निराश

भास्कर हा सुमारे पंचवीस वर्षे वयाचा तरुण, अर्थातच साहसी व धैर्यवान होता. दररोज रात्री जेवण झाल्यावर तो आपल्या गांवच्या तलावाच्या काठापर्यंत जाऊन परत येई. त्या तलावाला लागूनच स्मशान होते. तरी त्याला भुता खेतांची भीती वाटत नसे.

नेहमीप्रमाणे तो एकदां तलावापर्यंत परत येत असतां स्मशानाच्या जवळच्या भागात कोणीतरी दोघे खूप जोरजोराने भांडत असल्याचे दिसले. कोण असतील बरे हे असा विचार करून भास्कर त्या बाजूला जाऊन थोड्या अंतरावरूनच मोठ्याने ओरडला–"या मध्य रात्रीच्या वेळी कोण आणि कां भांडते आहे?" पाहू दे बरे.

त्या पाठोपाठ भांडणारांपैकी एकजण म्हणाला–"कोणी माणूस दिसतो आहे! इतक्या रात्रीच्या वेळी इकडे तो एकटा आला म्हणजे खात्रीनेच चांगला धीट असला पाहिजे. चल, आपले भांडण मिटवून तो चांगला निवाडा कदाचित देईल! पाहू या.!"

भास्कर त्याच्याजवळ गेला असेल त्याला दोन काळ्या आकृती घाईघाईने येत असलेल्या दिसल्या आणि जवळ उभ्या राहिल्या. ती भुते होती. भास्कर क्षणभर घाबरला, पण लगेच स्वतःला सावरून म्हणाला–"ओहो! तुम्हीच नाही का भांडत होतां?"

"होय, आम्हीच! आम्हांला पाहून तुला भीती वाटत नाही ना? आम्ही कोण आहों वाटले? भुते आहों भुते!" एक आकृती म्हणाली.

भास्करला आंतून भीती वाटत होती तरी बाहेर धीटपणे म्हणाला–"ते तर

श्री सं. ना. सर्वटे



तुम्ही म्हटल्याशिवायच कळते आहे. मला नाही कसलीहीं भीती वाटत. तुमच्या-सारखीं भुते मी लहानपणी रस्त्यावरच्या नाटकांत पाहिली आहेत. आज या स्मशाना-जवळ तुम्हांला पाहातो आहे." मला पाहून भांडणे का थांबविलीत.

"तू तर चोराचा दिसतो आहेस. पण आमचे एका गोष्टीबद्दल भांडण चालले आहे. तू काय तो निवाडा दिला पाहिजेस!" एक भूत म्हणाले.

भास्करने विचारले–"कशा बद्दल भांडण?"

भुते म्हणाली–"येथून जवळच एका घराच्या गच्चीवर अप्सरे सारखी सुंदर एक मुलगी झोपली आहे. तिचा रंग सोन्यासारखा पिवळा आहे एकाचे म्हणणें आहे तर दुसऱ्याचे म्हणणें गुलाबी रंग आहे. तू त्या तरुणीला स्वतः पाहून आमच्या पैकी कोणाचे म्हणणे बरोबर आहे, सांग!"

या भुतांच्या भानगडीत उगाच सांपडलो की, असा विचार करीत दुसरा काही उपाय नाही असे ठरवून भास्करने 'बरे' या अर्थी मान हलविली.

भुते त्याला ती मुलगी झोपली होती त्या घराच्या गच्चीजवळ घेऊन गेली. एका झाडाची फांदी त्या घरावर वांकलेली होती. भुतांबरोबर भास्कर त्या फांदीवर चढून गच्चीवर उतरला.

दुधासारख्या चांदण्यात खाटेवर ती मुलगी झोपलेली होती. तिला पाहून भास्कर थक्कच झाला. इतकी सुंदर मुलगी त्याने त्या दिवसापूर्वी कधी कोठेही पाहिली नव्हती. लग्न करायचं झालं तर याच मुलीशिवाय आणखी कोणाशी करावयाचे नाही, असे त्याने मनाशी ठरविले. आणि तेवढ्यातच ती भुते पळाली.

भास्कर त्या मुलीकडे पापणी लवू न देतां पहात असतां दोन्ही भुते चटदिशी फांदीला धरून उतरू लागली. त्या वेळी जो आवाज झाला, त्यामुळे त्या मुलीची



झोप मोडली व तिने समोर भास्करला पाहिले व म्हणाली–"अगोबाई!"

भास्कर हसत मुखाने म्हणाला–"भिऊ नकोस! मी चोर नाही! आणि भूत तर नाहीच नाही!"

"तरमग या मध्य रात्रीच्या वेळी तुला इकडे कोणते काम होते?" रागाने त्या मुलीने विचारले.

भास्कर तिला तो कशासाठी तेथे आला हे सांगून म्हणाला–"त्या भुतानी मला जे सांगितले होते, त्यात मुळीच खोटे नाही. तुझे सौंदर्य अपूर्व असेच आहे! मला येथे चांगली नोकरी आहे. मी तुझ्याशी लग्न करावे म्हणतो. मी उजाडतांच येऊन तुझ्या घरच्या लोकांशी बोलतो!"

ते ऐकून ती डोळे वटारून पहात व दांताने ओठ चावीत म्हणाली–"तुझे डोके तर फिरले नाही? माझ्याशी म्हणे लग्न करणार! माझे सौंदर्य पाहून तू जो बोल-लास ते बोलायला तू धजलासच कसा? तू कधी आरशात आपले माकडासारखं तोंड पाहिलं आहेस का? तुला याबद्दल योग्य दंड मिळाला पाहिजे." असे म्हणत आवाज मोठा करून ओरडली–"दादा, दादा! चोर!"

ती म्हणाली ते ऐकून भास्करला छातीत भाला भोसकल्या सारखे झाले. अपमानाने



तो आधीच हतबल झाला होता, त्याला पळून यायचे सुद्धां सुचले नाही.

इतक्यात एखाद्या पहेलवाना सारखा आडदाण दांडगा माणूस एक जाडजूड सोटा घेऊन आला व म्हणाला–"चोर, कोठे आहे?" तो भास्करला पाहून म्हणाला–"मूर्ख चोरा! मनात आलं तर तुला उचलून गच्चीवरून खाली फेंकून देईन. तुझ्यावर दया करून सोडून देतो. रात्रभर तुला अंधाऱ्या कोठडीत कोंडून ठेवतो व उजाडल्या दहा जणांसमोर तुझं डोके ठीक करतो."

भास्कर भीतीमुळे आणि अपमानामुळे थरथर कांपत म्हणाला–"मी चोर नाही!"



"ते उत्तर ऐकून ती मोठमोठ्याने हसत म्हणाली–"चोरांत मी इतका कुरूप माणूस आजपर्यंत पाहिला नाही!"

पहेलवानाने भास्करला धरून ओढीत खाली घेऊन त्याला एका अंधार कोठडीत कोंडून ठेवून बाहेरून कडी लावली.

भास्करला हे सर्व एखादे स्वप्न पडते तसे वाटले. त्याला रात्रभर झोप लागली नाही. उजाडण्याच्या सुमारास त्याला दुरून कोंबड्याचे आरवणे आणि जवळच कावळ्यांचे ओरडणे ऐकू आले.

डोके फिरल्यासारखे झाले त्याला त्याने बाहेरून बंद केलेला दरवाजा ठोठावयाला सुरवात केली आणि ओरडला–"मी चोर नाही. दार उघडा!"

काही वेळाने दार उघडले. दार उघडणारी ती मुलगी नव्हती. तिचा पहेलवान भाऊपण नव्हता. कोणी चार मजूर होते.

त्यांनी, आनंद खोली बाहेर आल्यावर त्याच्याकडे आश्चर्याने पाहिले व त्याला विचारू लागले–"हा वाडा भुतांच्या हातांत किती पूर्वी गेला. तू कसा काय आलास, याच्यात? तुझं नशीब त्यानी तुझे लचके तोडून तुला खाल्ले नाही."

भास्कर मान खाली घालून घरी परतला. त्याच्या मनात् आलं की काय वाटेल ते करून ज्यांच्यामुळे त्याला इतका अपमान सहन करावा लागला त्या भुतांवर सूड उगवायचा! काळोख होऊन थोडा वेळ गेल्यावर एक जाडजूड काठी घेऊन गेल्या रात्री त्याला ती दोन भुते भेटली होती तेथे गेला.

दोन्ही भुते तेथे बसलेली होती. भास्करला येत असलेला पाहून दोन्ही पोटधरून हंसू लागली. म्हणाली–"तू येणार हे आम्हांला माहीत होते! तुम्ही माणसे जो जाडजूड सोटे धनुष्य बाण वगैरे घेऊन जातां ते आम्हांला बोरू सारखे वाटतात."



"अस्सं! ते सर्व मागाहून कळेल. रात्री तुम्ही दोघांनी आणखी काही भुतांच्या मदतीने एवढे नाटक कशाला केलेत? माझा अपमान आणि एवढा शारीरिक त्रास मला कां दिलात?" भास्करने त्यांना विचारले. तेव्हां त्याने आपली काठी खांद्यावर ठेवली होती.

भुतें दोन पावले मागे सरकली आणि म्हणाली–"ते सामान्य नाटक नाही. रस्त्यावर खेळतातना, तसले नाटक. तुला अक्कल यावी म्हणून ते आम्ही केले. अंजनी कोण आहे तुम्हाला माहीत आहे का? त्या मुलीच्या गावाहून या कामासाठी या गावी आलो!"

"अंजना? ती तर माझ्या मामाची मुलगी!" भास्कर म्हणाला त्यावेळी त्याचा चेहरा पांढरा फट्ट झाला होता.

"म्हणजे तुला ते नाव अजून आठवते आहे म्हणावयाचे! तुझ्या इच्छे प्रमाणे तिचे लग्न तुझ्याशी केव्हांच ठरले होते, नाही का? तुला नोकरी मिळाल्यावर या गावी आल्यानंतर, (हे गांव खेडे गांव नसून लहान से शहर आहे) चार चांगल्या सुंदर मुली पाहताच अंजना तुझ्या डोळ्यात अंजना कुरूप झाली, होय ना?" भुतांनी विचारले.



भास्करला काही उत्तर न सुचल्यामुळे तो मान खाली घालून बसला. दोन्ही भुते विकट हास्य करून म्हणाली–"रात्री त्या मुलीने सांगितले ना! आठवड्यापूर्वी लग्नाविषयी बोलणी करायला आलेल्या तुझ्या मामाला तू म्हणालास की अंजनी सुंदर नाही म्हणून तिच्याशी मी लग्न करणार नाही! ती किती दुःखी आहे, वाटलं तुला!"

ते ऐकून त्याला इतके दिवस होत असलेला भ्रम नाहीसा झाला. सर्व मुलींना नाही तर एखाद्या मुलीच्या मनात राक्षस शिरून बसेल. त्याच प्रमाणे एखाद्या राक्षसी मनांत देव येऊन राहू

लागेल. आपण केलेला अपराध काही नाही तरी त्या गच्चीवरच्या सुंदर मुलीने आपला किती अपमान केला. मी ती गोष्ट कधी विसरणार नाही.

भास्कर काही वेळ अशा तऱ्हेने मनात विचार करीत राहल्यावर त्या भुतांना म्हणाला–"तुमच्या मुळे मी दिवसां स्वप्ने पहात होतो त्यांतुन मुक्त झालो. माणसाच्या रूपापेक्षां मनच जास्त महत्वाचे असते. उद्या उजाडतांच आपल्या गावी जाऊन मी आपल्या मामाला सांगतो की माझा अंजनाशी विवाह करून देण्यासाठी मुहूर्त धरा!"

फार चांगलं म्हणालास, आतां आम्ही आपल्या उंबराच्या झाडावर परत जातो! असे म्हणत दोन्ही भुते काळोखात दिसेनाशी झाली.

दुसऱ्या दिवशी भास्कर त्याच्या गावी गेला आणि त्याने आपल्या मामाला तो अंजनाशी विवाहास तयार असल्याचे सांगितले. त्याला व अंजनाला त्यामुळे जो आनंद झाला तो एवढा तेवढा नव्हता. त्यांना सर्वांना खूप आनंद झाला.

दहा दिवसांनी भास्कर व अंजनाचा विवाह झाला. रात्री मामाने, लग्नाला जमलेल्या नतोवाइकांच्या करमणुकी साठी एक नाटक उघडयावर करविले. नाटक सुरू होतांच निरनिराळे वेष करून पडद्याच्या पुढल्या बाजूला आलेल्या तिघां पुरुषांना व एका सुंदर स्त्रीला पाहून भास्कर चकित होऊन आपल्या मामाला म्हणाला–"मामा, ही माणसं दिसत नाहीत, भुते आहेत!" असे सांगून तो नोकरी करीत असलेल्या गावी त्याने जे पाहिले होते ते थोडक्यात सांगितले.

मामा थोडा हसत म्हणाला–"होय रे भास्कर! तू म्हणालास ते खरे आहे. ही रस्त्यावरची नाटके करायला शिकलेली भुते आहेत! यांच्या मदतीनेच मी तुझ्या मनातला सर्व भ्रम दूर करविला."

ते उत्तर ऐकून भास्करला जे घडले होते ते सर्व कळले. तो आनंदाने मनातल्या मनांत हसला.

# प्रतिज्ञा पात्र

एकनाथ आपला विद्याभ्यास संपवून आपल्या गावी परत आला. तो हुशार आहे व स्वभावाने चांगला आहे असे ऐकून भिकूशेट नावाच्या व्यापाऱ्याने त्याला बोलावून आपल्याकडे जमा खर्च व हिशोब लिहायचे काम सांगून नोकरीवर ठेवले. एकनाथाने भिकूशेटकडे तीन महिने काम केल्यावर त्याला हिशोब कसा लिहायचा याचा चांगलाच अनुभव आला.

त्याला गावात धनशेट नावाचा आणखी एक व्यापारी होता. त्याची आणि भिकूशेटची व्यापारात चांगलीच चढाओढ होती. एकनाथ हुशारच नव्हे तर चांगला प्रामाणिक आहे ऐकून धनशेटने त्याच्याकडे एका आपल्या माणसाला पाठविले आणि भिकूशेट पगार देतो त्याहून शंभर रुपये जास्त देतो असे सांगून आपल्या दुकानात नोकरी करायला बोलाविले.

एकनाथाने एका आठवडयाने भिकूशेटकडची नोकरी सोडली आणि धनशेटकडे नोकरीला लागला.

त्या गावचा जमिनदार रामजी पाटील होता. त्याचा कारभार आणि कामाचा पसारा फार मोठा होता. त्याच्याकडे हिशेब लिहायला त्याला एका नोकराची गरज होती. त्याने एकनाथाला बोलावून, धनशेट देतो त्याच्या दुप्पट पगार देतो असे सांगून विचारले तुला किती पगार मिळतो?" एकनाथने दोनशे रुपये मिळत असल्याचे सांगितल्यावर रामजी पाटलांनी चारशे रुपयाचे प्रलोभन दिले आणि कामाला लागायला सांगितले.

एकनाथ रामजी पाटलाकडे कामाला लागला. दोन तीन महिने काम केल्यावर त्याचा बालमित्र धर्म त्याला भेटला आणि म्हणाला–"अरे एकनाथ, माझा फार

श्री स. ना. जोशी

मोठा धंदा आहे. मी आयात-निर्यात करतो. खूप फायदा होतो. तू पाहिजेतर भागीदार होऊन ये, मी आणि तू मिळून व्यापार करू. खूप फायदा होईल."

"मला स्वत: व्यापार करायचा म्हणजे बरे नाही वाटत." एकनाथ म्हणाला.

"तरमग तू माझ्या व्यापारात हिशेब तपासनीस म्हणून रहा. तुला रामजी पाटील देतात त्याच्या दुप्पट पगार देईन.

एकनाथ जमिनदारा कडची नोकरी सोडून धर्मूकडे कामाला लागला. परंतु एका महिन्याच्या आत त्याला कळून आले की धर्मूचा सर्व व्यापार सर्व लबाडीचा व तस्करीचा आहे. अधिकाऱ्यांनी धर्मूला धरून तुरुंगात टाकले.

एकनाथने ती नोकरी सोडली आणि दुसऱ्या नोकरीच्या शोधार्थ निघाला. परंतु त्याची पूर्वीची धरसोडीची वागणूक पाहून कोणी नोकरी द्यायला तयार होईना. शेवटी तो निराश होऊन आपल्या व्यंकोबा नांवाच्या मामाकडे गेला. मामाला त्याने सर्व पूर्वकथा सांगितली.

तो म्हणाला—"कायरे, कोणीचार पैसे जास्त दिले की त्याच्या लोभाने तू आपल्या पहिल्या मालकाला सोडून देतोस, तुला दाराशी कोण उभा करील?"

एकनाथ म्हणाला—"मामा ते सोड, मी तशा प्रलोभनांना बळी जाणार नाही. जी नोकरी मिळेल ती सोडून जाणार नाही असे प्रतिज्ञापत्र पाहिजेतर लिहून देतो."

दुसऱ्या दिवशी व्यंकोबा आपल्या भाच्याला बरोबर घेऊन रामजी पाटलाकडे गेले आणि घडले ते जसेच्या तसे सांगितले व म्हणाले—"यापुढे हा कायम तुमच्याचकडे राहील, म्हणतो आहे. पाहिजे तर तो प्रतिज्ञापत्र लिहून द्यायला तयार आहे."

"तशा प्रतिज्ञापत्राची गरज नाही. त्याने ज्या ठोकरा खाल्या आहेत, त्याच प्रतिज्ञा-पत्रा सारख्या आहेत!" असे सांगून रामजी पाटलांनी एकनाथला नोकरीवर ठेवून घेतले.






लक्ष्मी वेदवती नामे अवतार धारण करून तपश्चर्या करीत असतां रावणाने तिचा बुचडा धरला म्हणून ती योगाग्नीने जळून गेली आणि लंकेत जन्मली.

लंका नगरी सारखंच एक विशाल व सुंदर सरोवर होते. रावण नित्य संवयी प्रमाणे रावण प्रातःकालीच त्या सरोवरात स्नान संध्या आटोपून शंकराच्या पुजेसाठी कमळें आणायला गेला. त्याला एक मोठे कमळ सरोवराच्या मध्यभागी दिसले. त्या कमळातून शुभ्रकांती बाहेर फेकली जात असल्याचे दिसले. त्याच्या जवळ जात असतां त्या फुलात सोन्या सारखं चकाकणारे एक मूल रडत असलेलं दिसलं.

त्या तान्ह्या मुलाला पाहून रावण त्याच्याकडे आकृष्ट होऊ लागला. त्याच वेळी एक देववाणी झाली—"रावणा, ते मूल तुझा व तुझ्या लंकेचा नाश करण्या-साठी जन्मलेले मूल आहे!"

रावणाने ती वाणी ऐकून राक्षस वीरांना त्या अर्भकाला मारून टाकण्याची आज्ञा केली.

अनेक तऱ्हेने प्रयत्न करून पाहूनही ते मूल मरेना. तलवारी व सुरे अदृश्य झाले अग्नी विझून गेला. दगड फुलांचे ढीग झाले. क्रूर जंगली प्राणी पळून गेले.

राक्षस कंटाळून गेले त्यांनी पंचधातूची केलेली एक पेटी घेऊन त्यात त्या अर्भकाला ठेवले आणि ती पेटी समुद्रात टाकून दिली.

११. सीताराम विवाह


















ती पेटी तरंगत जाऊन जमिनीला पार जाऊन लागली व भूगर्भात शिरून कोठे तरी अदृश्य झाली.

मिथिला नगरीचा राजा जनक हा फार मोठा ज्ञानीपुरुष व राजर्षी होता. यज्ञ करण्यासाठी जमीन सपाट व सारखी करण्या करिता नांगरीत होता. नांगराला 'खण्' असा आवाज होऊन ती पेटी लागली. पेटी उघडून पाहिली तर आत एक सुंदर मुलगी. जनक राजाने तिला भूदेवीने दिलला प्रसाद समजून प्रेमाने आपली मुलगी म्हणून उचलून घेतले.

नांगराच्या फाळानेजो खांच पडते तिला 'सीता' म्हणतात, त्या खाचेत सापडलेली मुलगी म्हणून तिचे नाव 'सीता' झाले. जनकाची मुलगी म्हणून 'जानकी', भूमीत जन्मली म्हणून 'भूमाता' या नामें सीता वाढू लागली.

सीता आपल्या बरोबरच्या मुली बरोबर खेळत आपला चेंडू शोधीत असतां फुलांनी पुजलेल्या धनुष्याखाली डाव्या हाताने उचलून पाहिले तर चेंडू दिसला. तो तिने उचलला. नंतर ते धनुष्य खेळायला चांगलं आहे असे समजून तिने आपल्या घरकुलात नेऊन ठेवले आणि खेळू लागली.

जनकराजाने ते सर्व प्रत्यक्ष पाहिले व थक्क झाला.

त्या धनुष्याची पूजा जनकराजाचे पूर्वज ते शंकरांकडून मागून घेऊन पूजा करीत आले होते. त्रिपुरासुराचा वध केला तेव्हां शंकराने त्याच धनुष्याचा उपयोग केला होता. ते धनुष्य उचलावयाचे म्हणजे तीनशे वीरांची गरज असे.

असे धनुष्य सीतेने लहानपणीच उचलले हे पाहून जनकराजाने सीता ही कोणी सामान्य स्त्री नाही हे ओळखले. अशा मुलीला वर शोधायचा म्हणजे ते धनुष्य उचलून त्याला दोरी चढविण्याचे काम जो पुरुष करील तोच योग्य होईल.

त्या प्रमाणे अशा पुरुषालाच आपली मुलगी वरमाळा घालील असे स्वयंवर प्रसंगी जनकराजाने जाहीर केले होते.

सीता अशा स्थितीत मिथिलेत लहानाची मोठी झाली.

विश्वामित्राने यज्ञरक्षणार्थ रामलक्ष्मणाला पाठवावे, म्हणून दशरथ राजाला सांगितले. तेव्हां दशरथ राजा म्हणाला–"राक्षसांपासून यज्ञ रक्षणार्थ मी या लहान मुलांना कसा काय पाठवू मुनीश्वर? अद्याप त्यांनी शस्त्रास्त्र विद्या शिकून घेतलेली नाही!"

"त्या साठीच तर मी आलों आहे! क्षत्रिय कुमारांना कोणकोणत्या विद्या शिकविणे आवश्यक आहे त्या सर्व मी त्यांना शिकवीन!" असे सांगून विश्वामित्रांनी सगर्व वसिष्ठ मुनींकडे पाहिले.

वसिष्ठमुनी स्मित करून विश्वामित्रांची स्तुती करू लागले आणि रामलक्ष्मणाला विश्वामित्रां बरोबर पाठविण्यास त्यांनी दशरथाला सांगितले. राम लक्ष्मण मुनिकुमारां सारखे आपले केस बांधून धनुष्य बाण घेऊन विश्वामित्र मुनींबरोबर निघाले.

वाटेत जागोजागी थांबून विश्वमित्र मुनी दोघांना धनुर्विद्येचे मंत्र तंत्र शिकवीत.

रामलक्ष्मण विश्वामित्र ऋषींच्या आश्रयाला राहून धनुर्विद्येत पारंगत झाले.



विश्वामित्र मुनी यज्ञाची तयारी करीत असतां त्यांत विघ्न आणण्यासाठी भयंकर आवाज करीत ताटका राक्षसीण विजेसारखी घेऊन आश्रमावर पडली.

विश्वामित्र मुनींनी ताटका राक्षसिणीचा वध कर म्हणून रामाला आज्ञा केली. रामाने ताटकेवर शरवृष्टी सुरू केली. ताटकेच्या सर्व अंगात बाण शिरले व ती एका पर्वतासारखी जमिनीवर मरून पडली.

यज्ञ शुरू झाला. विश्वामित्रांनी रामाला सर्व तऱ्हेच्या अस्त्रांचा प्रयोग कसा करावयाचा उपदेश केला. रामलक्ष्मण, धनुष्यबाण घेऊन सारखे यज्ञभूमीच्या



चारही बाजूना हिंडत होते. त्यामुळे यज्ञभूमीचे रक्षण उत्तम प्रकारे झाले.

तरी मारीच व सुबाहू नावाचे दोन राक्षस यज्ञभूमीवर चालून आले. रामाने दोनच बाण सोडले. सुबाहू तत्काळ मरण पावला. मारीचाला जो बाण लागला त्यामुळे तो समुद्रात जाऊन पडला आणि कसाबसा स्वतःचे प्राण वाचवून लंकेला पोहोचला.

यज्ञ निर्विघ्नपणे चालू होता. विश्वामित्रांनी यज्ञ समाप्ती पूर्वी रामाच्या हस्ते अग्निकुंडात हविष घालवून त्याला यज्ञ कार्यात भाग घेतल्याचा पुण्यलाभ करवून दिला. यज्ञकुंडातून ज्या ज्वाळा बाहेर येत होत्या त्यावर अर्धचंद्राकृती टोक असलेला एक बाण तरंगत असल्याचे दिसले.

विश्वामित्र रामाला म्हणाले–"रामा, तो तुझा बाण आहे त्याला यापुढे रामबाण हेच नाव राहील. तो बाण शत्रूचा शिरच्छेद करून परत तुझ्या हातात येईल!" असे सांगून विश्वामित्र ऋषींनी तो बाण रामाला दिला. रामाने तो बाण भक्तिभावनेने डोळ्याला लावून भात्यात ठेवला.

यज्ञ बरेच दिवस चालू होता. त्या अवधीत विश्वामित्रांनी रामाला सर्व अस्त्रांचा उपदेश केला!

"रामा, तू व मी सूर्यवंशीय आहोत! मला माहित असलेली सर्व अस्त्रविद्या शिकविण्यासाठी तुला घेऊन आलो व तुला ती शिकविल्याने माझ्या मनाचे समाधान झाले आहे. तुझ्या सारख्या शिष्याचा गुरू झाल्याबद्दल मला किती आनंद होत आहे!"

"गुरुदेव, मी आपल्या कृपाप्रसादाला पात्र ठरलो, याबद्दल मी स्वतःधन्य समजतो!" राम म्हणाला.

विश्वामित्रांच्या सिद्धाश्रमात रामलक्ष्मणांनी युवावस्थेत प्रवेश केला.

एके दिवशी विश्वामित्र ऋषी अस्त्रांचे वैशिष्ट्य रामाला समजावून सांगताना रामाकडे पहात म्हणाले-"रामा, तुझे विशाल नयनारविंद माझ्या आश्रमावर शांत चंद्रिका किरण फेकीत राहून माझ्या आश्रमाला त्यांनी शांतिस्थान केले आहे. म्हणून तू शांताराम आहेस आणि सुंदरामही आहेस.

चल माझ्या बरोबर अशा अर्थी मान हलवून विश्वामित्र निघाले. रामलक्ष्मण त्यांच्या पाठोपाठ चालू लागले. विश्वामित्र मिथिला नगरीच्या दिशेने चालू लागले.

वाटेत गौतम मुनींच्या आश्रमातून जात असतां रामाचा पाय एका पाषाणाला, म्हणजे दगडाला लागला व तो पाषाण अहिल्येचे रूप घेऊन बदलला. अहिल्येने रामाला प्रणाम केला. रामचकित झाला.

त्याचवेळी दीर्घकाळ करीत असलेले गौतममुनी तपश्चर्या संपल्यावर तेथे आले.

रामाकडे श्रद्धा भक्ति पूर्वक पहात राहल्यावर म्हणाले–"रामचंद्रा! माझी पत्नी अहिल्या शापमुक्त झाली. तू पावनराम आहेस!"

अशी कोणती गोष्ट घडली त्यामुळे अहिल्या शापमुक्त झाली या अर्थी राम चकित होऊन सर्वांकडे पाहू लागला.

गौतम मुनी अनन्य भावे रामाकडे पहात म्हणाले–"रामा, होय, तू राखे आड लपलेला निखारा आहेस. तू एक अवतार पुरुष आहेस!"



"विष्णूने जे अवतार धारण केले त्या अवतारांत रामावतारानंतर कृष्णावताराात कृष्णाने तो अवतार पुरुष आहे हे माहीत असूनही अनेक लीला केल्या, व लहानाचा मोठा झाला. राम हा पूर्णपणे मानव म्हणूनच आपले कर्तव्य पालन करीत राहिला. मानव म्हणूनच त्याने मोठमोठी कार्ये केली. हेच रामावताराचे वैशिष्ट्य!" सूत महर्षी रामकथा पुढे सांगू लागले.

गौतममुनी सर्वांना आश्रमात बोलावून घेऊन गेले आणि सर्व प्रकारे अतिथि सत्कार केला. विश्वामित्र ऋषी रामलक्ष्मणाला घेऊन गौतमाश्रमातून निघाले.



जनक महाराजांनी सीतेचे स्वयंवर रचल्याचे जाहीर करण्यासाठी व ऋषी मुनींनी त्या उत्सवास हजर रहावे याचे निमंत्रण देण्यासाठी आपले पुरोहित सतानंद यांना पाठविले होते. सतानंद हे अहिल्या व गौतम मुनी यांचे पुत्र होते. सतानंदाच्या पालखी बरोबर जनक महाराजांनी पाठविलेले शिपाई व सरदार होते. सतानंद विश्वामित्रांना भेटण्यासाठी सिद्धाश्रमाला जात होते.

वाटेत च विश्वामित्र भेटले. सतानंद पालखी तून उतरले. त्यांना नमस्कार करून जनकराजाचे निमंत्रण पोंचते केले.

विश्वामित्राच्या कृपेने अहिल्येचे शाप विमोचन झाल्याचे ऐकून शतानंद आनंदाने रामाला भेटले व त्याची अनेक प्रकारे स्तुती केली आणि मातापित्यांच्या दर्शनाला गेले.

रामलक्ष्मणांना घेऊन विश्वामित्र मिथिला नगरीस गेले.

सीता त्यावेळी राजोद्यानात हिंडत होती. तिच्या बरोबर तिची धाकटी बहीण उर्मिला होती.

सीता रामांची परस्पर दृष्टादृष्ट झाली. "आपले आले वाटते!" असा विचार मनात येऊन सीताची गडबड उडाल्या-सारखी झाली. तिचे पाय सरळ पडत नव्हते. ती घाईघाईने अंतःपुरात निघून गेली. उर्मिलचे मन लक्ष्मणाकडे आकर्षित झाले

मोठमोठे बलिष्ठ राजाधिराज कोणी ही शिवधनुष्य उचलूही शकले नाहीत.

राजा जनकाला निराशा झाली. सीता वडिलांच्या बरोबरच उभी होती. तिची दृष्टी रामावर खिळलेली होती. तिने रामाकडे पाहून वडिलांकडे पाहिले, हेतू हाकी वडिलांनी सुद्धा रामाकडे पहावे.

विश्वामित्रांनी रामाला पुढे व्हायला सांगितले. गुरुवर्यांची आज्ञा शिरसावंद्य मानून आपण तर निमित्त मात्र आहों असे समजून राम पुढे सरसावला व त्याने शिवधनुष्यला नमस्कार केला आणि उस

सहजी उचलून घेणाऱ्या हत्ती सारखे शिवधनुष्य उचलून घेतले आणि धनुष्य वांकवून त्यावर दोरी चढवू लागला, परंतु मोठा आवाज झाला आणि काळवत्री दगड फुटतांना जसा कडाडल्या सारखा आवाज होतो तसा आवाज होऊन धनुष्य मोडले.

तो आवाज दिगदिगांत दुमदुमला. आणि दक्षिण महासागरात महेंद्र पर्वतावर तपश्चर्या करीत बसलेल्या परशुरामाला ऐकू आला.

परशुरामाला विष्णूने निराळया रूपात गोलाकवासी कृष्णाने सांगितलेल्या गोष्टी आठवल्या. कृष्णाने दिलेले कोदंड विष्णूचा अंश असलेल्या रामाला देण्यासाठी निघाला.

सीतेने रामाच्या गळयात वरमाळा घातली लाजून घाईघाईने पावले उचलीत वडिलांशेजारी जाऊन उभी राहिली. सीतारामांच्या विवाहाला हजर राहण्यासाठी महाराज दशरथ सकुटुंब आले.

बोहोल्यावर सीताराम परस्परांवर लग्नविधी म्हणून तांदूळ घालीत असतां सीतेच्या कमळा सारख्या सुकोमल ओंजळीत ते मोत्यां सारखे आणि पद्मरागा सारखे भासले. रामाच्या डोक्यावर जाईजुई व मोगऱ्या सारखे स्वच्छ भासले. रामाच्या श्यामल शरीरावरून खाली पडत असतां इंद्रनील मण्या सारखे वाटत होते.

सीतेची धाकटी बहीण उर्मिला लक्ष्मणाला मांडवी भरताला, शत-रूपाला शत्रुघ्नाला देऊन त्यांचेही विवाह समारंभ सीता रामांच्या विवाहा बरोबर पार पडले.

दशरथ राजा मुलां बरोबर सुनांना घेऊन अयोध्येला निघाला. घाईघाईने येणाऱ्या परशुरामाला पाहून रथातून खाली उतरून नमस्कार केला आणि रामाच्या ऐवजी आपला शिरच्छेद करावा अशी विनंती केली.

परशुराम रामाला म्हणाला—"रामा, तू शंकराचे धनुष्य तोडलेंस, म्हणे! ह्या धनुष्यावर दोरी चढव, पाहूं!" असें सांगून आपल्या हातांतील कोदंड दिले. ते देत असतानाच परशुरामातील विष्णूचा अंश रामांत शिरला.





# सज्जन-दुर्जन

इराण देशातील एका शहरात अबू तम्माम नावाचा एक व्यापारी रहात असे. तो वाक्चतुर होता, त्याच बरोबर नीतिपरायणही होता. व्यापारात त्याला चांगले यश मिळाले व त्याने खूप पैसे मिळविले.

त्या नगराच्या राजाला अबूची वाढती कीर्ती पाहून ईर्ष्या वाटू लागली. आतां तेथे राहणे जिवाला धोका आहे असे वाटून अबूने शेजारच्या अल्यानशहा राज्य करीत होता त्या देशाच्या राजधानीत जाऊन रहायचे ठरविले. त्या प्रमाणे तो जाऊन राहू लागला. हा अल्यानशहा धर्मपरायण म्हणून प्रसिद्ध होता.

त्याने अबूच्या विषयी ऐकले आणि त्याला भेटायला बोलविले. अबू मूल्यवान भेट वस्तू घेऊन राजाच्या दर्शनाला गेला. त्याने आपल्या नम्रपणाने आणि वाक्चातुर्याने राजाला खूष केले. राजाने त्याला दररोज भेटायला यायला सांगितले.

अबूने नम्रपणे मान वांकवून निवेदन केले—"सुलतान, थोडे दूरच राहून आपली सेवा करावी असे मनात आहे. सर्वकाळ राजाच्या बरोबर राहणे तेवढे बरोबर नाही. त्यात क्षेम नाही. त्यामुळे इतरांना ईर्ष्या होण्याची शक्यता आहे.

परंतु सुलतानाच्या मनावर त्याचा काहीच परिणाम झाला नाही. म्हणाला—"केव्हांही एखादा प्रश्न उभा राहिला की तो आपल्या तिघां वजीरां व्यतिरिक्त अबूचा सल्ला घ्यायला सुरवात करी. त्याला वजीरांचा फार राग येत असे.

एके दिवशी तिघे वजीर भेटले असतां त्यांच्या पैकी एक जण म्हणाला—"हा अबू सुलतानाला आपल्या जाळयात फसवीत

अरबस्थानांतील कथा



चालला आहे. तर आपण काय करणे योग्य होईल?"

दुसरा वजीर म्हणाला–"त्याचा कांटा काढायला एक उपाय आहे. टर्कीच्या सुलतानाची मुलगी कमालीची सुंदर आहे कित्येक सुलतानांनी किंवा त्यांच्या मुलांनी तिच्याशी लग्न करण्याच्या हेतूने आपले दूत पाठविले होते, परंतु त्यांच्यापैकी-एक जणही परतला नाही. बहुत करून टर्कीच्या सुलतानाने त्यांचा वध करविला असावा. सुलतान अजून ब्रह्मचारीच आहेत. आपण आपल्या सुलतानांना तिच्या सौंदर्या-विषयीं सांगून लग्नाविषयी बोलणी करायला अबूला पाठवावे, असे सूचित करू या!"

अबूचा कांटा काढायला हा उपाय सर्वांत उत्तम आहे हे इतर दोघांना मान्य झाले. त्यानंतर ते सुलतानाकडे गेले व टर्कीच्या राजकन्येच्या सौंदर्याचे तिखट मीठ लावून खूप वर्णन करू लागले. कांही दिवसांनी सुलतानाच्या मनांत टर्कीच्या राजकन्येशीच लग्न करण्याचा विचार पक्का झाला.

सुलतानाने वजीरांना विचारले–"सर्व ठीक आहे, परंतु राजदूत म्हणून टर्कीच्या सुलतानाकडे कोणाला पाठवायचे?"

"जहांपनाह! हे काम यशस्वी व्हायला पाहिजे असेल तर तिकडे जाणारा राजदूत योग्य व हुशार हवा! त्याने टर्कीच्या सुलतानाला खूष केले पाहिजे, त्यासाठी चातुर्या बरोबर राजदरबारांत कसे बोलायचे आणि वागायचे हे त्याला माहिती असले पाहिजे!" तिघे वजीर म्हणाले.

"ते सर्व बरोबर आहे, परंतु असा सर्वगुण संपन्न माणूस कोण आहे, आपल्या-कडे?" सुलतानाने विचारले.

एक वजीर म्हणाला–"अबू तम्माम एकटा आहे!"

राजाने अबूला टर्कीच्या सुलतानाकडे राजकन्येला मागणी घालण्यासाठी पाठविले, टर्कीच्या सुलतानाने राजदूताचे ज्या तऱ्हेने स्वागत करावयाचे ते सर्व केले व म्हणाला–



"तुम्ही जाऊन प्रथम माझ्या मुलीला हा!"

नोकर अबूला राजकुमारी राही त्या महालात घेऊन गेले. त्याने तिला नमस्कार केला व फक्त एकदांच पडद्या पलीकडे पाहिले आणि खाली गालिच्यावर मान खाली घालून बसला.

अशा तऱ्हेने चार पांच मिनिटे लोटल्यावर राजकन्या अबूला म्हणाली–"तेथे ठेवलेल्या भेटवस्तु तुमच्या साठींच आहेत." आणि एक चांदीचे तबक होते त्याकडे बोट दाख-विले त्यांत सोन्याचे दागिने ठेवलेले होते.

राजकुमारी तेथून निघून गेली. नंतर अबू सुलतानाला भेटला तेव्हां सुलतान म्हणाला–"आमच्या मुलीने तू आंधळा, बहिरा, आणि मुका असल्याचे सांगितले. असें कां बरे ती म्हणाली?"

"जहांपनाह, आमच्या सुलतानाने आपल्या राजकन्येशी विवाह करण्यासाठी त्यांची इच्छा असल्याचे आपणांजवळ निवेदन करायला सांगितले होते. तिला नखशिखांत ती कशी आहे वगैरे पाहून यायला सांगितले नव्हते. मान वर करून तिला पाहणे राजघराण्याच्या रीतीला धरून नाही. त्या म्हणाल्या ते मी सर्व ऐकले. त्याचे उत्तर मी आपणांजवळ निवेदन करीत आहे." अबू म्हणाला.



"ते ठीकच झाले. पण त्यांनी ज्या भेटवस्तू दिल्या, त्या तुम्ही कां नाकारल्या?" टर्कीच्या सुलतानाने विचारले.

"मी आमच्या सरकारांची काय इच्छा आहे, आपणांजवळ निवेदन केली. ती आपण प्रथम स्वीकार केली की नाही हे कळल्या शिवाय भेटवस्तू घेणे रास्त होणार नाही." अबू म्हणाला.

अबू म्हणाला ते ऐकून सुलतानाला कमालीचा आनंद झाला. तो म्हणाला–"या पूर्वी आलेले सर्व राजदूत आमच्या राजकन्येला पाहतांच, ते ज्या कामासाठी आले होते ते काम विसरून तिच्याचकडे पहात राहिले आणि निरर्थक गप्पा मारीत



राहिले. भिकारी घेतात तशा भेटवस्तू घेतल्या. त्या सर्व वस्तू त्यांनी आपल्या कपड्यात ठेवल्या. त्यामुळे त्यांच्यावर आलेला प्रसंग तू पहा. असें सांगून टर्कीच्या सुलतानाने त्या सर्व जणांना त्याने बंदीखान्यात टाकले होते त्याची दारे उघडली.

अबूला त्या जागी कैदेत पडलेले राजदूत व काही राजकुमार दिसले.

"आमच्या मुलीला तुमच्या मालकांना द्यायला आमची कोणतीही हरकत नाही. आतां तिने दिलेल्या सर्व भेटवस्तू आपण घ्यायला मुळीच हरकत असू नये." टर्कीचा सुलतान म्हणाला.

एक महिना लोटण्याच्या आंतच टर्कीच्या राजकन्येचा विवाह थाटामाटाने होऊन गेला. त्या शुभ-समयी त्याने कैदेत टाकलेल्या सर्व राजदूतांना व राजकुमारांना टर्कीच्या सुलतानाने कैदेतून मुक्त केले.

अबूने राजदूताचे काम करून त्या कामात तो यशस्वी झाला या बद्दल तिघे वजीर ईर्ष्याग्नीनें भडकले. त्यांनी अबूचा सर्वनाश करण्यासाठी आणखी एक दुष्ट उपाय योजला. त्यांनी सुलतानाचे पाय चेपणाऱ्या दोघां मुलांवर कामाची जबाबदारी सोंपविली. काय करायचे ते त्या दोघांना सांगून त्यांना लांच म्हणून एक पिशवी भरून सोन्याची नाणी दिली.

एकदां रात्री त्या दोघां मुलांनी सुलतानाचे पाय दाबीत असतां, सुलतान डोळे मिटून पडले असतां ते झोपी गेले असल्याचे खोटेंच समजून संभाषण सुरू केले.

त्यांच्यापैकी एकजण म्हणाला—"त्या दुष्टाचा शहाणपणा पाहिलास का?"

"तो फसव्या एकच आहे. तोच तो अबू तम्माम्! सुलतानांना सोडून बाकी सर्वांना तो मोठा लबाड आहे, हे माहीत आहे!" पहिला मुलगा म्हणाला.

"त्याने कोणती अशी लबाडी केली रे?" दुसऱ्याने विचारले.

"तो टर्कीचा सुलतान आहेना, ते आपल्या चातुर्याने आपल्या मुलीचे लग्न आपल्या सुलतानांशी करून द्यायला तयार झाले, म्हणे! राजकुमारीला सुद्धां आपले सुलतान म्हणजे फार आवडतात." पहिला मुलगा म्हणाला.

"असे का? हा अबू म्हणजे महादुष्ट हे सर्वांना माहीत आहे. परंतु तो इतका दुष्ट असेल असें मला वाटले नव्हते!" दुसरा म्हणाला.

सुलतानाला खरोखरी झोप लागलीच नव्हती. आपल्या नोकरांचे बोलणे त्याने सर्व ऐकले होते. त्याने उजाडतांच पहिले काम केले ते अबूला तुरुंगात टाकविले.

काही दिवस लोटल्यावर एक दिवशी रात्री सुलताना कोणी दोघे जण भांडत असल्याचे ऐकू आले. त्याची झोप मोडली. तो आपल्या शयनागारातून काही बोलल्या शिवाय बाहेर आला आणि नोकर रहात त्या बाजूला गेला. तेथे त्याला त्याचे पाय दाबणारे मुलगे आपसांत भांडत असल्याचे दिसले. "मला त्या मोहोरांपैकी तिसरा भाग तरी मिळाला पाहिजे. त्या दिवशी रात्री मीच तुझ्याहून जास्त बोललो."

दुसरा ती गोष्ट मान्य न करतां पहिल्याला मारीत होता. त्याने आपल्या अंगरक्षकांना बोलावून त्या दोघांना पकडून आपल्या खोलीत धरून आणायला सांगितले. तेथे त्या दोघांनी त्यांच्या भांडणाचे कारण सांगितले, म्हणाले—"तिघां वजिरांनी मिळून त्या दोघांना पिशवी भरून मोहोरा दिल्या आणि काय बोलायचे ते शिकविले. तसे आम्ही आपसात खोटे बोललो."

सुलतानाने तावडतोब अबूला कैदेतून सोडण्यास हुकूम सोडला आणि झाले त्या बद्दल त्याची क्षमा मागितली.

"मालक, मी मागेंच निवेदन केले होते ना, की आपल्या फार जवळपास मी राहता कामा नये. त्यामुळे धोका आहे!" अबू स्मित करून म्हणाला.

सुलतानाने आनंदाने मान डोलविली. त्या दुष्ट तिघां वजीरांना योग्य शिक्षा करून अबूला मुख्य वजीर म्हणून नेमले.



## चांदोबातील नवलाई



### अति वेगाने प्रवास करणारा चांदोबा

आपल्याला दिसणाऱ्या चांद्रोबाच्या तिप्पट वेगाने प्रवास करणारा चांदोबा आपल्या सूर्यमंडलात आहे. हे नुकतेच कळले आहे. सात तासात एकदां गुरु ग्रहाला प्रदक्षिणा करणारा हा चांदोबा, तासाला सत्तर हजार चारशें मैल वेगाने, म्हणे, प्रवास करतो.

### बर्मूडा त्रिकोण गूढ कोडे



पश्चिम अटलांटिक महासागरांत बर्मूडा-फ्लोरिडाचा मध्य भागात बर्मूडा त्रिकोण असा प्रदेश आहे. या प्रांताच्या जवळपास येणाऱ्या बोटी व विमानें अदृश्य होऊन जातात. अकस्मात् फेसाळ लाटा उसळून बोटींना गिळतात, असे कॅनेडा-तील नॅशनल रिसर्च कौन्सिलमधील ओप्लोग याचे म्हणणे आहे. नंतर विमानांना सुद्धां याच लाटा नष्ट करतात की काय असे न उलगडणारे कोडे आहे.

### नूतन विनोदांत रेकार्ड



इंग्लंडातील यार्क शायर येथे राहणाऱ्या चव्ऱ्याहत्तर वर्षांच्या रेग मेल्लर नावाच्या एका वृद्ध व्यक्तीने एक नूतन छंद-विनोदांत अगदी नवीन असा रेकार्ड निर्मिला आहे. सुईच्या सारखी नखे, करवतीसारखे दांत असलेल्या रानमांजराकडून खंड पडूं न देतां लागोपाठ पांच तास सव्वीस मिनिटे, त्याने चाववून घेतले. यार्क शायरच्या रहिवाशांत रानटी मांजराकडून चाववून घेण्यात एक नवीन छंदविनोद वाढत आहे.

## तुम्हांला माहीत आहे का ?

१. सर्व जगात अत्यंत जुना असा वृक्ष कोठे आहे ?
२. दोन हजार वर्षांपूर्वी भारतातून एक कलम नेऊन लावलेला वृक्ष कोणता ? तो कोठे आहे ?
३. सर्व जगात अत्यंत जाडजूड वृक्ष कोठे आहे, माहीत आहे का ?
४. पाहतां पाहतां वाढते ते झाड कोणते ?
५. एकच अळघात वाढून पुष्कळ जागा व्यापून टाकणारा वृक्ष कोणता ? तो कोठे आहे ?

(उत्तरें ६४ व्या पानावर)



# जबाबदारी ओळखणारा

आनंदपूरचा जमिनदार आनंदराय यांचे वार्द्धक्य जवळ येऊ लागले. त्यांना तीन मुलांनंतर एक कन्या झाली. तिचे नाव स्वर्णा असे ठेवले होते. जमिनदाराने विचार केला की आपल्या इस्टेटीबरोबर मुलीच्या लग्नाची जबाबदारी सुद्धां मुलां-मध्ये वांटून टाकावी. मुलीचे लग्न म्हणजे एवढीतेवढी जबाबदारी नाही. मुलीला काही स्थळें सांगून आली होती, पण त्यांपैकी एकही जमिनदाराला पसंत आले नाही.

एके दिवशीं जमिनदाराने आपल्या तिघां मुलांपैकी मुलीच्या लग्नाची जबाबदारी कोण घेतो, हे पाहाण्यासाठी सर्वांत मोठ्या मुलाला बोलाविले.

जमिनदाराने त्याला विचारले-"श्रीकांत, मी आपल्या इस्टेटीचे चार भाग करून तुम्हां चौघांना सारखे सारखे वांटे करून द्यावे, म्हणतो. स्वर्णाला चांगले स्थळ पाहून तूच तिचे लग्न थाटामाटाने करून दे. तूच सर्वांत मोठा म्हणून ही जबाबदारी तू उचलणें जास्त श्रेयस्कर. मी म्हणतो ते ठीक आहे ना ?"

श्रीकांत वडिलांना नम्रपणे म्हणाला- "ठीक आहे, बाबा ! पण मी म्हणतों की, तुम्ही चार वांटे करण्याऐवजी तीनच करा. आम्ही भाऊ भाऊ मिळून बहिणीच्या लग्नाला जो खर्च होईल तो करू. तिच्या लग्नानंतर तिला तिच्या सासरी पाठवूं."

आनंदराय मान हलवून म्हणाले- "स्थळ कोणतेंच चांगले दिसत नाही. मी जिवंत असेपर्यंत मुलीचे लग्न डोळ्यांनी पाहू शकेन की नाहीं कळत नाही !"

श्रीकांत वडिलांचे सांत्वन केल्या सारखा म्हणाला-"तुम्हांला स्वर्णाच्या

श्री बाळकृष्ण स. सावरकर



लग्नाची काळजी करण्याचे कारण नाही, बाबा! मी धाकट्या भावांच्या मदतीने चांगले स्थळ पाहून बहिणीचे लग्न थाटा-माटाने करून देईन. इस्टेटीचे वांटे करण्यासंबंधी मी सुचविले तसे केले तर बरे होईल. या बाबतीत खूप विचार करून काय ते करा, घाई करण्याचे मुळीच कारण नाही."

आनंदरायने त्याला निरोप देऊन दुसरा मुलगा श्रीनिवास याला बोलाविले. त्याला देखील श्रीकांतला सांगितले तसेच सर्व समजाऊन सांगितले. म्हणाले–"मुलीचे लग्न समोर पहायला मिळावे असे फार वाटते आहे, बाबा!"

"ठीक आहे, बाबा! कोठेतरी चांगले स्थळ पाहून लग्न करून देऊ या. परंतु इस्टेटीसंबंधी तुम्ही म्हणालात तसे न करता, थोडा बदल केला तर बरे होईल, असे माझे मत आहे." श्रीनिवास म्हणाला.

"कसे केले तर बरे होईल?" आनंदराय यांनी विचारले.

"चार वांटे करण्याऐवजी सहा वांटे केले तर बरे होईल, असे मला वाटते" श्रीनिवास म्हणाला.

"सहा वांटे? कां, तसे कां?" चकित होऊन आनंदरायांनी विचारले.

प्रथम बहिणीबरोबर चार वांटे आम्ही करून घेऊ. नंतर बहिणीच्या लग्नाकरिता एक वांटा खर्च करू." श्रीनिवास म्हणाला. सहाव्या वांटयाची गोष्ट त्याने स्पष्ट केली नाही.

सहावा वांटा मी जिवंत असेपर्यंत तसाच राहू द्यावा असे म्हणतो की काय, असे जमिनदाराला वांटले. परंतु श्रीनिवास म्हणाला ते ऐकून आनंदरायला जास्तच आश्चर्य वाटले.

"बाबा, स्वर्णाचे लग्न करून दिल्याने आमची जबाबदारी थोडीच संपते? तिचे लग्न झाल्यावर तिच्या माहेरच्या लोकांनी करावयाची काही कामें सासरचे लोक पहातच राहतात. बाळंतपण वगैरे साठी तिला यावे जावे लागणार. इस्टेटीत ठेवलेला सहावा वांटा अशा कामासाठी निराळा ठेवावा लागणार."

श्रीनिवासला परत पाठवून तिसऱ्या मुलाला बोलावून घेतले. त्याचे नाव श्याम. जमिनदाराने त्याच्या दोघां वडील भावांनी सांगितले तसेच सांगितले आणि विचारले–"इस्टेटीचे चार वांटे करायला तुला काही हरकत आहे का?"

"हरकत, कां, बाबा?" श्याम म्हणाला.

"हरकत कां, असे विचारतोस?" आनंदरायांनी श्यामला विचारले.

"तसे नव्हे बाबा, इस्टेटीचे वांटे करण्याची गरज कां आली?" श्यामने विचारले.

"मला आतां, मी फार दिवस राहीन असे नाही वाटत, बाळा! मी डोळे मिटण्यापूर्वी तुमच्यापैकी कोणावरही अन्याय होऊ नये, म्हणून आणि माझ्यानंतर तुमची आपसात भांडणे होऊ नयेत, मी या प्रयत्नात आहे." जमिनदार म्हणाला.

"तुम्ही बाबा, निदान दहा वर्षे तरी चांगले रहाल, असा मला पूर्ण विश्वास आहे. चांगले स्थळ पाहून प्रथम बहिणीचे लग्न करावयाचे. त्यानंतर वांटे वगैरेचा विचार केला तर बरे होईल." श्याम म्हणाला.

आनंदरायना श्याम म्हणाला ते ऐकून फार आनंद झाला.

"तू म्हणतोस तसंही करता येईल, बाळा! तरी वांटे करून घेतल्याने काय



बिघडणार आहे, स्वर्णाला एक वांटा देणार आहे ना! त्यांतून तिच्या लग्नाचा खर्च निघेल. काय म्हणतोस?" जमिनदाराने विचारले.

"असे कां म्हणतां, बाबा! मुलीची जबाबदारी सगळ्यांवरच नाही का? शिवाय वांटे करून टाकले तर तुमचं कसं? वांटे झाल्यावर तुमची फिकीर कोणीच करणार नाही, असेंही होऊ शकेल. बहिणीचा वांटा तिचे लग्न करील का? म्हणून तुम्ही तूर्त इस्टेटीचे वांटे करण्याचा विचार सोडूनच द्या." श्याम म्हणाला.

आनंदराय काही वेळ विचार करायला थांबल्यावर म्हणाले—"परंतु बहिणीकरितां स्थळ मिळणे तितकं सोपेंही नाही. आपल्या आर्थिक स्थितीला बरोबर होईल असे स्थळ पाहिले पाहिजे, ते सर्व होईपर्यंत मी राहातो की नाही, देवच जाणे!"

"बहिणीच्या लग्नासाठी योग्य ती व्यवस्था मी केली आहे, बाबा! बाईच्या जमिनदारांच्या वंशात जन्मलेला माझा एक मित्र आहे. तो आपल्या स्वर्णाशी लग्नाला उत्सुक दिसतो आहे. त्याच फोटोसुद्धा मी आणला आहे. तुम्हांला पसंत पडला तर त्याच्या घरच्या वडील मंडळींशी बोलणी करतां येतील. आपल्या कुटुंबाला सर्व तऱ्हेने योग्य ठरेल, असे स्थळ आहे, हं!" श्याम म्हणाला.

आनंदरायनीं मुलाला अत्यंत प्रेमाने पोटाशी धरले व म्हणाले—"मला तूच माझा मुलगा, असे वाटते आहे. तुझ्या दुसऱ्या भावांनी माझ्या इस्टेटीचे किती वांटे करावयाचे, याचाच विचार केला. परंतु एकानेही धाकटचा बहिणीच्या लग्नाला तेवढे महत्व देऊन जबाबदारी घेतली नाही. निदान माझे उरलेले आयुष्य कसे जाईल याचा विचारही त्यांनी केला नाही. तू म्हणालास ते स्थळ सर्व तऱ्हेने योग्य होईल, असे मला वाटते. उद्यांच त्या मुलाच्या वडीलधाऱ्यांशी बोलणी करूं या."






[८]

[पिंगळ पुन्हा एकदा जुन्या पडक्या देवळात गेला. तेथे दुष्ट शक्ती होत्या त्यांना जिंकून महामायिकाच्या समाधीजवळ पोचला. नंतर महामायिकाची अंगठी, रत्नजडित मूठ असलेली तलवार आणि भूगोल घेऊन सुरक्षितपणें बाहेर आला. तितक्यात नदीच्या तळापासून मोठा आवाज करून पाण्याची धारावर उडू लागली. त्यानंतर—]

इतका मोठा मांत्रिक पद्मपाद, पण तोहि पाण्याची धारा वर उडू लागल्याबरोबर, ती पाहून दचकला व त्याने पाय मागे घेतला. हे पाहून पिंगळला आश्चर्य वाटले. तो पद्मपादच्या जवळच उभा राहून निर्भीकपणे त्या पाण्याच्या धारेकडे पहात म्हणाला—

"पद्मपाद! कायरे, आपल्या जवळ सर्व जगाला वांकवूं शकणाऱ्या शक्ती असतां त्या पाण्याच्या धारेला पाहून आपण कशाला भायचे?"

पिंगळचा प्रश्न ऐकतांच पद्मपादने स्वत:ला सावरले व पिंगळकडे पाहून व त्याच्या खांद्यावर प्रेमाने हात फिरवीत म्हणाला—"पिंगळा, तुझ्यासारखा तरुण वीर बाजूला असतां मी कशाला भिईन रे? कोणताही मंत्रतंत्र माहीत नसतां तू दर्शविलेले धाडस आणि निर्भयपणा



सर्वच वाखाणण्यालायक आहे. मी नदीच्या तळापासून एकाएकी वर उडू लागलेली धारा पाहून भीत नाही. परंतु..." असे म्हणत त्याने पुन्हां एकदा नदीकडे पाहिले.

"तू असे मागेपुढे कां करतो आहेस? मला नाहीं कळलं! काय भानगड आहे?" पिंगळने विचारले.

पद्मपाद स्मित करून म्हणाला—"आपण महामायिकाकडून सर्व अद्‌भुत शक्ती संपादन केल्या. म्हणून या भल्लूक पर्वत प्रदेशात स्वच्छंदपणे विहार करणाऱ्या दुष्ट शक्ती शक्तिहीन व्हायला पाहिजेत. परंतु तसे तर झाले नाही आणि उलट त्या ज्यास्त बलवान झाल्यासारख्या दिसत आहेत. त्याचे कारण मला अद्याप कळले नाही. तुला कळलें का?"

पिंगळने सुद्धा त्यालाही ते कळले नसल्याबद्दल मान हलविली. पद्मपाद पुन्हां काही सांगणार, इतक्यात नदीच्या पात्रावर अनेक भयंकर आकृती असलेल्या व अनेक प्रकारची अस्त्रे धारण केलेल्या शक्ती अकराळ विकराळ आवाज काढून ओरडू व भांडू लागल्या.

ते दृश्य पाहून पिंगळ थोडा हादरला व म्हणाला—"पद्मपादा, आतां पुढे कोणता उपाय? मी आपल्या आयुष्यात पूर्वी, कधीहि स्वप्नातही अशा भयंकर शक्ती पाहिल्या नाहीत. यांच्यावर आपण संपादिलेल्या जास्त शक्तीशाली आयुधांचा प्रयोग केला पाहिजे ना?"

पद्मपाद एक क्षणभर मान खाली घालून गप्प राहिल्यावर म्हणाला—"ओहो! आतां लक्षात आले, आजपर्यंत या सर्वांना आपल्या आज्ञेत ठेवणाऱ्या महामायिकाच्या समाधिपर्यंत आपण पोंचलो, त्याच्या शक्तीसुद्धा आपल्या अधीन झाल्या. म्हणून आतां या दुष्ट पिशाच्चांना कोणी नायक उरला नाही. म्हणून त्या नायकत्व मिळावे, यासाठी आपसांत भांडत आहेत. आपण एक काम केले तर बरे



होणार आहे. तू भल्लूककेतूची गोष्ट विसरला नसशील."

"भल्लूककेतू म्हणतोस! त्याला कसा विसरेन? तो एका काळी या पर्वतांचा अधिकारी होता म्हणे! आपण परत जातांना त्याचे साखळदंड तोडू. त्याला वचनही दिले होते ना!" मंगळ म्हणाला.

"अगदी बरोबर! आपण त्याला दिलेल्या वचनाचे पालन करायला हीच चांगली वेळ आहे. या पर्वत प्रदेशाला कोणी प्रमुख नसेल तर ही सर्व लहानमोठी भुते आपसात भांडण करून या सर्व देशात गडबड गोंधळ करतील, म्हणून आपण परत जाऊन त्या भल्लूककेतूला या सर्वांवर अधिकार करायला नेमू या!" पद्मपाद म्हणाला.

"फार छान विचार आहे! आपण तसेंच करू या." पिंगळ म्हणाला.

"तरमग तू लगेच नीघ. त्या जंगलातील तो तलाव आणि आजूबाजूचा प्रदेश तुला माहीतच आहे. त्याला बंधनमुक्त करून त्याला इकडे घेऊन ये! पद्मपाद म्हणाला.

पिंगळ "ठीक!" म्हणाला. पद्मपाद महामायिकाची हिऱ्याची मूठ असलेली तलवार देऊन म्हणाला—"तुला वाहन ते



पिशाच्च गाढव राहील. तू तुझ्या हातातील तलवारीने भल्लूककेतूचे साखळदंड तोडू शकशील. हे पहा तुझे वाहन!" असे म्हणत त्याने गदा हवेत फिरविली. त्या पाठोपाठ जमीन दुभंगली आणि तीतून रेंकीत एक गाढव पिशाच्च बाहेर आले.

पिंगळ महामायिकाची तलवार धारण करून पिशाच्च गाढवावर बसला. गाढव हवेत उडाले. नद्या, पर्वत आणि जंगले ओलांडीत पिंगळ भल्लूककेतू होता त्या तलावापर्यंत येऊन पोंचला.

तलवार हातात घेऊन हवेतून गाढवावर येत असलेल्या पिंगळला पाहून भल्लूककेतु मोठ्याने एकदा कण्हला व म्हणाला—

"मालक, प्रभो, देवा, गर्दभेंद्रा! मला वांचव! हे लोखंडाचे साखळदंड तोडून पुण्य संपादन कर?" असे मोठयाने ओरडूं लागला.

पिंगळ हंसत तलावाच्या काठावरच उतरून म्हणाला—"मला कोणता तरी देव समजून गर्दभेंद्र म्हणत आहेस. मी सामान्य मनुष्य आहे. तू मागे एकदां मला पाहिले आहेस. माझे नाव पिंगळ आहे."

"आपण पिंगळ का, प्रभो! आतां आठवले, महामायिकाच्या समाधीवर हल्ला करण्यासाठी गेलेले ते थोर पद्मपाद आपले गुरु का?" भल्लूककेतू म्हणाला.

"होय रे, तुझी स्मरणशक्ती चांगली दिसते आहे!" पिंगळ म्हणाला.

"प्रभो! ते मांत्रिक आनंदाने आहेत ना? महामायिकच्या समाधीत प्रवेश करतां आला का?" भल्लूककेतूने विचारले.

"त्या समाधीत मी प्रवेश केला. ही पहा त्या महामायिकाची मंत्रवलेली तलवार!" असे म्हणत पिंगळने ती तलवार फिरवून तिचे टोंक भल्लूककेतूला चांगले दिसेल अशा तऱ्हेने पुढे केले.

दुसऱ्या क्षणाला त्या तलवारीतून वीज चमकावी तशी चमक आली आणि ठिणग्या उडाल्या आणि लोखंडाचे साखळदंड तुटून पडले. जिथे ते साखळदंड तुटले तेथे राखेसारखे काही जमा झाले. सर्वच आश्चर्यचकित करून सोडणारे दृश्य होते. स्वतः पिंगळही त्यामंत्रवलेल्या तलवारीची शक्ती ओळखू शकला.

भल्लूककेतूला तो मुक्त झाल्याचे खरेच वाटेना. त्याने आपला विशाल देह ताठ करून उभे राहून पाहिले. त्याला फार आनंद झाला. त्याने कृतज्ञतेने पिंगळकडे पाहिले नंतर पिंगळ जवळ जाऊन त्याला साष्टांग नमस्कार करीत म्हणाला—"प्रभो, आपण मला बंधनमुक्त करून मला कित्येक दिवसापासून मी ज्या यातना सहन करीत होतो त्या सर्वातून मुक्त करून माझे रक्षण केलेत. मी आपल्या कृपेने नरकयातनेतून बाहेर पडलो. मी या घटकेपासून आपला गुलाम, दास आहे! काय हुकूम आहे?"

"चल, आपण आतांच निघायला हवे. आपण पद्मपादला जाऊन भेटले पाहिजे. महामायिक आपली सर्व शक्ती घालवून बसल्यावर भल्लूक पर्वताच्या दऱ्या खोऱ्यांत जी लहान मोठी पिशाच्चे आहेत, ती नायकत्व हाती यावे यासाठी आपसात मारामारी करीत आहेत. त्या क्षुद्र शक्तींना ताब्यात ठेवण्यासाठी व त्यांचे नायकत्व करण्यासाठी तुझ्या सारख्या शक्तिशाली नायकाची गरज आहे. त्या पदावर तुला नेमण्याचा पद्मपादचा विचार आहे! तसे केले नाही तर ती क्षुद्र भुते गावे व राज्ये वांटून घेऊन त्या प्रदेशात गोंधळ माजवितील." पिंगळने सर्व समजावून सांगितले.







पिंगळ म्हणाला ते ऐकतांच भल्लूककेतू घाबरून गेला. दोन्ही हात जोडून तो पिंगळला नमस्कार करून म्हणाला—"मालक, मला आतां या भुतांवर राज्य करण्याचा अधिकार नको, तो अधिकार मिळाल्याने किती कष्ट सहन करावे लागतील, याचा मला चांगला अनुभव आहे! कोणी थोर मांत्रिकाने किंवा शूर साहसी वीर पुरुषाने ही जबाबदारी आपल्यावर घ्यावी, कारण असा अधिकार घेऊन मार खाऊन कोठेतरी पळून जाऊन रहायचे, हा अनुभव आम्ही यापूर्वी घेतलेला आहे. मी या घटकेपासून कोणत्या तरी मानवाची चाकरी करून सुखाने रहावयाचे ठरविले आहे. मानवांत आपण थोर साहसी आहांत हे मला माहीत आहे. मला आपला एक गुलाम म्हणून माझा स्वीकार करा. पाहिजे असल्यास आपल्या इतर गुलामांवर व नोकरांचाकरांवर नायक म्हणून नेमल्यास मी ते काम करीन."

"शाबास, तुझी श्रद्धा आणि भक्ती पाहून मला फार आनंद झाला. परंतु तुझा कसा उपयोग करून घ्यावयाचा याचा निश्चय मी करणार नाही. प्रथम मी पद्मपादशी बोलून त्याचा सल्ला घेऊन मग तुला काय काम द्यावयाचे ते ठरवीन. तर चल आतां! आपण निघाले पाहिजे!" पिंगळ मागे फिरून निघण्याच्या तयारीने म्हणाला.

पिंगळ आपल्या गर्दभ वाहनावर चढून निघेपर्यंत भल्लूककेतू पिशाच्च गर्दभाची कंबर धरून म्हणाला—"आपल्यासारख्या थोर व गौरवशाली व्यक्तीने पिशाच्च गर्दभासारख्या क्षुद्र प्राण्यांचा वाहन म्हणून उपयोग करणे बरोबर नाही. माझ्या सारख्याच्या खांद्यावर बसावे. एका क्षणांत आपणांस मी आपल्या गुरूंकडे पोंचता करतो." असें सांगून भल्लूककेतूने गाढवाला एका हाताने उचलून गरगर फिरवून झाडांच्या वर आकाशांत फेकले.







गाढव नाइलाजाने दुसरा काही मार्ग नाही, जणुं रेंकत उडत असलेला पाहून भल्लूककेतू मोठ्याने हंसू लागला व म्हणाला–"प्रभो, आतां या, माझ्या खांद्यावर बसा." असे म्हणत पिंगळ समोर गुडगे टेकून बसला.

पिंगळ मागेपुढे न पाहतां अस्वलाच्या रूपांत असलेल्या भल्लूककेतूच्या खांद्यावर बसला. भल्लूककेतू लगेच आकाशांत उडाला. पापणी लवून उघडायच्या आत पिंगळला पद्मपाद वाट पहात होता त्या जागी येऊन पोंचला.

पद्मपादने भल्लूककेतूला पाहतांच स्मित केले व म्हणाला–"खुशाल आहेस ना? तिकडे पहा!" असे म्हणत नदीत उचंबळून वर येत असलेल्या पाण्याकडे आणि बाजूला दगडगोटयामधून प्रवाहा-बरोबर वहात चाललेल्या असंख्य प्रेतांकडे बोट दाखवून "हे सर्व राज्याधिकार मिळ-विण्यासाठी एकाचा गळा दुसरा कापीत आहेत. पाहिलेंस ना? तू यांची भांडणे थांबव. यांचा नायक होऊन तू राजा व्हावेस ही माझी इच्छा आहे!"

पद्मपाद म्हणाला ते ऐकतांच भल्लूककेतू असहाय झाल्यासारखा पिंगळकडे दीनपणे पाहू लागला. पिंगळ पद्मपादला म्हणाला–"मी याला आपला सेवक म्हणून घेणार म्हणतों!"

"मला त्यात काही हरकत वाटत नाही. परंतु आपसात भांडणाऱ्या या राक्षसांना ताळ्यावर आणायला काय करावयाचे?" पद्मपादने विचारले.

"त्यांना कसे मार्गावर आणायचे हें मी पाहून घेईन..." असे सांगून भल्लूककेतू कांही बोलणार, इतक्यात एकाएकी तो सर्व प्रदेश एकाएकी कित्येक आवाज झाल्याने दुमदुमू लागला. इतक्या मोठ्याने भुतें म्हणाली–"भल्लूककेतू, ओ हो! ओ हो!" असे म्हणत पद्मपाद होता तेथे धावत येऊ लागली. (क्रमश :)



# वीरसेनाचा स्वार्थीपणा

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा! कोणते तरी महत्कार्य करण्याचे ठरवून एवढ्या मध्यरात्रीच्या समयी भयानक अशा या स्मशानात तू मेहनत करण्यास बाध्य झालेला दिसतो आहेस, अशी मला शंका वाटत आहे. परंतु त्यासाठी तुला प्रोत्साहन देणारा, कोणी मंत्रवेत्ता तर नाही? तशा सारख्याच्या बोलण्यावर विश्वास ठेवून कधी कधी निराशाच पदरी पडते. संकट सुद्धां ओढवूं शकते. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला सुवाक याची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.



विद्यारण्य नावाच्या प्रदेशात सर्व शास्त्रात पारंगत असा एक योगी रहात असे. त्याच्या आश्रमात राहून कित्येक विद्यार्थी विद्या संपादन करून स्वदेशी जात असत. अशा विद्यार्थ्यांत सुवाक नावाचा एक जण मंत्रशास्त्रावर अधिक विश्वास ठेवून शिकायला आला होता. योग्याने त्याला मंत्रशास्त्र विद्येत काही प्रारंभिक गोष्टीच शिकविल्या होत्या.

"मंत्रशास्त्र विद्येत मला आपल्यासारखा पारंगत करा, गुरुवर्य!" असे सुवाक योग्याला म्हणाला.

त्याला उत्तर देत योगी म्हणाला—"मंत्रशास्त्र शिकण्यासाठी सर्व जणांत योग्यता असतेच असे नाही. तू त्याचा उपयोग समाजाची सेवा करण्याव्यतिरिक्त स्वार्थसिद्धी साठी करणार नाहीस, असा मला विश्वास होईपर्यंत मी तुला ती शिकविणार नाही."

सुवाक काही काळ त्या योग्याकडे श्रद्धाभक्तिपूर्वक राहून त्याची सेवा करीत राहिला. तरी त्या योग्याने त्याला मंत्रविद्या जास्त खोल शिकविली नाही.

एके दिवशी सुवाकने योग्याला नम्रपणे विचारले—"गुरुवर्य, आपणांस माझ्यावर तसा विश्वास केव्हां उत्पन्न होईल?"

योगी क्षणभर थांबून विचार करून म्हणाला—"उज्वल देशाची राजकन्या विद्युल्लता हिच्याशी जो विवाह करील तो एकटाच मंत्रविद्या अवगत करून घेण्यास योग्य आहे."

ते ऐकतांच सुवाक गुरुवर्यांचा निरोप घेऊन उज्वल देशाला निघाला.

तेथे राजधानीच्या शहरात त्याने त्याला येत होती तेवढी मंत्रविद्या वापरून काही प्रयोग केले आणि नागरिकांना आश्चर्यचकित करून सोडले. ती बातमी महाराजांपर्यंत पोचली. राजाने त्याच्याकडे निरोप पाठविला व आल्यावर म्हणाला—"आपण मंत्रविद्येत निष्णात असल्याचे ऐकतो आपण आमच्या अंत:पुरात आपल्या विद्येचे प्रदर्शन करून आमचे मनोरंजन करावे, अशी विनंती करीत आहे!"

तेव्हां सुवाक नम्रपणे म्हणाला—"मी आपल्या इच्छेविरुद्ध काही करीत नाही. तरी आपणांस वाटते तसा मी इंद्रजाल विद्येत निष्णात नाही. विद्यारण्य प्रांतात निवास करणारे एक महायोगी आहेत, त्यांचा मी शिष्य आहे. आपली राजकन्या विद्युल्लता एका विशिष्ट कारणाने जन्मली आहे. त्यांच्या आज्ञेप्रमाणे मी आपल्या कन्येशी काही बोलून जावे म्हणत आहे."

राजाने होकार दिला. अंत:पुरात सुवाकच्या मंत्रविद्येच्या प्रदर्शनाची व्यवस्था करण्यात आली. सर्व जण सुवाकच्या मंत्रशक्तीची स्तुती करू लागले.

प्रदर्शन संपल्यावर राजकन्या विद्युल्लता त्याचे अभिनंदन करण्यासाठी आली. तो तिला विचारू लागला—"कसे वाटले माझे हे प्रदर्शन?"

"मी उभ्या आयुष्यात इतके अद्भुत मंत्रविद्येचे प्रदर्शन पाहिले नाही." विद्युल्लता म्हणाली.

"तू पाहिलेस ते मंत्रशास्त्रातील एक सहस्रांशच होते." सुवाक म्हणाला.

"तरमग आपणात जेवढे ज्ञान आहे, ते सर्व दाखवून आम्हांला आणखी आनंदित करावे!" विद्युल्लता म्हणाली.

"मला एवढेच ज्ञान आहे. मला आपली शक्ती आणखी वाढवावयाची असेल तर तुझ्या मदतीची गरज आहे." सुवाक म्हणाला.





"सांगा, माझ्या हातून होईल तेवढी मदत मी करीन." विद्युल्लता म्हणाली.

सुवाक थोडावेळ मागेपुढे केल्यावर म्हणाला–"तू माझ्याशी लग्न केले पाहिजेस. तेव्हां मी या जगात अद्वितीय मंत्रवेत्ता होईन. सर्व जगावर आपले राज्य होऊ शकेल."

विद्युल्लता थोडी चिंतित होऊन म्हणाली–"आतां मी काय करू? अहो, तुम्हांला मदत न करण्यामुळे मी केवढी दुर्भाग्यशाली होते आहे! कारण माझे लग्न विजयपुरीचा राजा वीरसेन याच्याशी ठरले आहे. ते उद्यांच इकडे येणार आहेत!"

हे सर्व ऐकतांच सुवाकचा सर्व उत्साह थंड पडला. त्यानंतर काही वेळ विचार करीत राहिल्यावर तो विद्युल्लतेला म्हणाला–"तू वीरसेनाशी विवाह केलास तर फक्त विजयपुरीची राणी होशील. माझ्याशी विवाह केलास तर तू सर्व जगाची राणी होशील."

"मी तरी काय करू? मला आपले मन बदलता येत नाही. जगाची राणी होण्याचे भाग्य मला नाही, म्हणावयाचं!"

"तुझ्यामुळे मला जगाचा चक्रवर्ती होण्याचे भाग्य नाही, म्हणावयाचे! त्याचे फळ तुला भोगावे लागेल! मी वीरसेन येईपर्यंत येथेच वाट पहात थांबतो!" सुवाक म्हणाला.

दुसऱ्या दिवशी वीरसेन राजधानीत आला. सुवाकने त्याला भेटून आपली गोष्ट त्याला सांगितली.

सर्व ऐकून घेऊन वीरसेन फार शांतपणे म्हणाला–"राजकुमारी व मी दोघांचे परस्परांवर फार प्रेम आहे. तुझ्या मनांत आणखी काही इच्छा असेल तर ती पुरी करण्याचा मी प्रयत्न करीन."

ते उत्तर ऐकून सुवाकला भयंकर राग आला. तो दांतओठ चावून म्हणाला–"तू कुरूप हो!"

त्याच्या मंत्रशक्तीमुळे वीरसेन कुरूप झाला.





"आतां पाहातो, विद्युल्लता तुझ्याशी कसा विवाह करते ती!" असे म्हणत सुवाक वाकडे तोंड करून हसू लागला.

वीरसेनाने आरशात आपले तोंड पाहिले. ते बदलेले रूप पाहून त्याला रडावेसे वाटले. आतां विद्युल्लतेजवळ कसे जावयाचे असा तो विचार करीत असतां, काय घडले हे कळल्यावर विद्युल्लतेने आपल्या एका सखीबरोबर त्याच्याकडे निरोप पाठविला.

"मी तुमच्या रूपाकडे पाहून तुमच्याशी प्रेम करीत नाही, तुमचे मन व स्वभाव पाहून तुमच्यावर माझे मन बसले."

ते ऐकून वीरसेन सुवाककडे पाहून म्हणाला–"तू आमचे प्रेम किती अधिक आहे, याचा विचार केला नाहीस. कुरूप असूनही विद्युल्लता माझ्याशीच विवाह करणार, म्हणत आहे!"

सुवाक जास्तच चिडून म्हणाला–"तिचे प्रेम किती मोठे असो, तुला काय वाटते? तू हे रूप घेऊन तिला योग्य वर शोभशील असे तुला वाटते का? तिच्यावर खरे प्रेम असेल तर तू तिला विसर. माझ्याशी तिने विवाह केला तर ती जगाची राणी होईल."

ते ऐकून वीरसेन हसून म्हणाला–"विद्युल्लतेला मी योग्य वर नसेन तर ती गोष्ट तिने बोलायला हवी! मी कशाला तसे मानावे? आमचा विवाह नक्कीच होणार!"

अशातऱ्हेने सुवाक त्या दोघांचा विवाह थांबवू शकला नाही. विवाह समारंभ संपतांच वीरसेनला पूर्वरूप प्राप्त झाले.

सुवाकला फार वाईट वाटले. त्याचे सर्व प्रयत्न आणि युक्त्या फोल ठरल्या. तो परत आपल्या गुरूकडे जाऊन म्हणाला–"गुरुवर्य! माझ्या सर्व प्रयत्नांत विघ्नेच विघ्ने आली. कारण वीरसेनचा स्वार्थ!" असे सांगून जे घडले होते ते त्याने सविस्तर सांगितले.

योग्याने सुवाककडे खोल नजरेने पाहिले व म्हणाला—"तू मंत्रविद्या शिकण्यास योग्य नाहीस, हे स्पष्ट झाले."

वेताळ येथवर गोष्ट सांगून म्हणाला—"राजा, मंत्रवेत्ता योगी व सुवाकच्या गुरूचे वर्तन अन्यायाचे वाटत नाही का? आपला शिष्य सुवाक याला राजकन्या विद्युल्लते-विषयीं त्यानेंच सांगितले होते ना? तो प्रयत्नात अयशस्वी होऊन परतल्यावर त्याला, तू मंत्रविद्या शिकायला अयोग्य आहेस असे म्हणणें, हे कसे काय न्याय्य व धर्माला अनुकूल होऊ शकेल? स्वतः कुरूप झाला असून राजकन्येशी विवाह करण्याचा आग्रह धरणारा वीरसेन स्वार्थीच नाहीं का? तसा स्वार्थी कोठे मिळेल का? या शंकांचे समाधानकारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील!"

विक्रमादित्य म्हणाला—"योग्याच्या वागण्यात अन्याय अधर्म असा काहीच नाही. त्याने मंत्रविद्या शिकविण्यापूर्वी त्याच्या शिष्यात नीतिधर्म बुद्धी किती आहे, हे पाहून घ्यायचे ठरविले होते. जे घडले ते ऐकून घेतल्यावर सुवाक हा मंत्रविद्या शिकायला योग्य नाही, हे त्याने ओळखले. आता वीरसेनाच्या स्वार्थासंबंधी. सुवाक ज्या स्वार्थबुद्धीने राजकन्येशी विवाह करणार होता तें त्याने बोलतां-बोलतांच ओळखले. त्याच्याजवळ जी थोडी मंत्रविद्या होती तिचा उपयोग करून त्याने वीरसेनला कुरूप केले होते. त्याला पूर्ण मंत्रविद्या लाभली असती तर जगात त्याने किती अन्याय केला असता याची कल्पना वीरसेनला साहजिक झाली. म्हणूनच त्याची मंत्रविद्या निष्फल होऊन आपल्याला मूळ रूप आले हे सुद्धा त्याला कळले, त्याने जे केले ते सत् संकल्पानेच केले, स्वार्थबुद्धीने नव्हे!"

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# शिवशिवणारी जीभ

आंबेवाडी येथे सोनदेव नावाचा एक सधन शेतकरी रहात असे. कोणी त्याच्याकडे आपल्या कामासाठी आला तर प्रत्येकाला तो 'कुचकामाचा' म्हणून त्याचा पाणउतारा करी.

एकदां स्वतः सोनदेवाला कामानिमित्त शेजारच्या गावी जावे लागले. फार रात्र झाली होती म्हणून कोणाच्या घरी न जाता धर्मशाळेत त्याला रहावे लागले. झोप येईना म्हणून तो खाटेवर या कुशीवरून त्या कुशीवर लोळत असतां शेजारच्या खोलीतून त्याला संभाषण ऐकू आले.

"तरमग तुम्ही उजाडल्यावर माझ्या बरोबर आंबेवाडीला येणार म्हणतां? पण तेथे तुम्ही कोणाच्या घरी उतरणार, नाही सांगितलेत?" एक आवाज.

"सोनदेवांच्या घरी!" दुसरा आवाज.

"कुचकामाच्या सोनदेवांच्या घरी, होय ना?" असा पहिला आवाज हंसत झाला.

त्या पाठोपाठ दुसरा आवाज घाबरल्यासारखा होऊन—"असे का म्हणालात हो? तुमच्या गावात सोनदेवांइतका कोणी श्रीमंत नाही, असे ऐकतो! मला एकुलता एक मुलगा आहे. सोनदेव घरदार व संपत्तीच्या बाबतीत आमच्या बरोबरीचे आहेत असे मला वाटते आहे. त्यांची मुलगी माझ्या मुलाला योग्य होईल, हे विचारण्यासाठीच मी आंबेवाडीला जात आहे. त्यांच्या विषयी तुम्हांला जे माहीत आहे, ते सर्व सांगितलेत तर मी तितक्या दूर जाण्याची गरजच रहाणार नाही."

त्यानंतर प्रथम आवाज झाला तो म्हणाला—"तसे तुम्ही मुळीच घाबरण्याचे कारण नाही हो! सोनदेव गावातले सर्वांत

श्रीमती सुषमा ना

श्रीमंत व इस्टेटवाले गृहस्थ आहेत, यात संशय करण्याचे कारण नाही."

"असे होय? मग तुम्ही 'कुचकामाचे' सोनदेव असे कां म्हणाला होतां, तेव्हां?" सोनदेवाकडे मुलीला पाहायला जाणाऱ्या गृहस्थांनी विचारले.

तो गांववाला म्हणाला—"मी सोनदेवांच्या गावचाच. असे आहे पहा, सोनदेवांकडे कोणी गृहस्थ कामानिमित्त आला की तो कितीही मोठा असो, सोनदेव त्याला 'कुचकामाचा' म्हणून खिताब बहाल करतात. म्हणून सोनदेवांना थट्टेत 'कुचकामाचे' सोनदेव हे सर्व म्हणू लागले. पण हे आपसांतच हो! परंतु खिताब देण्याचा दुसरा काही अर्थ नाही!"

"म्हणजे सोनदेवांची जीभ जास्त शिवशिवते, असे म्हणाना!" असे म्हणत बोलणी करायला आलेले गृहस्थ म्हणाले.

सोनदेव हे सर्व संभाषण ऐकत होते, ते खाटेवरून उठून शेजारच्या खोलीत गेले. त्यांना पाहून आंबेवाडीचा रहिवासी घाबरला. परंतु सोनदेव त्याला न पाहिल्याचे सोंग करून शेजारगांवच्या पाहुण्यांना म्हणाले—"तुमचे सर्व बोलणे मी ऐकले. माणसाजवळ पैसा असला म्हणजे झाले. कोणाशी बोलावयाचे झाले तर त्यांची हेटाळणी करून बोलू नये, ही गोष्ट आमच्या गावकऱ्यांनी वेळीच सांगून माझी कानउघाडणी केली. तसे झाले नाही तर आपल्यासारखी थोर माणसं व्याही म्हणून कशी लाभतील?"

"हे ऐकून मला तुमचा चांगुलपणा व शांत स्वभाव कळला." भावी व्याही सोनदेवांना म्हणाला.

सोनदेव एक क्षणभर थांबून म्हणाले—"तुम्हांला हरकत नसेल तर बोलणी-करायला आमच्या गावच्या पुरोहिताला बोलावून आणतो."

ती गोष्ट भावी व्याह्यांना मान्यच होती. तेव्हांपासून सोनदेवांनी आपली व्यर्थ बडबड बंद केली आणि शिवशिवणारी जीभ आवरली.





# विदूषकाचे गणितज्ञान

कांचनगिरीचे महाराज कनकादित्य याने प्रजेच्या हितासाठी काही कामें करायचे ठरवून ती यशस्वी व्हावी यासाठी पद्धतशीर काम करणाऱ्या अधिकाऱ्यांची निवड करण्याकरितां एक परीक्षा ठेवली. त्या परीक्षेत सुनील, विनय व निर्मल हे तिघे प्रतिभावान आहेत हे सिद्ध झाले. या तिघांपैकी कोणी एक कोणत्याही बाबतीत आपली दुसऱ्याहून कमी नाही किंवा हारवू शकणार नाही, हे कळले.

महाराजांनी या तिघांना अधिकारी म्हणून नेमून देशाच्या उन्नतीसाठी ठरविलेली कामे तिघांनी मिळून करण्यासाठी व्यवस्था केली. परंतु काही काळ लोटल्यावर हे तिघे ती कामें करीत असतां महाराजांना त्यांच्या कामांत ते यशस्वी होतील की नाही याबद्दल शंका वाटू लागली. त्याचे कारण कांचनगिरीशी तुलना करून पाहतां शेजारचे सर्व बाबतीत मागासलेले रजतगिरीचे राज्य. त्या राज्याने कमी वेळेत अनेक लोकहिताची कामें यशस्वीपणे पूर्ण केली होती. तेथे ही सर्व कामें करण्यात सुचींद्र नावाचा एकटा अधिकारी यशस्वी होऊ शकला.

कनकादित्य महाराजांनी एके दिवशी बोलतांबोलतां ही गोष्ट आपल्या अत्यंत विश्वासू अशा विश्वेश्वर याला बोलून दाखविली. ते म्हणाले—"आपल्या देशांत तिघे अधिकारी आहेत. पण रजतगिरीला एकटा सुचींद्र सर्व कामे कशी व्यवस्थित करत आहे आणि यशस्वी होतं आहेत. त्याच्याकडे पाहिले तर आपले अगदी निरूपयोगी आणि कुचकामाचे वाटतात.

ते ऐकून विश्वेश्वर म्हणाला—"महाराज! सुचीन्द्र हा एक समर्थ अधिकारी आहे! तरी आमच्या अधिकाऱ्यांपैकी प्रत्येक जण दोन-

श्री रा. कु. जोग



दोन सुचीन्द्रा एवढा आहे अशी माझी खात्री आहे. योग्यतेत कोणी सुचीन्द्रा पेक्षां कमी नाही.

कनकादित्य हंसून म्हणाला–"आपल्या देशातल्या व्यक्तीचा अभिमान प्रत्येकाला असावा, तसे तू बोलतो आहेस."

महाराज म्हणाले ते न आवडल्या सारखे तोंड करून विश्वेश्वर म्हणाला–"मला गणित शास्त्रात चांगले पांडित्य आहे ही गोष्ट आजपर्यंत आपणांस सांगायला मला योग्य संधी लाभली नाही. मी थोडे कळावे म्हणून कुतूहलाने सुचीन्द्र आणि आपल्या अधिकाऱ्यांची तुलना करून पाहिली व काही हिशोब करून पाहिला. त्यामुळे मी आपणांजवळ तसे निवेदन केले."

तसें म्हटल्या बरोबर महाराजांच्या मनांत त्याच्या गणिताच्या ज्ञानविषयीं व त्याने लावलेल्या हिशोबाविषयी विचारावेसे वाटले. त्यांनी तसे विचारलेही.

"महाराज, आपण स्वतःच निवडलेल्या सुनील, विनय व निर्मल या तिघांपैकी कोणा एकाला एकट्याने तुलना करून त्यांच्या योग्यते विषयी पाहिले तर तो दोन सुचीन्द्रा एवढा ठरेल. परंतु त्यांच्यापैकी कोण्या दोघांनाच घेऊन तुलना करून पाहिले तर ते दोघे एकट्या सुचीन्द्रा-एवढेच ठरतील. आणखी एक आश्चर्य-कारक गोष्ट अशी की आपल्या तिघां अधिकाऱ्यांना मिळून तुलना करून पाहिले तर एका सुचीन्द्रा एवढे सुद्धां होऊं शकणार नाहीत." विश्वेश्वर म्हणाला.

महाराज थट्टा करीत विश्वेश्वरला म्हणाले–"आपला प्रत्येक अधिकारी दोन-दोन सुचीन्द्रां बरोबर आहे. असा प्रारंभ करून तिघांनी मिळून प्रयत्न केला तरी एका सुचीन्द्राएवढे होऊ शकणार नाहीत. हे उलटें गणित ऐकले की तुला गणित शास्त्राचे केवढे ज्ञान आहे ह्याचा विचार जाऊन तुला साधा गुणाकार तरी येतो का, हा विचार मनांत येतो."

"महाराज, तुम्ही मला लहान आंकडे वाढवून लिहितां येत नाहीत असे म्हणालात तर ते मी एकवेळ मान्य करीत. परंतु मला गणित शास्त्रात प्रवेशही नाही, असे म्हणालात तर मात्र मी मान्य करणार नाही. आपण परवानगी द्याल तर आपल्या अधिकाऱ्यांची योग्यता कितपत आहे याविषयी मी केलेले गणित कसे आहे निवेदन करावे म्हणतो."

"ठीक, कर बघू!" असे म्हटल्यासारखी महाराजांनी मान हलविली.

"आपल्या अधिकाऱ्यांची प्रतिभा, मेधाशक्ती व योग्यता आपणांस माहीतच आहे. अशा तिघां व्यक्तींवर सर्वांनी मिळून काम करा अशी एक जबाबदारी टाकली होती. एकाच तऱ्हेच्या योग्यता या तिघांचा त्यांची-त्यांची व्यक्तित्वें आणि अहंकार ही मिळून एकाच पातळीवर जायला मदत करू शकत नाहीत. म्हणून या तिघांना मिळून विचार केला तर एका सुचीन्द्राची ते बरोबरी करू शकणार नाहीत असें मी म्हटले. दोघे असतील तर सुखातील मतभेद झाला तरी एकाच्या विचाराशीं दुसऱ्याची विचार मिळणे शक्य आहे. म्हणून ते एका सुचीन्द्राची बरोबरी करू शकतील, असे मी म्हणालो."

महाराज म्हणाले–"बोल पुढे, थांबलास कां?" "अत्यंत प्रतिभावान व योग्य अशा आपल्या तिघां अधिकाऱ्यांपैकी कोणा एकाला आपण जबाबदारी सोंपविली असतीत तर तो दोघां सुचीन्द्रांची बरोबरी करू शकला असता असे मी खात्रीने म्हणू शकेन." विश्वेश्वर म्हणाला.

विश्वेश्वरने आपली बाजू स्पष्ट केल्यानंतर त्याच्या गणिताआड लपलेलें मर्म व प्रतिभा-वान व्यक्तीची मानसिक अवस्था कशी असते याची कल्पना महाराजांना झाली.

त्यानंतर महाराजांनी त्या अधिकाऱ्यांना पाळीपाळीने नेमून आपली आपली जबाब-दारी संभाळायला सांगितले काही काळ लोटल्यावर महाराजांना आपल्या अधिकाऱ्यांची योग्यता विदूषकाने सांगि-तल्या प्रमाणेच नव्हेतर त्याहून ही जास्त असल्याचे आढळून आले.



# उत्तम चित्र

अवंती नगरीची राजकन्या चित्रकलाप्रवीण व अत्यंत रूपवती होती. तिने आपल्या विवाहासाठी एक अट ठेवली होती. जगातल्या सर्वोत्तम सुंदर स्त्रीचे चित्र काढून जो राजकुमार आणील त्याच्याशीच ती लग्न करणार, अशी ती अट होती..

कित्येक राजकुमारांनी सुंदर दृश्यांची आणि एकाहून एक सुंदर स्त्रियांची चित्रें काढून आणली. त्यांतले जगांतली सर्वांत सुंदर अशी एकही नसल्याने राजकन्येने सांगितले आणि त्यांना आपला नकार कळविला. शेवटी मगध देशाच्या राजकुमाराने आणलेले चित्र पाहून राजकन्येने मान्य केले की त्यातली स्त्री जगांत सर्वांत सुंदर आहे.

ते चित्र आणखी कोणाचे नसून अवंतीच्या राजकन्येचेच होते !

लग्न थाटामाटाने झाले. त्यानंतर अवंतीच्या राजकन्येने नवऱ्याला विचारले–"काय हो. तुम्ही हे कसे ठरविलेत की जगातल्या राजकन्येत मीच सर्वांत सुंदर आहे म्हणून ?"

"त्यात आश्चर्य करण्यासारखे असे काय आहे ? तुझ्या जागी आणखी कोणी असती तर मी तिचेच चित्र काढले असते !" मगधचा राजकुमार थोडे मंदहास्य करीत म्हणाला.

राजकुमारी प्रथम खजिल झाली नंतर नवऱ्याच्या हुशारीची मनोमन स्तुती करून थोडी हंसली.





# माहूत राजा झाला

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असतां बोधिसत्व वाराणसी जवळच एक साधू म्हणून रहात होते. ते भिक्षेकरिता एकदां राजधानीत गेले आणि एका माहूताच्या घरा समोर येऊन उभे राहिले. हा माहूत हत्ती धरण्यात व त्याला काबूत ठेवण्यात मोठा पटाईत होता. तो राजाच्या गजशालेचा प्रमुख होता.

बोधिसत्वांना पाहून माहूताने त्यांना अत्यंत श्रद्धा भक्तिपूर्वक नमस्कार केला आणि त्यांना घरात बोलावून घेतले. त्यांना जेवायला वाढले आणि अत्यंत नम्रपणे म्हणाला–"आपण काही दिवस तरी माझ्या घरी माझे आतिथ्य स्वीकारावे, अशी विनंती करतो आहे."

बोधिसत्व एक आठवडाभर माहूताकडे अतिथि म्हणून राहिले. परत जातांना त्यांनी त्याला आशीर्वाद दिला की आयुष्यभर सुखी रहा. त्या आशीर्वादामुळे माहूताचे आयुष्य सुखी झाले.

एक दिवशी रात्री गावातल्या एका देवळाच्या मंडपात एक लाकूड फोडया झोपला. शेजारीच काही झाडे होती. त्यांपैकी एका झाडावर काही कोंबडया झोपला होत्या. झाडाखाली काहीतरी खुडबुड झाली तेव्हां एका कोंबडयाची झोप मोडली व त्याने पंख पसरून फडफडविले तेव्हां एक वाळकी काटकी खालच्या फांदीवर झोपलेल्या कोंबडयाच्या अंगावर पडली. त्यामुळ त्याची झोप मोडली.

त्या कोंबडयाने रागाने पाहिले आणि म्हणाला–"इतका गर्व चांगला नाही ! मी कोण आहे असे वाटले तुला ? मी सामान्य कोंबडा नाही. माझं मांस



खाणाऱ्याला खूप मोठे धन लाभेल, समजलास!"

ते ऐकून वरच्या फांदीवरचा कोंबडा खदखदां हसून म्हणाला–"माझं मोठे पण तुला माहीत नाहीसे दिसते आहे. माझं मांस खाणारा खात्रीने राजा होईल." त्याने आपल्या थोर पणाचे गुपित उघड सांगितले.

तें संभाषण लाकूडफोड्याने ऐकले आणि त्याला फार आनंद झाला. तो काही वेळे हालचाल केल्याशिवाय व काही आवाज केल्या शिवाय पडून राहिला. पुन्हां कोंबडे झोपी जातील असा विचार करून तो जागा राहिला आणि काही आवाज केल्याशिवाय झाडावर चढला. तो राजाच करणारा कोंबडा आहे तर नुसता धनी करणारा कोंबडा हवा कशाला असा विचार करून त्याने खालाच्या फांदीवरच्या कोंबड्याला सोडले आणी वरच्या कोंबड्याला जाऊन धरले आणि खाली उतरून आला. तो घरी गेला.

घरी पोंचतांच त्याने बायकोला बोलावून विचारले–"तुला माहीत आहे का, तू राणी होणार आहेस."

त्याची बायको रागाने म्हणाली– "असल्या गप्पा नको मारूस माझ्या जवळ. मी लाकूड फोड्याची बायको आहे, त्याच्याशी लग्न केले आहे. मला त्यात समाधान आहे!"

लाकूडफोड्या मोठ्याने हसून म्हणाला– "होय, लाकडे फोडून आयुष्य घालविणारा तुझा नवरा सिंहासनावर बसणार आहे. हा पहा कोंबडा पहिल्याने त्याचे मांस शिजवून तयार कर." असे सांगून त्याने तो कोंबडा बायकोच्या हातात दिला व त्या कोंबड्याचा महिमा बायकोला सविस्तर सांगितला.

त्याच्या बायकोला जो आनंद झाला तो एवढा तेवढा नव्हता. तिने लगेच कोंबडा कापून त्याचे मांस शिजविले. लाकूड फोड्या बायकोला म्हणाला–

"आपण प्रथम नदीवर जाऊन आंघोळ करू या. नंतर जेवू या."

दोघांनी थोडा भात व त्या बरोबर कोंबड्याचे मांस एका मडक्यात ठेवले आणि त्याचे तोंड घट्ट बंद करून नदीवर ते नेऊन स्नानाला गेले.

त्यांनी मडके नदीकाठावर एका जागी ठेवले आणि नदीत स्नानाला उतरले. एकाएकी नदीचे पाणी वाढू लागले, आणि काठावर ठेवलेले मडके पाण्याच्या प्रवाहात वाहू लागले.

लाकूडफोड्या डोके आपटू लागला व म्हणाला–"मी राजा आणि तू राणी होण्याचे भाग्य दिसत नाही; काय करायचे?" दोघे दुःख करीत घरी परतले.

त्या वेळी नदीच्या काठाकाठाने दूर अगदी खाली बोधिसत्वांचे आतीथ्य करणारा माहूत नदीत एका हत्तीला धुवून स्नान घालीत होता. त्याला नदीच्या प्रवाहात वहात असलेले मडके दिसले. त्याने ते मडके पकडले आणि तोंड उघडून पाहिले तर थोड्याच वेळा पूर्वी शिजवलेले मांस व भात होता. तो चकित झाला. त्याला खूप भूक लागलेली होती. त्याने लगेच भात व मांस पोटभर खाऊन घेतले.

ही गोष्ट घडली त्याच्या तिसऱ्या दिवशी वाराणसी नगरावर शत्रुसैन्याची स्वारी झाली. राजाने माहूताचा वेष धारण केला आणि माहूताला राजाची वस्त्रे व आभूषणें धारण करायला लावली. आपण माहूताच्या



वेषात असलो तर आपल्या जिवाला धोका राहणार नाही या विचाराने राजाने हे सर्व केले होते.

स्वारी करून आलेल्या शत्रूने राजाला जिवंत धरायचा विचार केला होता. म्हणून राजाला न मारतां त्याच्या हत्तीच्या माहूताला वार करून राजाला जिवंत धरून न्यायचा घाट घातला. त्यांनी माहूताचा वेध करून बसलेल्या राजावर बाणवृष्टी करून त्याला ठार केले. राजा होऊन अंबारीत बसलेल्या माहूताला शत्रूचा डाव कळला. तो रणांगणावरून पळून न जातां शत्रूचा सूड उगवायचे ठरवून त्याने शत्रूला शौर्याने तोंड दिले.

त्यामुळे वारणासीच्या सैनिकां मध्ये उत्साह वाढला व घनघोर युद्ध झाले. वाराणसीचे सैनिक भुकेल्या सिंहासारखे शत्रुसैन्यावर चवताळून तुटून पडले. कित्येक शत्रुसैनिक हताहत झाले. जे उरले ते रणांगणावरून पळून गेले. युद्ध थांबले आपल्या विजयाला कारण आपले महाराज नसून त्यांचा माहूत होता ही गोष्ट मंत्र्याच्या व दरबारी लोकांना माहीत होती. राजा मरण पावला तेव्हां दुसऱ्या राजाची निवड करणे आवश्यक होते. मृत महाराजांना मूलबाळ नव्हते.

राजाचा मुख्य पुरोहित म्हणाला– "महाराजांनी स्वतःच राजवस्त्रे व आभूषणे आणि राजमुकुट माहूताला दिला. तेव्हां आपल्या राजा होण्यालायक हा माहूतच आहे"

"आपले म्हणणे बरोबर आहे. माहूताच्या पराक्रमा मुळेच नाहीका आपण विजयी झालो! शत्रू पळून गेला व वारणासीचे रक्षण झाले. म्हणून सिंहासनारूढ होण्यास माहूतच अधिकारी आहे." प्रधान म्हणाला.

सेनापती व इतर सर्व प्रमुख अधिकारी, पुरोहित आणि प्रधानाचे अनुमोदन मिळाल्यामुळे माहूतच राजा झाला. त्याच्या इच्छेनुसार बोधिसत्वांची मुख्य सल्लागार म्हणून नेमणूक झाली.



# छत्रपती शिवाजी–२



आपला राजा शिवाजी मोंगलांच्या कैदेतून सुटून सुखरूप परत आल्याबद्दल महाराष्ट्रभर उत्सव झाले. इ.स. १६७४ यावर्षी शिवाजी 'छत्रपति' ही पदवी धारण करून सिंहासनारूढ झाले.

महाराष्ट्र व मोंगल यांची युद्धे वारंवार होऊ लागली. शिवाजीने आपल्या आदर्श वागणुकीने, अपूर्व धैर्य व साहसाने आपल्या अनुयायांचा उत्साह वाढविला. त्याचे एक सेनापती बाजी प्रभू यांनी एकदां आपले महाराज सुरक्षित प्रतापगडावर पोंचावे म्हणून पावनखिंडीत आपले प्राणार्पण करून शत्रूला अडवून ठेवले.





हारलेल्या शत्रूशी शिवाजीचा व्यवहार गौरवपूर्ण असे हिंदुधर्माचा अभिमान असूनही इतर धर्मियांशी शिवाजीचा व्यवहार अत्यंत औदार्यपूर्ण असे. एकदां शिवाजीला कुराणाची प्रत लाभली होती. ती त्याने एका मुस्लिम धर्मावलंबियाला भेट म्हणून दिली.



कल्याणचा सुबेदार त्याची सून अबाजी सोनदेवाच्या हाती सांपडली. तिला अबाजी सोनदेवाने भेट म्हणून शिवाजीकडे पाठविली. तिला पाहतांच शिवाजी म्हणाला—"माझी आई इतकी सुंदर असती तर आम्ही पण सुंदर झालो असतो!" असे सांगून तिला बहुमूल्य वस्तूभेट म्हणून देऊन शिवाजीने कल्याणच्या सुबेदाराकडे परत पाठविले.

धर्मासंबंधी प्रवचन ऐकण्यात शिवाजीला फार आनंद वाटत असे. एकदा संत तुकारामाचे कीर्तन ऐकत असतां ती गोष्ट शत्रूला कळली. लगेच शत्रुसैन्याने वेढा दिला व शिवाजीचा शोध काढू लागले. त्यावेळी शिवाजीसारख्याच एका व्यक्तिला तेथून पळून जाताना शत्रूने पहिले व त्याचाच पाठलाग करीत निघाले. प्रवचन संपल्यावर शिवाजी सुखरूप घरी पोचला.





समर्थ रामदास यांच्या सहवासात राहणे शिवाजीला फार आवडे. परंतु त्याहून थोर कामें करण्याची शक्ती शिवाजीत आहे हे ओळखून श्रीसमर्थांना आपल्या दारासमोर भिक्षेला आलेले पाहून शिवाजीने आपले सारे राज्यच त्यांना समर्पित केल्याचे लिहून तो कागद समर्थांच्या भिक्षापात्रात टाकला.

धर्मावर अवलंबून असलेले साम्राज्य स्थापन करून त्याची प्रतिष्ठा वाढव असा उपदेश रामदास स्वामींनी शिवाजीला केला. त्या थोर कार्यात शिवाजी मग्न झाला. हिन्दूंच्या देवालयांच्या निर्मितीलाच नव्हे, तर मुसलमानांच्या मशीदी बांधण्यासाठी सुद्धा शिवाजीने सहाय्य केले त्याने कोणत्याही धर्माचा द्वेष केला नाही. धर्मविरोधी कार्यांचा त्याने निरोध केला.





शूर, साहसी व फार मोठा पुजारी असा शिवाजीने त्रेपन्न वर्षांचा असतांना डोळे मिटले. (इ.स. १६८० मध्ये) त्याच्या मृत्यूमुळे फक्त महाराष्ट्रीयांसच नव्हे, तर औरंगजेबाने ज्यांचा ज्यांचा छळ केला त्या सर्वांना अत्यंत दुःख झाले.

शिवाजीनंतर त्याचा ज्येष्ठ पुत्र संभाजी राजा झाला. त्याने शौर्य व पराक्रम गाजवून नऊ वर्षे राज्य केले. त्याने मोंगलांच्या अत्याचारांपासून प्रजेचे संरक्षण केले. मोंगलांच्या सैन्याचा अधिकार स्वतः औरंगजेबने घेतला असूनही महाराष्ट्रीयांनी संभाजीच्या नेतृत्वाखाली त्याला तोंड दिले म्हणून औरंगजेबाची डाळ शिजली नाही.





संभाजी झोपलेला असतांना संधी साधून मोंगलांनी त्याला कैद केले. इ स. १६८९ मध्ये संभाजी कैदेत असता नाही मोगलांच्या दुष्ट कृत्याचे खंडन करीत राहिला- त्याचा निरनिराळ्या प्रकारे छळ करून औरंगजेबाने संभाजीचा वध केला.

संभाजीच्या वधाने महाराष्ट्रियांचा क्रोध जास्तच भडकला. त्यांनी गनिमी काव्याने युद्ध करून औरंगजेबाला 'नको जीव' करून सोडले. संधी मिळेल तेव्हा मोंगलांच्या सैन्यावर छापे मारून त्यांनी औरंगजेबाला जेरीस आणले. महाराष्ट्रीयांस जिंकण्यासाठी औरंगजेबाने शभरा प्रयत्न केले. परंतु त्याची शक्ती हळूहळू क्षीण होत गेली.





सभाजी नंतर त्याचा धाकटा भाऊ राजाराम राजा झाला. त्याने राजधानी प्रथम जिंजीला व नंतर साताऱ्याला नेऊन तेथून मराठ्यांचे नेतृत्व केले. इ. स. १७०० मध्ये राजारामने आपला देह ठेवेपर्यंत युद्ध करीत राहिला. त्याच्या मृत्यूनंतर त्याची राणी ताराबाईने राज्यसूत्रे हाती घेऊन मराठ्यांचे नेतृत्व समर्थपणे केले. त्याच्या शेवटापर्यंत शांती मिळाली नाही.



# गाढवाची किंमत

कैरो शहरात एक सावकार रहात असे. तो अत्यंत लोभी होता. त्याच्याकडे येणाऱ्या गिऱ्हाइकांकडून तो त्यांची गरज पाहून कमी जास्त व्याज घेत असे. गरजू लोक देतही.

त्याला तो फार हुशार म्हणून फार घमेंड होती. तो म्हणत असे–"काय वाटते त्यांना मला फसवणारा या जगात कोणी नाही, म्हणावे."

एकदा चार तरुण मुलांच्या मनात आले या सावकाराची खोड मोडली पाहिजे. कांही तरी उपाय योजून ते निघाले. त्यांच्या पैकी एक एका गाढवावर बसून त्या सावकाराकडे जाऊन म्हणाला–"अहो, माझ्या जवळ दीनार आहेत, पण मला मोड हवी आहे हो!"

"देतो की! परंतु एक गोष्ट लक्षात ठेवा, मला थोडं कमीशन मिळालं पाहिजे."

असे सांगून सावकार मोड मोजू लागला. इतक्यात कोठून तरी त्याचे तिघे तरुण मित्र आले आणि गाढवाकडे फार लक्षपूर्वक पाहू लागले. त्यांच्या पैकी एकजण कांहीतरी गुपित सांगितल्यासारखा हलक्या आवाजांत म्हणाला–"हाच तो! तेच गाढव!"

"खरंच का?" उत्साहाने दुसरा तरुण त्याला विचारू लागला.

"कोणास ठाऊक? मला नाही खरं वाटत." तिसरा म्हणाला.

"गप्प रे! आपल्याला पाहिजे असलेले गाढव हेच! केवढ्याला विकेल विचारून तर पाहूया त्याच्या मालकाला." इतर दोघे म्हणाले.

ते गाढवावर बसलेल्या तरुणाजवळ जाऊन विचारू लागले–"तू आपलं हे गाढव केवढ्याला विकणार?"

श्री स. ना. श्रीखंडे



"विकायचं म्हणतां? मी विकणार म्हणून तुम्हांला कोणी सांगितले, हे आधी सांगा!" गाढवाचा मालक म्हणाला, तोंडावर आश्चर्याचा भाव आणीत.

"तू हे गाढव विकलेच पाहिजेस! शंभर दीनार देतो! तिघे म्हणाले.

सावकार ऐकून थक्कच झाला. इतकी किंमत! किती तरुण व दणकट गाढव झालं म्हणून फार तर दहा दीनार किंमत होईल. त्याहून जास्त मिळणेंच शक्य नाही.

यावेळी तिघे तरुण थोडे चिडल्यासारखे होऊन म्हणाले–"उगाच वेळ घालवू नकोस! आम्ही एक हजार दीनार देतो. देतोस का, बोल!" हे सर्व त्यांचे उघड-उघड नाटकच होते.

सावकाराचा कानावर विश्वास होईना. तो घाईघाईने त्या तरुणांना म्हणाला–"तुम्हांला गाढवाची इतकीच गरज असेल तर एकच काय. दोन विकायला तयार आहे, एकेक हजाराला, काय म्हणतां?"

ते तरुण सावकार म्हणाला ते ऐकून हंसू लागले व गाढवाच्या मालकाला म्हणाले–"दोन हजार दीनार! ही किंमत बरोबर नाही, म्हणतोस का?" त्यावेळी ते त्या गाढवाची फार गरज असल्या सारखे पहात होते.

"तुम्ही खरोखरच गाढव विकत घेणार असलात तर दहा हजार दीनार द्या. ही किंमत फार कमी आहे, हे मी सांगण्याची गरज नाही. तुम्ही समजूत दार आहां!" गाढवाचा मालक म्हणाला.

"इतके पैसे आमच्या जवळ नाहीत. अगदी शेवटचे सांगतो पांच हजार देतो. देऊन टाक!" तिघे तरुण म्हणाले.

"दहा हजाराला एक कवडीसुद्धा कमी नाही! गाढववाला म्हणाला.

"इतका हट्टीपणा करू नये रे!" तिघे तरुण म्हणाले.

"मला हट्टी म्हणणारे तुम्ही कोण रे? माझ्या गाढवाची किंमत मी मागितली तेवढी द्यायची असेल तर द्या. नाही तर चालू लागा!" गाढववाला म्हणाला राग आल्याचा भाव दाखवून.

त्या बरोबर बाचाबाची वाढली आणि त्यांचे भांडणही झाले काही वेळ. शेवटी गाढववाला तरुण इतर तिघांना म्हणाला–"तुमच्या बोलण्याची रीत मला मुळीच आवडली नाही. तुम्ही दहा हजार दीनार दिलेत तरी मी आपले गाढव तुम्हांला देणार नाही."

तिघे तेथून निघाले आणि रस्त्याच्या बाजूला एक झाड होते त्याच्या सावलीत जाऊन बसले.

सावकार गाढवाच्या मालकाला म्हणाला–"अरे वेड्या पोरा! एका मर-तुकड्या गाढवाला पांच हजार दीनार किंमत स्वप्नातही कधी ऐकली नाही. माझं ऐक आणि देऊन टाक!"

"अहो, माझ्या गाढवा विषयी एक गुपित आहे, ते तुम्हांला माहीत आहे का? त्याला अद्भुत शक्ती प्राप्त आहेत. त्याला रस्त्यावर नाही, जायचे त्या दिशेला जाऊ दिले तर ते कोठे निधी दडलेला असेल तर तो आम्हांला ते दाखविते." गाढवाचा मालक म्हणाला. नंतर गाढवाचा मालक गाढवाला घेऊन शेजारी एक सरबताचे दुकान होते त्याच्या समोर जाऊन उभा राहिला.



झाडाखाली बसलेले तिघे तरुण साव-काराकडे आले आणि म्हणाले–"या मूर्ख पोराला राग आलेला दिसतो आहे. तो हे गाढव आम्हांला विकणार नाही. आमच्या करितां तुम्ही घ्या. दहा हजारच दीनार घे, म्हणावे. तुम्ही केलेल्या मदती बद्दल शंभर दीनार देऊ."

"शंभर? नाही पुरायचे!" असे म्हणत सावकाराने मान हलविली.

"तरमग दोनशें घ्या! तो जाण्यापूर्वी जाऊन विकत घ्या." असे म्हणत तिघे तरुण सावकाराच्या जणू गळीच पडले.

सावकार गाढवाच्या मालकाजवळ गेला आणि दहा हजार दीनाराला गाढव

देतोस का, विचारू लागला. गाढववाला त्या गोष्टीस कबूल झाला. सावकाराने दहा हजार दीनार आणून दिले आणि गाढव घेऊन गेला.

तो त्या तिघां तरुणांजवळ येऊन म्हणाला. तुम्हांला हे गाढव हवे असेलतर वीस हजार दीनार दिले पाहिजेत. ते तुम्हांला मान्य नसेल तर मीच गाढव ठेवून घेतो."

तरुणांनी गाढवाकडे लक्षपूर्वक पाहिले व म्हणाले–"आम्ही इतके दिवस हे गाढव विकत घ्यायचे म्हणत होतो तेच हेना की नाही, असा संशय आम्हांला होतो आहे. तूच ठेवून घे!" असे म्हणत तेथून निघून गेले.

सावकार संतापला. त्याचे सर्व अंग रागाने थरथर कांपू लागले. म्हणाला– "थांबा! मी त्याला दिलेल्या दहा हजार दीनारां बरोबर सहाय्य केले तर दोनशे दीनार देण्याचे तुम्ही कबूल केले होते ते दोनशे दीनार जोडून द्या आणि गाढवाला घेऊन जा."

"तूच ते गाढव ठेवून घे, म्हणून सांगितले ना आम्ही!" म्हणत तिघे तेथून निघून गेले.

सावकार मोठ्याने ओरडून म्हणाला– "वाटेने जाणारे सर्व गृहस्थ हो, थांबा!"

रस्त्यावरून जाणारे दहा एक जण तेथे जमले व विचारू लागले–"काय भानगड आहे?"

सावकाराने तिघां तरुणाकडे बोट दाखवून म्हटले–"त्या सद्गृहस्थांनी विकत घे म्हटले म्हणून हे गाढव मी दहा हजार दीनार देऊन विकत घेतले. आतां हे लोक माझ्या कडून ते विकत घ्यायला तयार नाहीत."

"दहा हजार देऊन गाढव विकत घेतलेस? म्हणजे तू इतका का खुळा आहेस?" एक जण म्हणाला. सर्व पोट धर धरून हसत निघून गेले.

खरोखरच सावकाराचे जे नुकसान झाले ते किती? नऊहजार नऊशे पंचाण्णव दीनार! त्याने विकत घेतलेल्या गाढवाची किंमत पांच दीनाराहून जास्त नाही.





# राक्षसिणीचे उपकार

नारायणपूर गांवी भीमू नावाचा एक तरुण युवक रहात असे. तो गुणवान आणि हुशार होता, परंतु स्वभावाने थोडा आळशी होता. त्याच्याजवळ वडिलांनी बांधून ठेवलेले एक झोपडे व त्याच्या चारी बाजूची जमीन तेवढी होती. हुंडा दाग-दागदागिने वगैरे देण्याची शक्ती नसलेल्या एका गरीब माणसाने त्याला आपली मुलगी देऊन आपला जांवई करून घेतले. मुलीचे नाव होते मैथिली.

सासरी आल्या बरोबर तिने नवऱ्याचा आळशीपणा घालविण्यासाठी अनेक प्रयत्न करून पाहिले. परंतु भीमूत काही बदल झाला नाही. या सर्व प्रयत्नांचा काही उपयोग नाही, असा विचार करून तिने झोपडीच्या चारी बाजूला जी पडीत जमीन होती तीत केळीची व नारळाची रोपें लावली आणि उरलेल्या जमिनीत भाजी-पाला लावण्यासाठी जमीन खणून खत घालून आळीं केली.

केळाची रोपे मोठी झाली आणि केळयाचे घोस आले. ते घोस काढून तिने शहरातल्या बाजारात जाऊन विकून यायला नवऱ्याला सांगितले.

त्यादिवशी भीमूची संवयीप्रमाणे कोठे जायची इच्छा नव्हती. तरी बायकोच्या सांगण्यावरून त्याला जावेंच लागले. तो घोस खांद्यावर ठेवून रस्त्यावरून निघाला तेव्हां मैथिलीने मागून हाक मारली व म्हणाली–"वाटेत जंगल आहे, कोठे तरी चांगलीशी गार सांवली पाहून झोपाल बरं का? झोपी जाऊ नका. काळोख पडायच्या आत घरी परत या." असे सांगून तिने त्याला सावध केले.

भीमूने बाजारांत केळ्यांचा घोस विकला आणि आलेल्या पैशातून एक

श्री श. स. नखाते



पावली खर्च करून काहीतरी गोड विकत घेऊन खाल्लें. उरलेले पैसे उपरण्याच्या पदराला बांधून ठेवले. बांधताना त्याला मैथिलीची आठवण झाली. ती काही दिवसांपासून एका फुटक्या आरशात तोंड पाहून कुंकू लावीत असे. तेव्हां बायकोला एक आरसा विकत घेऊन जावा, असें त्याच्या मनात आले.

परंतु आरसा वगैरे चौकशी करून विकत घेतां घेतां दुपार झाली. तो एका चिंचेच्या झाडाखाली चांगली दाट सावली होती, तिथे झोंपला. त्याला एकदम अंग मोडून आल्यासारखे झाले. त्याने आरसा बाजूला ठेवला आणि गाढ झोपी गेला.

त्या झाडावर एक ब्रह्म राक्षसीण रहात होती. ती त्यावेळी घोरत पडलेली होती. काही वेळाने भीमू झोपला होता. त्याच्या अंगावर उन्हं आली. सूर्यकिरणांचा एक झोत त्याने नवीन घेतलेल्या आरशावर पडला. त्याची किरणे उलटून ब्रह्म-राक्षसीच्या तोंडावर जाऊन पडली आणि राक्षसिणीची झोप मोडली.

ती रागाने उठली तेव्हां तिची नजर झाडाखाली झोपलेल्या भीमूवर पडली. तिने रागाने त्याला विचारले–"कोणरे तो? माझ्या झाडाखाली येऊन झोपायची तुझी हिम्मत कशी काय झाली?" असे दटावून ओरडत डोळे वटारून तिने उडी मारली.

भीमू दचकून उठून बसला. त्याला समोर मोठ-मोठ्या जटा असलेली राक्षसीण दिसली. तिचे दांत मोठे होते आणि रूप भयंकर होते. त्याने तिच्या व आपल्या मध्ये आरसा धरला व तिच्याकडे पाहू लागला.

राक्षसिणीला आरशात तिचे रूप दिसले व तिला वाटले की झाडाखाली आणखी एक राक्षसीण असावी. तिने आश्चर्यचकित होऊन टाळ्या वाजविल्या व म्हणाली–"माणसाचे शरीर आणि ब्रह्म राक्षसीचे डोकें! आश्चर्य आहे! तू माझ्या



सारखाच ब्रह्मराक्षस असशील तर ही मोठी विद्या तू कोठे शिकलास?" तिने भीमूला विचारले.

तो प्रश्न ऐकून भीमूने चकित होऊन जो आरसा त्याने तोंडाआड धरला होता, बाजूला ठेवला. ब्रह्मराक्षसी आणखी जास्त चकित होऊन म्हणाली–"आतां तुझे तोंड माणसाच्या तोंडासारखे झाले आहे. या वेळी तुला पाहिजे असेल तर तुला माणसांमध्ये जाऊन वेळ घालवायचा असेल तर ते शक्य होईल. मला माणसांमध्ये जाऊन रहावेसे वाटते. तू मला मदत कर, तू मला माणसासारखा करू शकशील का?"

ते ऐकतांच भीमूच्या मनात एक विचार आला. आतापर्यंत मला लोक आळशी रिकामटेकडा समजत आले. आपण ब्रह्म राक्षसिणीला माणूस करू शकलो नाही तरी तिच्या राक्षसी स्वभावाला बदलून तिला माणसांमध्ये केले तर लोक आपल्याला ब्रह्मदूत मानू लागतील.

भीमू असा विचार करून ब्रह्म राक्षसीला म्हणाला–"होय, मी तुला माणूस करून टाकतो, परंतु तू त्या आधी माणसाच्या सर्व सवयी शिकून घेतल्या पाहिजेस. तू आपला क्रूर स्वभाव सोडून माणसाचा साधु स्वभाव घेतला पाहिजेस. तेव्हा



माझ्या सारखे मनुष्य रूप तुला येईल."

"ठीक, तू म्हणशील, सांगशील ते मी सर्व शिकून घेईन." ब्रह्म राक्षसीण उत्साहाने म्हणाली.

भीमू तिला माणसामध्ये जी नाती-गोती असतात तीं, वागण्याची रीत आणि कसे बोलायचे, हे समजाऊन सांगून काळोख पडू लागला तेव्हां म्हणाला–"उद्यां काळोख पडल्यावर इकडे येतों. तुला पूर्णपणे माणूस करायला सहा महिने तरी लागतील."

तो चांगला काळोख पडल्यावर घरी आला तेव्हां त्याची वाट पहात बसलेली मैथिली म्हणाली–"आतां तरी आलात!

अहो, मी किती घाबरले होते म्हणून सांगू! नाही नाही ते विचार मनांत येत होते." तिच्या बोलण्यांत थोडा राग होता.

आपण मैथिलीला ब्रह्म राक्षसीची गोष्ट सांगितली तर ती घाबरून जाईल, म्हणून त्याने ती गोष्ट गुप्तच ठेवली. त्याने आणलेला नवा आरसा पाहून मैथिली खूष होऊन गेली.. दुसऱ्या दिवशी सूर्यास्त होऊन गेल्यावर भीम बायकोला 'हा आलोच' असे सांगून घरातून बाहेर निघाला. इतका आळशी माणूस हा, आणि या वेळी कोठे निघाला असावा असा विचार करून मैथिली चकित झाली. त्या रात्री भीमू ब्रह्म राक्षसीला माणसाची राहणी, आचार विचार, शृंगार वगैरे विषयी सांगू लागला. त्यानंतर बरीच रात्र झाल्यानंतर घरी आला. येताच बायकोने विचारले–"कोठे होता हो, इतकी रात्र होईपर्यंत?"

भीमू बराच थकला असल्याचे सोंग करून पोंचतांच खाटेवर आडवा झाला. दुसऱ्या दिवशी तो जंगलांत निघाला तेव्हां त्याने ब्रह्म राक्षसीत बराच बदल झाला असल्याचे ओळखले. तिने माणसांत जशी वस्त्राभूषणे घालतात तसा थाट माट केला होता. आपली लांब-लांब नखें काढून टाकली होती. नंतर कालव्यात स्नानही केले होते आणि डोक्यात फुले खोचली होती.

भीमूने तिची स्तुती केली व म्हणाला–"मी तुला सांगतो ते कळू लागले आहे. तुला आणखी पुष्कळ शिकावयाचे आहे." असे सांगून माणसामध्ये बोलताना कसे हळू बोलावे हे सांगितले.

त्या रात्री घरी पोंचतांच बायको म्हणाली–"दररोज कोठे जाता हो रात्रीचे? तुमचा आळस कमी होत चालला आहे. हे चांगलेच आहे. परंतु तुम्ही जातां कोठे ते तर सांगाल!" असे म्हणत थोडी रागावली.

भीमू उलट काहीच बोलला नाही. मैथिली आरडा ओरडा करू लागली. त्यावरून दोघां नवराबायकोंचे भांडण झाले. तरी ब्रह्मराक्षसीला माणसासारखे करून मनुष्यवस्तीत आणायचा हट्ट भीमूने सोडला नाही. भीमू बायको जे म्हणे ते शांतपणे ऐकून घेत राहिला.

एके दिवशी रात्री ब्रह्म राक्षसी भीमूला म्हणाली–"तू माझ्यासाठी फार कष्ट सहन करीत आहेस. तुझे हे श्रम मी वृथा जाऊ देणार नाही."

ते ऐकून भीमूला वाटले की ब्रह्म राक्षसीकडून आपणांला द्रव्यलाभ होणार आहे.

एक दिवशी रात्री बायकोने विचार केला की पाहू या तरी नवरा रात्रीच्या वेळी कोठे जातो ते. मैथिली एक चिंचेची डहाळी घेऊन नवऱ्याच्या पाठोपाठ निघाली. भीमू ब्रह्म राक्षसिणीकडे जात असल्याचे







पाहून ती घाबरून जाऊन एका झुडपा आड लपून बसली.

ब्रह्म राक्षसीण भीमूला म्हणाली— "माणसांच्या संवयी मला येतील अशा शिकविल्यास, हे चांगले झाले. आतां मला माणसांसारखं गायला शिकव."

भीमू त्याला जे एक गाणे म्हणतां येत होते ते उच्च स्वरात गाऊ लागला. ब्रह्म राक्षसीण त्याचे अनुकरण करून गाऊं लागली.

ते पाहून मैथिलीच्या मनांतले ब्रह्म राक्षसीविषयीचे जे भय होते, ते नाहीसे झाले. तिने हातातली चिंचेची डहाळी बाजूला टाकली आणि झुडपांतून बाहेर आली. म्हणाली—"आतांपर्यंत तू जे महत्वाचे काम करीत आलास ते हेच का? खरोखरच तुझ्यात होता तो आळसटपणा पार नाहीसा झाला. प्रथम शिष्याला चांगला नीतिधर्म शिकवावा!" असे सांगून ब्रह्म राक्षसिणीला चिंचेच्या डाहाळीने बडवू लागली.

ब्रह्म राक्षसी ओरडली—"वांचवा! ती कोण आहे? ब्रह्म राक्षसिणीसारखीच आहे!" म्हणत तेथून पळून गेली.

भीमूला सुद्धा बायको म्हणजे फार भीती वाटली. तो ब्रह्म राक्षसिणीच्या पाठोपाठ जंगलात धावला. काही अंतर पळत गेल्यावर ब्रह्म राक्षसी दमून बसली आणि भीमूला म्हणाली—"माझ्या पाठी मागून कशाला आलास?"

"तुला माणसांविषयी पुष्कळ गोष्टी सांगितल्या ना? मला गुरुदक्षिणा म्हणून काही तू द्यायला नको का?" भीमू म्हणाला.

भीमू असे म्हणतांच ब्रह्म राक्षसीण उठून उभी राहून म्हणाली—"तू शिकविलेंस ते सर्व ती बाई चिंचेचा डहाळी घेऊन आली त्या वरून कळले. मला आतां माणसांमध्ये जाऊन रहायची मुळीच इच्छा नाही. खरे म्हणजे मी खोल जंगलात जिथे माणूस नावाचा प्राणी दिसणार नाही अशा ठिकाणी जाऊन राहणार आहे."



ते पाहल्यावर भीमूला वेड लागल्या सारखे झाले. तो तेथेच बसून राहिला आणि सकाळपर्यंत तेथेच बसून रहायचे की घरी जायचे असा विचार करींत असतां लहान लहान वाळक्या काटक्यांची मोळी घेऊन तिकडून म्हातारे विठूकाका आले. भीमू त्यांच्याशी बोलला.

विठूकाका त्याच्याकडे आश्चर्याने पहात मोळी जमिनीवर ठेवून विचारू लागले— "कायरे, आळशी भीम्या, इकडे काय करतो आहेस रे?"

भीमूला आंतल्या आंत दुःख होत होते तरी विठूकाकाला जे झाले ते सांगून त्याने विचारले—"मी केले त्यात काही चुकले का?"

विठूकाका काही वेळ विचार केल्यावर म्हणाले—"काल परवांपर्यंत आळशीपणाने राहणारा तू केलेस ते चूक. ते राहणे सोडून दूर कोठे जंगलात राहणाऱ्या ब्रह्म राक्षसीला माणसात आणावयाची जी तू खटपट केलीस-ती त्याहून मोठी चूक. बरं ते जाऊ दे तुझ्या अंगात आळस नावाचा जो ब्रह्म राक्षस होता तो पळाला. यापुढे तरी आळस सोडून कंबर वांकवून मेहनत कर आणि आहे त्याच्यावर समाधान मानून कसे जगायचे हे शीक."

तेव्हां भीमूला त्याची बायको एकटी घरची सर्व कामें करून झोपडी सभोवतीच्या जमिनीत काही तरी उत्पन्न काढावे म्हणून खपत असल्याचे आठविले.

तो बसला होता तेथून उठला. विठूकाकांनी आणलेली मोळी उचलून आपल्या डोक्यावर घेतली व म्हणाला—"तुम्ही म्हणालात ते बरोबर आहे, काका! यापुढे हा भीम्या कसा मेहनती कामसू होतो ते तुम्ही पहाच. एकातऱ्हेने ब्रह्म राक्षसिणीने माझ्यावर उपकारच केलेत!"



     

# शब्दाला मान

नशरापूरचे काही गावकरी मिळेल तेथे नोकरी सोडून आल्यावर गावात राहू लागले. ते संध्याकाळी गावाच्या पारावर जमून गप्पा गोष्टी करीत बसले होते. सुमारे दहा वर्षांचा एक मुलगा तेथे आला व एका वृद्ध माणसाला म्हणाला–"आजोबा, आज रात्री कोणती भाजी करावयाची, हे आईने आणि आजीने विचारुन यायला सांगितले आहे."

ते ऐकतांच त्या मुलाचा आजा मिशा पिळवटीत म्हणाला–"पाहिलेत, आमच्या कुटुंबात माझा मुलगा, सून आणि नातू सर्व माझ्या शब्दा बाहेर नाहीत."

त्यावर बाकीची वृद्ध मंडळी त्यांच्या कुटुंबात त्यांच्या शब्दाला किती मान आहे, हे तिखटमीठ लावून निरनिराळया तऱ्हेने सांगु लागली.

सर्व बोलत होते ते मौनपणे ऐकत बसलेला एक वृद्ध तेथून उठून जाऊ लागला ते पाहून बाकीची मंडळी त्याला म्हणाली–"काय हो तुम्ही आपल्या विषयी काहीच सांगितले नाही! तुमच्या घरात तुमच्या सांगण्या प्रमाणेच सगळे वागतात का?"

"खरे पाहिले तर आजपर्यंत आपल्या शब्दाला मान आहे हे सांगणे म्हणजे मोठेपणा आहे; हे मला माहीत नव्हते!" असे सांगून तो आपल्या घरी निघून गेला.






श्रीरामचंद्राने कोदंडावर बाण चढवून दाखवितांच परशुराम म्हणाला–"रघुरामा! यापुढे मी क्षत्रियांवर सूड उगविण्याचे सोडून शांतपणे तपश्चर्या करीन. मी दिलेले कोदंड धनुष्य यापुढे तुझेंच राहील. तू कोदंडराम म्हणूनही ओळखला जाशील." परशुराम निघून गेला.

अयोध्या नगरीत नवीन वरवधूंच्या आगमनाने आनंद मंगल चालू होते.

एके दिवशी राम सीतेला म्हणाला–"सीता! या दिवशी राजवाड्यापेक्षां आपण सुंदरवनांत विहार करीत असतों तर किती आनंद झाला असता? तू वनलक्ष्मी सारखी विहार करीत असलेली दिसतीस." ते ऐकून सीता लाजली.

त्यांचे दिवस आनंदाने जात होते भविष्याची कोणाला कल्पना नव्हती.

काही काळ लोटल्यावर दशरथाला काही अशुभ चिह्ने दिसू लागली. मुनि दंपत्तीने जो शाप दिला होता, त्याची आठवण झाली. त्याला मृत्यु जवळ येऊन ठेपला आहे, असे वाटू लागले.

रामाचा लवकर राज्याभिषेक करून टाकावा, असे वाटून त्याने वसिष्ठ ऋषींकडून सुमुहूर्त निश्चित केला.

तिकडे ब्रह्मलोकांत ब्रह्मदेव चिदानंदात होता. सरस्वती वीणेवर निरनिराळे राग वाजवीत होती.

नारद आणि त्याच्या मागून सर्व देव जरा गर्दीनेच ब्रह्मदेवाकडे आले. नारद



म्हणाला—"रामाचा राज्याभिषेक झाला तर राक्षसांचा संहार कसा होईल?"

ब्रह्मदेव काही बोलला नाही. तो सहेतुक सरस्वतीकडे पाहू लागला. सरस्वती मंदहास करीत म्हणाली—"नारदा, जे होणार आहे ते होणार नाही का? तू त्रिकालज्ञानी आहेस! आणि तिकडे पहा. तुझी जणुंकाही वारसच, ती मंथरा कळ लावायला कैकेयीच्या महालात जात आहे."

नारदाने व देवांनी पृथ्वीकडे पाहिले कुबड असलेली मंथरा मुसमुसून रडत जात होती. नारद म्हणाला—"वाग्देवी माते! लोककल्याणार्थ त्यांच्या तोंडून तू काय वदवतेस, तुलाच माहीत! सर्व तुझी कृपा!" असे म्हणत नारद गेला. त्याच्या पाठोपाठ सर्व देवही गेले.

कुबड असलेली मंथरा कैकेयीच्या माहेरून आलेली तिची विश्वासपात्र दासी होती. कैकेयी नुकतीच झोपेतून जागी झाली होती, कैकेयीकडे पहात उभी राहिली.

कैकेयी म्हणाली—"काय ग, मंथरे! काय अशी उदास उभी आहेस!"

"काय बोलू म्हणतेस, माझे आई! उद्या रामाचा राज्याभिषेक आहे, म्हणे! राज्याभिषेक!" मंथरा म्हणाली.

कैकेयीने आपल्या गळ्यातला मोत्याचा हार काढून मंथरेच्या गळ्यात घातला व म्हणाली—"किती चांगली बातमी सांगितलीस?"

मंथरा आपले तोंड विकृतपणे हलवीत म्हणाली—"अग कैकेयी! तू किती भोळी आहेस ग! अगदी दूधखुळी आहेस!"

"म्हणजे! कैकेयीने विचारले?"

"राम राजा झाला तर तू त्या कौसल्येच्या समोर दासी होणार! चांगला विचार कर, उशीर करू नकोस आणि कोपगृहात जा. तुला राजाकडून दोन वर मिळाले होते ना, ते आतां मागून घे! तू भरताला कां जन्म दिलास? रामाच्या मागे त्याने छत्र चामर धरावे म्हणून?'.



मंथरेने या शब्दांत आपल्या म्हणण्याचा अर्थ तिला समजावून सांगितला.

तिला तिचे वर आतां पाहिजे आहेत, असे कैकेयीने सांगितलें आणि राजा म्हणाला—"ठीक, तुला काय हवे असेल ते घे मागून!"

"एका वराने रामाला चवदा वर्षे वनवास, द्यावा. दुसऱ्या वराने भरताचा राज्याभिषेक करावा." कैकेयी म्हणाली.

ते ऐकतांच दशरथ आपले केस उपटू लागला व बेशुद्ध होऊन पडला.

कैकेयीने रामाला बोलवायला सांगितले.

"पित्याचे वचन पालन करणे आपले कर्तव्य आहे. तो काही चूक करतो आहे, असे मानणे चूक आहे! रघुवंशात असे कधी घडले नाही." रामाने विचार केला. रामाने वल्कलवस्त्रे धारण केली आणि वनवासाला तयार झाला.

लक्ष्मण नाग साप फूत्कार सोडतो तसा फूत्कार सोडीत आला आणि 'दशरथाचे आणि कैकेयीचे डोके उडवितो, म्हणत, त्याने तलवार उपसली. रामाने धाकट्या भावाला शांत केले.

रामाच्या बरोबर सीता आणि लक्ष्मण वनवासास निघाले.

अयोध्यावासी त्यांच्या वाटेवर आडवे उभे राहिले. रामाने त्यांना समजावून



सांगितले आणि गंगापार जंगलाचा मार्ग धरला. तो प्रथम भरद्वाज आश्रमात गेला. वडाचा चीक केसांना लावून रामालक्ष्मणांनी मुनिकुमारांसारखी जटाजूट धारण केली.

दशरथाला शुद्धीवर आल्यावर राम वनवासाला गेल्याचे कळले. तो 'हे राम, हे राम!' म्हणत बेशुद्ध झाला. त्यातच त्याचे प्राणोत्क्रमण झाले.

त्यावेळी भरत व शत्रुघ्न आपल्या आजोळी गेले होते. ते दोघे ती शोकवार्ता ऐकून परतले. भरताने दशरथाची अन्त्येष्टी केली. त्याने आईचे तोंडही पाहिले नाही. शत्रुघ्न मंथरेच्या कुबडात



लाथ भारायचें ठरवून निघाला. तिचा तर पत्ताच नव्हता.

भरत रामाला परत आणायला म्हणून छत्र चामर घेऊन जंगलात गेला.

राम त्याला म्हणाला–"आपल्या वडिलांचा शब्द राखणें आपल्या दोघांचें कर्तव्य आहे. तू माझा धाकटा भाऊ आहेस, माझें ऐक. राज्याभिषेक करून घेऊन राज्याचें पालन कर!"

भरताने नकारार्थी मान हलवून म्हटलें–"मी फक्त राज्याचें पालन करीन. तुझ्या पादुका सिंहासनावर ठेवीन." असे सांगून रामाच्या पादुका घेऊन अयोध्येला परतला.

राम, सीता व लक्ष्मणासह ज्यास्त खोल वनात गेला.

खर व दूषण या बंधुद्वयांनी दंडकारण्यातील भूमी रावणाचे प्रतिनिधि म्हणून बळकावली होती. ही जमीन विंध्य पर्वताच्या पायथ्याला होती. ते राक्षसांना बरोबर घेऊन दंडकारण्यात हिंडत असतां त्यांना दंडकारण्यात नव्याने सीतेसह आलेले रामलक्ष्मण हे मानव दिसले.

हिंस्र पशूंसारखे त्यांनी राक्षसांसह मोठमोठे दगड तलवारी वगैरे घेऊन रामलक्ष्मण व सीतेला घेरले.

रामलक्ष्मणांनी धनुष्यबाण काढून राक्षसांवर बाणांचा वर्षाव करून त्यांना पळविले. रामाने खरदूषणांचा वध केला. कित्येक राक्षस मरण पावले. जे जिवंत राहाले ते पळून गेले.

रहायला योग्य जागेची निवड करण्यासाठी हिंडत असतां रामालक्ष्मणांना ताडासारखा उंच आणि भयंकर आकृतीचा विराध राक्षस दिसला. त्याने सीतेला उचलून घेतले आणि पळू लागला. रामाने एक मोठें अस्त्र टाकून त्या राक्षसाला ठार केलें.

जे राक्षस जिवंत होते ते शूर्पणखेकडे गेले व तिला खरदूषण ठार झाल्याचें सांगितलें.



दंडकारण्यात राहणारे सर्व राक्षस हे शूर्पणखेलाच आपला प्रमुख मानीत. ती रामलक्ष्मणांना ठार करायला म्हणून निघाली.

दंडकारण्यात पांच वटवृक्ष एका जागी होते. ते स्थान थंड सावलीचे व शांत असे रमणीय स्थान होते. तेथे पर्णकुटी बांधून राम, लक्ष्मण व सीता रहात असत. त्याच जागेजवळून गोदावरी नदी वहात होती.

पर्णकुटीत राहून राम सीतेसह वनविहाराला जात असे. त्यांचा वनवास सुखाने चालू होता. लक्ष्मण मोठ्या भावाची व वहिनीची सेवा करीत रात्रंदिवस पर्णकुटीचे रक्षण करी.

शूर्पणखा एके दिवशी एकाएकी त्या जागी आली. रामाचे सौंदर्य पाहून त्याने तिच्याशी विवाह करावा, अशी तिने विनंती केली व सीतेला ठार करायला आली. लक्ष्मणाने तिचे नाक व कान कापून टाकले.

शूर्पणखा लंकेला गेली आणि तिचा जो अपमान झाला होता, तो वर्णन करून सांगितला. रावणाने त्या गोष्टीचा प्रतिकार करण्यासाठी सीतेचे हरण करायचे ठरवून मारीच राक्षसाला सुवर्णमृगाचे रूप घेऊन पंचवटीजवळ जायला सांगितले.

सीता तो सुवर्णमृग पाहून खूष झाली. राम त्या सुवर्णमृगाला आणायला गेला व शेवटी त्याला ठार करून घेऊन यायच्या



विचाराने बाण मारला. बाण लागतांच सुवर्णमृग मारीच राक्षस झाला व ओरडू लागला–"हा सीते! हा लक्ष्मणा! बांचवा!" रामाचाच आवाज त्याने काढला होता.

तो राक्षस आहे व रामाला कोणत्याही प्रकारची दुखापत त्याला करतां येणार नाही, असे लक्ष्मणाने किती समजावून सांगितले तरी सीतेने ऐकले नाही. ती काही कठोर वाक्यें बोलली. नाइलाजाने लक्ष्मणाने पर्णकुटीच्या समोर तीन रेषा काढून ठेवल्या व त्यांच्या बाहेर न जाण्यास बजावून रामाच्या शोधार्थ निघाला.

सीता पर्णकुटीत एकटी होती. रावण वृद्ध तपस्वी मुनीचा वेष करून आला.



सीता भिक्षा घालायला तीनही रेषा ओलांडून पुढे गेली. रावण स्वस्वरूपांत प्रकट होऊन सीतेला उचलून घेऊन गेला.

रामलक्ष्मण सीतेच्या शोधार्थ निघाले. राम सामान्य माणसासारखा, सीताविरहाने विलाप करू लागला.

दोघे शोध काढीत जात असतां त्यांना सर्व पंख कापल्यामुळे असहाय स्थितीत जटायुपक्षी दिसला. त्याने सीतेला वांच-विण्यासाठी रावणाशी युद्ध करून पंख घालवून बसल्याचे सांगून रावण सीतेला घेऊन दक्षिणेकडे गेल्याचे सांगितले.

दशरथाचा आप्तबंधु अशा जटायूचा दहनसंस्कार करून रामलक्ष्मण पुढे निघाले.

वाटेत त्यांना जंगली जनावरांसारखा कबंध राक्षस भेटला. त्याचे हात लांब लांब होते. त्याने रामालक्ष्मणाला धरून ओढले.

कबंध एक विचित्र राक्षस होता. त्याचे पोट पर्वतासारखे मोठे होते. त्या पोटालाच दांत व प्राण्यांना गिळण्याला मोठे तोंड होते. विस्तवासारखा एक डोळा होता. योजनभर लांब पसरता येतील एवढे मोठे हात होते. त्याला डोके असें निराळे नव्हतेंच.

रामलक्ष्मणांनी आपल्या तलवारी उपसून कबंध राक्षसाचे हात कापले. कबंध हा एक शापग्रस्त गंधर्व होता. तो शापमुक्त होऊन गंधर्व लोकी निघताना म्हणाला—"तुला वानरांची मैत्री लाभेल व तिचा उपयोगही चांगला होईल!" रामाला तो म्हणाला.

ऋष्यमूक पर्वतावर वानर प्रमुखांबरोबर सुग्रीव बसला होता त्याने रामाला पाहून हनुमानाला त्याची माहिती काढून यायला पाठविले.

तीन कोटी देव वानर रूपे या पृथ्वीवर आले. हनुमान त्यांपैकीच. तो अंजनादेवीच्या पोटी पवनाच्या कृपेने जन्मला. आंजनेय हा वायुसुत, मारुती या नावेंही ओळखला जात असे.

तान्हा असतानाच हनुमानाने सूर्यो-दयाच्या सूर्याला फळ समजून ते घ्यायला

म्हणून उड्डाण केले व त्याला खायला गेला, तेव्हां इंद्राने त्याच्यावर वज्रायुध टाकले. मारुती मूर्च्छित होऊन पडला. वायूला त्याचा राग आला व इंद्राला काष्ठवत् केले. परंतु सर्व देवांच्या प्रार्थनेनंतर मारुतीला चिरंजीवित्व लाभले व अनेक वर प्राप्त झाले. इंद्राची मुक्तता झाली

ब्रह्मदेवाने आंजनेयाच्या कानांत विचित्र कुंडले घातली. "ती ज्याला दिसतील व त्यांची जो प्रशंसा करील तोच विष्णू म्हणून ओळखून त्यालाच आपला आराध्य देव मानून त्याची सेवा कर." असे ब्रह्मदेवाने सांगितले.

हनुमान, सुग्रीवाने पाठविल्यावर राम-लक्ष्मणांना भेटायला गेला, तेव्हां एक ब्रह्मचारी होऊन गेला. रामाने त्याला पाहिले व लक्ष्मणाला म्हणाला–"पहा, याची कुंडले किती सुंदर आहेत!" असे सांगून रामाने त्याची प्रशंसा केली.

तेव्हां हनुमानाने राम हा विष्णूचा अवतार आहे हे ओळखले व त्याचा विश्वासपात्र सेवक झाला. रामाच्या तोंडून सुंदर म्हणवून हनुमान 'सुंदर' या नावेही ओळखला जाऊ लागला.

हनुमानाच्या मध्यस्थीने राम व सुग्रीव यांची अग्नीला साक्ष ठेवून मैत्री जमली.

सुग्रीवाचा भाऊ वाली हा किष्किंधेचा राजा होता. धाकटया भावाला गैरसमज करून घेऊन तो त्याला ठार करणार होता. तेव्हां सुग्रीव ऋष्यमूक पर्वतावर येऊन राहू लागला. वालीने सुग्रीवाच्या बायकोला कैदेत ठेवले.

आपत्कालात आपल्या बंधूचे रक्षण करणे आपले कर्तव्य आहे, असे समजून रामाने 'वालीचा वध करून सुग्रीवाला किष्किंधेचे राज्य देईन' असे वचन दिले.

वालीला त्याच्याशी जो युद्धाला येईल त्याचे बळही प्राप्त होईल असा वर होता. म्हणून सुग्रीव व वाली यांचे युद्ध चालू असता रामाने ताड वृक्षांच्या आडून सुग्रीवाचा वध केला.






कोण्या एका देशाचा एक राजा होता. त्याला एकुलती एक मुलगी होती. ती दिसायला फारच सुंदर होती. म्हणून तिला अनेक तरुणांनी मागणी घातली. तिच्याशी लग्न करण्यासाठी हमरीतु-मरीच लागली. राजा अगदी कंटाळून गेला.

तो फार हुशार, म्हणजे सहजी हार न मानणारा. त्याला कोणी फसविणे शक्यच नव्हते. म्हणून आपल्या मुलीसाठी योग्य वर निवडण्यासाठी त्याने एक नवीन विचार केला. "माझ्या मुलीशी लग्न करण्याची इच्छा असणाऱ्याने मला फसविले पाहिजे. मला जो फसवील त्याला माझी मुलगीच नाही, माझे अर्धे राज्य सुद्धा देईन." अशी त्याने राज्यभर दवंडी पिटविली.

राजकन्येशी विवाह करण्याच्या आशेने कित्येक तरुण आले आणि राजाला फसवू न शकल्यामुळे हार मानून फटके खाऊन परत गेले.

त्या गावातच एक श्रीमंत गृहस्थ रहात होते. त्यांना तीन मुलगे होते. त्यातले मोठे दोघे हुशार होते. तिसरा अगदी मंदबुद्धी होता. तो हातावर हात धरून कोणत्या तरी कोपऱ्यात बसून राही. त्याला सर्व जण मंदबुद्धी म्हणूनच हाक मारीत.

त्या श्रीमंताचा सर्वात थोरला मुलगा एके दिवशी आपल्या वडिलांना म्हणाला– "बाबा, राजकन्येशी सर्वच लोक लग्न करण्याच्या प्रयत्नात आहेत. मी सुद्धां आपलं नशीब पारखून पहावे म्हणतो."

"जाऊन पहा, बाबा!" बाप म्हणाला.

थोरला मुलगा निघाला. तो सरळ राजाच्या महालात गेला आणि राज-कन्येशी विवाह करण्याच्या हेतूने आला असल्याचे कळविले. शिपायांनी त्याला

२५ वर्षांपूर्वीची चांदोबातली गोष्ट



राजाकडे नेले. त्याने राजाला नमस्कार करून खिडकीतून बाहेर पहात म्हटले– "ती दिसत आहेत ना, ती तीन काळी बदके किती सुंदर दिसत आहेत."

"तुझी हुशारी कुचकामाची आहे. पहायला एक बदक पुरत नाही का? याला घेऊन जाऊन फटके मारा." राजाने शिपायांना आज्ञा केली. शिपायांनी त्याला फटके मारले आणि त्याला पाठवून दिले. थोरला फटके खाऊन परतल्यावर दुसऱ्याला आपले भाग्य पारखून पहावेंसे वाटले.

तो देखील वडिलांची परवानगी घेऊन राजाच्या दर्शनाला गेला. त्याला देखील राजाच्या खास खोलीत पाठविण्यात आले. त्याने खिडकीबाहेर पाहिले व म्हणाला– "ते काय ते? त्या झाडावर बसून कावळ्याच्या पाठीवर तीन पांढरे बगळे बसले आहेत, वाटते?"

"कावळ्याच्या पाठीवर बगळे कोठे आहेत. याच्या पाठीवर फटके बसणार हे खरे आहे! याला धरून नेऊन याला फटके मारून निरोप द्या." राजाने शिपायांना सांगितले.

दुसरा सुद्धा हार खाऊन परतला. तेव्हां मंदबुद्धी म्हणाला–"मी महाराजांना फंसवून राजकन्येशी विवाह करतो."

"तुझे हुशार दोघे थोरले भाऊ करू शकले नाहीत ते तू करणार का? तू तर मुळांतच मंदबुद्धी!" बाप म्हणाला.

परंतु त्याने हट्ट धरला–"सर्वच उलटे होते आहे तर जाऊन फटके खाऊन ये." बाप म्हणाला.

तिसरा भिंतीच्या बाजूबाजूने गेला. काळाधाण झालेला नळ काढला आणि तो झाडून हातात धरून राजाच्या महालाकडे निघाला. वाटेत त्याला एक बाई डोक्यावर पाटीत मडकी घालून जात असलेली दिसली.

त्याने तिला विचारले–"काय हो बाई! ही मडकी कोठे घेऊन चाललां आहां?"

"विकायला बाबा!" ती बाई म्हणाली.

त्याने त्यांची किंमत विचारली. मडकी-वाली म्हणाली–"तीन रुपये!"





"मी पांच रुपये देतो. पण मी सांगेन तसे करशील का?" तो म्हणाला. तिने होकारार्थी मान हलविली. दोघे बरोबर-बरोबर राजाच्या महालापर्यंत गेले. काय करायचे ते त्याने तिला सविस्तर समजाऊन सांगितले.

दोघे महालाबाहेर उभे राहिले. मंदबुद्धी मोठ्याने ओरडला–"मी नाही विकणार! मला पाहिजेत ती! उगाच मला त्रास देऊ नकोस!" असे मोठ मोठ्याने ओरडून सांगू लागला.

तो ओरडा ऐकून राजा बाहेर आला. मंदबुद्धीला पाहून विचारू लागला– "कशाला रे एवढा ओरडा करतो आहेस? विकायला तुझ्याजवळ आहेच काय?"

"हा नळ महाराज! हा मंत्रवलेला नळ आहे! तो डोक्यावर ठेवून बोललं तर कोणाला ही फंसविता येते." मंदबुद्धी म्हणाला.

"पाहू तरी कोणा एकाला फंसव पाहू!" राजा म्हणाला.

त्याने नळ डोक्यावर ठेवला आणि मडकेवालीजवळ जाऊन म्हणाला–"ए, आपली सर्व मडकी फोड!"

लगेच ती मडकेवाली आपल्या डोक्या-वरची मडकी एकेक करून जमिनीवर टाकून फोडू लागली.

राजा चक्कच झाला. अशा तऱ्हेचा नळ इतरांजवळ असणे आपल्याला व आपल्या मुलीला हिताचे नाही, असा विचार करून तो नळ त्याला विकायला त्याने मंदबुद्धीला सांगितले. मंदबुद्धी म्हणाला–"मेलो तरी तो नळ विकणार नाही." राजाने एक पिशवी भरून मोहारा आणवून, एवढी किंमत देतो, म्हटल्यावर मंदबुद्धी "ठीक" या अर्थी मान हलवून विकायला तयार झाला. म्हणाला–"शेवटी कोणाला तरी विकलाच पाहिजे, नाही का?" त्यानंतर तो राजाला नळ देऊन पिशवी घेऊन घरी गेला.



त्याने त्यातले काही पैसे खर्च करून नवीन सुंदर आणि मूल्यवान कपडे तयार करविले आणि दुसऱ्या दिवशी राजाच्या दर्शनाला जाऊन म्हणाला–"आपण आपल्या मुलीशी माझे लग्न करून द्यावे!"

राजाला काय बोलावे, सुचेना. नळात काही महत्वाचे नाही, हे त्याला कळले होते. त्याने आपल्याला फसविले आहे, राजाला आधीच कळले होते. तरी तो म्हणाला–"तू मला प्रथम सांगून फसविले नाहीस, तू उद्या सकाळी माझ्या प्रधानाला बळज-बरीने माझ्याकडे घेऊन येऊ शकलास तर तू खरोखरच हुशार आहेस, हे मी मानायला तयार होईन."

"ठीक आहे!" असे सांगून मंदबुद्धी निघून गेला. दुसऱ्या दिवशी प्रधानाने घरांतच रहायचे ठरवून आपल्या नोकरांना ताकीद केली की मंदबुद्धीला घरात येऊ देऊ नका. तो आलाच तर त्याला बडवून परत पाठवा."

मध्यंतरी मंदबुद्धी वेष पालटून एका पोत्यात लपून प्रधानाच्या घराजवळ गणंगळत आला. ते पाहून शिपाई चकित होऊन पोत्याजवळ गेले व विचारू लागले-"कोण आहे पिशवीत?"

"शूः, बोलू नका." मंदबुद्धी म्हणाला.

शिपायांनी ते प्रधानाला जाऊन सांगितले. तो घाईघाईने बाहेर आला व पोत्यांतल्या मंदबुद्धीला ओरडून विचारू लागला–"कोण रे तू?"

"बोलू नका हो, ही ज्ञानाची पिशवी आहे. मला अनेक गोष्टी हिच्या मदतीने कळतात." मंदबुद्धी म्हणाला.

"कोठे? तिने सांगितलेल्या गोष्टींपैकी एक सांग!" प्रधान म्हणाला.

"काल महाराजांना फसविणारा तो दुष्ट तुमच्या घरावर सतरा योध्द्यां बरोबर येऊन हल्ला करणार आहे, म्हणे!" मंदबुद्धी म्हणाला.

"मग मी काय करू म्हणतोस?" प्रधान घाबरून विचारू लागला.

"या पिशवीलाच विचारा!" मंदबुद्धी म्हणाला.

प्रधानाने पिशवीचे तोंड उघडले व मंदबुद्धीला बाहेर येऊं दिले. प्रधान पोत्यात शिरला व विचारू लागला–"मी काय करूं?" इतक्यात मंदबुद्धीने पोत्याचे तोंड बंद करून बांधून टाकले आणि प्रधानाला खांद्यावर उचलून घेऊन सरळ राजासमोर आणून ठेवले.

"या परीक्षेत तू जिंकलास. उद्या ये, अंतःपुरात माझी मुलगी आहे. तिला ओळखून तिच्याशी लग्न कर. लक्षात राहू दे, माझ्या मुलीच्या ऐंशी दासी आहेत. त्यांच्यात माझी मुलगी कोण, हे तूच ओळखले पाहिजेस, तुला कोणी, 'ही राजकन्या' म्हणून दाखविणार नाही. तू माझ्या मुलीला ओळखले नाहीस तर तुझे लग्न तर होणारच नाही आणि फटक्यांची शिक्षाही चुकणार नाही! समजले?" राजा म्हणाला.

दुसऱ्या दिवशी मंदबुद्धी एका लहानशा पिशवीत एक उंदीर ठेवून अंतःपुरात गेला.

तो तेथे गेला तेव्हां एक्याऐंशी मुली एकाच रंगाचे व एकाच तऱ्हेचे कपडे घालून आणि दागिने घालून अंतःपुरात बसल्या होत्या. राजासुद्धा तेथे होता.

मंदबुद्धीने आपल्या हातातल्या पिशवीचे तोंड सोडून उंदराला त्या मुलींच्या मध्ये टाकले. सर्व मुली किंकाळी फोडून वाट फुटेल तिकडे पळाल्या. परंतु त्यांच्यापैकी एक बेशुद्ध होऊन पडली. थोड्या वेळाने सर्व मुली परत येऊन मूर्च्छित झालेल्या मुलीला सावध करण्याच्या प्रयत्नाला लागल्या.

मंदबुद्धीला परमानंद झाला. त्याने राजाकडे पहात मूर्च्छित झालेल्या मुलीकडे बोट दाखवून म्हटले–"हीच तुमची राजकन्या!"

निरुपाय होऊन राजाने सुमुहूर्त पाहून राजकन्येचे मंदबुद्धीशी थाटामाटाने लग्न करून दिले आणि जाहीर केल्याप्रमाणे अर्धे राज्यही दिले. मंदबुद्धी इतरांपेक्षा जास्त हुशार म्हणवून घेऊन राजकन्ये-बरोबर संसार करू लागला.



# चांदोबातील नवलाई



## हुकुमाप्रमाणे चालणारे जहाज

जपान देशातील किनोकावा मारू नांवाचे जहाज खलाशाने "जा" म्हटले की पुढे जाते. "थांब" म्हटले म्हणजे थांबते. जगातले सर्वांत प्रथम असे, आज्ञेप्रमाणे चालणारे यंत्र बसविलेले हे जहाज कप्तानाचा हुकूम ऐकून त्याप्रमाणे चालण्यासाठी इंजिनाच्या खोलीत इंजीनिअर नसतो. त्याऐवजी त्या जागी 'कंप्यूटर' असतो.

## सौर शक्ती बरोबर विद्युत्शक्ती



कॅलिफोर्नियातील 'सोलारवन' नांवाच्या प्रयोगशाळेत १९८८ यावर्षी–पंधरा हजार? महाभयंकर मोठ्या आरशाच्या सहाय्याने सूर्यप्रकाश वाळवंटातील खाऱ्या तलावावर फेंकला जाईल. या मुळे पन्नास हजार घरांना पुरेल इतकी विद्युत्शक्ती उत्पन्न होऊ शकेल असे "सायन्स डायजेस्ट" या पत्रिकेवरून कळते.



## जगातील सर्वांत मोठा फुलांचा हार

जमैका (अमेरिका) मध्ये प्रसिद्ध झालेले भारतीय योगी चिन्मय यांनी, दहा हजार गीतें पूर्ण केली याबद्दल एक मोठा हार समर्पित करण्यात आला. दहा हजार फुलांचा हा पुष्पहार जगांतील सर्वात मोठा हार असे सांगण्यात येते. योगी चिन्मय ह्यांनी पांडिचेरी येथे श्री अरविंद आश्रमात शिक्षण प्राप्त केले.

## तुम्हांला माहीत आहे का?

१. भूगर्भात जगातील सर्वात मोठ्या गुहा कोठे आहेत?
२. जगात मोठमोठे बर्फखंड कोण-कोणत्या प्रदेशात आढळतात?
३. जगात सर्वात उंच असा धबधबा कोठे आहे, तुम्हांला माहीत आहे का?
४. जगात सर्वात मोठा ज्वालामुखी पर्वत कोठे आहे?
५. आशिया खंडात अत्यंत मोठे असे कृत्रिम सरोवर कोठे आहे?

(उत्तरें ६४ व्या पानावर)



# तूंच मी-मीच तूं

सोमूला पंचविसावे वर्ष लागले आणि काही कारण नसतां तो लठ्ठ होऊ लागला. तो इतका लठ्ठ झाला की लोक त्याला पाहून हसू लागले.

सोमूला सुद्धां काळजी वाटू लागली. तो वैद्याकडे गेला आणि आपला लठ्ठपणा कमी करायला काही औषधोपचार सुचवा, म्हणाला. वैद्यबुवा म्हणाले–"एक महिना-भर कोठेही थांबल्याशिवाय दोन कोस पळत जा, बारीक होशील."

दोन कोस लोक जातातयेतात त्या रस्त्यानंच पळलें पाहिजे. सोमूने त्याप्रमाणेंच केले. रस्त्यावर पुष्कळ लोक त्याला धावतांना पाहून खूप हसत.

त्या हसणाऱ्या पैकी एकाने सोमूला विचारलेंही की तो तसा कां पळतो? सोमूने आणखी कारण सांगितले. दुसऱ्या दिवशी जास्त लोक भेटले. त्याला आश्चर्य वाटले.

सोमूने आतां पहाटेच उठून पळायला जायचे ठरविले. त्याने एक दिवस तसे केले. त्याला एक दोघेच भेटले, परंतु मागच्या सारखे हसणारे कोणी भेटले नाहीत. परंतु पहाटे उठणे हा एक मोठा प्रश्नच त्याच्या-समोर उभा राहिला. त्याच वेळी तर त्याला गाढ झोप येत असे.

सोमू पुन्हा वैद्याकडे गेला व म्हणाला– "ही धांवपळ मला नाही होणार. याहून थोडा सोपा उपाय काही तरी सुचवा!"

"त्यात काय रे मोठेसे? खाणेपिण थोडे कमी कर. दररोज एक पेला भरून दूध, एक पेलाभर फळांचा रस पी. आणखी एका लिंबाएवढा ताक भात मात्र खात जा. दोन महिन्यात तुझा लठ्ठपणा कमी होईल." वैद्यबुवांनी सुचविले.

सोमूने वैद्यबुवांनी सांगितले तसे दोन दिवस केले. त्या दोन दिवसांतच त्याला

"वसुंधरा"



इतका अशक्तपणा वाटला की आयुष्य भरात तेवढा वाटला नव्हता. खाण्यासाठी जीव कासावीस होऊ लागला. तो थोडा बारीक झाला खरा, परंतु तिसऱ्या दिवशी त्याला राहावले नाही आणि नेहमीसारखा झोंपला, पुन्हा 'येरे माझ्या मागल्या!' पूर्वी होता तसा झाला.

सोमू वैद्यबुवांकडे गेला व म्हणाला— "तुम्ही सांगितले तसा दोन दिवस मिताहार करून राहालो. तिसऱ्या दिवशी मात्र स्वतःला आवरू शकलो नाही आणि नेहमी सारखा जेवलो. पुन्हां पहिल्यासारखा लठ्ठ झालो. असं झालं तर कसं हो? कायमचे बारीक व्हायचे म्हणजे किती दिवस उपाशी किंवा अर्धपोटी रहावयाचे हो?"

"किती दिवस काय रे? आयुष्यभरच आहार कमी केलास तर तुझा लठ्ठपणा कमी रहाणार. तू नेहमी सारखा जेवू लागलास की पुन्हां तुझा लठ्ठपणा नेहमीसारखा होणार. तुझ्या प्रकृतीची हीच स्थिती आहे. कमी खाल्लेस तर लठ्ठपणा कमी होईल. नेहमीसारखे खाल्लेस तर लठ्ठ होशील!" वैद्यबुवा म्हणाले.

आयुष्यभर कमी आहार करून उपाशी मरणे माझ्या कडून होणार नाही. आणखी काही उपाय असला तर सांगा!" या शब्दात सोमू वैद्यबुवांच्या गळीच पडला.

"माझ्या जवळ एक औषध आहे. ते वापरून पहा!" असे म्हणत वैद्यबुवांनी सोमूला दहा गोळ्या दिल्या आणि दररोज एकेक गोळी सकाळी घ्यायला सांगितली.

दुसऱ्या दिवशी सोमूने एक गोळी घेतली. घसा चांगला भाजून निघाला. जीभही आल्यासारखी झाली. तो त्या दिवशी काहीच खाऊ शकला नाही. त्या गोळीत वलवर्धक काही आहार असेल, म्हणून सोमूला 'भूक भूक' मात्र झाले नाही.

दुसऱ्या दिवशी सोमूच्या घशाची आग थोडी थांबल्यासारखी झाली. परंतु दुसरी गोळी गिळल्याबरोबर घसा भाजल्या सारखा झाला. जिभेची आग आग होऊ लागली. त्या दिवशींही तो काही खाऊ शकला नाही. नकोसे वाटत असूनही वैद्यबुवांनी दिलेल्या सर्व गोळ्या एका मागून एक सर्व दहा दिवस खायच्या, असे त्याने ठरविले.



त्या दिवशी रात्री सोमूच्या घरी एक गिड्डू आला. तो शेजारच्या गावी चालला होता, पाऊस पडू लागला म्हणून सोमूच्या घरी रात्र काढावी, म्हणून राहला. सोमूने त्याला अत्यंत आदरपूर्वक राहायला सांगितले. त्याला जेवायला वाढले. स्वतःमात्र काही खाल्ले नाही.

"तू बराच आहेस की रे! असला अतिथिसत्कार आजपर्यंत कोणी माझा केला नाही. तू माझ्या बरोबर जेवला नाहीस हे बरोबर नाही. मला नाही ते आवडले." तो गिड्डू म्हणाला.

तेव्हां सोमूने त्याला आपली रामकहाणी सांगितली.

सर्व ऐकून घेऊन तो गिड्डू म्हणाला— "तू म्हणतोस ते तुझ्या सारख्याला ठीक आहे! तुला पाहिजे तर बारीक होतां येईल, पण माझ्या सारख्यांनी काय करायचे? मला उंच करणारे काही औषधच नाही! सर्व माझा गिड्डेपणा पाहून हसतात. मी काय करावे?" त्याने विचारले.

"होय बुवा, तुझी स्थिती तर माझ्याहूनही जास्तच केंविलवाणी आहे!" सोमूने मान्य केले.

"तू म्हणतोस तितकी वाईट स्थिती माझी नाही. तुझीच आहे!" गिड्डू म्हणाला.

"ती कशी काय?" सोमूने आश्चर्यचकित होऊन विचारले.

"तू लठ्ठ झालास त्यामुळे तुझे तसे काय नुकसान झाले रे? तू आपली सर्व कामे चांगल्या तऱ्हेने करतो आहेस. पण सर्व तुला पाहून हसतात म्हणून तुला बारीक व्हावेंसे वाटते आहे. म्हणजे तुला पाहणारांसाठी तू एवढे कष्ट सहन करायला तयार झाला आहेस, म्हणावयाचे. मग तुझी स्थिती

केंविलवाणीं म्हणावयाची नाही तर काय म्हणावयाचे ?" गिड्डू म्हणाला.

"तरमग तुला पाहून लोक हंसले तर तुला वाईट वाटणार नाही का? सोमूने विचारले.

"संकोच सोडून मागेपुढे न करतां मी विचारतो; त्याचे उत्तर दे. माझा आकार पाहून पुष्कळ जण हसतात की नाही ?" गिड्डुचाने विचारले.

ती गोष्ट खरी असल्याचे सोमूने कबूल केले. "त्याच प्रमाणे तुझा आकार पाहून हंसणाऱ्यांबरोबर मी हसतो, असे मी म्हटलं का ?" गिड्डुघाने विचारले.

"असं म्हणतोस होय! तुझा आकार पाहून मला, माझा आकार पाहून तुला हंसे येणे साहजिकच आहे!" सोमू म्हणाला.

"असे बोल! आतां आपला प्रश्न सोडवायला अगदी सोपा उपाय आहे तो मी सांगतो, ऐक! तुला पाहून कोणी हसला, की तेव्हां तूच मी आहे, असे समज. मला पाहून कोणी हसले तर मीच तू आहेस असे समजेन. मग मनाला वाईट वाटण्याचे कारणच काय?" गिड्डू असे हसत म्हणाला.

सोमूला, गिड्डा म्हणाला त्यात पुष्कळ खरे आहेसे वाटले. आपले आरोग्य चांगले असल्यावर कोणी किती हसला तरी ते मनाला लावून घेण्याचे कारणच काय? आणि देहाला कष्ट देण्याची गरज काय? शरीराला जे खाणे इष्ट आहे ते खाल्लेच पाहिजे. उपाशी राहण्यात व स्वतःचे मन मारण्यात काय हित आहे?

सोमूने गिड्डुचाचे आभार मानले व म्हणाला—"तुमचे मी आतिथ्य केले त्याचा मला फायदाच झाला. तू एखाद्या ज्ञानी पुरुषासारखा मला हित बोध केलास. आतां माझ्या समोर कोणतीच समस्या उरली नाही.

त्यानंतर सोमूचा लठ्ठपणा कमी झाला नाही. पण त्याला पाहून हंसणाऱ्या लोकांची संख्यामात्र कमी होऊ लागली. ज्याला पाहून हंसावेसे वाटते, त्याच्यावर काहीच परिणाम होत नाहीसे पाहून कोण थट्टा करील किंवा हसेल!






[१]

[महामायिकाच्या समाधीपासून पिंगळने अद्भुत शक्ती असलेल्या सर्व वस्तू हरण केल्याबरोबर भल्लूक पर्वतावरील सर्व दुष्ट शक्तींनी डोके वर काढले. पद्मपादने भल्लूककेतूला आणण्यासाठी पिंगळला पाठविले. तो भल्लूककेतुला घेऊन आला. तेव्हां सर्व भुतें मोठमोठ्याने ओरडा करीत भल्लूककेतु होता, त्या ठिकाणी धावत येऊ लागली. —त्यानंतर]

आपल्याजवळ धावत येत असलेल्या भुतांना पाहून पद्मपादने फक्त स्मित केले. परंतु भल्लूककेतू मात्र त्यांच्याकडे पाहून त्याला ते असह्य होत असल्यासारखी मान फिरवून पिंगळला नमस्कार करून म्हणाला—"मी या तुच्छ प्राण्यांचा प्रमुख व्हायला तयार नाही. कृपा करून मला आपल्याबरोबर घेऊन चला.'

पिंगळने कांहीच उत्तर दिले नाही. तेव्हां पद्मपाद भल्लूककेतूच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाला—"भल्लूककेता! तू या पर्वत प्रदेशाचा या राक्षसगणांचा नायक होऊन जीवित घालविणे बरे असे माझे सर्व गोष्टींचा विचार करतां म्हणणे आहे!',

"ते जीवित मला यापुढे नको आहे!" असे म्हणत भल्लूककेतूने पद्मपादला साष्टांग नमस्कार केला.

इतक्यात सर्व भुते त्यांना घेरा घालून मोठ्याने ओरडू लागली—"भल्लूककेतू



आमचा राजा ! ओ हो ! ओ हो !"

त्यांचा तो विकृत आवाज ऐकून पिंगळ थोडा रागवल्या चिडल्यासारखा होऊन म्हणाला–"पद्मपाद मला एक चांगला उपाय सुचला आहे. तसे केले तर एका बाजूला भल्लूककेतूला व आपल्याला सुद्धां सर्व प्रश्नांची तोड निघाल्यासारखे होईल."

"ऐकू तर दे !" पद्मपाद म्हणाला.

"भल्लूककेतूला आपली सेवा करून पुढील आयुष्य सुखाने घालवावे, असे आहे. म्हणून तो या पर्वतावर या सर्व शक्तींचा राजा म्हणून रहायला तयार नाही. या सर्व भुतांना व शक्तींना असेच सोडले तर ती किती मारामाऱ्या करतील व गोंधळ माजवितील, हे आपणांस माहीत नाही. म्हणून यांचा कांटाच काढणे चांगले. यांच्यावर महामायिकाने दिलेल्या तलवारीचा उपयोग करू या."

पिंगळने ते म्हटल्यावर सर्व भुते व पिशाच्चे हाहाकार करू लागली. ती सर्व एक स्वराने म्हणाली–"महामांत्रिक हो ! आमचा सर्वनाश करू नका. भल्लूककेतू आमचे नायकत्व करायला तयार नसेल तर आम्हीच आपला नायक निवडतो."

"त्या गोष्टीस माझी काहीच हरकत नाही. तुम्ही नायक निवडण्याचा प्रश्न कसा सोडवतां हे पाहण्याचे कुतूहल मात्र मला वाटत आहे !" पद्मपाद म्हणाला.

"तुम्हां माणसांप्रमाणेच आमच्यात जो सर्वात बलिष्ठ असेल त्याला आम्ही नायक मानतों ! जास्त शक्ती कोणात आहे हे आम्ही सिद्ध करायला लावतो." असे म्हणत सर्व पिशाच्चे आपसात मारामारी, कुस्ती व मुष्टियुद्ध करू लागली.

"छान, ही पद्धत फार चांगली आहे !" असे म्हणत पिंगळने आनंदाने टाळ्या वाजवायला सुरवात केली.

पिशाच्चांमध्ये नायकत्वासाठी चढाओढ आणि मुष्टियुद्ध सुरू झाले. ती क्षणाक्षणाला आपले रूप बदलून द्वंद्वयुद्ध करीत होती, वाघाचे रूप घेऊन युद्धाला तयार होणा-







ऱ्यांशी युद्ध करायला काहींनी हत्तीचे रूप धारण केले. त्या हत्तींना मारण्यासाठी आणखी काही भुतांनी सिंहाचे रूप धारण केले. काहींनी नागसांपाचे रूप घेतले तर काहींनी गरुडाचे.

अशातऱ्हेने झालेल्या द्वंद्वयुद्धांत मरण पावलेल्याना सोडून उरलेल्यांनी एका दाणग्या भुताला आपला नायक म्हणून निवडले. अशातऱ्हेने नायकाचा प्रश्न सुटल्याबद्दल पद्मपादला परमानंद झाला. त्या पद्धतीने निवडून आलेल्या एका मोठ्या भुताला आशीर्वाद देऊन तो म्हणाला–"आतां तुम्ही सर्व या भल्लूक पर्वतावर स्वच्छंदपणे रहायला हरकत नाही. तुम्ही अहंकाराला बळी पडून मानवांवर तलवार उचलली नाहीत तर ठीक, आम्ही, मी किंवा पिंगळ तुमच्या वाटेस जाणार नाही. मी अभयवचन तुम्हांला देत आहें. तर मग आतां तुम्ही जा !"

सर्व भुते जयजयकार करीत आपल्या नव्या मोठ्या नायकाला खांद्यावर उचलून घेऊन पर्वत प्रदेशात निघून गेली. नंतर पद्मपाद पिंगळकडे वळून म्हणाला–"पिंगळ, आपण सर्व कष्ट सहन करून आपल्याला हव्या असलेल्या अद्भुत शक्ती संपादन केल्या. तू मला या कामात जी मदत केली आहेस ती मी आयुष्यभरात कधी विसरणार नाही. तू, आपल्या घरी जाण्यापूर्वी काही दिवस माझा पाहुणा म्हणून रहावे, अशी मी विनंती करीत आहे."

पिंगळने त्या गोष्टीस मान्यता दिली. पद्मपादने एक चिमूटभर माती घेऊन एक मंत्र म्हटला व माती जमिनीवर टाकली. त्या पाठोपाठ जमीन दुभंगली आणि दोन भूतें गाढवें जमिनीतून रेंकत बाहेर आली.

पद्मपाद एका गाढवावर बसला. दुसऱ्या गाढवावर पिंगळ बसू लागतांच भल्लूककेतू गुढगे टेकून म्हणाला–"मालक, तुम्ही माझ्या खांद्यावर बसा. मी तुमचा कायमचा दासनुदास आहे !"



पिंगळ हंसत भल्लूककेतूच्या खांद्यावर बसला. पद्मपाद ज्या गाढवावर बसला होता ते बोलतां बोलतां आकाशांत उडू लागले. त्याच्या पाठोपाठ भल्लूककेतू सुद्धा हवेत उड्डाण करून निघाला. कोणी वर बसले नसूनही जे गाढव होते ते पाठोपाठ निघाले.

जंगल, पर्वत व नद्या पार करीत सूर्यास्ताच्या सुमारास सर्वजण एका गावानजीक येऊन पोचले. पद्मपाद घरकुलासारखी आकाशांतून दिसणारी घरे दाखवीत पिंगळला त्यांची नावे सांगत होता. एका जागी डोंगराला लागून असलेल्या गावाकडे बोट दाखवून म्हणाला—"त्या डोंगराशेजारी सांपासारखा वहात असलेला डोंगरी ओढा दिसतो आहे ना? त्याच्या बाजूने पहा, एका जागी बरीचशी झाडे दिसत आहेत ना, त्यांच्या मध्ये संगमरवरी दगडाचा चकचकीत वाडा दिसतो आहे, तो आमच्या वाडवडिलांनी बांधलेला वाडा आहे. तेच माझ्या वडिलांनी बांधलेले घर. माझे दोघे वडील भाऊ चिलका तलावांत स्वत:ची आहुती देऊन मरण पावले. म्हणून आतां त्या घराचा मी एकटा मालक आहे. माझ्या वडिलांनी मागे ठेवलेली ग्रंथांची संपत्ती सुद्धा आतां माझी एकट्याची आहे!"

इतक्यात पद्मपाद ज्या गाढवावर बसला होता ते खाली उतरू लागले आणि पद्मपादच्या उंच भिंती असलेल्या वाड्यासमोर दोघे उतरले. उंच भिंती असलेल्या किल्ल्याचे मोठे लोखंडी फाटक होते. दोन नीग्रो पाहारेकरी पहारा देत होते. त्यांनी पद्मपादला पाहतांच त्यांच्या हातांत जे भाले होते ते उंच उभारून पद्मपादचे अभिवंदन केले व जयजयकार केला.

पद्मपाद प्रथम गाढवावरून उतरला व वाड्यात पुढे निघाला. पिंगळ भल्लूककेतूच्या खांद्यावरून उतरून पद्मपादच्या मागे निघाला. सर्व जण वाड्यासमोरच्या चित्रविचित्र झाडांमधून चालत राजवाड्यासमोरच्या दाराजवळ येऊन पोंचले. वाड्याच्या पायऱ्यांजवळ पांढरी शुभ्र लांब दाढी असलेला एक वृद्ध समोरा आला. त्याला पाहतांच पद्मपादने वांकून नमस्कार केला आणि मागे वळून पिंगळला म्हणाला—"हेच आमच्या वडिलांचे गुरुवर्य!"

पिंगळने सुद्धा त्यांना नमस्कार केला.

तो वृद्ध, सर्व जवळ येईपर्यंत थांबून, पिंगळकडे बोट दाखवीत म्हणाला-"पद्मपाद, हा तरुण मुलगा कोण रे?" थोडा थांबून पुढे म्हणाला—"अवंती नगरीचा कोळी तर नव्हे ना?"

पद्मपादने होकारार्थी मान हलविली. ते पाहून तो वृद्ध अत्यंत आनंदित होऊन म्हणाला—"म्हणजे तू महामायिकाच्या समाधीजवळच्या भयंकर शक्तींवर विजय मिळविलास म्हणावयाचा! त्या तुला वश झाल्या तर!"







पद्मपादने आणखी काही न बोलतां आपल्या बोटांतील अंगठी; हीरेजडित मूठ असलेली तलवार आणि भूगोल त्या वृद्धाला सर्व दाखविले. त्या वृद्धाने त्या सर्व वस्तूं-कडे जरा खोल नजरने पाहिले आणि म्हणाला—"पद्मपाद! आतां या जगात तुला जिंकू शकेल, असा दुसरा कोणी मांत्रिक राहिला नाही. तुझ्या वडिलांना अनेक प्रयत्न करूनही जी गोष्ट साध्य झाली नाही, ती तुला साध्य झाली. आतां त्याच्या आत्म्याला शांतिलाभ होईल!"

"आतां माझ्या वडिलांनी जे मंत्रग्रंथ लिहून माझ्या साठी ठेवले आहेत, ते सर्व माझेच ना?" पद्मपादने विचारले.

वृद्ध स्मित करून म्हणाला—"सर्व जगाला जिंकण्याची शक्तीच तुला लाभल्या-नंतर, आज सर्व शक्ती तुझ्या हातांत असल्यानंतर, ते ग्रंथ घेऊन तुला नवीन असे काय लाभणार आहे? तू स्वाधीन करून घेतलेल्या शक्तींपेक्षां त्यांत नवीन अशी शक्ती काहीच नाही. त्याला स्वतःला स्वाधीन करून घेणे शक्य झाले नाही, अशा शक्ती स्वाधीन करून मुलांनी तरी घ्याव्या ही इच्छा तुझ्या वडिलांच्या मनांत मृत्यूपूर्वी होती. म्हणून ते ग्रंथ तुम्हांला प्राप्त होण्यापूर्वी त्यांनी त्या अटी तुमच्यावर लावल्या होत्या. महामायिक तुझ्या वडिलांचा मोठा विरोधी होता. तू त्याला जिंकलेस!"

त्या वृद्धाने हे सर्व सांगेपर्यंत पद्मपादला त्याच्या वडिलांची काय इच्छा होती, हे कळले नव्हते. आपल्या शत्रूला, महा-मायिकाला शक्तिहीन करण्यासाठी माझ्या वडिलांनी माझा उपयोग करून घेतला, म्हणावयाचा!

पद्मपादच्या मनात हे विचार चालू असतां त्या वृद्धाने पिंगळच्या खांद्यावर प्रेमाने हात ठेवला व त्याला म्हणाला—"तू अवंती नगरीचा कोळी असलास तरी देवाच्या प्रेरणेने पद्मपादच्या मदतीस आलास आणि एक फार मोठे कार्य करू शकलास. त्या साठी मी तुझे अभिनंदन करतों!"





पिंगळ एक आठवडाभर पद्मपादच्या पाहुणा म्हणून राहाला आणि परत अवंती-पूरला जाण्याच्या तयारीला लागला. पद्मपादने त्याला मूल्यवान वस्त्रे व पुष्कळसे सोने, हिरे व माणिक्ये दिली. त्या मूल्यवान वस्तू मिळाल्याने पिंगळला परमा-नंद झाला. त्याने पद्मपादचे फार आभार मानले व त्या वस्तू घेतल्या.

शेवटी पिंगळ पद्मपादच्या घराच्या बाहेरच्या कोटाच्या दारावर आल्या नंतर पद्मपाद पिंगळला महामायिकाकडून प्राप्त करून घेतलेल्या सर्व वस्तू दाखवून म्हणाला—"पिंगळ, तुला या वस्तूं पैकी जी वस्तू हवी असेल ती आनंदाने मागून घे! मी तुला देईन!"

पिंगळ त्या गोष्टीस कबूल झाला नाही. तो स्मित करून एवढेच म्हणाला—"पद्मपाद! त्या सर्व वस्तू महाशक्ती असलेल्या आहेत. माझ्यासारख्या एखाद्या कोळ्यापेक्षा तुझ्या-सारख्या मांत्रिकाजवळ त्या असणे जास्त उपयोगाचे होईल, नाही का? तू अन्यथा मानणार नसशील तर तुझ्याजवळ मला उपयोगी पडेल अशी एक वस्तू आहे!"

"काय ती वस्तू निःसंकोचपणें मागून घे! मी देतो!" पद्मपाद म्हणाला.

"तुझ्याजवळ महिमा असलेली मंत्र-वलेली एक पिशवी आहे ना? शिजवलेल्या सर्व वस्तू तीत मिळतात! तशी पिशवी असली की माझ्या वृद्ध आईला काही श्रम केल्याशिवाय आम्हांला पोटभर वाढतां येईल! तिला फार आनंद होईल!" पिंगळ म्हणाला.

पद्मपाद ने आनंदाने ती पिशवी पिंगळला दिली. त्यानंतर पिंगळ वृद्ध मांत्रिकाचा व पद्मपादचा निरोप घेऊन भल्लूककेतूच्या खांद्यावर बसून आकाशमार्गे निघाला.

भल्लूककेतू ढगाळ आकाशमार्गे उडत ठीक दुपारच्या सुमारास अवंती नगरीच्या जवळ पास येऊन पोंचला. पिंगळ आपल्या गावाच्या वेशीवरच्या आपल्या झोपडीकडे पाहून भल्लूककेतूच्या खांद्याला स्पर्श करून

म्हणाला–"भूल्लका, आतां तू पुढे जाऊ नकोस! ती जी झाडी खाली दिसते आहे तेथे उतर! हे सर्व तो जरा घाई-घाईनेच म्हणाला. त्याला भल्लूककेतू बरोबर गांवात पाऊल टाकणे इष्ट वाटले नाही.

भल्लूककेतूने पिंगळच्या इच्छेप्रमाणे त्या झाडीत उतरला. पिंगळने खांद्या-वरून उतरल्यावर एकदां गांवाकडे एक नजर फिरविली व म्हणाला–"भल्लूका, तुला या रूपात गांवात घेऊन जाणे बरोबर वाटत नाही. अनेक विघ्ने येण्याची शक्यता आहे. तर मग काय करू या, म्हणतोस?" पिंगळने संकोच सोडून विचारले.

पिंगळला कसली भीती वाटत असावी, याचा अंदाज भल्लूकला लागला. तो मोठ्याने हसला व म्हणाला–"तर मग, प्रभो! आपण एकट्यानेच गावात प्रवेश करावा. माझ्या मदतीची आपणांला जेव्हा गरज पडेल तेव्हां मी सांगतो तो मंत्र म्हणावा, लगेच मी आपल्या जवळ हजर होईन!" असे सांगून कोणता तरी मंत्र भल्लूककेतूने पिंगळच्या कानांत सांगितला आणि तो अदृश्य झाला.

पिंगळ, पद्मपादने दिलेले सर्व वैभव ओझ्यासारखे घेऊन आपल्या घराकडे निघाला. तो आपल्या घराच्या जवळ पोचणार त्या सुमारास त्याची आई बरेच दिवसात काही खायला प्यायला न मिळाल्यासारखी, काळजीने खंगल्या-सारखी दारांत बसून रडत म्हणत होती–"अहो, कोणी धर्मदाता आहे का, या म्हातारीला काही तरी द्या. भुकेने जीव कासावीस झाला आहे!" अशा दीन शब्दात येणाऱ्याजाणाऱ्यासमोर हात पसरून ती मागत होती.

पिंगळ ते दृश्य पाहून दु:खाने व रागाने थरथर कांपू लागला. तरी धीर धरून व दु:ख आवरून म्हणाला–"आई! तुझ्यावर हा असा प्रसंग कसा आला ग?" तो मागेपुढे न म्हणत पाहातां आईकडे धांवतच गेला. (क्रमश:)



# पद्मनाभचे लग्न

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमीप्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, हातात घेतलेले काम, किती कष्ट सहन करावे लागले तरी सहन करून, यशस्वीपणे साध्य करून घेण्यासाठी तू प्रयत्न करतो आहेस, ही गोष्ट खरोखरच स्तुत्य आहे. परंतु दुस्साध्य अशा कामात तुला गुंतवणारा तुझ्याशी मित्रत्वाचे नाटक करून तुझ्याकडून हे काम करायला लावणारा तुझा कोणीतरी शत्रूच असावा, अशी शंका मला येते आहे. फक्त धैर्य-साहसाने व बुद्धीने साध्य होणारी काही कामे काही भोळी माणसे, आणि सद्बुद्धीवाली माणसे सहजी साध्य करून घेऊ शकतात. त्याचे उदाहरण म्हणून मी



"तुला पद्मनाभ नावाच्या माणसाची गोष्ट सांगतो, लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ ती गोष्ट सांगू लागला.

कुमुद्वती नावाच्या गावी पद्मनाभ नावाचा एक तरुण युवक रहात असे. तो अत्यंत रूपवान होता, परंतु अगदी भोळा, दुधखुळाच म्हणा ना, होता. त्याला स्वतःचे असे कोणी नव्हते.

एकदा तो गावातल्या रस्ताने हिंडत असता रत्नभद्र नावाच्या एका श्रीमंत व्यापाऱ्याची मुलगी सुलक्षणा पालखीतून बसून जात असलेली त्याला दिसली. तिचे अद्भुत सौंदर्य पाहून पद्मनाभ चकित झाला. त्याने त्याच वेळी मनात ठरविले, लग्न करायचे तर हिच्याशीच! रत्नभद्र हा गावातला सर्वांत श्रीमंत व्यापारी होता. कोट्याधीश होता. अशा श्रीमंताच्या मुलीशी लग्नाचा विचार करणे पद्मनाभसारख्या गरीब दरिद्रयाला साध्य होणारी गोष्ट नव्हती. परंतु भोळेपणाने तो या गोष्टीचा विचार करू शकला नाही.

त्या दिवशी संध्याकाळीच त्याने ही गोष्ट आपला मित्र रविवर्मा याला सांगितली. पद्मनाभवर रविवर्म्याचे तितकेसे प्रेम नव्हते, उलट तो त्याला एक मूर्ख समजत असे. सर्व, पद्मनाभला सुंदर सुंदर म्हणत, हे रविवर्म्याला आवडत नसे. पण कधी उघडपणे तो ती गोष्ट बोलला नव्हता. वेळ पाहून पद्मनाभची थट्टा उडवायची एवढे त्याच्या मनात होते.

सुलक्षणाच्या सौंदर्याचे वर्णन करून पद्मनाभने तिच्याशीच लग्न करण्याचे ठरविले असल्याचे सांगितल्यावर रविवर्मा म्हणाला—"हे काय मोठे काम झाले? तुझ्या सारखा सुंदर जांवई होणार म्हणजे रत्नभद्र उड्या मारील, जाऊन विचार."

पद्मनाभ बिचारा भोळाभाबडा खरोखरच रत्नभद्रकडे गेला आणि म्हणाला—"तुम्हांला हरकत नसेल तर तुमच्या मुलीशी मी लग्न करावे म्हणतो आहे!"





रत्नभद्र वस्ताद माणूस होता. तसा रागीटही नव्हता. त्याने पद्मनाभचा भोळेपणा पाहिला आणि म्हणाला—"तुला माझी मुलगी मी देतो. पण लग्नापूर्वी मला एक मण सोने आणून दिले पाहिजेस!"

पद्मनाभला तेवढे सोने आणून देणे शक्य नाही, हे रत्नभद्रला चांगले माहीत होते. परंतु पद्मनाभला त्याचे काहीच वाटले नाही. त्याने रविवर्म्याला जाऊन ती गोष्ट सांगितली आणि त्याचा सल्ला विचारला.

"त्यात काय रे? तू जाऊन सोमनाथ सावकार आहे ना? त्याच्याकडे जाऊन माग. तुझे रूप पाहूनच तो खूष होईल आणि तुला मणभर काय, तू मागशील तेवढे सोने देईल." रविवर्मा म्हणाला.

पद्मनाभ सोमनाथ सावकाराकडे गेला आणि म्हणाला—"मला एक मण सोने कर्जाऊ हवे आहे. तेवढे द्या."

सोमनाथने विचार केला, या वेड्याला थोडे नाचवावे. म्हणून तो पद्मनाभला म्हणाला—"तुझ्या सारख्या थोर माणसाला मी कर्ज द्यायचे म्हणतोस? आपल्या गांवच्या नदीच्या काठी वडाच्या झाडाखाली भैरवबैरागी राहतो, तुला माहीत आहे ना? त्याला लोखंड, पितळ, तांबं वगैरे नेऊन दिलं की तो त्यांचे सोने करून देतो. तू त्याच्याकडे जाऊन माग, तो तुला पाहिजे तेवढे सोने देईल."

सोने आपल्याला फुकटात मिळणार, असे ऐकून पद्मनाभला परमानंद झाला. तो भैरवबैराग्याकडे गेला आणि म्हणाला—"मला एक मण सोने द्या, बाबा! माझ्याकडे पैसेबैसे नाहीत!"

तो बैरागी म्हणजे लबाड माणूस होता. पारस विद्या शिकवितो असे सांगून त्याने लोकांकडून पुष्कळ पैसे उकळले होते. त्याने अशा तऱ्हेने मिळविलेले पैसे गौरमुख नावाच्या एका अट्टल चोराने चोरून नेले होते. त्या चोराला कसे पकडावे, या विचारात भैरवबैरागी होता.











म्हणून भैरवबैरागी पद्मनाभला म्हणाला-"पद्मनाभा, तू नुसता सुंदरच नाहीस, तू हुशार आणि धैर्यवान सुद्धा दिसतो आहेस. एक काम कर, शहराच्या शेजारच्या जंगलात कोठेतरी गौरमुख नावाचा चोर राहातो आहे ना, त्याला धरून तू माझ्याकडे घेऊन ये. म्हणजे मी तुला एक मण सोने फुकट देईन!"

पद्मनाभ जंगलात गेला. खूप हिंडला फिरला आणि कसातरी गौरमुख राही त्या जागी पोचला. गौरमुखने त्याला पाहून प्रेमाने विचारले-"कोण रे बाबा, तू? माझ्या बरोबर माझ्या धंद्यात भागीदार होणार आहेस वाटते?"

"तसे काही नाही रे! भैरवबैरागी, मी तुला धरून त्याच्याकडे घेऊन गेलो तर मला एक मणभर सोने फुकट देईन, म्हणाला. म्हणून तू माझ्या बरोबर चल!" पद्मनाभ म्हणाला.

गौरमुखला पद्मनाभ अगदी भोळा आहे, हे कळले. त्याच्याकडून एक गंमत करवावी असे ठरवून तो पद्मनाभला म्हणाला-"एक मणभरच सोने पाहिजे ना? त्यात काय, दहा मण सोने मिळेल, असा उपाय सुचवितो. तो समोर डोंगर आहे ना, त्यात एक गुहा आहे. एका गुहेत एक काळे भूत राहते. त्याला जाऊन मागितले-मना, की मागशील तेवढे ते तुला देईल."

ते ऐकून सुलक्षणाशी आपले लग्न झालेच, असे पद्मनाभला वाटले व तो घाईघाईने त्या गुहेकडे गेला. तिकडे एका गुहेसमोर एक मोठी धोंड ठेवलेली होती आणि तीवर एक काळे भूत बसलेले होते.

हे भूत कोणाला कधी त्रास देत नसे. परंतु त्याचे भयंकर रूप पाहूनच कोणी त्या बाजूला फिरकत नव्हते. त्याला पाहूनच लोक दुरून निघून जात. परंतु भोळाभाळा पद्मनाभ ते दिसतांच आनंदाने त्याच्या जवळ गेला आणि त्याने आपल्या मनातली इच्छा सांगून, आतापर्यंत घडले ते सर्व त्या भुताला सांगितले आणि रत्नभद्राची मुलगी सुलक्षणाशी त्याला लग्न करावयाचे असल्याचेही सांगून त्यासाठी मदत हवी असल्याचे सांगितले. "एक मण सोने दिलेस तर मी जन्मभर तुझी आठवण काढीन!" म्हणाला.

इतक्या निर्भयपणे आलेला हा मुलगा किती भोळाभाळा आहे! इतक्या निर्मळ हृदयाच्या माणसाला मदत करावयाची नाही तर कोणाला करायची, या भावनेने पद्मनाभविषयी भुताच्या मनात आदर व प्रेमभाव वाढला.

भूत उठले व गुहेत जाऊन लखलख करीत असलेले चार हिरे घेऊन आले. ते पद्मनाभला देत म्हणाले-"तुला हवे असेल तर एक मण सोने नव्हे, लक्ष कोटी किमतीचे हे हिरे मी तुला देऊ शकेन. परंतु तू सांगितलेस ते सर्व ऐकल्यावर तुला यांची गरज राहणार नाही, असे मला वाटते. गावांत परत जाऊन रत्नभद्राला घडलेले सर्व सांग. तेव्हा तो पैसेच पाहिजे असे म्हणाला तर तू हे हिरे घेऊन जा."

पद्मनाभने भुताचे आभार मानले आणि गावात गेला, त्याने रत्नभद्राला घडलेले सर्व वृत्त सांगितले.

रत्नभद्राने पद्मनाभला त्याच्या खांद्यावर प्रेमाने हात फिरवीत जवळ ओढून म्हटले-"तूच माझा जांवई होण्यालायक आहेस! सुलक्षणाशी मी तुझे लग्न करून देतो!"

वेताळने येथवर कथा सांगून राजाला विचारले-"राजा! रत्नभद्रासारख्या









लौकिक ज्ञान असलेल्या एका प्रमुख व्यापाऱ्याने अगदी भोळ्या दुधखुळ्या पद्मनाभाला आपली एकुलती एक मुलगी द्यायचे कसे काय मान्य केले? आश्चर्यच नाही का? काळे भूत त्याचे काही नुकसान करील या भीतीने त्याने मान्य केले का? पद्मनाभ कोट्यावधी रुपये किमतीचे हिरे आणून देईल ना? ती संधी त्याने कां घालविली? या शंकांचे समाधानकारक उत्तर माहीत असूनही तू दिले नाहीस तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–"भूत आपले काही नुकसान करील अशी भीती पद्मनाभला मुळीच नव्हती. कोट्यावधी रुपये देऊ शकणारे हिरे म्हणजे त्याला त्यांची काही किंमतच वाटली नाही. पद्मनाभ म्हणाला ते ऐकल्यावर भूत आपले नुकसान करणे तर शक्यच नाही, पुष्कळ फायदाच करील असे वाटले. ती गोष्ट त्याला परोक्षपणे जीवनातील एक सत्य कळायला उपयोगी पडली की माणसात धनापेक्षां चांगली बुद्धी, हातात घेतलेले काम करण्याची जिद्द, नीतिमत्ता या गोष्टी जास्त महत्वाच्या आहेत. तसे लोक जीवितात केव्हांतरी उच्च स्थानी पोचू शकतातच! दुष्ट बुद्धी असलेला पद्मनाभचा मित्र, बैरागी आणि चोर आपल्या दुष्कृत्याची फळे चाखणारच. हे जीवनातील सत्य ओळखल्यानंतर रत्नभद्राला त्याच्या भावी जावयांतला भोळेपणा हा त्याचा अवगुण असा वाटलाच नाही. पद्मनाभ आपला जांवई झाल्यावर त्याला व्यापारधंद्याचा अनुभव करून देऊन त्याला आपल्या हाताखाली शिकवून लोकज्ञान करून देणे तेवढे अवघड नाही अशी रत्नभद्राची खात्री होती. असा विचार करून रत्नभद्राने पद्मनाभला आपला जांवई करून घेण्याचे ठरविले."

अशा प्रकारे राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि पुन्हां जाऊन झाडाला लोंबकळू लागला.

(कल्पित)





# बोलण्याची रीत

शचीन्द्र नांवाच्या राजाला संगीत शिकावेसे वाटले. त्याने थोडी सुरवातही केली आणि चारचौघांना गाणे म्हणूनही दाखवू लागला. त्याने गायला सुरवात केली की त्याच्या आश्रयाला नित्य राहणारे लोक जमत. त्या शिवाय दरबारी नोकरचाकर व मंत्री सुद्धां येऊन ऐकायला बसत. कारण राजाला ते आवडेल व नाही आलो तर राजा रागावेल ही भीती वाटे. पण त्यामुळे त्यांनी त्यावेळी करावयाची कामें राहून जात. ही गोष्ट महाराजांना कशी सांगावयाची हा प्रश्न सर्वांसमोर उभा राहिला.

किती विचार करून पाहिला तरी कोणाला त्या प्रश्नाचे उत्तर मिळेना. राजाला ही गोष्ट सरळ जाऊन सांगितली तर त्याला नक्कीच राग येईल. त्यामुळे नोकरीवरून काढले जाऊन, प्राणाची भीती सुद्धां कित्येकांना वाटली. वसन्तक नावाचा, राजा शचींद्र याचा एक विदूषक होता. त्याला तास दोन तास दररोज राजाचे गाणे ऐकणे म्हणजे एक संकटच वाटत होते. एके दिवशी राजाचे गाणे संपल्यावर राजा शेजारी बसलेल्या विदूषकाला म्हणाला–"माझ्या आवाजात काहीतरी जादू आहे, असे वाटते. मी गात असतो, तितका वेळ तुम्ही सर्व माझ्यासमोर बसून राहतां. तर मी इतके चांगले गातो का? मला तरी असे वाटू लागले आहे, बुवा!"

ते ऐकून विदूषकाने भीत असल्याचा अभिनय केला आणि म्हणाला–"प्रभो! आपणच विचार करा, आपण गात असतां आपल्या गानसभेत पाऊल टाकल्यावर कोणाला उठून जाण्याची हिम्मत तरी होईल का?"



विदूषक म्हणाला, त्याचा अर्थ राजाला तत्काळ समजला. तो रागावला तर नाहीच, स्मित करून म्हणाला–"दररोज माझे गाणे ऐकत बसणाऱ्यामध्ये काही जण माझी प्रशंसा करण्यासाठी बसत असणार, तर काही जण माझ्या अधिकाराला भिऊन बसत असणार. ही गोष्ट इतके दिवस माझ्या लक्षांत कशी आली नाही, याचे दुःख मला वाटत आहे !"

"क्षमा करा, प्रभो! मी म्हणालो त्याचा आपल्याला राग येईल, असे मला वाटले होते." विदूषक म्हणाला.

"तसे काही नाही रे! मी तुझे आभारच मानतो. तरी समज, मी एकदम गाणे बंद केले किंवा कोणी येऊ नका असा हुकूम सोडला तर सर्वांना शंका येईल. असे न सांगता मी, माझ्या-मुळे तुम्हा सर्वांना अडचणच झाली असेल नाही, असे म्हटले तर ते मला अपमानास्पदच होणार. तर हा प्रश्न कसा सोडवायचा ?"

"प्रभो, प्रत्येक बाबतीत बोलण्याची रीत म्हणून असते. मी आपल्या पद्धतीने सांगावे म्हटलं व तसे सांगितलेही. तसेच आपणही आपल्या दर्जाला शोभेल अशा पद्धतीने आज्ञा केलीत की झाले. विचार करून पहावा." विदूषक म्हणाला.

दुसऱ्या दिवशी राजा गाण्याला बसतांच तेथे आलेल्या सर्वांना उद्देशून तो रागाने म्हणाला–"तुमची ही पद्धत मला नाही आवडली. काही काळ एकांतात साधना करावी, म्हटले तर ही सामान्य गोष्टही तुम्हांला कळू नये, हे आश्चर्य आहे. माझा आवाज ऐकतांच तुम्ही सर्व आपापली कामें सोडून धावतां! यापुढे आपली कामें सोडून तुम्ही येऊन बसलात तर तुम्हांला शिक्षा होईल!" सर्व नोकरांचाकरांना तेच हवे होते. जे हवे होते ते सहजी घडले. गाण्याला हजर न राहाल्याचा महाराजांना राग येणार नाही, हे स्पष्ट झाले. सर्वांना आनंद झाला. परंतु इतका बदल अकस्मात् कसा घडला, हे मात्र कोणाला कळले नाही.





# भांडवल हवेच!

सदोबा पाटील गावातले एक प्रतिष्ठित शेतकरी होते. त्यांनी खूप मेहनत करून त्यांच्याकडे जे शेत होते त्यावर मिळकत करून घेऊन चार मुलांना वाढविले व त्यांची लग्ने करून दिली, आणि स्वतःचे एक चांगलेसे घर सुद्धा बांधून घेतले.

एकट्याने एवढ्या मोठ्या कुटुंबाचा भार वाहणे त्यांना कठीण वाटू लागले. वाडवडिलार्जित जी शेते होती त्याशिवाय नवीन एकाध एकर जमीन घेणे सुद्धा त्यांना शक्य झाले नाही. मुलांची कुटुंबे, मुलेबाळे वाढली व संसाराचा मोठा पसारा झाला. अन्नवस्त्र सर्वांना पुरविणे कठीण होत गेले. मुले गांव सोडून किंवा घर सोडून आपला संसार थाटू शकणे शक्य होते परंतु तसे झाले नाही. मुलांपैकी कोणीच तो विषय काढला नाही.

एकदां सदोबांनी मोठ्या मुलाला बोलावून म्हटले–"आपण तूर्त ज्या शेतात पीक काढीत आहों, ते वाढणे शक्य नाही. याच गावात आपण लोकांची शेतें खंडावर घेऊन पीक काढले तर आजपर्यंत आपली मान ताठ होती ती थोडी तरी वांकेलच. बरे, दुसरा काही मार्ग आहे का? विचार केलास का कधी?"

मोठ्या मुलाने खंडावर शेत घेणेच योग्य होईल हे सुचविले. पण सदोबांना मुळीच आवडले नाही. लोक आपल्यावर अधिकार गाजवायला सुरवात करतील व आपला गावात जो थोडा मान मरातब होतो आहे, तो होणार नाही. म्हणून त्यांनी त्या गोष्टीस नकारच दिला.

नंतर सदोबांनी आपल्या इतर तिघां मुलांना बोलावून त्यांचे मत विचारले.

       



सर्वांनी मोठ्या भावाने सुचविले तेच सुचविले. निसर्गनियम आहे, झाडाला लागलेली फळे चार निरनिराळ्या जागी लावली गेली तर त्यांची झाडे स्वतंत्रपणे वाढून त्या जातीच्या झाडांची संख्या वाढते. एकाच झाडाखाली फळे पडली तर, एकतर ती रुजत नाहीत, रुजलीच तर वाढत नाहीत. कारण त्यांना पुरेसा आहार मिळत नाही.

वास्तविक स्थितीचा बोध मुलांना व्हावा, यासाठी काय करावे, हे सदोबांना कळेना. त्यांनी बराच विचार केला आणि जिल्ह्याच्या गावी गेले. त्याच्या दुसऱ्याच दिवशी सदोबाच्या घरी लाकडाची वखार ठेवणारा एक जण आला. त्यावेळी थोरला मुलगा घरी होता. त्याने त्याला विचारले—"कोणासाठी आलां आहां?"

"अहो, माझ्याजवळ एक बांबूचें बेट आहे. कोणीतरी ते बेट घेऊन बांबू कापून नेतात का, चौकशी करायला आलो होतो." तो वखारवाला म्हणाला.

थोरल्या मुलाच्या मनांत लोभाचे अंकुर वर डोके काढू लागले. पाहिजे तेवढे बांबू तोडून कापून घेतां येतील. मोठ्या शहरात त्यांना चांगली किंमत मिळेल. इकडून शहरात नेण्याचा खर्च काय तो होणार!

असा विचार करून थोरला त्याच्या बरोबर जंगलात गेला. त्याने बांबू तोडविले व शहरात घेऊन गेला. तो तेथे ते विकणार इतक्यात तेथे सदोबांचा दुसरा मुलगा आला.

तो आपल्या थोरल्या भावाला म्हणाला—"तूं बांबू विकूं नकोस. ते पिंजून कामट्या करून विकल्या तर जास्त किंमत देऊन विकत घ्यायला एक व्यापारी तयार आहे.

दोघां भावांनी बांबू चिरून त्याच्या कामट्या करविल्या. सर्व बांबू चिरून लांबलांब कामट्या तयार झाल्या. दुसऱ्या दिवशी व्यापारी त्या विकत घ्यायला आला. ठीक त्याच वेळी सदोबांचा तिसरा मुलगा आला. तो त्यांना म्हणाला—"तुम्ही दोघे इतक्या चांगल्या कामट्या किती स्वस्तात विकतां आहां? या कामट्या आणखी पातळ चिरून त्यांच्या चटाया व करंड्या वगैरे केल्या तर त्या विकत घ्यायला एक व्यापारी तयार होऊन आला आहे. तो चांगल्या किंमतीला विकून देईल."

कामट्या चिरून त्यांच्या टोपल्या, करंड्या वगैरे विणून तयार झाल्या. त्या विकत घ्यायला एक व्यापारी आला. त्याच वेळी सदोबांचा चवथा मुलगा धांवत आला व म्हणाला—"या आपणच सर्व विकल्या तर जो लाभ होईल तो आपणां सर्वांनाच मिळेल की नाही? ते काम मीच करतो."

चौघां भावांनी मिळून सर्व सामान बाजारांत विकले व चांगली किंमत आली. चौघे आलेला फायदा आपसात वांटून घेऊ लागले. त्याच वेळी स्वतः सदोबाच तेथे आले व म्हणाले-"तुम्ही फायदा वांटून घेण्या-पूर्वी बांबूची किंमत बाजूला काढून ठेवा."

वडिलांनी ते म्हटल्यावर सर्व भाऊ आश्चर्यचकित होऊन परस्परांकडे पाहू लागले—"बांबूची किंमत कोठली हो, ते तर फुकटांतच आपल्याला मिळाले होते!"

सदोबा हसून म्हणाले—"वखारवाल्याने ते तुम्हांला फुकट दिले होते हे खरे आहे! परंतु आपण व्यापारासाठी पुन्हां बांबू विकत घ्यायचे झाले तर पैसे देऊनच विकत घ्यायला लागणार!"

चारही जणांनी थोडा वेळ विचार करून होकार दिला. आलेल्या अनुभवावरून हा धंदा तेवढा त्यांना कठीण वाटला नाही. चौघांनी जबाबदारी वाटून घेऊन काही दिवसांत पुष्कळ चांगला धंदा केला. व्यापाऱ्यांत मोठे नाव मिळविले आणि फायदा पण मिळविला.

सदोबांनी मुलांना एक गोष्ट सांगितली नाही. सर्वांत आधी मुलांना बांबू देणाऱ्या वखारवाल्याने सदोबाकडून योग्य किंमत घेऊनच बांबू फुकट म्हणून सांगून दिले होते. त्यानंतरचे तिघे व्यापारी सुद्धा जिल्ह्याच्या गांवचे सदोबांचे व्यापारी मित्रच होते.





# दानास पात्र व्यक्ती

एकदा बोधिसत्वांनी काशीचा राजा म्हणून अवतार ग्रहण केला. ते राज्य करीत असतां सरहद्दीवर फितूरी आणि बंडखोरी वाढू लागली. ती बंडखोरी चिरडून काढण्यासाठी राजानं छोटेंसे सैन्य घेऊन त्यांच्या वर स्वारी केली. तेथे चकमक झाली त्यात स्वत: राजाच जखमी झाला. राजा बसला होता तो घोडा विथरला आणि राजाला घेऊन रणांगणावरून पळून गेला.

काही वेळाने राजा सरहद्दीवरच्या एका बंडखोरांच्या गावी येऊन पोचला. त्यावेळी गांवकरी एकत्र होऊन आपसात विचार करीत बसले होते. ते गावातल्या काही प्रश्नांवर आपसात सल्ला करीत होते. चर्चा ऐन रंगात आली होती, त्याच वेळी ढाल तलवार व कवच धारण करून एका योद्धयाचा पोशाख करून येणाऱ्या राजाला पाहून सर्व लोक घाबरून गेले. बंडखोर असल्यामुळे जास्तच घाबरले आणि वाट फुटेल तिकडे पळून गेले. फक्त एक गांवकरी तेथून हलला नाही.

तो गावकरी राजाजवळ गेला व त्याने राजाला विचारले–"तू बंडखोरांपैकी आहेस की राजाचा स्वामिभक्त नोकर आहेस ?"

राजाने उत्तर दिले–"अहो, मी राजाचा स्वामिभक्त नोकर आहें !'

ते उत्तर ऐकून तो गांवकरी मनाचे समाधान झाल्यासारखे दर्शवून म्हणाला– "तरमग चल आमच्या घरी जाऊं !" त्याने राजाला आपला पाहुणा म्हणून आपल्या घरी नेले आणि त्याला हातपाय धुवायला बायकोकडून पाणी वगैरे देवविले. नंतर त्याने त्याला जेवायला वाढविले आणि त्याचा सर्व प्रकारे अतिथिसत्कार करविला. त्यानंतर त्या गावकऱ्याने राजाच्या घोड्याला दाना पाणी घातले.

राजा त्या गांवकऱ्याकडे चार दिवस राहिला आणि त्याला झालेल्या जखमांवर मलमपट्टी करविली. त्याच सुमारास राजाच्या सैन्याने बंडखोरांची खोड मोडली आणि राजाला येऊन भेटले.

राजाने घरी परत जातेवेळी त्या गांवकऱ्याचे आभार मानले व म्हणाला–"हे पहा, मी काशीचा राहणारा आहे. आमचे घर किल्ल्याच्या आतच आहे. माझी बायको आणि दोन मुले आहेत. तुम्ही काशीला कधी आलांत तर उजव्या बाजूला उत्तरद्वार आहे. तेथे पाहारेकऱ्याला विचारले की महाश्वारोहीचे घर कोठे आहे, तर तो लगेच माझ्या घरी बोलावून घेऊन येईल तुम्ही तुम्हांला वाटेल तितके दिवस माझ्या घरी पाहुणे म्हणून राहलात तर मला आनंद होईल !"

त्यानंतर राजा आपल्या सैन्याबरोबर काशीला परत आला. उत्तरेकडील पाहारेकऱ्याला हाक मारून राजाने त्याला समजावून सांगितले की जर कोणी महाश्वारोहीचे घर कोठे आहे, तर त्याला सरळ माझ्या घरी आदरपूर्वक बोलावून आण !"

तो गांवकरी येईल म्हणून राजाने बरेच दिवस वाट पाहिली. परंतु तो आलाच



नाही. त्याला कोणत्याही तऱ्हेने आणलच पाहिजे या हेतूने राजाने आपल्या मंत्र्यांचा सल्ला घेऊन त्या गावावर नवीन कर लावले.

तरीसुद्धां तो गावकरी राजाकडे आला नाही. आणखी काही दिवस वाट पाहून राजाने तो कर आणखी जास्त वाढविला. असे तीनचार वेळ झाल्यानंतर त्या गांवचे इतर लोक त्या गावकऱ्याकडे येऊन म्हणाले–"हा कर डोईजड झाला आहे, बुवा! काशीला तुझा कोणी मित्र आहे म्हणालास ना; तू त्याला भेटून सांग, आम्ही कर देऊ न शकल्यामुळे फार कष्ट सहन करीत आहो. हा कर कसा तरी प्रयत्न करून काढून टाकव !"

"माझ्या मित्राला भेटणे कठीण नाही. पण त्याच्याकडे मी रिकाम्या हाताने कसा जाऊ? त्याची बायको आहे आणि दोन मुलगे आहेत, म्हणे. त्या सर्वांना कपडे नको का द्यायला? त्याच्या बायकोला काही दागिना नको का भेट म्हणून द्यायला? ह्या सर्व वस्तूंची प्रथम तयारी करा. मी लगेच निघतो. त्या गावकऱ्याने आपल्या इतर गांवकऱ्यांना सांगितले.

त्या प्रमाणे गावकऱ्यांनी कपडे व दागिने तयार करवून आणून दिले. ते कपडे व दागिने वगैरे घेऊन त्या गावकऱ्याने आपल्या बायकोकडून पोळ्या चपात्या वगैरे करवून घेतल्या आणि सर्व सामानाचे त्याने एक मोठे गाठोडे बांधून घेतले.

तो काही दिवसांनी काशीला येऊन पोचला. उजव्या हाताला जे दार होते, तेथल्या दारावरच्या पाहारेकऱ्याला त्याने विचारले–"अहो, मला महा अश्वारोहीच्या घरी जायचे आहे. मला त्यांचे घर दाखविता का ?"

पाहारकेरी लगेच त्या गावकऱ्याला बरोबर घेऊन महाराजांच्या अंत:पुरात घऊन गेला. राजा तेथे होताच.

त्या गांवकऱ्याला आलेला पाहून राजाला परमानंद झाला. त्याने आणलेल्या सर्व वस्तू राजाने आनंदाने स्वीकारल्या. त्याने आणलेले सर्व खाद्यपदार्थ राजाने स्वत: त्याची बायको व मुले सर्वांनी खाल्ले. गावकऱ्याने आणलेली वस्त्रे त्याने बायकोला नेसायला व मुलांना अंगात घालायला सांगितली. बायकोने दागिने घातले. नंतर राजाने आपल्या पाहुण्याला रेशमी वस्त्रे परिधान करायला दिली. पाहुण्याला ती नेसावी व अंगात घालावी लागली. राजाच्या पाकशाळेत जी पंच-पक्वान्ने तयार केली होती तीच त्या गावकऱ्याला वाढण्यात् आली. त्या गाव-कऱ्याच्या गावावर जे नवीन कर बसविण्यात आले होते, राजाने कर आपल्या मंत्र्या-कडून रद्द करविले.

त्यानंतर राजाने दरबार भरविला. भर दरबारांत मंत्री व सामंतांच्या समक्ष राजाने आपले अर्धे राज्य त्या गावकऱ्याला देत असल्याचे जाहीर केले.

तो गावकरी भेटला त्या घटकेपासून राजाने त्याच्यावर दर्शविलेले प्रेम व आदर मंत्री व दरबारी मंडळींस मुळीच आवडला नाही. राजाने त्या गावकऱ्याला अर्धे राज्य देऊन टाकणे हा शुद्ध अविवेक असल्याचे दरबारी लोकांनी दर्शविले:

परंतु राजाच्या विरुद्ध "ब्र" काढण्याची कोणाची छाती झाली नाही. म्हणून ते युवराजाला भेटले व त्याचे कान भरू लागले–"युवराज, महाराजांनी तुमच्यावर फार मोठा अन्याय केला आहे. तुम्हांला मिळावयाचे जे संपूर्ण राज्य आहे, त्यातले अर्धे एका गांवकऱ्याला देऊन टाकले. तुम्हांला विचारल्याशिवाय तुम्हांला मिळणारे अर्धे राज्य कोणाला तरी देऊन







टाकणे अन्यायाचे होणार नाही का? तेव्हां आपण ही गोष्ट महाराजांसमोर बोलून दाखवावी."

युवराजाने महाराजांकडे जाऊन पोपटासारखे ते सर्व बोलून दाखविले.

सर्व ऐकून घेऊन राजा स्मित करून म्हणाला–"बाळा, तुझी ही स्वतःची बुद्धी दिसत नाही. मला आतां तू जे विचारलेस ते तू उद्यां भर दरबारातच विचार. मी त्याचे उत्तर सर्वांसमक्ष द्यावे म्हणतो!"

युवराजाने त्याप्रमाणे दरबारात पुन्हां तोच प्रश्न केला व त्याला ते आवडले नसल्याचे या शब्दांत दर्शविले. "तुम्ही आपले अर्धे राज्य एका अर्धसभ्य गावकऱ्याला देता आहां, ते कां?".

लगेच राजा म्हणाला–"युवराज, या गांवकऱ्याने एकदां मला वांचवून प्राणदान दिले होते. तुला ही गोष्ट माहीत नसावी." एवढे सांगून राजाने सरहद्दीवरची फितूरी व बडखोरी झाली होती ती चिरडून टाकीत असतां तो स्वतः कसा जखमी झाला होता आणि गावकऱ्याने कशी मदत केली होती ते थोडक्यात सांगितले. नंतर तो असेही म्हणाला.

"अपात्र व्यक्तीला दान करणे जितके चूक तितकेच सपात्राला दान न करणे चुकीचे आहे. मी राजा असल्याचे माहीत नसूनही या गावकऱ्याने माझ्यावर विश्वास करून, मी बोलावणे पाठविले असूनही प्रत्युपकार करून घेणे योग्य नाही असा विचार करून तो आला नाही. शेवटी आला तो गांवकऱ्यांच्या हितासाठी निघून आला. माझ्या अर्ध्या राज्याला याच्याहून कोण जास्त योग्य ठरू शकेल?"

ते ऐकून मंत्री सामंत वगैरे सर्व शरमिन्दे झाले. युवराजाला त्याने केलेली चूक कळली. वडिलांनी केले ते बरोबर असल्याचे पटले. त्यानंतर राजा आजन्म त्या गावकऱ्याचा आदर करीत राहिला.





## मोंगल साम्राज्याचा ऱ्हास

मराठ्यांचा उत्कर्ष चिरडून टाकण्याच्या प्रयत्नात औरंगजेबाला त्याच्या एकूण कारकीर्दीतील सव्वीस वर्षे दक्खन प्रदेशात घालवी लागली. तो दिल्लीला न राहिल्याने त्याच्या राज्याला मोठा धक्का बसला. त्याचा मुलगा अकबर याने बंड केले. अत्यंत दु:खाने इ. स. १७०७ मध्ये औरंगजेब अहमदनगर येथे मरण पावला.

त्याच्या मुलात आपसांत भांडणे वाढली व मोठ्या मुलाने आपल्या धाकट्या दोघां भावंडांना ठार केले व बहादुर शहा नावें गादीवर बसला. १७१२ मध्ये तो मरण पावल्यावर त्याचा मोठा मुलगा जहांदर शहा याने आपल्या तिघां धाकट्या भावंडांना ठार करून स्वतःला बादशहा म्हणून जाहीर केले.





एक वर्ष लोटायच्या आत त्याच्या भाच्याने त्याचा खून करून गादी बळकावली. त्यानंतर दुष्ट म्हणून प्रसिद्ध झालेल्या सैयद बंधूंनी सर्व अधिकार हस्तगत करून घेऊन आपल्या इच्छेप्रमाणे एकामागून एक अशा तिघां राजकुमारांना बादशहा करून त्यांना ठार करविले!



शेवटी महंम्मद शहाने गादीवर आल्यावर सैयद बंधूंची कत्तल करविली. तोपर्यंत दिल्लीतील अस्त-व्यस्त स्थिती व अशांततेविषयी ऐकून पर्शियाचा बादशहा नादिरशहा याने मोठ्या सैन्यानिशी भारतावर स्वारी करून मोंगलांची राजधानी दिल्ली शहर काबीज केले.

नादिरशहाला तोंड देण्या इतके बलाढ्य सैन्य किंवा धैर्य महंम्मद शहा याच्या अंगात नव्हते. शिवाय त्याने रजपुतांची मदत सुद्धा घेतली नाही. म्हणून नादिरशहाने दिल्ली शहर सहजी काबीज केले. महंमद शहाने नादिर-शहा समोर डाळ न शिजल्याने स्वतःच त्याचे स्वागत केले.





नादिरशहा दिल्लीत भोगविलासात बुडून गेला असतां त्याच्या सैन्याने दिल्ली शहर लुटले. नादिरशहा मरण पावल्याची अफवा उडाल्यावर दिल्लीच्या नागरिकांनी अत्यंत आनंदाने नादिरशहाच्या सैन्याची कत्तल सुरू केली.

ती बातमी नादिरशहाच्या कानावर येतांच त्याने दिल्लीच्या नागरिकां-विरुद्ध आपल्या सैन्याला चेतविले. सैनिकांनी घरेदारे व बाजारपेठा लुटून जमीन द्योस्त केल्या. सानथोर, स्त्रीपुरुष हा भेद न करता एका दिवसात तीस हजार लोकांची कत्तल केली.





मोठमोठे महाल व राजवाड्यांना आग लावली. समोर येईल त्याची कत्तल केली. ऐश्वर्याचा नमुना असलेले दिल्ली शहर भूतनगरी झाले.

विपुल धन, सोने, मूल्यवान रत्ने, हिरे माणिक्ये नव्हे तर जगप्रसिद्ध असे मयूरसिंहासन सुद्धा नादिरशहा आपल्या बरोबर पर्शियाला घेऊन गेला. त्याच बरोबर एक हजार हत्ती, सात हजार घोडे, दहा हजार उंट, निर-निराळ्या कलांत निष्णात अशा काही कारागिरांना नादिरशहा पर्शियाला घेऊन गेला.











सुप्रसिद्ध कोहिनूर हिऱ्याचा शोध लावण्यासाठी नादिरशहाने बादशाही महाल चाळून काढले. तो हिरा महंमद शहाने आपल्या पगडीत लपवून ठेवला असल्याचे एका फितूर मोंगल सरदाराने गुप्तपणे नादिरशहाच्या कानावर आणले.

ही गुप्त गोष्ट नादिरशहाला कळल्यावर तो महंमदशहाला म्हणाला- "मित्रा ! आपण आपल्या मैत्रीचे चिन्ह म्हणून परस्पराचे पागोटे बदलू या का ?" आणि आपले पागोटे काढून महंम्मद शहाला दिले आणि महंम्मद शहाचे पागोटे स्वतः काढून आपल्या डोक्यावर ठेवले. अशा तऱ्हेने त्याने कोहिनूर हिरा हस्तगत करून घेतला.





दिल्ली शहर रक्ताच्या थारळ्यात बुडून गेल्यावर मोडकळीस आलेल्या मोंगल साम्राज्यावर शेवटचा वार नादिरशहाने केला. तेव्हांपासून भारताच्या वैभवाकडे फ्रेंच व ब्रिटीश लोक आकर्षिले गेले आणि हळहळू आपली सत्ता वाढवू लागले.

# बहिरेपणच बरें !

एका गावात एक बहिरा सावकार रहात असे. त्याने पुष्कळ पैसे मिळविले होते.

त्या गावी एकदा एक साधू आला. त्याला औषधी वनस्पतींची चांगली माहिती होती. जुना मुरलेला आजार सुद्धा तो बरा करी. सावकाराला ती गोष्ट कळली आणि आपले बहिरेपण जावे म्हणून त्याने त्या साधूकडून औषधपाणी करायचे ठरविले. तो त्या साधूकडे गेला आणि त्याने आपली परिस्थिती व आजाराची गोष्ट कागदावर लिहून दिली.

"बहिरेपणामुळे तुमचे काही नुकसान झाले का ? सावकारीचा धंदा चांगला चालला आहे ना ? तरमग बहिरेपणाची फिकीर करण्याचे कारण नाही." साधूने सल्ला दिला.

सावकाराला ती गोष्ट मान्य नव्हती. त्याच्याकडे कर्ज मागायला लोक येत ते रागा-रागाने काही बोलत. काही लोक त्याच्या विरुद्धही काही काही बोलत. त्याच्याकडे विचित्रपणे पहात असत, असे साधूला सावकाराने सांगितले व म्हणाला–"ते जे काही बोलतात ते सर्व मला कळले पाहिजे ! "

त्या साधूने सावकाराला कोणता तरी द्रव पदार्थ दिला व म्हणाला–"हे औषध कित्येक वनस्पती औषधींचा रस काढून तयार केलेले कर्णामृत आहे. हे वापरले तर एका महिन्याच्या आत तुम्हांला छान ऐकू येऊ लागेल."

त्या दिवशी संध्याकाळीच सावकार त्या साधूकडे जाऊन म्हणाला–"तुमच्या कर्णामृताचा अद्भुत परिणाम झाला. परंतु माझ्याकडे येणारे लोक मला ऐकू येत नाही, असे समजत आहेत. ते बोलतात ते मला ऐकणे नको असे वाटू लागले आहे. बहिरेपण होते, तेच बरे होते, असे वाटते आहे. औषधाचा फायदा फक्त एक महिनाभरच राहातो ना ? तरमग एक महिनाभर मी तुमच्याकडेच राहातो ?" तो अगदी दीनपणे म्हणाला. साधूने स्मित करून सावकाराला स्वतःकडे राहू दिले.











# सूक्ष्मग्राही

पुरंदर नावाच्या गावी सदाशिव नावाचा व्यापारी पूर्वेकडील समुद्रातल्या बेटांशी आयात निर्यात करून व्यापार करीत असे. त्याचा सर्व व्यापार जहाजांगलबतांवरून होत असे. त्याला या व्यापारात मदत करू शकेल असा एक योग्य तरुण नोकर हवा होता.

ती गोष्ट कळल्यावर एका बरोबरच्या व्यापाऱ्याने त्याच्याकडे विशाख आणि आनंद अशा दोघां तरुणांना पाठविले आणि दोघांपैकी जो जास्त योग्य वाटेल त्याला ठेवून घ्यावे, असे कळविले.

सदाशिवने प्रथम त्या दोघांपैकी आनंदला बंदराजवळ त्याचा माल ठेवला होता त्या गोदीत नेले. तेथे पुष्कळशा पेटचा वाकडचा तिकडचा पडलेल्या होत्या. त्या पेटचा आनंदला दाखवून सदाशिव म्हणाला—"या पेटचात चांदी व इतर धातूच्या वस्तू भरून ठेवलेल्या आहेत. या मी चंद्रपूरच्या व्यापाऱ्याकडून विकत घेतलेल्या आहेत. लवकरच या पूर्वेकडील बेटात पाठवावयाच्या आहेत. प्रथम तू या जहाजांत भरण्यालायक तयार करून ठेव."

नंतर काही अंतरावर असलेल्या चौघां जणांना बोलावून तो आनंदला म्हणाला—"हे चंद्रपूरच्या व्यापाऱ्याचे लोक आहेत. ह्यांनीच या पेटचा इकडे आणून ठेवल्या आहेत. गोदीत आमचा माणूस आहे. हे लोक पेटचा तिकडे आणतील. आपला माणूस पेटचा उचलून व्यवस्थित ठेवील तू जवळ राहून पेटचा मोजून काळजीपूर्वक लिहून घेऊन ये." असे सांगून सदाशिव तेथून निघून गेला.

आनंद 'ठीक आहे' असे सांगून गोदीत गेला. बाहेरून चौघे जण खूप मेहनत करून आणीत असलेल्या पेटचा, सदाशिवने गोदीत आपला माणूस आहे, म्हणून सांगितले होते तो माणूस सर्व पेटचा आत सहज उचलून एकावर एक रचू लागला.

आनंद त्या पेटचा मोजीत राहिला.

काही वेळाने काम पुरे झाल्या बरोबर आनंद सदाशिवकडे गेला. सर्व पेटचा मोजून गोदीत ठेवल्याचे सांगून त्या सर्व मिळून एकशे दहा असल्याचे त्याने सदाशिवला कळविले.

सदाशिवने त्याला कामावर ठेवणार असल्याचे कळवायचे झाल्यास एक माणूस पाठवितो, असे सांगून आनंदला निरोप दिला. दुसऱ्या दिवशी सदाशिवने बंदराजवळच्या दुसऱ्या एका गोदीत विशाखला नेले व तेथे वाकडचा तिकडचा पेटचा दाखविल्या आणि आनंदला सांगितले होते तसे सांगून निघून गेला.

गोदीत जाऊन पेटचा मोजीत असतां विशाखला एक शंका आली. ते चार जण मोठ्या कष्टाने ज्या पेटचा उचलून घेऊन येत होते त्या गोदीतील माणूस सहजी उचलून एकीवर दुसरी पेटी उचलून ठेवीत होता.

काम पुरे झाल्यावर विशाख सदाशिवकडे गेल्यावर सर्व पेटचा एकशे दहा असल्याचे सांगून म्हणाला—"मालक, आपण म्हणालात त्या चंद्रपूरच्या व्यापाऱ्याशी या पूर्वीच आपल्याला देवघेव करावी लागली असेल, मला ते माहीत नाही. त्यांच्या प्रामाणिक-












पणाबद्दल मला शंका वाटत आहे. ही गोष्ट आपल्याला कळविणे हे माझे कर्तव्य आहे!"

"कळू दे तरी कोणती शंका?" सदाशिवने विचारले.

त्या पेटचा भरून चांदी व इतर धातूंच्या वस्तू आहेत असे आपण म्हणाला होतांत. परंतु त्या व्यापाऱ्याने आपणांस या वेळी हुशारीने फसविले अशी मला शंका आहे. पेटचा गोदीत घेऊन येणारे चौघे जण त्याचेच लोक होते ना? ते उचलून घेऊन आले ते मोठचा कष्टाने उचलून आणीत असल्याचे त्यांनी सोंग केले. तसे नसते तर आपल्या माणसाने सहजी त्या उचलून एकीवर एक अशा कशा रचल्या असत्या? त्या पेटचात चांदीच्या वस्तू नसून गवत भरलेले आहे, अशी मला शंका आहे. आपण ताबडतोब गोदीत येऊन त्या उघडून पहाव्या."

ते ऐकून सदाशिव, मनाचे समाधान झाल्यासारखे स्मित करून म्हणाला—

"तू सूक्ष्मग्राही आहेस? त्या पेटचा गोदीत आणणारे चौघे जण आणि गोदीत ठेवणारा तो माणूस सर्व आपलेच नोकर आहेत. नोकरीसाठी आलेल्या तुम्हां दोघां उमेदवारांची हुशारी पहावी म्हणून मी तुमची परीक्षा घेण्यासाठीच हे सर्व केले होते. तूं या परीक्षेत यशस्वी झालास. तुला आजपासूनच कामावर लावून घेतल्याचे मी आपल्या व्यापारी मित्राला कळवितो."

व्यापार धंद्यात कोणाला कामावर ठेवतांना त्याच्या फक्त इमानदारीची परीक्षा घेऊन पुरत नाही. त्याची हुशारीसुद्धा पहावी लागते. हलगर्जीपणा व्यापार धंद्यातच नव्हे, कोणत्याही धंद्यात चालत नाही. म्हणून कोणालाही नोकरी देतांना फार चतुरपणाने परीक्षा घ्यावी लागते. सदाशिवला हे चांगले माहीत होते. म्हणून त्याने ती युक्ती केली होती.

ही परीक्षा असल्याचे माहीत नसून-ही आपण यशस्वी झाल्याबद्दल आनंदला परमानंद झाला.





# डोहाळे

भूपती नावाच्या माणसाला कारकुनी करावी लागे. पगार बेताचाच होता. तो एके दिवशी ऑफिसातले काम संपल्यावर बरोबरच्या सहकाऱ्यांबरोबर घरी निघाला. घराजवळ येतां येतां त्याने दुरून पाहिले, बायको वाट पहात दारात उभी होती.

त्याची बायको नीला आजाऱ्यासारखी होती. नवऱ्याला येताच तिने विचारले— "आज सुद्धां फणस मिळाला नाही का?"

"मिळाला तर आणणार नाही का? दुकानदार उद्यां चांगले फणस येतील, म्हणाला!" म्हणत भूपतीने मान वळवून तोंड लपविले.

भूपतीचा पगार घरखर्चाकरितां पुरेसा नव्हता. दिवस भरत आले होते नीलाचे. तिने कधी तोंड उघडून, मला हे पाहिजे, ते पाहिजे, असे नवऱ्याला कधी सांगितले नव्हते. परंतु अलीकडे तिला फणस खायची इच्छा वाटत होती.

फणस विकत घ्यायचा म्हणजे कमीत कमी सहा रुपये तरी पाहिजेत. महिना संपत आला होता, भूपतीकडे एवढे पैसे नव्हते. कोणाकडून कर्ज मागावे, तर सहकाऱ्यांची आर्थिक स्थिती त्याच्या सारखीच होती. त्याला ते माहीत होते. म्हणून तो फणस न आणायचे कारण काही तरी सांगून टाळीत होता.

त्या दिवशी रात्री भूपतीला नीटशी झोंपच लागली नाही. त्याने संध्याकाळी घरी परत येतांना कोणाच्या तरी परसात फणसाचे झाड पाहिले होते. ते त्याला आठवले. त्या झाडाला मोठमोठे फणस लोंबत होते. काळोख पडल्यावर एक तोडून आणला तर! भूपतीने काही वेळ याच विचारात वेळ घालविला. बायकोला



झोंप लागेपर्यंत स्वस्थ पडून राहिला. नंतर एक पोते घेऊन मागच्या दाराने बाहेर पडला.

तो, फणसाचे झाड होते त्या घराजवळ पोचला, तेव्हां अर्धरात्रीची वेळ होती त्याने आवाराच्या भिंतीवरून उडी मारली आणि आंत गेला. त्याने जवळच्या फणसांपैकी पिकायला झालेला एक फणस काढून पोत्यात टाकला.

परंतु भूपतीला इतका मोठा फणस घेऊन भिंतीपलीकडे उडी मारून जाता आले नाही. समोरचे फाटक उघडून जाता येईल, असा विचार करून भिंतीच्या बाजूबाजूने काही अंतर चालून गेला. तेथून त्याला जे दृश्य दिसले ते पाहून तो थक्कच झाला. एक माणूस पेरूच्या झाडाजवळ काळोखात एक खड्डा खणीत होता! त्याच्या जवळच एका पोत्यात काहीतरी वस्तू होती.

आपण चोरासारखे या आवारात आलो आहो, ही गोष्ट विसरून भूपतीने त्याला विचारले—"कोण ते?" त्याच्या आवाजात थोडा करडेपणाच होता.

खड्डा खणीत असलेला तो माणूस तो प्रश्न ऐकतांच दचकला. हातातली कुदळ टाकून म्हणाला—"बाबा रे, थोडा हळू बोल की! आमची ही उठून येईल की!" त्यावेळी तो मागचे दार बंद होते त्याकडे पहात होता. त्याच्या डोळ्यात भीती स्पष्ट दिसत होती.

तो त्या घराचा मालकच आहे, हे कळल्यावर भूपती घाबरूनच गेला व त्याने खांद्यावरचे पोते खाली ठेवले व म्हणाला—"माफ करा, मी आपल्या हिच्या साठी तुमच्या झाडाचा एक फणस तोडला आहे, घेऊन जाण्यासाठी!"

त्या घरच्या धन्याने भूपतीकडे एकदां आश्चर्यचकित होऊन पाहिले व म्हणाला—"फणस होय, एकच काय, दहा तोडून न्या हो! प्रथम मला हा खड्डा खणायला थोडी मदत करा. या पोत्यात एक मेलेली मांजरी आहे, तिला पुरून टाकायचे आहे!"

'वाचलो देवा!' असे मनात म्हणत भूपती पहार घेऊन खणू लागला. घरचा धनी बारीक आवाजात मांजरीची कहाणी सांगू लागला. ती मांजरी म्हणजे त्याच्या बायकोला पंचप्राणापेक्षां आवडती होती. त्याची बायको कोणाच्या तरी लग्नासाठी नातेवाइकांच्या घरी गेली होती. बरोबर मांजरीला सुद्धा घेऊन जाणार होती, म्हणे. शेजारपाजारचे लोक तिची मांजरी वर माया किती होती हे सांगत.

म्हणून तिला तिचा नवरा म्हणाला—"मांजरीला इकडेच ठेवून जा. खाकेत तिला घेऊन तू लग्नाला जाणं बरं दिसेल का तुला पाहून लग्नाला आलेली पाहुणे मंडळी काय म्हणतील? ते बरोबर होईल का?"

म्हणून तिने थोडा वेळ विचार केला व म्हणाली—"तुम्ही म्हणता तेही बरोबर आहे. ती जागा नवीन. माझी सोन्या सारखी भाटी, तिला कोणाची दृष्टसुद्धां लागण्याची शक्यता आहे! इकडेच सोडून जाते. तिचे खाणेपिणे तुम्हीच पहायला हवे. मी परत येईन, तोंपर्यंत ती थोडी जरी वाळलेली असली तर तुम्हांला काही दिवस उपासच समजा!"

ती गेली त्या वेळेपासून भाटी ओरडू लागली आणि घरभर मालकिणीला शोधू लागली. हे चार दिवस तिने दुधाचा वास सुद्धा घेतला नाही. निमूटपणें भिंतीला टेकून पडून होती. मालकीण आली त्या आधी तिचे डोळे जणुंकाही





पांढरे झाले होते व ती परलोकी गेल्या-सारखी झाली होती. काय करावे हे घरधन्याला सुचेना. म्हणून त्याने तिला एका पोत्यात घालून माळावर ठेवून दिले होते.

बायकोने घरी येतांच विचारले— "माझी आई, माझी सोन्याची भाटी- कोठे आहे?"

भाटी मेली असे सांगितले तर बायको सर्व घर डोक्यावर घेईल, हा विचार करून तो तिला म्हणाला—"तू गेलीस त्या दिवशी रात्रीच ती तुझ्या नावाने हाका मारीत कोठेतरी निघून गेली. तू आलीस ना, आतां ती सुद्धा येईल."

परंतु बायकोने सर्व घर डोक्यावर घेतलेच. जेवली नाही आणि रडत रडतच झोपली. तिचा डोळा लागला आहे हे ओळखून मांजरीला पुरून टाकण्याचे ठरवून तो खड्डा खणू लागला होता.

भूपतीच्या मदतीने खड्डा खणायचे काम लवकरच संपले. घरधनी त्याला काही सांगणार, इतक्यात त्याची बायको दार उघडून येऊ लागली व तिने नवऱ्याला विचारले—"इतक्या रात्री परसात काय करतां आहां हो?" तिच्या आवाजात थोडा रागही दिसत होता.

बायकोला पाहून घरधनी घाबरून गेला व त्याने पोते खड्ड्यात टाकले व भूपतीला म्हणाला—"मी जातो, बाबा! तूच खड्डा भरून टाक, मेहेरबानी करून, आणि मगजा!" म्हणत तो बायकोशी बोलायला त्या दिशेने निघाला.

नवराबायको घरात जाताच भूपतीने त्या खड्ड्यात माती टाकली व तो बुजविला. नंतर फाटक उघडून भूपती बाहेर आला आणि घाईघाईने घरी निघाला. वाटेत त्याला गस्ती घालणारे पोलीस शिपाई भेटले. त्यांनी अडविले.

भूपतीच्या खांद्यावर पोते होते ते पाहून त्यांनी त्याला विचारले—"काय आहे पोत्यात? कोणाच्या घरात चोरी केली होतीस? पळतोस कां?"

भूपती थरथर कापू लागला व म्हणाला— "नाहीं हो, मी पळत नाही. मी सावकाश तर चाललों आहे. मी चोर नाही. मी आपल्या बायकोसाठी एक फणस नेतो आहे!"

"आम्ही या गोष्टीवर विश्वास करू, असे वाटले का तुला?" असे म्हणत एका शिपायाने हातातल्या काठीने पोत्याला भोसकून पाहिले.

त्या पाठोपाठ पोत्यातून "म्यांऊ" असा आवाज आला.

भूपतीला फार आश्चर्य वाटले, बायको येत आहे, असें समजून घाबरलेल्या माणसाने फणसाचे पोतेंच खड्ड्यात टाकले वाटते! त्याने मांजर मेले, म्हणून समजून पुरण्याचा विचार केला होता. ती मेलेली नाही तर! खाल्लंप्यालं नसल्यामुळे पडून राहिली असावी.

शिपायांनी मांजरीचा आवाज ऐकला व मोठ्याने हसू लागले. म्हणाले—"तुझी बायको मांजरीला फणस म्हणते का रे? तू कोणी तरी मांत्रिक जादूगार दिसतो आहेस! म्हणून या अवेळी मांजराला घेऊन कोठेतरी जंगलात जाण्याच्या विचारात दिसतो आहेस. उजाडल्यावर तू खरोखरी कोण आहेस, हे कळेल." असे म्हणत ते



दोघे, भूपती, किती गयावया करून सांगत असून ही, त्याला तुरुंगात घेऊन गेले.

चांगले उजाडल्यावर तुरुंगाचा अधिकारी तिकडे आला. तेव्हां शिपाई त्याला म्हणाले—"रात्री एकाला धरून आणले आहे. तो कोणी मांत्रिक असावा, असा आम्हांला संशय आहे." असे सांगत भूपतीला ज्या खोलीत कोंडले होते तिकडे बोलावून घेऊन गेले.

भूपतीने त्या अधिकाऱ्याला पाहिले आणि चकितच झाला. रात्री त्याने त्यालाच बायकोजवळ मांजरीसारखे भीतभीत जातांना पाहिले होते. भूपतीला व त्याच्या जवळ असलेल्या मांज-









रीला पाहून त्या अधिकाऱ्याच्या सर्व गोष्टी लक्षात आल्या. मेली म्हणून मानीत आलों ती मांजरी जिवंत आहे, हे पाहतांच त्या अधिकाऱ्याला जो आनंद झाला तो किती, हें सांगणें कठीण! आतां बायकोला भिण्याचे कारण नाही!"

त्याने शिपायांकडे डोळे वटारून पाहिले व म्हणाला—"हे गृहस्थ माझ्या-चांगल्या ओळखीचे आहेत. चांगल्या कुटुंबा-तले आहेत. यांना तुम्ही मांत्रिक समजून पकडून घेऊन आलांत? चला, व्हा चालते येथून!" असे म्हणत हुंकारला. पोलीस शिपाई शेपटी दाबून निघून गेले,

तुरुंगाच्या अधिकाऱ्याने भूपतीला सोडविले आणि मांजराला प्रेमाने कुरवाळीत म्हणाला—"माझ्या आईला तुम्ही प्राणदान दिल्यासारखं आहे! आपलं ऋण कसं फेडावे, कळत नाही, मला! सोन्यासारखा तो फणस मी घाईघाईत खड्ड्यात टाकला, वाटते! मी देतो ते पैसे घ्या आणि आपल्या बायकोला चांगलासा फणस विकत घेऊन या!" असे म्हणत भूपती 'नको नको' म्हणत असूनही त्याने भूपतीच्या खिशात दहा रुपयाची नोट कोंबली.

भूपती अत्यंत आनंदाने तिकडून निघाला. वाटेत त्याने एक चांगलासा फणस विकत घेतला व घराच्या वाटेला लागला.

तो घरी आला तेव्हां शेजारची सुईण सखुबाई समोर येऊन म्हणाली—"रात्रभर दिसला नाहीत! कोठे गेलां होतांत?" उसन्या रागाने हंसत ती विचारू लागली.

काय उत्तर द्यावे, सुचेना. भूपती म्हणाला—"तिच्या साठी फणस आणायला गेलो होतों."

ते उत्तर ऐकून सखुबाई हंसू लागली व म्हणाली—"आतां फणसाची गरज उरली नाही. तुमच्या बायकोला रात्री फणसा-सारखा गोड गुटपटीत पोरगा झाला!" म्हणत ती घरात गेली. तिच्या पाठोपाठ भूपती आनंदाने घरात गेला.





# झाडाची सावली

एका गावांत एका माणसाच्या घरासमोर एक मोठें झाड होतें. उन्हाळ्याच्या दिवसात त्या झाडाच्या सावलीत तो माणूस येऊन आनंदाने बसे.

एकदां ऐन दुपारी तो झाडाखाली बसण्यासाठी येऊन पाहातो, तर तेथे एक अनोळखी माणूस येऊन बसला होता.

"हे काय हो, तुम्हांला येथे कोणी बसून दिले? उठा, उठा!" त्या माणसाला त्या घराचा मालक म्हणाला.

"कां हो, असे रागवतां कां? ऊन फार पडले आहे! म्हणून बसलो आहे!" तो अनोळखी माणूस म्हणाला.

"ते सर्व जमणार नाही. हे माझे झाड आहे! मी कित्येक वर्षांपासून याला खत पाणी घालून वाढविले आहे. म्हणून हे एवढे मोठें झाड झाले आहे. याची सावली पण माझीच आहे!" तो माणूस म्हणाला.

"असे म्हणतां! तरमग एक काम करा. या झाडाची सावली मला विकून टाका, मी पैसे देतों!" तो अनोळखी माणूस म्हणाला.

पैशाची गोष्ट ऐकतांच झाडाच्या मालकाच्या तोंडाला पाणी सुटले. "ठीक आहे, मी विकतो. तू काय देशील?" त्याने विचारले.

भाव ठरला. तिघांचौघां रस्त्याने जाणाऱ्यांच्या साक्षीने अनोळखी माणसाने झाडाच्या मालकाला पैसे देऊन सावली विकत घेतली. अनोळखी माणसाने पैसे देऊन आपला अधिकार सावलीवर गाज-वायला सुरवात केली.

त्या दिवसापासून तो अनोळखी माणूस दररोज दुपारी झाडाच्या सावलीत येऊन बसू लागला. रस्त्याने जाणारे येणारे कोणी







दिसले तर त्यांना बोलावून सावलीत जरा-वेळ बसायला सांगू लागला. त्यांच्या बरोबर कोणी गायबैल येत ते सुद्धां सावलीत बसत.

या सर्वावर संतुष्ट न होऊन त्या अनोळखी माणसाने जास्त अगाऊपणा सुरू केला. त्या झाडाची सावली जेथे जेथे जाई तेथे तो जाऊन बसू लागला. ऋतू बदलला की सावलीची दिशा बदले. घर मालकाच्या घरातही जाई. एवढेच नव्हे झोपायच्या खोलीत सुद्धा जाई. तो अनोळखी माणूस संकोच सोडून सावली जाई तिकडे खुशाल जाऊन ठाणं मांडून बसे.

ते सर्व पाहून घरमालक संतापला. म्हणाला–"तुला माझ्या आवारभर, वऱ्हांडयात व झोपायच्या खोलीत येऊन बसायला काय हक्क आहे रे ?"

"अहो, मी तुमच्या झाडाची सावली विकत घेतली आहे. ती जेथे जाईल तेथे मी जाणार. मला माझ्या सावालीवर हक्क आहे !" तो ठासून म्हणाला.

घरमालक गुरगुरला, पण निरुत्तर झाला. कारण त्याने त्या अनोळखी माणसाला सावली विकली होती. ती गोष्ट नाकारतां येत नव्हती.

एक दिवशी झाडाच्या मालकाच्या घरी कसला तरी सण होता आणि पुष्कळ नातेवाईक मंडळी आली होती. ती सर्व जेवून खाऊन सावलीत बसली होती. एक वेळी तो अनोळखी माणूस तेथे येऊन बसला. हा आगांतुक कोण, हे कोणालाच कळेना "हा असा निडविलेला कोण ?"

त्या अनोळखी माणसाने, त्याने सावली विकत घेतली असल्याचे सर्वांना सांगितले.

ती विचित्र गोष्ट ऐकून हजर असलेले सर्व खदखदां हसले.

घर मालकाला चार चौघांमध्ये बसून मोकळेपणे बोलणेदेखील कमीपणाचे वाटू लागले.

त्या गांवात राहणे देखील त्याला कठीण वाटू लागले व तो काही दिवसांसाठी दुसऱ्या गावी निघून गेला.





सुग्रीव किष्किंधेचा राजा झाला. वालीचा मुलगा अंगद याला त्याने सर्व राज्य कारभार सोंपविला आणि स्वत: ऐश-आरामात गुरफटून गेला. रामाला दिलेले वचनच तो विसरून गेला. लक्ष्मणाला राग आला आणि तो धनुष्यावर बाण चढवून किष्किंधेला गेला. हनुमानाने जाऊन सुग्रीवाला बजाविले की रामाच्या कामाची जबाबदारी तत्क्षण बजाविली पाहिजे.

सुग्रीवाने चारही दिशांना वानरांना पाठविले व सीतेचा शोध काढून यायला सांगितले. अंगद, हनुमान, जांबुवंत वगैरे वानरवीर दक्षिण दिशेला निघाले त्यावेळी रामाने मारुतीला बोटातली अंगठी काढून दिली आणि 'ही' मी खुणेसाठी देत आहे असें सांगून सीतेला द्यायला सांगितले.

दक्षिणेकडील समुद्राच्या किनाऱ्यावर पोचल्यावर वानर म्हणू लागले–"जटायूने, रावण सीतेला घेऊन दक्षिणेकडे गेला असल्याचे सांगितले खरे, पण तो कोठे गेला, आणि त्याने पुढे काय केले कोणास ठाऊक ?" त्याच वेळी सर्व वानरांना गिळण्यासाठी जटायूचा थोरला भाऊ संपाती पुढे चालतच येत होता. त्याला पंख नव्हते.

एकदा जटायू आणि संपाती चढाओढ लावून सूर्यमंडलाकडे गेले. जटायूला उडतां आले नाही म्हणून तो थांबला. संपाती उडतच राहिला आणि त्याने आपले पंख जाळून घेतले. दक्षिणेकडे










समुद्र काठीं तो असहाय होऊन पडला. तेव्हांपासून सहजी मिळेल ते मिळून तो आपला उदरनिर्वाह चालवीत होता.

संपातीला वानरांकडून घडलेले सर्व वृत्त कळले. त्याने अंगदाला पाठीवर उचलून बसविले आणि जितके दूर पाहातां येईल ते पहायला सांगून त्याला लंकाद्वीप दाखविले.

शंभर योजने पार करून लंकेला जाऊ शकणारा कोण आहे आपल्या मध्ये, वानर विचार करू लागले.

हनुमानाला त्याच्या अंगात किती शक्ती आहे हे माहीत नव्हते. कारण त्याने ऋषीमुनींना त्रास दिल्यामुळे त्याला तसा शाप पडला होता. हे जांबुवंताला माहीत होते. तो म्हणाला–"अरे हनुमंता! तू सहजी लंका पार जाऊन रामकार्य करू शकशील."

तेव्हां हनुमानाने रामाचे एकदां ध्यान करून उड्डाण केले. हनुमान आकाशमार्गे समुद्रपार करीत असतां त्याच्या शक्ती व युक्तीची परीक्षा घेण्यासाठी देवांनी सुरसा राक्षसिणीला पाठविले.

ती देवस्त्री असूनही राक्षसरूप घेऊन आपले तोंड उघडून मध्ये उभी राहिली. हनुमानाने आपले शरीर मोठे केले. सुरसेने सुद्धा तोंड वाढविले. हनुमान आणखी मोठा झाला. सुरसाने आपले तोंड आणखी मोठे करून हनुमानाला गिळायला पुढे आली. हनुमान लगेच सूक्ष्म रूप धारण करून सुरसेच्या तोंडात शिरला आणि तत्क्षण विराट रूप धारण करून तिचे तोंड फाडून बाहेर आला. सुरसा पुन्हीं देवस्त्री रूप घेऊन निघून गेली. देवांनी हनुमानाच्या शक्तिसामर्थ्याची प्रशंसा केली.

हनुमान उडत उडत जात असतां त्याची सावली राहूची आई सिंहिका नांवाच्या राक्षसिणीने धरली आणि मागे ओढू लागली. हनुमानाला शंका आली. त्याने खाली डोकावून पाहिले. सिंहिकेवर एक मुष्टिप्रहार करून तिला त्याने ठार केले.

सर्व विघ्ने पार करून हनुमान पुढे निघाला असतां सुवत्सला नांवाची सागर-कन्या माशाच्या रूपाने तोंड उघडून चकित होऊन पाहूं लागली हनुमानाचा एक स्वेदबिंदु तिच्या तोंडात पडला. तिने तो गिळला. त्यामुळे तिला गर्भ राहिला आणि मत्स्यवल्लभ नावाचा मुलगा झाला.

एकदा इंद्र पर्वतांना पंख होते ते आपल्या वज्रायुधाने कापीत असतां हिमालयाचा मुलगा मैनाक समुद्रात जाऊन लपून बसला होता. हनुमानाला पाहून तो वर आला व हनुमानाला म्हणाला–"हनुमंता, जरा माझ्या शिखरावर थांबून विश्रांती घेरे, मी विनंती करतों!"

मैनाकाच्या विनंतीला मान देऊन हनुमान त्याच्या शिखरावर थोडा वेळ थांबला आणि पुन्हां उड्डाण करून विद्युत् वेगाने लंकेला जाऊन पोंचला.

लंकानगरीच्या रक्षणार्थ लंकिणी नावाची एक राक्षसीण होती. तिने हनुमानाला लंकेत शिरत असतां पाहिले व एक भाला घेऊन हनुमानावर चालून गेली.

हनुमानाने सूक्ष्म रूप धारण केले आणि स्वतःचा बचाव केला. तो त्या रूपातच लंकेचे दार पार करण्याच्या प्रयत्नात होता. लंकिणीने हनुमानाला हाताने माशी पकडावी तसे पकडले. हनुमान लंकिणीच्या



तळहाताला चावला. रक्तप्रवाह सुरू झाला. लंकिणीने त्याला सोडले.

हनुमंताने आपली मूठ वळून लंकिणीच्या छातीत प्रहार केला. तो मुष्टिप्रकार होताच लंकिणी भडभडा ओकू लागली आणि बेशुद्ध होऊन पडली.

लंकिणीने शुद्धीवर आल्यावर हनुमानाला नमस्कार केला व म्हणाली–"मी जेव्हां अशी बेशुद्ध होऊन पडेन त्या घटकेपासून लंकेचा नाश प्रारंभ होईल, असे. ब्रह्मदेवाने सांगितले होते. शापामुळे मी एक क्षुद्र देवता होऊन लंकेचे रक्षण करीत आले. इतके दिवस मी पाहारा दिला. आतां मी निघून जातें, तू आंत जा!" असें सांगून









लंकिणी गंधर्वरूप धारण करून आकाशात उडून गेली आणि अंतर्धान पावली.

हनुमानाने लंकानगरीत प्रवेश केला. रत्नदीप जळत होते आणि उंच इमारती लंकेत होत्या. लंकेचे वैभव पाहून हनुमान चकित झाला.

हनुमान सूक्ष्मरूप धारण करून सीतेचा शोध लंकानगरीत सर्वत्र काढू लागला. त्याने रावणाचा सर्व महाल हुडकून पाहिला. त्याला मंदोदरीच तर सीता नाही असे भ्रमवश वाटले, परंतु लगेच आपली चूक त्याच्या लक्षात आली.

सीतेचा पत्ता कोठेही लागेना. असा शोध काढीत काढीत हनुमान अशोक वनात गेला. तेथे त्याला रामनामाचा जप कोणी करीत असल्याचा आवाज कानी पडला.

चंद्रशिलेने बांधलेल्या एका मंडपांत रामाचे स्मरण करून सीता त्याच्या नामाचा जप करीत होती.

त्या मंडपाच्या चारही बाजूला मोठमोठे भाले व तलवारी वगैरे शस्त्रे धारण करून राक्षस स्त्रिया पाहारा देत होत्या.

मंडपाजवळच असलेल्या एका अशोक वृक्षावर चढून हनुमान पाहू लागला.

सीता मंडपांतून येऊन शेजारच्या एका अशोक वृक्षाखाली बसली.

रावण थाटामाटाने अशोकवनात येत होता. त्याच्या पाठीमागून देव, गंधर्व, नाग, यक्ष, राक्षस व सुंदर मानव स्त्रिया त्याच्या वैभवाचे गान करीत येत होत्या.

रावण अशोक वृक्षाजवळ आला व सीतेला म्हणाला–"तू आतां तरी मी म्हणतो ते ऐक. एक क्षुद्र असा मानव राम, त्याच्यावर विश्वास करू नकोस. तो लंकेला येणे म्हणजे एक स्वप्नच!"

सीतेने गवताची एक काडी तोडून घेतली व त्याला म्हणूं लागली–"हे रावणा! तुझ्या बढाया आणि तुझ्या वैभावाला पाहून मी लुब्ध होईन हेच स्वप्न आहे! तू एक चोर आहेस! तुला शिक्षा करणे राजा रामाचे कर्तव्य आहे! दहा कंठांनी कंठशोष व्यर्थ करू नकोस! राम तुझे शासन करण्यापूर्वी तुला ज्या फुशारक्या मारायच्या असतील त्या मारून घे! तू आपल्या अंतःपुरात जा. तुझा अंतकाळ जवळ येऊन ठेपला आहे!"

रावण ते ऐकून एक मोठी तलवार उपसून म्हणाला–"मी तुझे तुकडे तुकडे करून टाकतों!"

ते ऐकून सीता म्हणाली–"तू तसें करणे शक्य नाही! मी स्वतःच तुझ्या समोर नमून जाईन, असे तुला वाटते आहे. रामाची बायको, रावणाचा प्रताप आणि वैभव पाहून नम्रपणे तुझी होऊन जाईल असे तुला वाटते आहे. तुझा हा अहंकार आहे व तुझी ही दुराकांक्षा आहे!"

"होय, आमच्या एका राक्षसवनितेचा जो अपमान झाला त्याला असाच प्रतिकार मिळणार आहे! तोच माझा हट्ट आहे!" रावण म्हणाला.

"नाही, तू रामाशी दोन हात करून जिकून मला जिंक. तू आहेस भितरा. मायारूप घेऊन चोरासारखा आलास. राम तुझा संहार करील. माझा हा हट्ट आहे!" सीता म्हणाली.

रावण गुरगुरत तेथून निघून गेला.

हनुमान संधी पहात होता. राक्षस स्त्रिया नसते वेळी तो झाडावरून उतरून



आला. आणि रामाची अंगठी त्याने दिली. तारिका जणू त्याच्या डोक्यावर शोभत होत्या, असे विराट रूप धारण करून "माझ्या खांद्यावर बसून आलीस तर रामाजवळ घेऊन जाईन," हनुमान म्हणाला.

"ते योग्य नाही; रामाने रावणाचा संहार केला पाहिजे आणि मला सोडवून नेले पाहिजे! तोंपर्यंत सीता अशोक वनात शोक करीत राहणार, असे रामाला सांग!" सीता म्हणाली. तिने आपल्या वेणीतील चूडामणी काढून दिला आणि "रामाला हा दे!" असे म्हणाली.

हनुमानाने आपण आलो होतो, हे रावणाला कळावे म्हणून अशोक वनाचा














ध्वंस केला. त्याला ठार करायला जंबुमाली आला. त्याला आणि अक्षयकुमाराला आणि महस्त्रावधी राक्षसांना हनुमानाने ठार केले.

रावणाचा मोठा मुलगा इंद्रजित याने हनुमानावर ब्रह्मास्त्राचा प्रयोग केला. ब्रह्मदेवाचा गौरव रहावा, यासाठी हनुमान थोडा वेळ स्वस्थ राहिला आणि ब्रह्मास्त्राने स्वत:ला बद्ध करून घेतले. रावणाच्या दरबारात जाऊन त्याची कानउघाडणी करण्याची इच्छासुद्धां होती.

राक्षस हनुमंताला रावणाच्या दरबारात घेऊन गेले, तेव्हां रावण एका उच्च सिंहासनावर बसलेला होता. खाली लोखंडाच्या साखळदंडांनी बांधलेल्या हनुमानाकडे त्याने हंसत पाहिले.

हनुमानाने आपले शरीर वाढवून साखळदंड तोडले आणि आपल्या शेपटीची वेटोळी एकावर एक करून रावणाच्या सिंहासनापेक्षां एक उंच आसन केले व त्यांवर बसला.

तो रावणाला म्हणाला–"ऐक रावणा, राक्षसांच्या राजा! मी रामाचा दूत आहे. रामाने माकडांनाच मोठे वीर म्हणून तयार करून तुझ्या लंकेवर स्वारी करण्यास तयार केले आहे. तो असा श्रेष्ठ मानव आहे. तू बलिष्ठ आहेस, असा गर्व करू नकोस. बलिष्ठ सापाला मुंग्यानीं कसे ठार केले, तुला ती गोष्ट सांगण्याची गरज नाही. तू सीतेला रामाकडे मुकाट्याने पोचती करून रामाची क्षमा माग!"

रावणाला भयंकर राग आला व त्याने तलवार उपसली. तेव्हां बिभीषणाने रावणाला आठवण करून दिली की दूताला मारावयाचे नसते. ते नीतिविरुद्ध आहे!"

रावण म्हणाला–"तसे असेल तर या घमेंडखोर माकडाच्या शेपटीला चिंध्या गुंडाळून त्यावर तेल ओता." शेपटी लांबच होत गेली. कपडे व तेल पुरेच पडत नव्हते. त्याला आग लावली गेली. मारुतीने शरीर वाढविले आणि उड्डाण केले. पेटलेल्या शेपटीसह गरगर फिरला. मोठमोठ्या







इमारती व वाड्यांवरून उड्या मारीत गेला–आणि सर्व लंका नगरीची जणू आहूती अग्नीला दिली. रावणाचे अंत:पुरही जळून गेले. कित्येक राक्षस जळून गेले. विभीषणाचा वाडा मात्र वाचला.

सीता अशोक वनात सुरक्षित आहे हें पाहून त्याने समुद्रात उडी मारली आणि आपली शेपटी विझविली. नंतर चूडामणी घेऊन रामाकडे परतला.

चूडामणीला पाहून रामाला आनंद झाला व हनुमान सीतेला पाहून आल्याची खात्री पटली. हनुमानाने सर्व वर्णन सांगितले.

रामाने हनुमंताचे आलिंगन केले व म्हणाला–"हनुमाना ! पाहून ये, म्हटले होते तुला, पण तू लंकेला आग लावून आलास. तुझ्या सारखे वानर माझ्या बाजूला असतां मला असाध्य असे काहीच नाही. तू, मी व सीता यांच्या मध्ये असलेले अंतर दूर केलेस त्याचा मला परमानंद होत आहे! तू बुद्धिमान आहेस कीर्तिमान आहेस !"

रामाने कोदंड उचलेले आणि सीतेने म्हटल्याप्रमाणे रावणाचा वध करण्यासाठी जणूकाही प्रतिज्ञाच केली.

विभीषण हा रावणाचा सावत्रभाऊ होता. रामाशी वैर करू नकोस व सीतेला गौरवसहित रामाकडे पोचती कर आणि लंकेचे रक्षण कर, असे त्याने रावणाला परोपरीने सांगितले.

रावणाला अनावर क्रोध आला. तो म्हणाला–"तुझ्या एकट्याचा हट्ट आहे! तुझ्या मूर्खपणामुळे सर्व राक्षसकुळाचा अपमान करू म्हणतोस?" विभीषणाला अशा शब्दात उत्तर देऊन रावण पुढे म्हणाला–"अरे भित्र्या! तू राक्षस कुळात व्यर्थ जन्मलास! शूर्पणखेचा अपमान सर्व राक्षस जातीचा अपमान आहे, हे विसरू नकोस! तू कुलद्रोही आहेस. तू लंका सोडून चालता हो! पुन्हां दृष्टीस पडलास तर तुझा जागच्या जागी शेवट करीन!"

बिभीषण आपल्या अनुचरांसह लंकेहून निघाला.





# त्यागाचे फळ

इराक देशातील एका प्रदेशात एक लहानसे राज्य होते. त्या राज्याचा प्रमुख एक तरुण सुलतान होता. कोणी भिकारी आपल्या राज्यात असू नये असे त्याला वाटे.

सुलतानाने आपल्या काही अधिकाऱ्यांना राज्यातील सर्व प्रदेशात पाठविले. त्यांनी काम करण्याची अंगात ताकद असणाऱ्या सर्वांना कामे नेमून दिली. म्हातारपण किंवा अंगातले काही वैगुण्य असणारांसाठी धर्मसत्रे काढून त्यांत त्यांच्या जेवणा-खाण्याची व्यवस्था करून दिली.

सुलतानाने इतकी चांगली व्यवस्था करून दिली असूनही काही जण धर्मशाळांतून पळून जात आणि भीक मागीत. ते पाहून सुलतान फार संतापला. त्याने राज्यांत दवंडी पिटविली की राज्याच्या हद्दीत भिकाऱ्याला भीक घालणाराला मोठी शिक्षा केली जाईल. एकदा राजाची धाकटी बहीण आपल्या मामाला भेटायला आपल्या मैत्रिणी-बरोबर गेली होती. ती तेथून परत येत होती. वाटेत त्यांना एक उद्यानवन दिसले. त्यांनी तेथल्या झाडाच्या सावलीत काही वेळ विश्रांती घ्यायचे ठरविले. ती जेवायची वेळ सुद्धा होती, म्हणून सुलतानाच्या बहिणीने आपल्या मैत्रिणींना दोन दोन रोट्या खायला दिल्या.

मैत्रिणींपैकी एक उद्यानवनात पाण्याच्या शोधार्थ गेली असतां तिला एका झाडाखाली पडून राहिलेला एक म्हातारा दिसला. तो इतका अशक्त होता की त्याच्या अंगात उठायची शक्ती सुद्धा नव्हती.

मैत्रीण त्याच्या जवळ गेली व तिने त्याला–"इतक्या असहाय अवस्थेत तो कां पडला आहे?" असे विचारले.











म्हातारा धापा टाकीत म्हणाला– "मुली, मी एक तीर्थयात्रेकरू आहे. माझ्या जवळ जे काही होते ते सर्व चोरांनी लुबाडून नेले. त्यानंतर मी तापाने आजारी पडलो. आतां थोडा थोडा बरा होऊ लागलो असलो तरी भुकेने जीव कासावीस झाला आहे."

त्या मैत्रिणीला त्या म्हाताऱ्याची कीव आली. ती, तिच्या जवळ असलेल्या दोन्ही रोटया त्याला देऊ लागली, एवढयात पाठीमागून सुलतानाच्या बहिणीने तिला हाक मारली.

मैत्रिणीने घाबरून जाऊन मागे वळून पाहिले, सुलतानाची बहीण रागाने व घाईघाईने जवळ येऊन म्हणाली–"तुला इतका गर्व झाला का ग? कोणाला भीक घालू नये, हा हुकूम तुला माहीत नाही का?"

सखी म्हणाली–"राजकन्ये मला हुकूम माहीत आहे. राज्यात भिकारी असू नये असा विचार करणे ठीकच आहे! भिकाऱ्यांत पुष्कळ जण चोर लबाड व आळशी पण असतात. हा म्हातारा भिकारी नाही, एक तीर्थयात्रेकरू आहे. चोरांनी बिचाऱ्याला लुबाडले आहे. भुकेने त्याचा जीव कासावीस झाला आहे."

"काहीतरी खोटीनाटी कारणे सांगून तू राजाज्ञेचा भंग करीत आहेस!" असे सांगून सुलतानाच्या धाकटया बहिणीने राजवाडयात पोचल्याबरोबर सुलतानाला सांगितले की तिच्या मैत्रिणीने कोणातरी भिकाऱ्याला भीक घातली.

"अस्सं! तर तिचा हात कांपला जाणार! चुकणे शक्य नाही!" असें सांगून राजकुमारीच्या मैत्रिणीला शिपायांच्या हाती सोंपविले. त्यांनीं तिला धरून नेऊन तिचा एक हात कापून टाकला.

शिपाई तिला आपल्या बरोबर धरून नेत असतां सुलतानाने तिच्या तोंडाकडे पाहिले. तिचे सौंदर्य व निर्भीकपणा व चेहऱ्यावरची शांतता पाहून त्याच्या मनावर फार परिणाम झाला. परंतु त्याने पक्षपात केला असे लोक म्हणतील, असा विचार करून तो आपला हुकूम मागे घेऊ शकला नाही. त्या दिवशी रात्री त्याला पश्चात्तापामुळे झोंपही आली नाही.

दुसऱ्या दिवशी सुलतानाने आपल्या खास मित्रमंडळी करवी त्या मैत्रिणीविषयी चौकशी करविली. सर्वांनी तिच्या सौंदर्या विषयीच नव्हे, तर ती स्वभावाने किती दयाळू आहे आणि चांगली आहे, हे येऊन सांगितले. तोपर्यंत सुलतानाचे लग्नही झाले नव्हते. एका आठवडयाच्या आतच सुलतानाने हात तुटका असून ही त्या मुलीशी लग्न केले. त्या लग्नामुळे राजकन्येला कमालीचा राग आला.

राणी झाल्यावरही त्या मैत्रिणीने सुलतानाच्या बहिणीवर सूड उगवायचा विचार मनांत आणला नाही. काही काळ लोटला. ती गरोदर होती. नऊ महिने पुरे झाल्यावर तिला एक सुंदर मुलगा झाला. त्यामुळे राजकन्येचा राणीवरचा राग जास्तच वाढला.

एकदां राजाला काही कामानिमित्त काही महिने राजधानीच्या बाहेर रहावे लागले. ती संधी साधून सुलतानाच्या बहिणीने आपल्या काही दुष्ट मैत्रिणींच्या मदतीने राणी मांत्रिक असल्याची अफवा पसरविली. ती मांत्रिक नसती तर मोडका



हात असूनही तिच्या रूपावर सुलतान कसा काय भाळला? असे त्या मैत्रिणींनी सांगायला सुरवात केली.

सुलतानाच्या म्हाताऱ्या आईला मांत्रिक बाई म्हणजे फार भीती वाटे. शिवाय मोडक्या हाताची सून म्हणजे तिला पहिल्यापासूनच आवडत नसे. तिला तो तिचा अपमानच वाटे. म्हणून तिने राजवाडयात पाहारा देणाऱ्यांस बोलावून सुनेला कोठेतरी वाळवंटात सोडून यायला सांगितले. पाहारेकऱ्यांनी राणीला व तिच्या मुलाला धरून नेऊन वाळवंटात एकांत जागी नेऊन सोडले.

ती ऐन दुपारची वेळ होती. राणीचा जीव तहानेने कासावीस झाला होता. ती








मुलाला कडेवर घेऊन वाळवंटात हिंडत राहली. तिला एक लहानसा ओढा दिसला. पाणी प्यायला ती ओढ्याजवळ गेली. एका हाताने मुलाला धरले होते. दुसरा हातच नसल्यामुळे पाणी पिण्यासाठी पुढे पाण्यात वांकली. त्या बरोबर तिच्या हातातला मुलगा निसटून पाण्यात पडला. आणि प्रवाहाच्या वेगात वाहून गेला. तिचा दु:खावेग आवरेना. ती दु:खाने रडत त्या ओढ्याच्या काठीच बसून राहिली.

काही वेळाने चांगला काळोख पडला. आणि पाठोपाठ चंद्रोदय झाला. राणी बेशुद्ध होऊन पडली असतां कोणीतरी गोड व बारीक आवाजात बोललं— "राणी, तुला तुझा गेलेला मुलगा हवा आहे का?"

"होय तर हवाच आहे!" असे म्हणत राणीने डोळे उघडले आणि हाताने चांचपू लागली.

चांदण्यात पुसट दिसणाऱ्या एका आकृतीने येऊन राणीला तिचा मुलगा आणून दिला.

एक दोन क्षणच गेले असतील, पुन्हां दुसरा एक गोड आवाज ऐकू आला— "राणी, तुझा गेलेला हात पुन्हा यावा असे वाटते आहे का?"

"होय तर! दुसरा हात पुन्हां आला तर बरे होणार नाही का?" राणी म्हणाली.

त्या पाठोपाठ तिचा गेलेला हात पुन्हां जशाचा तसा झाला.

तेव्हां त्या दोन्ही आकृतींनी राणीला आशीर्वाद दिला आणि म्हणाल्या—"आतां तू येथेच रहा. सुलतान आपल्या राजधानीला परत जातांना याच वाटेने येईल. तुला पाहून त्याला फार आनंद होईल."

राणीने अत्यंत आश्चर्याने विचारले— "माझे इतके हित करणाऱ्या तुम्ही कोण?"

"तू केलेल्या त्यागाचे फळ म्हणून तुझे इतके कल्याण झाले आहे! त्या दिवशी अर्धमृतावस्थेत पडून राहलेल्या म्हाताऱ्यास तू दोन रोटया देऊन वाचविलेस. आम्हीच त्या दोन रोटया!" असे सांगून त्या दोन्ही आकृती चंद्रबिंबात विलीन झाल्या.



# हुकूम बदलला

एका देशातील राजधानीत काळोख पडल्यानंतर गुंड व चोर शहराच्या गल्यात जाणाऱ्या येणाऱ्या नागरिकांना लुटीत व त्यांना मारहाण करीत. त्यामुळे काळोख पडल्यावर नागरिकांना रस्त्यांवरून हिंडणे फिरणे अशक्य झाले. ही गोष्ट नागरिकांनी नगराचा मुख्य अधिकारी विरूपाक्ष यांच्या दृष्टीसमोर आणली. दुसऱ्याच दिवशी काळोख पडल्या बरोबर नागरिकांनी गावात हिंडूफिरू नये असा हुकूम विरूपाक्षने काढला.

हा हुकूम निघाल्यामुळे संध्याकाळ झाल्याबरोबर गावांतील सर्व कामें नुसती बंदच पडली नाहीत तर व्यापार धंदांचे फार नुकसान सुद्धा होऊ लागले. काही प्रमुख नागरिकांनी राजधानीत जाऊन ही गोष्ट महाराजांच्या कानावर घातली.

त्यांनी आपल्या प्रधानाकरवी असे पत्र लिहविले—'गुंड व डाकूंच्यामुळे जो त्रास होतो तो होऊ नये या साठी काळोख पडल्यावर कोणी गावात हिंडू फिरू नये हे ठीकच आहे. परंतु खरे पाहिले तर प्रजेनेच दिवसभर व रात्री गावात निर्भयपणे हिंडायला हवे. चोरां डाकूंनी नव्हे! म्हणून तू प्रजेकडून ज्या गोष्टींची अपेक्षा करीत आहेस, त्या ऐवजी गुन्हेगारांवर दावा ठेवावा व हुकूम त्यानुसार बदलावा, असे आम्हांला वाटत आहे.

ते पत्र मिळाल्यावर विरूपाक्षला, त्या पत्रात त्याच्यावर जो शेरा आला तो कळला. त्याने लगेच गुन्हेगारांना धरण्यासाठी योग्य उपाय योजना करून नगरात शांति व सुव्यवस्था राखण्याचा प्रयत्न सुरु केला.



# चांदोबातील नवलाई



## उडणारे विचित्र प्राणी

काही काही वर्षांपूर्वी या पृथ्वीवर 'टीनोसार्स' नावाचे विचित्र सरपटणारे प्राणी होते. १६ मीटर लांबीचे पंख असल्याने हवेत उडणारे हे विचित्र प्राणी लक्षावधी वर्षं जगत, असे पूर्वी हेक्सात प्रदेशात प्राप्त आलेल्या लावा खंडावरून कळते.

## व्योम मंडलात भ्रमण



अमेरिकेतील 'नासा' रॉक्वेल अंतर्जातीय विज्ञान संस्थेतील काही विज्ञानशास्त्रज्ञ मिळून एक व्योम नौका तयार करीत आहेत. ही व्योमनौका चव्र्याहत्तर जणांना 'व्योमवस्तीत' घेऊन जाऊ शकेल. १९९० सालानंतर पहिले उड्डाण होईल असे तज्ज्ञांकडून सांगण्यात येते. या व्योम नौका यानात प्रवास करणाऱ्या प्रत्येक व्यक्तीचा खर्च अंदाजे वीस लक्ष डॉलर हून जास्त होईल, म्हणे.



## कांचे सारखे सोने

न्यू मेक्सिकोतील लास अलमस या राष्ट्रीय प्रयोग शाळेत विज्ञान शास्त्रज्ञांनी सोन्याचे तुकडे घेऊन पलीकडची वस्तू दिसू शकेल इतके पातळ केले आहेत. यांची जाडी एका इंचाच्या दहा लक्षांशाहून कमी आहे म्हणे.

## तुम्हांला माहीत आहे का?

१. कलकत्ता शहराची निर्मिती कोणी केली ? केव्हां
२. ख्रिश्चन धर्माविषयीं औत्सुक्य कोणत्या मोंगल बादशाहाने दर्शविले, तुम्हांला माहीत आहे का ?
३. अॅलेक्झॅण्डरच्या भारतावरच्या स्वारी विषयी लिहिणारा इतिहासकार कोण?
४. पंधराव्या शतकात भारताच्या काही भूभागावर अधिकार करून घेणारा परकीय राजा कोण,
५. भारतात इंग्रजी शिक्षणाची सुरवात कोणी केली ?



# परोपकारी

नारायणपूर गावी राहणारा शंभू फार मोठा परोपकारी होता. एकदां फार मोठे तुफान आले व त्यात कित्येक झोपड्या पडल्याने नुकसान झाले म्हणून शंभूने घरोघरी जाऊन चंदा वसुल केला आणि ज्यांचे नुकसान झाले होते, त्यांना नवीन झोपड्या बांधून देवविल्या. गावातल्या जवळ जवळ सर्वांनीच या बाबतीत त्यांना शक्य होती तेवढी मदत केली. परंतु खूप श्रीमंत अशा धनगुप्त सावकाराने एक पैसा सुद्धा चंदा दिला नाही.

शंभूने त्याला ज्यांनी ज्यांनी मोठा चंदा दिला त्यांची नावे सांगितली नाहीत तेव्हां धनगुप्त चिडून म्हणाला—"तू उगाच कंठशोष करू नकोस. ज्यांच्या झोपड्या गेल्या त्यांनी पैशासाठी कोणासमोर हात पसरले नाहीत. का माहित आहे का ? कोणालाही भिक्षा मागणो आवडत नाही. ज्यांना भीक मागायला लाज वाटत नाही ते चंद्याचे नाव सांगून पाठीस लागतात. त्यांत स्वत:साठी थोडे फार वाचविता आले तर पाहतात. तु सुद्धां पाहातो आहेस, हे मला माहीत आहे. तुझ्या सारख्यांना मी कधीच सहकार देणार नाही !"

गावात शंभूची सर्वांनी देवमाणूस म्हणून खूप स्तुती केली. तरी त्याच्या मनाचे समाधान झाले नाही. धनगुप्त त्याला तोंडाला आले ते बोलला त्याला चांगला धडा शिकवावा म्हणून शंभू खटाटोप करीत होता.

इतके सर्व असतां तो एके दिवशी धनगुप्तच्या घरी गेला व म्हणाला—"तुम्हांला माहीत आहे की नाही, कोणास ठाऊक गांवो गावी माझी प्रशंसा होते आहे! ज्यांच्या जवळ पैसे आहेत त्यांपैकी तुझ्या शिवाय सर्वांनी चंदा दिला. चंदा दिला

श्री य. ना. देसाई



असतास तर तुझ्या मनालाही बरे वाटले असते ना?"

धनगुप्त संतापून म्हणाला–"माझ्या कडे पुष्कळ जण येऊन कर्ज घेऊन जातात व माझी स्तुती करतात. माझ्या जवळ पैसे आहेत तों पर्यंत मला इतरांच्या स्तुतीची भीक मागत फिरायची गरज नाही. तुझ्या सारखे नांव गांव नसलेले उपटसुंभे लोक परोपकार करायला भटकतात. दुसऱ्यांनी दिलेल्या पैशांवर परोपकारी म्हणून स्तुतीची भीक मागत फिरतात." या शब्दात त्याचा अपमान करून त्याला पाठमोरा पाठविले.

शंभूला कमालीचा राग आला. जे घडले ते सर्व ऐकून त्याचे वडील त्याला म्हणाले–"धनगुप्ताचे थोबाड चांगले नाही. अशांशी चार हात दूर असावे. तुला दहा जणांना मदत करावी वाटत असेल तर कर. परंतु त्या धनगुप्ताच्या वाटेला जाऊ नकोस!"

वडिलांचा सल्ला धन गुप्ताला आवडला नाही. त्याने आपल्या मित्रांना सर्व सांगितले. त्यांनी शंभूचे सांत्वन करीत म्हटले–"तो धनगुप्त जो बडबडला फक्त त्यामुळे तू उपट संभ्या झालास का? ते सर्व मनाला लावून घेऊ नकोस!"

आश्चर्याची गोष्ट अशी की शंभूने ज्यांच्यावर उपकार केले होते ते सुद्धा म्हणत–"तुम्ही देवमाणूस म्हणून वाटेल ते म्हणवून घेऊन ही आम्हांला घरे बांधवून दिलीत." परंतु ते धनगुप्त विरुद्ध एकही शब्द बोलले नाहीत.

हे सर्व ऐकून गावातील काही वडील-धाऱ्या मंडळींनी पारावर जमून शंभूला म्हटले–"अरे धनगुप्ताचे हे असेच आहे. त्याने म्हटले ते आणि नाही म्हटले त्यांतूनही निसटतो. तू का मनाला लावून घेतोस. त्याची कान उघाडणी आम्ही करू परंतु त्या पासून फायदा काय? आम्हांला तो कीड मुंग्या सारखे मानतो."

हे सर्व झाल्यावर शंभूने धनगुप्ता विषयी आणखी खोल विचार केला. धनगुप्ताकडे खूप पैसे आहेत. सर्वांना त्याची कमी जास्त गरज वाटते. म्हणून त्याच्या विरुद्ध काही बोलायला किंवा करायला कोणी धजत नाही!

धनगुप्ताचे नाक कसे ठेचायचे याचा विचार करीत असतां त्याला एक चांगली संधी मिळाली.

दूर देशातला राहणारा एक मल्ल शंभूच्या घरी आला व म्हणाला–"मला विद्येतले पुष्कळ चमत्कार माहीत आहेत. मी त्यांचे प्रदर्शन तुमच्या गावात करावे, म्हणतो. सर्वांनी मिळून मला शंभर रुपये दिलेत की पुरेत!"

शंभूने विचार केला की धनगुप्तावर सूड उगवायला ही चांगली संधी आहे. तो मल्लाला म्हणाला–"अशी कामे माझ्या हातून होणार नाहीत. गावात धनगुप्त नावाचे मोठे सावकार आहेत. त्यांना मल्लविद्येची फार आवड आहे. तू जाऊन विचारलेंस की ते नक्कीच मदत करतील.

मल्ल धनगुप्तकडे गेला आणि आपल्या नैपुण्याचे खूप वर्णन करून सांगितले व म्हणाला–"आपणाला मल्लविद्येची फार आवड असल्याचे ऐकतो. मी सर्वांच्या करमणुकी खातर जे प्रदर्शन करीन त्या बद्दल मला एकून फक्त शंभर रुपये इनाम म्हणून द्यावेत!"

धनगुप्ताला मल्ल म्हणाला ते ऐकूनच फार राग आला. त्याने मल्लाकडे किंवा









मुंगीकडे पाहतात तसे पाहिले आणि म्हणाला–"देह वाढवून पोटासाठी इतरांवर अवलंबून राहणाऱ्याचा मला फार राग येतो. शिवाय मल्लविद्येचा मला मुळात तिटकारा. तू आलास त्या वाटेने चालू लाग!"

तो मल्ल दांत ओठ चावून शंभूकडे येऊन म्हणाला–"कायरे, तू मला खोटें कां बोललास? त्या धनगुप्ताला तर मल्लविद्येचा तिटकारा आहे. मला काय वाटेल ते तो बोलला. तुझ्यामुळे पहिल्या प्रथम मला हे असले बोल ऐकून घ्यावे लागले."

"असं का? त्या धनगुप्ताने जे बोलू नये ते बोल बोलल्यावर तू गप्प कसा राहिलास? ते मल्ल आहेत ना? तू आपलं कसब त्याला दाखविले नाहीस का?" शंभू मल्लाला जास्त चेतवीत म्हणाला.

"होय, मी आपलं कसब दाखवितों," असे म्हणत मल्लाने शंभूलाच चांगले दोन ठोसे दिले.

शंभू म्हणाला–"त्या दुष्टाने तुला शिव्या दिल्या आणि तू मला मारतोस ते का?"

"तुझं व त्याचं काही तरी वांकडं आहे व त्याचा सूड उगवण्यासाठी माझ्या हातून त्याला ठोकवून काढण्याचा तुझा बेत होता. मी मल्लच असलो, तरी तुझा नोकर नाही. तुझ्या मुळेच मला धनगुप्ताने शिव्या दिल्या. म्हणून मी तुला मारले!" सांगून मल्ल निघून गेला.

ते शंभूच्या वडिलांना कळल्यावर त्यांनी मुलाची चांगली कान उघाडणी केली. म्हणाले–"तो धनगुप्त म्हणजे गांधीलमाशी समज! तू त्याच्या पोळ्याला हात घालून त्याला खिजविलेस. पुन्हां कधी त्याच्या वाटेस जाऊ नकोस. खऱ्या परोपकाऱ्याने शिव्या शाप व स्तुतीची पर्वाच करतां कामा नये!"

त्यानंतर शंभूने चंद्याचे नाव काढून कोणाकडे काही मागितलेच नाही.






[१०]

[भल्लूककेतूने भुताराक्षसांचे नायकत्व करण्याचे मान्य केले नाही. पश्चात आपल्या स्वग्रामी निघाला. तेथे पिंगळ एक आठवडाभर त्याचा पाहुणा म्हणून राहिला. त्यानंतर भल्लूककेतूला आपले वाहन करून घेऊन आपल्या घरी आला. घरा समोर त्याला त्याची आई अगदी दीनस्थितीत आढळली. पुढे–]

पिंगळचा आवाज ऐकून आईने त्याला ओळखले आणि रडत म्हणाली–"बाळा! किती दिवसांनी तुला पाहाते आहेरे!" तिने त्याला घट्ट पोटाशी आवळून धरले. पिंगळने तिचें सांत्वन करीत विचारले–"आई, तुझी ही स्थिती कशी झालीग? मी जाण्यापूर्वी तुला एक हजार मोहोरा दिल्या नव्हत्या का? ते पैसे काय झाले? आणि माझे दोघे थोरले भाऊ कोठे गेले आहेत?" तुझ्या जवळपास कोणीच कसे दिसत नाहीत.

आई लगेच काही उत्तर देऊ न शकल्यामुळे नुसती रडत राहिली. तिला कसे सर्व व्यवस्थित सांगावे तेच कळेना शेवटी कसेतरी स्वतःला सावरून डोळे पुसून म्हणाली–"तुझ्या दोघां भावां मुळेच माझी ही दशा झाली. तू तसा तिकडे गेलास व



त्यांनी दोघांनी मला शिवीगाळ करून मारले तू दिलेल्या त्या एक हजार मोहारा घेऊन गेले.

आई म्हणाली ते ऐकून पिंगळ थक्कच झाला. स्वतःच्या आईला असे मारणारे भाऊ म्हणजे राक्षसच आहेत! असे त्याला वाटले. तरी स्वतःच्या भावांचा वध करण्याची दुष्ट बुद्धी त्याला झाली नाही. ती गोष्ट त्याच्या मनातही आली नाही. तो पुढे काय करावे त्याचा विचार करित राहिला.

पिंगळ नुसता हाडांचा सांपळा होऊन राहिलेल्या आईला उचलून घरात घेऊन गेला. म्हणाला–"आई! आतां तू रडण्याचे कारण नाहीं. देवाच्या कृपेने मी सर्व तऱ्हेच्या संकटांना तोंड देऊन अलोट पैसे घेऊन घरी परतलों आहे. तुझे सर्व कष्ट व माझे ही सर्व कष्ट यापुढे संपले आहेत." असे म्हणत त्याने आपल्या बरोबर आणलेली पिशवी सोडली व त्यातून आणलेले सोने, हिरे, माणिक्ये काढून आईला दाखविली.

आईच्या आनंदाला पारावार नव्हता. दोन्ही हातांनी त्या सोन्याला व हिऱ्या माणक्यांना हातांत घेऊन ती म्हणाली–"बाबारे! खरोखरच तू भाग्यवान आहेस! म्हणून अनेक संकटांना तोंड देऊन व धोक्यात आपला जीव घालून तू सुरक्षित घरी पोचलास. माझ्या पोटांत भुकेची आग पेटली आहे! म्हणून बाजारात जाऊन काहीतरी खायला घेऊन ये! रोटी भाजी जे मिळेल ते आण!"

आई म्हणाली ते ऐकून पिंगळ खुदकन हसला. त्यानंतर त्याने भिंतीला लागून तिला बसायला सांगितले. तिच्या समोर एक पत्रावळ ठेवली व आपल्या बरोबर आणलेली मंत्रवलेली पिशवी दाखवून त्याने विचारले–"आई, तुला काय हवे ते सांग, पंच पक्वान्नांचे भोजन कर. एका क्षणात तुझ्या समोर तू मागशील ते हजर होईल!"



"बाबारे, भुकेने जीव कासावीस झाला आहे! पक्वान्नें कशाला? पोळी भाजी बाजारांतून आणलीस म्हणजे पुरे!" आई म्हणाली.

पिंगळ आई जवळच बसला आणि पिशवीत हात घालून त्याने एक मंत्र म्हटला. त्याने पिशवीतून ऊनऊन पोळ्या होत्या त्या काढल्या. हे काही तरी अद्भुत असल्यासारखं पिशवीकडे ती पहात राहिली. तिने काही विचारण्यापूर्वीच हंसत त्याने पिशवीतून पंच पक्वान्नें काढली आणि आईच्या समोरच्या पानावर वाढली.

आईच्या आश्चर्याला पारावार नव्हता. ती आपल्या समोरच्या पक्वान्नांकडे पहात म्हणाली–"बाबारे! मला हा तुझा काय मंत्र आहे की आणखी काही आहे कळले नाही. एवढ्याशा पिशवीत इतकी पक्वान्नें कशी ठेवली होती?"

पिंगळने त्या मंत्रवलेल्या पिशवीची घडी घातली व जवळ ठेवून म्हणाला–"आई, तू पहिल्याने सर्व पदार्थ खा तर नंतर काय ते सर्व सांगतों प्रथम खाणेपिणे तर संपू दे!" म्हणून त्याने तिला प्रेमाने भरवायला सुरवात केली.

थोड्याच वेळात दोघां मायलेकांचे जेवण झाले. पिंगळने उरलेले सर्व पदार्थ पुन्हां पिशवीत ठेवून दिले व ती आईच्या हातांत देत म्हणाला–"आई, आजपासून तुला सैंपाक करायची गरज नाही. या पिशवीत एक अद्भुत शक्ती आहे. त्या शक्तीमुळे आपण मनांत आणू ती खाण्याची वस्तू व पदार्थ या पिशवीत मिळतो. आपण मनात इच्छा करण्यापूर्वी एक मंत्र म्हणावयाचा असतो." असे सांगून त्याने आईच्या कानांत तो मंत्र म्हणून सांगितला आणि म्हणाला–"हे गुपित मात्र कोणाला कळतां कामा नये याची कोणालाही चुकू नही ही गुप्त गोष्ट कळता कामा नये तू काळजी बाळग!"

इतक्यात बाहेरच्या दरवाज्या समोर कोणी तरी मोठ्याने रडल्याचा आवाज आला. कोणी आपले डोके आपटून घेत

होते आणि रडत होते. पिंगळने कोण रडते आहे पाहण्यासाठी बाहेरचे दार उघडून पाहिले. समोर उंबरठ्या जवळ त्याचे दोघे भाऊ जीवदत्त व लक्षदत्त होते. त्याचे कपडे फाटके व मळके होते. तेच रडत होते.

त्याचे दोघे भाऊ त्या दीनावस्थेत त्याला दिसले. पिंगळच्या मनांत त्याच्याकडे पाहून भ्रातृ प्रेम उचंबळून आले. त्या पाठोपाठ जीवदत्तने रडत आपले कपाळ बडवून घेतले व म्हणाला–"पिंगळा! काही दिवस झाले, आमचे जीवित संपल्या-सारखेच झालेले आहे. आम्ही आईवर किती अत्याचार केले असतील, आमचे आम्हांलाच माहीत. तिने सर्व सांगितले असेल. आतां कोणते तोंड घेऊन या घरी यावयाचे? इतके दिवस तु परत केव्हां येतोस म्हणून आम्ही वाट पहात होतो. त्या चिलका सरोवरात उडी टाकून जीव द्यावा, असे मनात होते. तोपर्यंत आमच्या पापाचे प्राय:श्चित्त व्हावयाचे नाही. आईला हजार वेळ डोके टेकून तिचे उपकार मानतो. तिला शेवटचा नमस्कार करून जावे म्हणून आलो आहो!" म्हणत तो मागे फिरला. त्याच्या बरोबर लक्षदत्त सुद्धा निघाला. पिंगळ एक उडी मारून दोघांना आडवा उभा राहिला व म्हणाला–"थांबा, कोठे निघालात?"

"कोठे म्हणतोस? हाः हाः हाः!" असे म्हणत दोघे वेड लागल्यासारखे मोठ-मोठ्याने हसू लागले. "धाकटू, बाजूला हो, आमच्या पापाचे प्राय:श्चित्त झालेच पाहिजे! आईला इतक्या दुष्टपणाने वागविणाऱ्यांना चिलका सरोवरच शेवटचा आधार!" म्हणत भावाकडे दुर्लक्ष करीत ते पुढे निघाले.

इतक्यात आईसुद्धा बाहेरच्या दारात आली व आपल्या दोघां मुलांना त्या दीन स्थितीत पाहून तिला त्यांची दया आली. ती त्या वेळी मुलांनी तिच्या-वर केलेले सर्व अत्याचार विसरून गेली.
पुत्रप्रेमाने कळवळून जाऊन ती म्हणाली–"बाळांनो! रडून का. काही निष्पन्न होणार आहे हातपाय हलविल्या शिवाय कोण काय देणार तुम्हाला परंतु थांबा देवाच्या कृपेने तुमच्या भावाने पुष्कळ पैसे मिळवून आणले आहेत. झाले गेले विसरून, निदान या पुढे तरी सुखाने रहा!"

"मग आम्ही केलेल्या पापाचे प्राय:श्चित कसं?" दोघे जीवदत्त व लक्षदत्त म्हणाले.

"पश्चात्तापाने सर्व पापे धुवून निघतात! आतां मागे फिरा आणि घरात या!" पिंगळ म्हणाला. त्याने जीवदत्ताचा हात धरून आत यायला सांगितले.

आई सुद्धां आपल्या मोठ्या मुलाच्या आड उभी राहून म्हणाली–"बाबांनो, आत चला!" पोरखेळ म्हणून तुम्ही जो














माझ्यावर अत्याचार केलात, तो मी आई म्हणून सर्व विसरते!" असे म्हणत तिने दोघांचे हात धरले. व त्यांना ती घरात घेऊन येण्याअति आग्रह करू लागली.

त्यानंतर 'नको' 'नको' म्हणत दोघे थोरले घरात आले. आईने त्यांना आंघोळीला पाणी दिले. पिंगळने आणलेल्या कपड्यांपैकी रेशमी वस्त्रे काढून त्यांना नेसायला व अंगात घालायला दिली. दोघांनी स्नाने करून कपडे घातले आणि आईला व पिंगळला प्रेमाने आलिंगन केले. म्हणाले—"खायला काही असेल तर द्या! भुकेने जीव कासावीस झाला आहे." थोडे खाल्ल्यावर जिवानजिव येईल.

पिंगळने मंत्रवलेली पिशवी काढली व ती आईला देऊन दोघां भावांजवळ येऊन बसला. चार पांच मिनिटांत आईने ताटातून निरनिराळे खाद्य पदार्थं वाढून दोघां मोठ्या मुलांसमोर ठेवले.

दोघां मुलांनी पोटभर खाऊन घेतले आणि आश्चर्याने विचारले—"आई, इतके पदार्थं तू कोठून घेऊन आलीस ग? आम्ही काय पाहुणे आहो? एवढे पैसे कशाला खर्च केलेस?" आम्हाला साधी पोळी भाजी सुद्धा चालली असती की?

पिंगळ हसत म्हणाला—"आपण असेच पाहिजे तर दररोज जेवूं, पाहिजेतर गावातील गोर गरिबांना पोटभर जेवायला वाढू, हे सर्वं पदार्थ!"

पिंगळ ते म्हणाल्यावर जीवदत्तने लक्षदत्तकडे पाहून काही कळल्या सारखे पाहिले. त्याने देखील काही गूढ कळल्या-सारखी मान हलवून आपली प्रतिक्रिया दर्शविली.

त्या दिवशी रात्री जीवदत्त व लक्षदत्त जरा गारवाऱ्यात फिरून येतो असे सांगून निघून गेले. त्या दोघांना पिंगळ पुष्कळसे धन बरोबर घेऊन आल्याचे कळलेच होते. ते धन कसे पळवून न्यायचे हाच एक विचार त्यांच्या मनात होता. दुसरी गोष्ट त्यांच्या मनात घोळत होती, आईने सकाळी व दुपारी चूल पेटविल्या शिवाय इतके ऊनऊन पदार्थं कोठून व कसे आणून वाढले? तिने चूल पेटविली नसल्याची त्यांनी सैंपाकघरात जाऊन खात्री करून घेतली होती. त्यांना ते सर्वं जांणून घ्यावयाचे होते म्हणून काय उपाय करावा त्या विचारले दोघे गढून गेरात.

"पिंगळ पुष्कळ पैसे घेऊन आला आहे, यात शंका नाही. तर ते घेऊन पळून जायला आपल्याला पुष्कळ दिवस लागतील. आपण पश्चात्ताप करीत आहो, याची खात्री आईलाच नव्हे तर धाकट्या भावाला सुद्धा झाली आहे. तो विश्वास त्यांच्या मनात कायम रहावा, या करितां आपण सावध राहिले पाहिजे. आपण दोन वेळ मेजवान्या उडविल्या आहेत! सैंपाकघरात जाऊन पाहिले तर चूल पेटविली गेलेली नाही. हे सर्व विचित्रच दिसते आहे!" जीवदत्त म्हणाला.

लक्षदत्त मान हलवून आपला होकार दर्शवीत म्हणाला—"असे असेल तर पिंगळ कोणता तरी मंत्रतंत्र शिकून आला असावा. म्हणूनच तो इतक्या ऐटीत गावातल्या सर्व गोरगरीबांना जेवण देण्याच्या गोष्टी बोलत होता. वेळ संधी पाहून आईला सर्वं विचारून काढून घेतां येईल.



दोघे भाऊ दुसऱ्या दिवशी घरात पिंगळ नाही, अशी संधी साधून आई जवळ गेले आणि हे गुपित विचारू [illegible]

तिने बराच वेळ पिंगळने आणलेल्या पिशवी विषयी काहीच सांगितले नाही. परंतु दोघे मुलगे गळीच पडले तेव्हां तिने 'हे गुपित कोणाला कळतां कामा नये हं!' असे बजावून सांगून मंत्रवलेली पिशवी आणून दाखविली.

जीवदत्त म्हणाला—"आई, मला आत्तां जिलबी खावीशी वाटते आहे, तो काय तो मंत्र म्हणना!"

आईने मुलांच्या प्रेमाने भारून जाऊन, त्यांनी तिला मागे जो त्रास दिला होता








तो सर्व विसरून जाऊन त्यांना तो मंत्र सांगितला व त्यांच्या करवीच त्यांना जो जो खाद्य पदार्थ हवा होता तो पिशवीतून काढविला. त्यामुळे जीवदत्त व लक्षदत्तला परमावधीचा आनंद झाला.

त्या दिवशी रात्री दोघांनी आई विरुद्ध व भावा विरुद्ध कटकरण्याचे ठरविले. प्रथम पिंगळला घराबाहेर नाहीसे केले पाहिजे. त्यानंतर आई एकटी काही करू शकणार नाही, हे त्यांना चांगले माहीत होते. तर मग पिंगळच्या हातून कशी सुटका करून घ्यायची ?

जीवदत्त म्हणाला–"परवां मोठ्या बाजारातून आपण येत होतो तेव्हां एक जहाजाचा कप्तान आपल्याला दिसला होता. त्याला जहाज चालविण्यासाठी तरुण युवक खलाशी म्हणून हवे होते, म्हणे! जरूर असेल तर खूप पैसे सुद्धा देऊन तो घरातल्या मोठ्या माणसांकडून तरुणांना विकत घेतो, म्हणे! आपण त्याच्याशी बोलून त्याच्या हाती पिंगळला विकून टाकू या! आपण या घरातली मोठी माणसंच नव्हे का?"

"काय पण कल्पना आहे! त्या जहाजांच्या नायकाशी जाऊन बोलू या चल!" लक्षदत्त म्हणाला. दोघे भाऊ मिळून कप्तानाकडे निघाले त्या कप्तानाने दोघांना आदरपूर्वक बसायला वगैरे सांगून येण्याचे कारण विचारले. तेव्हां जीवदत्त त्याच्यावर मोठा प्रसंग आल्याचे सोंग करून म्हणाला– "अहो कप्तान साहेब! आमचा पिंगळ नावाचा एक धाकटा भाऊ आहे. तो एक उडाणटप्पूच निघाला आहे! तो त्याला गरज पडेल तेव्हां आपल्या आईला मारहाण करतो. आम्हांला ही मारहाण करायला धावतो. मिळेल ती वस्तू घरातून उचलून घेऊन जातो. त्याला कसा ताळ्यावर आणावा, हा मोठा प्रश्न आमच्या समोर आहे. (क्रमशः)



# माणसासारखा पोपट

**वि**क्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमी प्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, इतक्या मध्यरात्रीच्या वेळी या भयंकर स्मशानात तू इतके श्रम करीत आहेस हे पाहून मला तुझी कीव येते. हातात घेतलेले काम पुरे करण्याची जिद्द खरोखरीच वाखाणण्या सारखीच आहे. परंतु ही जिद्द स्वतःसाठी आहे की आणखी कोणासाठी हा संशय मला येतो आहे. कदाचित् इतकी कठोर शिक्षा जर इतरांसाठी घेतली असशील तर मात्र फार सावध राहिले पाहिजेस. कारण कधी कधी सहाय्य ज्यांना मिळते त्यांच्या कडून सन्मान सत्कार तर मिळत नाहीच, उलट अपमान होण्याची शक्यता

## वेताळाच्या गोष्टी



असते. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला माणसासारख्या एका पोपटाची गोष्ट सांगणार आहे. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

धारानगरीत सुदर्शन नावाचा एक गृहस्थ रहात असे. त्याची बायको सुंदर तर होतीच विनयशील होती. त्याची मुले हुशार होती. त्याला सुखसंपत्ती ही चांगली होती. हे सर्व असून ही कां कोणास ठाऊक, तो सर्वदा दु:खी व उदास असे.

एकदां एक माणूस एक लहानसा पिंजरा घेऊन आला. त्यात एक सुंदर बोलका पोपट होता. तो सुदर्शनला म्हणाला—"मालक, हा बोलका पोपट आहे. चांगला शिकला सवरलेला आहे. तुम्हांला निरनिराळ्या गोष्टी सांगून तुमची करमणूक करील. एक हजार वराह दिलेत तर मी हा तुम्हांला देईन."

सुदर्शनने काही वेळ पोपटाकडे खोल दृष्टीने पाहिले त्याचे बोलणे ऐकून त्याला अतिशय आनंद झाला. त्याने लगेच एक हजार वराह काढून दिले आणि तो पोपट विकत घेतला.

सुरवातीला पोपट बोले ते ऐकून घरात सर्वांना त्याचे कौतुक वाटे. परंतु सुदर्शन दिवसभर पोपटाच्या नादातच राही व सर्व कामांकडे दुर्लक्ष करी, हे पाहून घरात सर्वांनाच पोपटाचा तिटकारा वाटू लागला.

हे बरं नाही, असे घरातले सर्व लोक म्हणू लागले ते ऐकून तो म्हणे—"माझ्या मनातले जे दु:ख आहे, ते एकट्या पोपटाला कळते आहे व तो ते दूर करतो आहे!"

"पोपट इतका हुशार असेल तर तो तुमच्या मनातील दु:ख कायमचे दूर करायला एखादा उपाय कां नाही सुचवीत?" सुदर्शनची मुले म्हणाली.

ते बरोबर आहे असे समजून त्याने पोपटाला मनातील दु:ख दूर व्हायला काही उपाय आहे, का विचारले.

"पिंजऱ्यात राहणारा इतरांचे दु:ख दूर करू शकतो, परंतु स्वत:चे दु:ख दूर





करू शकणार नाही. तू, स्वत: साठीच नव्हे, इतरांसाठी सुद्धां जगणे कसे याची संवय करून घेतलीस, म्हणजे स्वार्थ नावाच्या पिंजऱ्यातून आपली सुटका करून घेतलीस-तर मनांतील दु:ख सहजी दूर होईल." पोपटाने सुचविले.

त्या दिवसापासून सुदर्शनने त्याच्याकडे जे होते ते ज्यांच्याजवळ नव्हते, त्यांना देण्याचा सपाटा सुरू केला. त्यामुळे त्याला चार जणात चांगलं नांव मिळू लागले.

तेव्हांपासून सुदर्शनचे मन कसे मोकळे मोकळे व आनंदित राहू लागले. रात्रंदिवस पोपटाजवळ घालविणे त्याचे थोडे कमी झाले आणि व्यापार धंद्याकडे सुद्धा थोडे फार लक्ष देऊ लागला.

वडिलांची दानवृत्ती मुलांना आवडली नाही. त्यांनी एके दिवशी सुदर्शनला म्हटले—"पोपट माणसांसारखा बोलतो हे अनैसर्गिक आहे! आपण जे बोलतो ते परत बोलणे तेवढेंच पोपटांना येते. परंतु मनुष्यांसारखं विचार करून बोलणे पोपटाला शक्य नसते. हा मंत्रवलेला पोपट आहे. असा आम्हांला संशय येतो तुमच्या जवळ जो पैसा आहे, तो कसा तरी काढून घेण्यासाठी कोणी तरी हा पोपट तुमच्याकडे पाठविला असावा, असे आम्हांला वाटत आहे."

ते ऐकल्यावर सुदर्शनने पोपटाला. विचारले—"काय रे, सामान्यपणे पक्षी काही विचार करू शकत नाहीत. मग तुला ही शक्ती कशी काय मिळाली?

"पूर्वी विक्रमार्क म्हणून एक राजा पोपटाच्या रूपे रहात असे. त्याने एका पोपटाशीच लग्न केले होते. ती दंपती आमचे पूर्वज होत." पोपट म्हणाला.

ते उत्तर ऐकून सुदर्शनच्या मनाचे समाधान झाले. परंतु त्यांच्या मुलांच्या मनाचे समाधान झाले नाही. पोपट जे मागे ते सर्व सुदर्शन देत असे.

"अहो, तुम्ही हे सर्व देतां त्याचा काय फायदा? मला तुम्ही स्वातंत्र्य द्याल



तर मला फार आनंद होईल." पोपट म्हणाला.

"तुला मी वाटेल ते देईन, परंतु पूर्ण स्वातंत्र्य मात्र देणार नाही." सुदर्शनने स्पष्टपणे सांगून टाकले.

त्यानंतर पोपटाने त्याला सोडावे, असे कितीदां तरी विनविले. एकदां सुदर्शन पिंजऱ्याचे दार बंद करायला विसरला, पण पोपट पळून गेला नाही.

त्याबद्दल सुदर्शनला फार आश्चर्य वाटले व त्याने पोपटाला तसे विचारले ही. म्हणाला—"कायरे, तुला! स्वातंत्र्य पाहिजे होते ना? तुला संधी मिळाली होती?"

"मागे मी कोणत्या वंशात जन्मलो हे सांगितले होते ना, म्हणून असली चुकीची कामे मला करतां येत नाहीत. तुम्ही एक हजार वराह देऊन मला विकत घेतलेत. म्हणून तुम्हांला माझ्यावर सर्व तऱ्हेचा हक्क आहे. म्हणून तुम्ही मनापासून मला सोडले नाही तर मी इकडून जाणार नाही." पोपट म्हणाला.

त्या दिवसापासून सुदर्शन पिंजऱ्याचे दार बंद करण्यात तेवढेसे लक्ष देत नासा झाला. एकदा पोपट त्याला म्हणाला—"मालक, तुम्ही पिंजऱ्याचे दार बंद करण्याकडे दुर्लक्ष करू नका. संधी मिळाली म्हणजे माझे मन मोहाला बळी पडेल की काय असे वाटते. कधी पळून गेलो तर!"

सुदर्शन संशय करीत म्हणाला—"पळून जायचे म्हणून तुझ्या मनात आहे वाटतं? तर मग ती गोष्ट मला सावध करण्यासाठी सांगण्याची गरज काय?"

त्यावर पोपट म्हणाला—"पुष्कळांना चूक करू नये असे वाटतं. परंतु वेळ आली म्हणजे मात्र चूक केल्याशिवाय रहात नाहीत. मी विक्रमार्काच्या वंशातलाच आहे; परंतु विक्रमार्का इतका मोठा नाही. चूक करणं मला बरोबर वाटत नाही! मेहेरबानी करून मला मोहात पाडू नका!"





हे सर्व सुदर्शनने आपल्या बायकोला व मुलांना सांगितले, तर त्यांचा पोपटावरचा संशय जास्तच वाढला. म्हणाले—"हा तर फारच वस्ताद पोपट दिसतो आहे. याच्यामुळे तुम्हांला व आपल्या कुटुंबाला धोका होण्याची शक्यता दिसते आहे."

त्यानंतर एका आठवड्याच्या आतच सुदर्शन कोणत्या तरी नवीन कारणाने आजारी पडला. कोणत्याही औषधाने आराम पडला नाही. वैद्य सुदर्शनला म्हणाला—"तुमच्या आजाराची लक्षणे पाहतां हा आजार राजगंधी नावाच्या मुळीनेच बरा होईल असे शास्त्राप्रमाणे वाटत आहे. परंतु या प्रदेशात कोठे ही ती मुळी मिळत नाही. ती कोठे मिळते हे सुद्धा मला माहीत नाही."

"मला बंधनमुक्त करून सोडाल असे वचन दिल्यास मी ती मुळी घेऊन येईन." पिंजऱ्यातला पोपट म्हणाला.

"मी मुळातच या आजाराने ग्रासलो आहे. तूच निघून गेलास तर दिवस कसे जायचे?" सुदर्शनने उदास होऊन विचारले.

ही परिस्थिती सुदर्शनच्या बायकोला व मुलांना फार अनुकूल अशी वाटली. त्यांनी सुदर्शनला, पोपटाच्या मुळेच ही भयंकर व्याधी तुम्हांला झाली आहे, असे सांगून पोपटाला सोडून दिले. परंतु पोपटाने सुदर्शनला फसविले नाही. दुसऱ्याच दिवशी राजगंधीमुळी चोचीत धरून आणून दिली.

वैद्याने ती मुळी घेऊन औषध तयार करून दिले, तेव्हां सुदर्शन चांगला बरा झाला. तो पोपटाला म्हणाला—"तुझ्या मुळेच मी या आजारातून वाचलो. आतां तू जायचंच म्हणतो आहेस तर मी तुला अडकवून ठेवणार नाही. परंतु तू इकडेच राहतो म्हणालास तर मात्र मला खूप आनंद होईल."

त्यावर पोपट म्हणाला—"आपल्या जवळच्यांना पुष्कळ दिवसांनी भेटलो. परत निघतेवेळी मी परत येईन असे सांगितले, तुम्ही माझ्यासाठी एक हजार वराह खर्च



केलेत. मी तुमचे प्राणच वांचविले. आतां माझ्या बंधन मुक्तीच्या आड येऊ नका!" असे सांगून पोपट पिंजऱ्यांतून उडून गेला.

तो निघून जाताच सुदर्शन फार उदास झाला. त्याची बायको मुले त्याला म्हणाली- "तो मंत्रवलेला पोपट होता. त्याच्या विषयी इतके दुःख करीत बसून आपल्या मनाला दुखवूं नका." हे फक्त एक दोनदांच त्यांनी सांगितले नाही, तर त्याचा त्या गोष्टीवर विश्वास व्हावा म्हणून मोठमोठ्या पंडितांना बोलावून आणले ते सुदर्शनला म्हणाले-"बोलणारे पोपट हे मांत्रिकांच्या सांगण्या प्रमाणे वागतात. ते घरांतून निघून जातात म्हणजे शुभसूचकच आहे.

काही काळ लोटल्यावर सुदर्शनचा त्या म्हणण्यावर विश्वास बसला.

काही दिवसांनंतर खरोखरीच तो पोपट सुदर्शनकडे आला व म्हणाला-"मला इकडेच जीवित घालवण्याची संवय झाली आहे. मी किती प्रयत्न करून पाहिले आपल्या नात्या गोत्यां मध्ये राहणे मला मुळीच आवडले नाही." मी तुमच्या बरोबरच राहतो.

परंतु सुदर्शनला ते मान्य झाले नाही. त्याने पोपटाचा पिंजरा जुन्या कोठीच्या खोलीत फेंकून दिला आणि पोपटाला जायला सांगितले.

"इतक्या दिवसांनी बाबा, तुम्हांला तो मंत्रवलेला पोपट आहे या गोष्टीची खात्री झाली. होय ना!"

सुदर्शनने त्या प्रश्नाचे उत्तर न देता, एकदां डोळे पुसले व गप्प राहिला.

वेताळाने येथवर गोष्ट सांगितली व विचारले-"राजा! सुदर्शनने त्याचे प्राण वांचविणारा पोपट पुन्हा आला असता त्याला 'नको' कां म्हटले? बायको मुलां प्रमाणे त्याच्या मनाची पण खात्री झाली होती का की तो पोपट एक मंत्रवलेलाच होता? या शंकेचे समाधान कारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस, तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला-"पंडितांनी तो मंत्रवलेला पोपट आहे असे सांगितल्यावर सुदर्शनाची खात्री झाली असल्याचे खरे आहे. पैशा बरोबर त्याच्यावर किती प्रेमाने वागणारी बायको व मुले असून ही त्याला माहीत नसलेल्या उणीवेमुळे सदा दुःखी व उदास असे. परंतु पोपट विकत घेतल्यानंतर पोपटाच्या सल्ल्याने व गोड-गोड बोलण्याने तो आपले औदास्य व दुःख विसरला. त्या कारणामुळेच पोपटाने बंधन मुक्तीची इच्छा प्रकट केल्यावर त्याने स्वतः होऊन ती इच्छा मान्य केली नाही. पोपटाने त्याला व्याधिमुक्त करण्यासाठी ती मुळी आणून, पुन्हां आपल्या लोकांमध्ये जाण्याची इच्छा प्रगट करून पुन्हां त्या गोष्टीस नकार देऊ नका असे विनविले होते. त्यावरून सुदर्शनला आत्मीयां विषयी माणसांत असणारे प्रेम व जबाबदारी यांची कल्पना आली. परंतु तोच पोपट पुन्हां आत्मीयांना सोडून आल्यावर व त्याला आपल्या आत्मीयां-बरोबर रहावे से वाटत नाही, असे त्याने म्हटल्यावर सुदर्शनला पोपटाचे खरे स्वरूप कळले. तो माणसा-सारखा पोपट आहे! पुष्कळ जण स्वतःच्या शक्तिसामर्थ्या बाहेरच्या गोष्टी, थोरां मोठ्यांकडून ते साध्य करून घेणे शक्य होत असेल तर आपल्यांनाही सोडून थोरा मोठ्यांकडे जातात. तसाच पोपट सुद्धा स्वतःची हुशारी आपल्या लोकां करितांच वापरण्याची जबाबदारी विसरून सुदर्शनच्या मदतीने त्याला मिळणाऱ्या सुखसोयींच्या आशेने आला. आहार मिळावा म्हणून मेहनत करण्याची गरज आणि शत्रूची भीती सुदर्शनच्या घरी त्याला नव्हती. पोपटाच्या मनातील हे दौर्बल्यच सुदर्शनच्या मनात पोपटा विषयीचा आदर व प्रेम कमी करण्यास कारण झाले आणि त्याने पोपटाला आपल्या घरात आश्रय दिला नाही."

अशा प्रकारे राजाचे मौनभंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)









# लांचखोर

शिलंगिरीच्या राजाच्या दरबारात कर्कट शास्त्री नावाचा एक ज्योतिषी रहात असे. त्याच्यावर देवीची कृपा असल्याने तो खरंखोटं काय ते कोणत्याही विषयात प्रत्यक्ष पाहू शकतो, अशी राजाची खात्री करुन दिली. त्यामुळे राजा त्याच्याकडे ज्या काही फिर्यादी येत, त्यांच्या विषयी निर्णय देण्यास कर्कट शास्त्रीलाच सांगे. कर्कट शास्त्री देवीचीकृपा सांगून जे जास्त लांच देत त्यांच्याबाजूने निवाडा देत असे.

शास्त्री लांच खातो, तो देवीची कृपा म्हणून जे सांगतो ते साफ खोटे असते, अशी दरबारात किंवदंती होती. ही किंवदंती कोठवर खरी आहे, ह्याची खरी माहिती मिळावी या साठी काय करावे, या विषयी राजाने प्रधानाला विचारले. प्रधानाने एक युक्ती सुचविली.

राजा कर्कट शास्त्र्यांना बोलवून म्हणाला–"आपल्या दरबारातील अधिकारी श्रीपतीयाने एकावर लांच खोर असा आरोप केला आहे. काही कारणामुळे मी त्याचे नाव गुप्त ठेवले. श्रीपतीचा आरोप कोठवर खरा आहे याची शहानिशा करुन उद्यां दरबारात सांगा. तो खरोखरच लांच खाऊ असेल तर त्याला चांगली शिक्षा करीन."

त्या दिवशी रात्री श्रीपती शास्त्रीबुवांना भेटून म्हणाला–"आहो, मी एकावर तो लांचखोर म्हणून राजाकडे फिर्याद केली आहे तो खरी असल्याचे सिद्ध झाले नाही तर महाराज मला मोठी शिक्षा करतील. म्हणून तुमच्या मदतीची गरज आहे. असे सांगून त्याने एक हजार वराह (सोन्याचे नाणे) शास्त्री बुवांच्या हातात ठेवले.

दुसऱ्या दिवशी शास्त्री बुवांनी दरबारात जाऊन म्हटलं–"देवी कृपा!" आणि डोळे मिटून पुन्हां उघडले आणि म्हणाले–"महाराज, श्रीपतीची फिर्याद खरी आहे!"

राजाने तावडतोब "शास्त्री बुवांना कैद कर!" असा हुकूम सोडला. शास्त्री बुवांनी विचारले–"महाराज, मला कोणत्या अपराधासाठी अटक करवितां आहां?"

"श्रीपतीने लांचखोर म्हणून फिर्याद केली होती, ती तुमच्या विरुद्ध!" राजा म्हणाला.





# दूधखुळे

रघूला सिताफळे फार आवडत. तो एकदा रस्त्याने जात होता, तेव्हां त्याला नारायण भेटला. तो कोठून तरी येऊन त्या गावात एक महिन्यापासून राहू लागला होता. नारायणच्या हातात एक सिताफळ होते.

रघूने चकित होऊन विचारले–"कायरे, हा सिताफळाचा मोसम नाही. मग तुला हे फळ कोठेरे मिळाले?"

"त्यात आश्चर्य करण्यासारखे काय आहे? आमच्या परसात एक आंब्याचे झाड आहे. त्याला सर्व तऱ्हेची फळे लागतात." नारायण म्हणाला.

"ते रे कसे?" आणखी आश्चर्यचकित होऊन रघूने विचारले.

"कां शक्य नाही? नित्यानंद योगी आमच्या घरी आले होते. त्यांनी आमच्या विहीरीतल्या पाण्यावर मंत्र टाकला आहे. तेव्हांपासून तसे होऊं लागलं आहे. पुष्कळ लोक आमच्या विहीरीचे पाणी मागून न्यायला येत आहेत. पण मी कोणाला देत नाही. सगळ्यांच्या परसांतली झाडे सर्व फळे देऊ लागली तर माझे मोठे पण काय राहिले?"

नारायणाचे घर तेथून फार दूर होते. तरी त्याच्या घरी जाऊन ती विचित्र गोष्ट पाहून यावेसे रघूला वाटले. तो चार पावले गेला असेल, बाजूच्या गल्लीतून गोविंदा येऊन त्यांना भेटला.

रघू त्याला काही तरी सांगणार इतक्यात तोच रघूला हाक मारून म्हणाला–"अरे, नारायणाच्या घरी जाऊन येऊ या का? तुला एक गंमत दाखवितो."

"मला आहे माहीत. आंब्याच्या झाडाला सिताफळे लागतात, तेच ना?" रघूने विचारले.

"ते सर्व काही नाही. त्यांच्या परसात म्हणे, एक नागसाप आहे, तो त्यांच्याकडे येणाऱ्या प्रत्येकाला फडा काढून आशीर्वाद देतो!" गोविंद म्हणाला.

आश्चर्य चकित झालेल्या रघूने जे सांगितले ते ऐकून गोविंद चकित झाला. म्हणजे नारायणाच्या घरात पुष्कळच विचित्र विचित्र गोष्टी पाहण्यासारख्या आहेत, म्हणावयाचे! दोघांना वाटले.

रघू आणि नारायण दोघे मिळून नारायणाच्या घरी जायला निघाले. वाटेत त्यांना नागू भेटला. तो त्यांना म्हणाला–"नारायणाच्या घरात म्हणे एक पारिजातक वृक्ष आहे. तो दिवसां झोपतो आणि रात्री पाहारा देतो. आणखी विशेष असे की त्याची पाने तोडली तर तो रडतो आणि गुदगुल्या केल्या तर हंसतो, म्हणे!"

"हा नारायण जादुगार आहे!" असे आश्चर्य करीत रघू म्हणाला.

या तिघांना वाटेत आणखी काही जण भेटले. त्यातल्या प्रत्येक जणाने नारायणाच्या घरातल्या गमती जमती सांगितल्या. नारायणाच्या घरात म्हणे, केरसुणी आपली आपणच केर काढते, म्हणे असा एक जण म्हणाला. त्याच्या घरात कधी न संपणारे पैसे देणारे अक्षयपात्र आहे. म्हणून आणखी एक जण म्हणाला.



एकूण दहा जण मिळून नारायणाच्या घरी पोचले. त्यावेळी नारायणाच्या घराचे दार बंद होते. रघूने जाऊन दाराची कडी खडखडविली. आंतून कोणीतरी येत असल्याचा पावलांचा आवाज झाला. ह्या सर्व विचित्र विचित्र गोष्टी ज्याच्या घरात आहेत, त्याच्या घरात माणसं राहतात की देव किंवा भुते? पाहूं या तरी, उत्सुकतेने सर्व वाट पहात होते.

"किर्र आवाज झाला आणि दार उघडले. सुमारे पंधरा वर्षांचा मुलगा बाहेर आला आणि विचारू लागला–"कोण हो? काय पाहिजे?"

"तुमच्या घरातल्या विचित्र गोष्टी पहायला आलों आहों!" रघू म्हणाला.

"आमच्या घरात विचित्र गोष्टी!" मुलाने आश्चर्यचकित होऊन विचारले.

रघूने ज्या ज्या विचित्र गोष्टी सांगितल्या होत्या, सर्व सांगितल्या.

"तुम्ही कोणाच्या घरी म्हणून आलात? आमच्या घरात तशा गंमती जंमती नाहीत" मुलगा म्हणाला.

"हे नारायणाचेच घर ना?" रघूने विचारले.

"होय!" तो मुलगा म्हणाला.

"स्वतः नारायणानेच आम्हांला सांगितले की या सर्व गंमती जंमती त्यांच्या घरी आहेत म्हणून!" रघू म्हणाला.

"मग त्यांनी तुम्हांला असे कां सांगितले, कोण जाणे? तुम्ही सांगतां





त्यांपैकी एक ही गोष्ट आमच्या घरात नाही." असे सांगून तो मुलगा घरात गेला.

घरातील गंमती जंमती दाखवायला मुलगा तयार नाही म्हणून काही न बोलता घरात गेला असावा, असे समजून सर्व मिळून घरात गेले. मुलाने सांगितले ते खरे होते, घरात एक ही विचित्र गोष्ट नव्हती. नारायणाच्या परसात विहीरनव्हती, एक ही झाड नव्हते.

आलेल्या दहाही जणांना राग आला, ते सर्व नारायणाच्या शोधार्थ निघाले. वाटेत त्यांना एका जागी नारायण दिसला.

रघूने संतापून त्याला विचारले–"तू आम्हां सर्वांना सपशेल खोटे सांगितलेस ना?"

"होय!" नारायण म्हणाला.

"तसं कां सांगितलेंस?" रघूने विचारले.

"नवीन नवीन एखाद्या गांवी जाऊन रहावे लागले की त्या गावात दूधखुळा कोण आणि हुशार कोण हे कसे कळणार हो?" नारायणने उलट प्रश्न केला.

"खोटं बोललं तर कळतं का?" गोविंदने थोडेसे चिडून विचारले.

"कां नाही कळणार? मी सांगितले ज्यांनी खरे मानले ते दुधखुळे नाहीत तर काय म्हणायचं त्यांना?" नारायण स्मित करून उत्तरला.

रघू व इतर सर्व परस्परांची तोंडे पाहू लागले. काय बोलावं हे कळेना.

काही वेळ थांबून गोविंद हळूच म्हणाला–"तुझं खोटं कोणी खरं मानलं, हे तुला कसं कळलं?"

"मी जे खोटं सांगितलं त्यांवर विश्वास करणारे माझ्या घरी जातील. त्या सर्वांना माझा मुलगा पाहील. त्यांना एकदां पाहून तो कधी विसरणार नाही. मी त्याला विचारून पाहातो." नारायण म्हणाला.

"तू आतां घरी जातो आहेस का?" रघूने विचारले.

"नाही, गांवात माझी अजून पुष्कळ कामें आहेत." नारायण म्हणाला.

रघू व त्याच्या बरोबरचे इतर सर्व नारायणाला "बरं येतो!" म्हणून सांगून सरळ त्याच्याच घरी गेले.

"पुन्हां कशाला आलांत?" नारायणाच्या मुलाने विचारले.

"आम्ही प्रत्येक जण एकेक वराह (सोन्याचं नाणं) देतो. आम्ही तुमच्या घरी येऊन विचित्र गोष्टी विषयी विचारलं, असं आपल्या वडिलांना तू सांगतां कामा नये. आहेना कबूल?" रघूने त्याला विचारले.

"बरं! सांगणार नाही. असं नारायणाचा मुलगा म्हणाल्यावर रघूने त्याला एकूण दहा वराह दिले आणि आपल्या इतर मित्रां बरोबर निघून गेला.

नारायण गावभर फिरून रात्री घरी परत आला. त्याचा मुलगा त्याला म्हणाला–"सकाळ पासून संध्याकाळ पर्यंत आलेल्या लोकांकडून एकूण पांचशे वराह मिळाले आहेत. आतां तुम्हांला कर्ज काढायची गरज नाही. व्यापाराला पाहिजे तेवढे भांडवल मिळाले आहे!"

"होय, व्यापार सुद्धा अशाच गावात चांगला चालेल. पुष्कळ फायदा होईल. दुधखुळ्या लोकांपेक्षां-स्वतःला कोणी दुधखुळा म्हणू नये असे समजणारे जे असतात, अशा लोकांपासूनच आपल्याला जास्त फायदा होईल. या गावात तसे लोक पुष्कळ आहेत" नारायण आनंदाने म्हणाला.

दुसऱ्या दिवशी नारायणाने दुभत्या म्हशी विकत घेतल्या आणि त्या गावातच दुधाचा धंदा सुरू केला. त्याचा धंदा लवकरच खूप चालू लागला.





# बोध झाला

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असतां बोधिसत्वांनी कोशल देशाचा राजा म्हणून अवतार ग्रहण केला. त्यांना सत्यसेन नावाचा एक मुलगा होता. त्याचे योग्य वय झाल्यावर राजाने त्याचा राज्याभिषेक करून दिला. सत्यसेन याच्या राणीचे नाव शंबुलादेवी असे होते. ती एक अत्यंत रूपवती तरुणी होती.

दुर्दैवाने युवराजाला एकाएकी कोड झाले. ते फारच भयंकर होते. कित्येक वैद्यांनी अनेक प्रकारे औषधपाणी करून पाहिले, परंतु गुण पडला नाही. उलट आजार वाढतच गेला. तो आजार असतांना चार चौघांत बसणे उठणे शक्य नव्हते. म्हणून वडिलांच्या अनुमतीने युवराज निर्जन अरण्यात राहायला निघाले. तेव्हां शंबुलादेवी सुद्धा पतीबरोबर वनवासाला गेली. युवराजांनी नको म्हणून किती सांगितले, परंतु शंबुलादेवीने ऐकले नाही.

जंगलात जेथे चांगले पाणी व फळझाडे होती अशी जागा पाहून युवराज एक पर्णकुटी बांधून राहू लागले. शंबुलादेवी पहाटे उठून घरातली सर्व कामे उरकून पतीला तोंड धुवायला पाणी वगैरे देऊन एक टोपली व कोयता खुरपे घेऊन जंगलात जाई आणि पतीसाठी कंदमुळेफळे घेऊन येई. सरोवरा वरून प्यायला व स्नानाला पाणी वगैरे घेऊन येई. नंतर पतीला खायला प्यायला देऊन स्वत:खाई पिई. अशा तऱ्हेने ती पतीसाठी अहोरात्र कामात गुंतलेली असे.

एके दिवशी ती फळे आणायला नव्या बाजूला गेली. काही अंतर चालून गेल्यावर तिला डोंगराचा एक कोपरा लागला. त्या ठिकाणी एक छोटे तळे होते. त्यात आंघोळ



करावी असे तिला वाटले. ती आंघोळ करून बाहेर आली त्यावेळी तिचे अंग चकचकीत सोन्यासारखे उजळले.

ती गोष्ट तिच्या लक्षात आली नाही. परंतु त्याच वेळी एक किरात त्या बाजूने जात होता तो तिला पाहून थक्क होऊन तिच्याकडे पहात राहिला. त्याने तिला आपल्या वस्तीत येऊन त्याच्याशी लग्न करून रहायला आग्रह केला. तो आडवा उभाच राहिला व तिला पुढे जाऊ दिले नाही. ते पाहून ती त्याला म्हणाली– "अरे, दुष्ट पापी! तुझा सर्वनाश होवो!" आणि तिने घागरीतले पाणी थोडे त्याच्या अंगावर शिंपडले. अंगावर वीज पडावी तसा एकदम तो जमिनीवर आदळला.



किराताचे विघ्न दूर झाल्यावर शंबुलादेवी पाणी व फळे घेऊन पर्णकुटीत परतली तेव्हां पुष्कळ काळोख पडला होता. पतीने तिला अर्थातच विचारले– "कायग, इतकी रात्र झाली?"

शंबुलादेवीने जे घडले ते सर्व यथातथ्य सांगितले. परंतु पतीचा त्यावर विश्वास बसला नाही. म्हणाला–"बायका, काय वाटेल ते बोलू शकतात, करू शकतात. तू कोठे गेलीस म्हणून तुला विचारणारा कोण आहे?"

"प्रभो, मी म्हटले ते खरे असेल तर या पाण्याने तुमची व्याधी बरी होईल!" असे सांगून तिने घागरीत आणलेले पाणी पतीच्या अंगावर अभिषेकासारखे ओतले. लगेच जादू करावी तसा पतीचा रोग नाहीसा झाला आणि त्याचे सर्व अंग सोन्यासारखे लकलकू लागले. आपल्या बायकोच्या पातिव्रत्या विषयी खात्री होण्यापेक्षा स्वत:चा आजार बरा झाल्याचा परमानंद युवराजाला झाला. तो लगेच निघाला आणि कोशल देशाच्या राजधानीला येऊन पोचला. तो उद्यानवनात उतरला. त्याने आपण परत आल्याची बातमी वडिलांना कळविली.

राजा स्वत: छत्र चामरासह उद्यान्‌वनात मुलाला भेटायला आला आणि आपल्या

मुलाचे स्वागत केले. महाराजानी युवराजाची व्याधी बरी करण्यासाठी व त्याच्या बरोबर जंगलात राहून सर्व तऱ्हेचे कष्ट सहन केल्याबद्दल शंबुलादेवीचा पट्ट महीषी असल्याचे जाहीर केले. नंतर स्वतः वानप्रस्थाश्रम ग्रहण करून सत्यसेनाला राज्य व्यवस्था पाहण्यास सांगितले.

वडिलांच्या हुकमाप्रमाणे शंबुलादेवीच पट्टमहीषी असल्याचे युवराजाने मान्य केले. परंतु तिच्या विषयी त्याने पूर्ण औदासिन्य दर्शविले आणि आपल्या इतर बायकां बरोबरच जास्तवेळ घालवू लागला. पतीच्या औदासिन्यामुळे आणि सवती मत्सरामुळे शंबुलादेवी हाडाचा पिंजरामात्र राहून गेली.

एकदा तिचे सासरे शंबुलादेवीच्या महालात आले. तिचा कृष देह पाहून त्यांना आश्चर्यच वाटले आणि त्यांनी विचारले– "इतकी वाळून कशी काय गेलीस?"

"पतीच लक्ष देत नसल्यास पत्नी आणखी कशी राहणार?" शंबलादेवीने विचारले.

वृद्ध राजाने जे घडले ते सर्व ऐकून घेऊन सत्यसेनला बोलावून घेतले व म्हणाला–"बाबारे, कृतघ्नते पेक्षा मोठे पातक नाही. भयंकर व्याधीमुळे तुला माणसात राहणे अशक्य झाले तेव्हा तू जंगलात पळून गेलास. त्यावेळी ती तुझ्या बरोबर सर्व कष्ट सहन करीत राहली. रात्रंदिवस तिने तुझी सेवा केली. शेवटी तिने तुझी व्याधी सुद्धां बरी केली. राज्य हातात येतांच तिच्याकडे दुर्लक्ष करू लागलास का? हे राज्य व वैभव कोणाला ही लाभेल. परंतु पतिव्रता स्त्री एखाद्या भाग्यवानालाच लाभते. शंबुला देवीचा अनादर करू नकोस. तसे केल्याने नुकसान तुझेच होईल!" असा हितबोध केला.

सत्यसेनाला हितबोध झाला. त्याने बायकोची क्षमा मागितली व तिला आपल्यावर व आपल्या इतर बायकांवर अधिकार देऊन तिच्या सांगण्या प्रमाणे राहूं लागल्या व इतर राण्यांचाही यथा योग्य आदर करीत राहिला.





## इंग्रजांच्या सत्तेची सुरवात

पंधराव्या शतकात पश्चिमत्य देशातील लोक भारताची संपन्नता व वैभव पाहून ते आपलेसे करून घेण्याची स्वप्ने पाहू लागले. इटलीचा एक नाविक कोलंबस स्पेनच्या राजा व राणीच्या कृपेने समुद्रमार्गे भारत देशाच्या शोधार्थ निघाला. परंतु इ. स. १४९८ मध्ये त्याने अमेरिकेचा शोध लावला.

त्याच वर्षी पोर्चुगीज नाविक वास्कोद गामा भारत देशात पोचला. कालि-कटचा राजा झोमोरिन याने त्याचे स्वागत केले. युरोप खंडातील भार-ताचा समुद्री मार्ग शोधून काढणारा सर्वांत प्रथम नाविक वास्को द गामा हाच होय. त्यानंतर डच, डेन्स इंग्लिश व फ्रेंच व्यापारी भारतात येऊ लागले.





फ्रेंच व इंग्लिश भारतात राहू शकले. भारतातील राजे रजवाड्यांना त्यांना विरोध करण्यासाठी एक करण्याचा प्रयत्न महाराष्ट्रियांनी केला. परंतु त्यांना त्यात यश आले नाही. सुरवातीला आलेल्या आपल्या फ्रेंच व्यापाऱ्यांनी व इंग्रज व्यापाऱ्यांनी भारतात आपली सत्ता कायम करण्या-



दक्षिण भारतात पांडिचेरी येथे आपले मुख्य केंद्र स्थान करून डयूप्ले याच्या नायकत्वाखाली फ्रेंचांनी आपली शक्ती वाढवायला सुरवात केली. इ. स. १७४० साली. युरोपात युद्ध सुरू झाले. फ्रेंच व इंग्रज परस्परांचे हाड वैरी झाले. त्याचाच परिणाम म्हणून इंग्रज व फ्रेंच आरमारांत दक्षिण भारताच्या समुद्र किनाऱ्यावर युद्ध सुरू झाले.

रॉबर्ट क्लाइव्ह नांवाचा एक साहसी तरुण युवक आल्याने इंग्रजांचे भाग्य उदयाला आलें. निर्भय वृत्तीचा असल्या कारणाने क्लाइव्ह वयाच्या अठराव्या वर्षीच घरातून पळून निघाला आणि ईस्ट इंडिया कंपनीचा एक कारकून म्हणून सेंट जॉर्ज किल्ला मद्रास येथे बांधला गेला तेथे पोचला.





बंगालमध्ये तरुण नबाब सिराज उद्दौला याने इंग्रजांचा विरोध केला. आपली राजधानी मुर्शिदाबादहून तो इस्ट इंडिया कंपनीची राजधानी कलकत्ता शहराला त्याने वेढा दिला आणि ते शहर जिंकले. कंपनीचा किल्ला विलियम त्याने काबीज केला.

आपली राजधानी हातातून गेल्याबद्दल भारतातील सर्व इंग्रजांना फार वाईट वाटले. रावर्ट क्लाइव्हने सैन्यानिशी कलकत्त्यावर स्वारी केली आणि विलियम किल्ला पुन्हा हस्तगत करून घेतला. सिराज उद्दौला युद्ध करायला आला तेव्हां क्लाइव्हने त्याच्याशी संधी केली. त्या संधी प्रमाणे तरुण नबाब आपल्या राजधानीला परत गेला.





सिराज उद्दौला परत गेल्यावर तावडतोब त्याचा सेनापती मीरजाफर याला अधिकाराचा मोह घालून क्लाइव्हने त्याच्या बरोबर सिराज उद्दौला विरुद्ध कट केला. त्याने एकाएकी नबाबाशी युद्ध पुकारले. परंतु फितूर झालेल्या मीरजाफरने एकाएकी नबाबा विरुद्ध जाऊन सैन्याला युद्ध करण्यास आज्ञा दिली नाही.

नबाबाचा पराभव झाला. मीरजा-फरच्या सैनिकांना नबाबाला कैद करून त्याच्या निर्घृण वध केला. मीरजाफर नबाब झाला. तरी त्याने प्रजे कडून वसूल केलेला सर्व कर इंग्रजांना देऊन टाकला. अज्ञातऱ्हेने क्लाइव्हला लक्षावधी रुपये मिळाले आणि ईस्ट-इंडियाकंपनीला कोटयावधी रुपये मीरजाफरला द्यावे लागले.





नाही असे सांगून इंग्रजांनी मीरजाफरचा जांवई मीरकासीम याला गादीवर आणले. मीरकासिम स्वतंत्र विचारांचा होता. हे त्याने इंग्रजां समोर मात्र वाकविली नाही. म्हणून इंग्रजव मीरकासीम यांच्या मध्ये इ. स. १७६४ मध्ये बक्सर येथे युद्ध झाले. मीरकासिमला दिल्लीचा मुगल बादशाह शाह आलम याची मदत मिळाली.

त्या युद्धात मीरकासिम हारला व दिल्लीकडे पळून गेला. तेथे तो अत्यंत गरीब स्थितीत मरण पावला. रॉबर्ट क्लाइव्ह स्वदेशी परतला होता. तो लॉर्ड होऊन भारतात पुन्हां आला. त्याने बंगाल, बिहार व ओरिसा कर वसूल करून देण्याचा अधिकार दिल्लीच्या मोंगल बादशहाकडून प्राप्त केला. त्यामुळे क्लाइव्हने पुष्कळ धन संपादन केले.





त्याचे वीरोचित स्वागत होईल या आशेने क्लाइव्ह इंग्लंडला गेला परंतु त्याचा लांचखाऊपणा आणि त्याने केलेले अत्याचार आणि क्रूर कृत्यां बद्दल पुष्कळांनी त्याची निंदा केली ते सहन न झाल्याने क्लाइव्हने तलवारीने आत्महत्या करून घेतली. क्लाइव्हनेच इंग्रजांची सत्ता भारतात चिरस्थायी करण्यास सत्तेचा पाया घातला.



# विश्‍वास पात्र

धनाजी पाटील नावाच्या एका श्रीमंत शेतकऱ्याकडे शिवू नावाचा एक नोकर होता. जन्मापासूनच तो बहिरा होता. धनाजीला नोकराला काही काम सांगावयाचे झाले की फार मोठ्याने ओरडूनच त्याला सांगावे लागे. इतके असूनही त्याला काही सांगितले तर आणखीच काही वांकडे तिकडे करून ठेवी.

धनाजीचा मुलगा लखुजी याला शिवू म्हणजे मुळीच आवडत नसे. तो मधून-मधून वडिलांना सांगे–"या बहिरटाला काही काम सांगावयाचे झाले की कंठशोष करावा लागतो. तो काही फुकट बिनपगारी काम थोडेच करतो? तसं आहे म्हणून त्याला काढून टाकूया व दुसऱ्या एखाद्याला ठेवून घेऊ या. ते बरे होईल!"

धनाजीला ते मान्य नव्हते. तो म्हणे "तो बहिरा असला तरी विश्‍वासपात्र व स्वामिभक्त आहे. कित्येक दिवसांपासून आपल्यावर अवलंबून राहिला आहे. म्हणून त्याला कामावरून काढून टाकणे बरोबर होणार नाही."

खरे पाहिले तर शिवू लखुजीवर सुद्धा फार प्रेम व विश्‍वास करी. तरी त्याला पाहिले की लखुजीच्या कपाळाला आठ्या पडत. संधी मिळेल तेव्हां त्याला काहीतरी करून कामावरून काढून टाकायचे लखुजीच्या मनात होते.

एकदा धनाजी बायको बरोबर तीर्थयात्रेला निघाला तेव्हां त्याने घराची सर्व जबाबदारी मुलावर टाकली. त्याला पाहिजे होती तशी संधी याहून जास्त चांगली कोठून मिळणार? असा विचार करून लखुजीने वडील तीर्थयात्रेला गेले त्याच्या दुसऱ्याच दिवशी शिवूला नोकरी वरून काढून टाकले.

श्री वि. ना. कुंटे












आपली चूक काय, आपली नोकरी कां गेली, शिवूला कळले नाही. लखुजी रागीट माणूस आहे, ही गोष्ट त्याला चांगली माहीत होती. म्हणून त्याने धाकट्या मालकाला त्याबद्दल काहीच विचारले नाही आणि आपल्या घरी निघून गेला.

त्यानंतर शिवूने गावात आणखी कोठे नोकरी मिळते का, म्हणून प्रयत्न करून पाहिला. परंतु त्याला नोकरीतर दिलीच नाही, म्हणत राहिले, "तू तर बहिरटच आहेस, आणखी वर चोरी करायला तुला सुचू लागली आहे. म्हणून तर तुला लखुजीने कामावरून काढून टाकले आहे."

आपली नोकरी गेल्याबद्दल शिवूला जितके वाईट वाटले त्या पेक्षां त्याच्यावर तो चोरी करतो, ह्या आरोपामुळे जास्त दु:ख वाटले. लखुजीने त्याच्यावर चोरीचा खोटा आरोप लावला असेही त्याला कळले. कोठे चांगली नोकरी मिळत नाही, हे पाहून त्याने रोजची मजुरी करून पोट भरायचे ठरविले.

एकदा चांगली दुपार झाल्यावर तो रस्त्याने चालत असतां शेजारच्या एका गल्लीत दोन वळूंची झुंज चालू होती. ते ओरडत होते व परस्परांना ठूसी देत होते, तसे ते परस्परांना रेटीत मोठ्या रस्त्यावर आले. त्याच वेळी लखुजीचा पांच वर्षांचा मुलगा शाळेत जात असतां त्याला समोर दिसला. तो नेमका जेथे झुंजचालू होती तेथूनच चालत होता.

वळूंची झुंज पाहून रस्त्यावरचीमुले कोणाच्या ओसरीत तर कोणाच्या घरच्या पायऱ्यांवर चढून लखुजीच्या मुलाला रस्त्यावर पाहून ओरडली–"अरे, लखुजीचा मुलगा! परंतु कोणी त्याला वांचवायला धावला नाही.

दुरून शिवूने त्याला पाहिले आणि तो वळूच्या पायाखाली तुडवला जाण्याच्या आत धावत जाऊन त्याला उचलले आणि एका घराच्या ओसरीत त्याला नेऊन बसविले.

त्या गडबडीत लखुजीच्या मुलाला काही लागले नाही, परंतु शिवूचा पाय घसरला व त्याला मात्र पायाला खूप लागले.

आपला मुलगा एका अपघातातून पूर्णपणे वांचला हे ऐकून लखुजी मुलाच्या शोधार्थ आला. त्याला शिवू आपल्या जखमेमुळे कण्हत असलेला त्याला दिसला. शेजारीच त्याचा मुलगा उभा होता. त्याचवेळी दोन्ही वळू झुंजत शेजारच्या गल्लीत निघून गेले.

तेथे जमलेल्या लोकांकडून मुलाला शिवूने वांचविल्याची गोष्ट लखुजीला कळली. तो धावत गेला आणि शिवूला हात धरून म्हणाला–"अरे, तुला किती लागलं रे? मी बोलतो ते तुला ऐकू येणार नाही. परंतु हरकत नाही. मी तू चोरी केलीस हे म्हटले ते खोटे होते. मी तुला कामावरून काढून टाकले. तरी तू माझ्या मुलाला वांचविलेस! तू किती विश्वासपात्र आहेस रे! मला आत्तां हे कळते आहे!" असे म्हणत त्याने आणखी दोघांना बोलावून शिवूला धरून आपल्या घरी नेले.

एका आठवड्यानंतर धनाजी तीर्थयात्रा संपल्यावर घरी परत आला. त्याने घरातील जे दृश्य पाहिले ते पाहून त्याला आश्चर्या बरोबर आनंदही झाला. लंगडत चालणाऱ्या शिवूला लखुजी हात धरून बाहेरच्या दाराकडे जात होता.

"काय झालं रे? स्वत:च हात धरून याला घेऊन चालला आहेस! याला बहिरटपणा बरोबर लंगडेपणा सुद्धा आला आहे, वाटते?" धनाजी म्हणाला.

"शिवू बहिरा व लंगडा असला म्हणून काय झालं बाबा? त्याचा आपल्या कुटुंबावर केवढा विश्वास आहे!" असे सांगून लखुजीने जे घडलं होते ते सर्व वडिलांना सांगितले.

आपल्या नातवाला वांचविल्यामुळे शिवूवरचा राग मुलाच्या मनांतून नाहीसा झाला, हे पाहून धनाजीला आनंद झाला.





# खरा चिक्कू

चिक्कू नारोबा मेल्याबरोबर सरळ स्वर्गाच्या दाराजवळ पोंचले. द्वारपालकाने त्याला पाहाल्यावर आश्चर्याने विचारले–"तू इकडे आलास, म्हणजे आश्चर्यच आहे, तू काय पुण्य केलेस रे, म्हणून स्वर्गाच्या दारापर्यंत आलास ?"

नारोबांनी त्याच्याकडे जरा चिडूनच पाहून म्हटले–"मागे एकदां नाशकाला कुंभ-मेळ्याच्या वेळी आंघोळीला जातांना वाटेत एक दमडी पडलेली दिसली. ती मी एका भिकाऱ्याला दिली. ते पुण्यकार्य केल्याचा उल्लेख तुमच्या चित्रगुप्ताच्या वहीत असेल की ! जाऊन पहा !"

द्वारपालक नारोबांना बरोबर घेऊन चित्रगुप्ताकडे गेला. चित्रगुप्त नारोबाला म्हणाला–"त्या दमडीने तुम्ही जे पुण्यकार्य केलेत, म्हणून तुम्हांला काही क्षण स्वर्गात राहतां येईल ! पण शेवटी नरकात जावेच लागेल !"

नारोबा जरा सुद्धा न घाबरतां म्हणाले–"मला तरीही नरक चुकणार नसेल तर ती दमडी तुमच्या जवळ राहून कशाला रडत रहायला हवी ?" असे म्हणत चित्रगुप्ताकडून ती दमडी वसूल करून नारोबा नरकाकडे जाऊ लागले.






विदेह देशाची राजकन्या वज्रप्रभा आपल्या काही सखीं बरोबर एकदां राजोद्यानात विहार करीत बसली असल्याचे सांगून आपल्या महालात परतली. सर्व सखी घाबरून गेल्या व उपचार करू लागल्या.

वज्रप्रभा हंसाच्या पंखांच्या गादीवर त्यावेळी विश्रांती घेत होती. तिने स्मित-करून आपल्या तिघां सखीकडे पाहिले आणि म्हणाली–"मी इतकी दमले त्याचे कारण काय, हें तुमच्यापैकी कोणी खरेखरे सांगू शकेल तर मी तिला आपल्या गळ्यातला रत्नहार देईन ?"

"समजा, जर कोणी खरे कारण सांगू शकली नाही तर?" मरीचिका नावाच्या सखीने विचारले.

"तर रत्नहारा ऐवजी दोन थोबाडीत देईन !" असे वज्रप्रभा म्हणाली.

"तर मग मी आपले भाग्य पारखून पाहाते !" असे म्हणत मरीचिका राज-कन्येला म्हणाली–"राजकन्येला इतका दम लागण्याचे कारण उद्यान वनांत पाऊल टाकल्या बरोबर आपण आंधळी कोशिबीर सुरू केली हे होय! सूर्य अगदी डोक्यावर आला होता. तरी खेळ आपण चालूच ठेवला. उद्यानांत त्या स्थितीत पळत राहिलं तर दम लागणार नाही का? तुम्ही म्हणून इतके सहन केलेत, आणखी कोणी असती तर!"

लगेच वज्रप्रभेने मरीचिकेच्या थोबाडीत दोन भडकविल्या. इतर दोघी सखी हंसू लागल्या.

काही वेळाने मरुद्वती नावाची दुसरी सखी म्हणाली–"राजकन्या इतक्या दमल्या त्याचे कारण त्या सरोवरात तासनतास पोहोत राहाल्या हे आहे! इतका वेळ



पोहोत राहल्यावर पुरुष सुद्धां दमणार नाहीत का?"

वज्रप्रभेने संतापून मरुद्वतीच्या थोबाडीत दोन भडकाविल्या.

मंदाकिनी नावाची तिसरी सखी म्हणाली–"राजकन्या इतक्या दमल्या त्याचे कारण मला एकटीलाच माहीत आहे. त्यांनी एक हार गुंफता येईल एवढी ओंजळ भर फुले तोडली. त्यांचा हार गुंफून आण म्हणून त्यांनी मला सांगितले तेव्हांच त्या दमल्या असल्याचे मी ओळखले. तुम्ही दोघींनी ओळखले नाही." असे ती आपल्या दोघी मैत्रिणींकडे थोडयाशा रागाने पहात म्हणाली.

मंदाकिनी अजून बोलतच होती, वज्रप्रभेने आनंदाने अंथरुणावरून उठून आपल्या गळयातला रत्नहार काढून मंदाकिनीच्या गळयात घातला. ते पाहून इतर दोघी आश्चर्य चकितच झाल्या.

त्यानंतर काही वेळाने वज्रप्रभा झोपी गेल्यावर मरीचिका व मरुद्वती मंदाकिनीला अंत:पुरातील एका कोपऱ्याच्या खोलीत ओढून घेऊन गेल्या व त्यांनी तिला विचारले–"कायग, मंदाकिनी! आपल्या राजकन्येचे रूप सौंदर्य कसे आहे, हे तुला माहीत नाही असे नाही. ती शरिराने स्थूलच आहे, तरी लठ्ठ दिसत् नाही अशांना आपण सर्व ओळखतो, पण राजकन्येचा स्थूल पणाच नाही, ती थोडी लठ्ठच आहे, असे मागे तूच म्हणाली होतीस, होयना?"

"होय, ते ही खरे आहे!" मंदाकिनी म्हणाली.

"मग अशी राजकन्या ओंजळ भर फुले तोडल्यावरोबर 'दमून जाईल का? ती इतकी सुकुमारी, नाजुक आहे का? तिची मर्जी संपादन करण्यासाठी तू पुढे पुढे किती खोटे बोलशील, कोणास ठाऊक?" या शब्दात दोन्ही सखी मंदाकिनीला टोचून बोलू लागल्या.

मंदाकिनी एक दोन मिनिटें गप्प राहल्यावर हळूच हसून म्हणाली–"मी म्हटले ते अगदीच खोटे नव्हते. दुसऱ्याच्या मनाला बोचणार नाही, असे बोलले. सामान्यपणे राजकन्या लावण्यवती व फुलांसारख्या कोंवळया सुकुमारी असतात असे सर्वंच मानतात नाही का? तरी आपली राजकुमारी या गोष्टीस पूर्ण प्रमाणें निराळी आहे. ती गोष्ट तिलाही चांगली माहीत आहे. म्हणूच कोणी तिच्या रूपलावण्या विरुद्ध थोडे काही बोललं तर तिला ते सहन होत नाही."

"म्हणजे, आम्ही ती स्थूल देहवाली, लठ्ठ आहे, असे म्हटलं, असा तुझ्या म्हणण्याचा अर्थ घ्यावयाचा का?" दोघी सखींनी थोडयाशा रागातच विचारले.

"इतका राग येण्याचं काय कारण? मी सांगते ते नीट ऐका!" असे सांगून मंदाकिनी पुढे म्हणाली–"राजकन्या इतक्या उन्हात सर्व उद्यानभर धावत आंधळी कोशिंबीर खेळली, असं तुम्ही म्हणालात. शिवाय सरोवरात तासन् तास पोहली, हे सांगून ते पुरुषांना सुद्धा असाध्य असते, असे म्हणालात. त्यामुळे तिला तुम्ही तिच्या स्थूल देहाविषयी व लठ्ठपणा विषयी बोलत हेटाळणी करीत आहां असे वाटून राग आला. मला तिच्या मनातली ही नाजुकगोष्ट चांगली माहीत होती. म्हणून मी ओंजळ भर फुले काढल्याने दमल्याची गोष्ट सांगितली. ते तिला आवडले. माणसाचा स्वभाव ओळखून बोलावं, ही साधी गोष्ट तुम्हांला माहीत नव्हती, म्हणून तुम्हांला इनाम मिळण्या ऐवजी थोबाड फोडून घ्यावं लागलं. तुम्ही माझ्या चांगल्या मैत्रिणी आहां, म्हणून आपण तिघी रत्नहार वांटून घेऊ या."

मंदाकिनी म्हणाली त्यावर मरीचिका व मुरुद्वतीच्या मनाचें समाधान झाले. त्या म्हणाल्या–"वज्रप्रभेसारख्या राजकन्यां-बरोबर कसं वागायचं, तू सांगितल्यानंतरच आम्हांला कळलं. आम्हांला चांगला धडा घेण्यासारखा आहे. रत्नहारांत आम्हांला वांटा नको. तूच तो ठेवून घे." असें सांगून त्यांनी मंदाकिनीचे अभिनंदन केले.



      



# दान करण्याचे गुपित

एका गावी एक कीर्तनकार रहात असत. ते गावो गांव फिरत व श्रोता जे काही देत त्यावर संतुष्ट होऊन ते आपलं जीवन सुखाने चालवीत असत.

एकदा ते कीर्तनकार एका गावी गेले. त्या गावच्या लोकांनी त्यांचे हरिकीर्तन करवायचे ठरविले. कीर्तनालायक मोठी जागा फक्त शेषराव नावाच्या सावकारांच्या आवारातच होती. म्हणून मुख्य मुख्य गावकरी कीर्तनकाराला शेषरावांच्या घरी घेऊन गेले-व म्हणाले-"यांचे कीर्तन आपल्या गावात करायचे ठरविले आहे. ते तुमच्या घरी झाले तर बरं होणार आहे. कीर्तन-कराचा आपण सर्वांनी आपल्या आपल्या शक्ति सामर्थ्या प्रमाणे गौरव करून त्यांना काही दिले तरी चालेल. मग काय म्हणतां?"

शेषराव जास्त्या रसिक मनुष्य नव्हता. परंतु सर्व गावकऱ्यांनी त्यांना मान दिल्या-बद्दल त्यांना फार आनंद झाला. म्हणून ते म्हणाले-"वा: वा! आमच्या घरी कीर्तनाची तयारी करु या. एवढेच नव्हे तर बुवांना आमच्या घरीच उतरवायची व्यवस्था करु या." त्यांनी हट्टच धरला.

त्याच दिवशी रात्री सावकारांच्या घरी त्यांच्या घरा समोरच्या मोठ्या अंगणात कीर्तनाची व्यवस्था करण्यात आली. देवाच्या तसबिरी समोर एक मोठे ताट ठेवण्यात आले. हरिकीर्तनाला आलेल्या श्रोत्यांनी आपापल्या शक्ति सामर्थ्याप्रमाणे कीर्तन कारांना जे द्यायचे असेल ते टाकावे. पुष्कळांना प्रथमच त्यांना जे द्यायचे होते ते त्यांनी ताटात टाकले. काही जण मागाहून घालू म्हणून थांबले. शेषरावांनी कीर्तन करांना द्यायला एक शाल व शंभर रुपये एका पिशवीत घालून ओटीवर ठेवले होते. कीर्तन संपल्यावर देऊं, असा त्यांचा विचार होता

त्या गावात रघुपती नावाचा एक छोटेखानी सावकार होता. त्याने कीर्तन-कारांच्या गळ्यात तीस रुपयाचे एक रेशमी उपकरणे आणून घातले. व ताटात चार रुपये घातले आणि पुढच्या रांगेत येऊन बसला. हे कीर्तन त्याच्या तर्फे झाले असते तर कीर्तनकारांचा जास्त गौरव करण्याचा त्यांचा विचार होता.

थोरले सावकार शेषराव कोण कोण काय किती देतो हे एका डोळ्याने पहात होते. सर्वात मोठी रक्कम व गौरव रघु-पतीनेच केला होता. तोही दहा रुपयांच्या आतच होता. अशा परिस्थितीत आपण मात्र कीर्तनकाराला शंभर रुपये नकद आणि एक शाल देणे कसे योग्य ठरेल. दहा रुपये नकद व एक धोतर जोडी दिली तर पुरे होईल, असे त्यांनी मनाशी ठरविले.

कीर्तन काराने हरिकथा सुरूकेली व पुढे चालू केली. मध्येच शेष राव काही काम आल्या सारखं दाखवून उठून ओटीवर गेले. त्यांनी तेथे तयार करून ठेवलेली शाल व रुपयांची पिशवी घेतली व त्याच्या जागी एक धोतर जोडी व दहा रुपये ठेवून आले,

कथाकार शेषरावांच्या मनांत जे तुफान उडले होते त्याची चिन्हें त्यांच्या चेहऱ्यावर पडत ती ओळखत होते. शेषराव घरात कशाला गेले होते, हे एका डोळ्यांनी कीर्तनकार पहातच होते. शेषराव परत










येऊन आपल्या जागेवर बसल्यानंतर बुवांनी एक उपकथा सुरू केली.

म्हणे कर्ण हा फार मोठा दानी होता. कोणी मागितले व त्याने 'नाही' म्हटले असे कधी घडलेच नाही. एकदां कर्ण स्नानाची तयारी करीत असतां कोणी तरी ब्राह्मण त्याच्याकडे भिक्षेसाठी आला. नोकरांनी ती गोष्ट येऊन सांगितली. त्या ब्राह्मणाला आपल्याकडे बोलावून आणण्यास कर्णाने सांगितले.

तो ब्राह्मण आला तेव्हां कर्ण डाव्या हातात स्वर्ण पात्रात तेल घेऊन बसला होता आणि उजव्या हाताने अंगाला तेल लावीत होता.

ब्राह्मण म्हणाला–"महाराज, मी गरीब दरिद्री आहे. आपणांस योग्य वाटेल ते देण्याची कृपा करावी :

दानशूर कर्णाने त्याच्या डाव्या हातात जे सोन्याचे भांडे होते ते तसेच ब्राह्मणाला देऊन टाकले.

ब्राह्मणाने ते आनंदाने स्वीकारले व म्हणाला–"आपण दानशूर आहां, परंतु विचार करा, कोणी डाव्या हाताने दान करतात का? असे देण्यात गुपित काय असते?"

त्यावर कर्ण स्मित करून म्हणाला–"हें दान देते समय गुपित सर्वांनी राखायचे असते. द्यावयाचे जे दान असते ते ज्योतिष पाहून द्यावयाचे नसते. बोलतांना मी तुम्हांला भांडे देण्याचे ठरविले होते त्या क्षणाला ते माझ्या डाव्या हातात होते. ते उजव्या बदलून दिले असते तर त्या अवधीत माझीबुद्धी फिरण्याची शक्यता होती. म्हणून डाव्या हातातली वस्तू डाव्या हातानेच दिली.

ही एक उपाख्यान सांगून कीर्तनकार मूळ आख्यानाकडे वळले. परंतु शेषरावांना ते उपाख्यान थोबाडीत मारल्या सारखे वाटले. हरिकीर्तन संपल्यावर त्यांनी पूर्वी देण्याचा जो विचार केला होता, त्या पेक्षा अधिकच देऊन कीर्तन कारांना निरोप दिला.





# ज्ञानोदय

चंद्रपूर या गावी भास्कर नावाचा एक तरुण युवक रहात असे. त्याचे शेजार गांवच्या एका कुटुंबातल्या अंबिका नावाच्या मुलीशी लग्न झाले.

एकदा त्याचा मुकुंद नावाचा मित्र बायको बरोबर त्याला भेटायला आला. तो जिल्ह्याच्या गांवचा राहणारा होता.

मुकुंदाच्या बायकोला चांगले गातायेत होते. तिचे गाणे ऐकून भास्कर बरोबर त्याची बायको अंबिका हिला सुद्धा फार आनंद झाला.

मुकुंद आपल्या मित्राकडे आठवडाभर राहल्यानंतर आपल्या गावी परतला. तेव्हां भास्कर बायकोला म्हणाला–"काय ग, अंबिके तू सुद्धा मुकुंदाची बायको गौरी सारखं गाणं गायची संवय कां करू नये?"

पतीचे ते म्हणणे ऐकून अंबिकेला फार आश्चर्य वाटले. गायन, चित्रकला आणि कविता करणे वगैरे गोष्टी वयावर अवलंबून राहात असतात. वाटेल तेव्हां वाटेल त्याला या गोष्टी येतात का? गौरी सहा वर्षांची असतानाच गायला शिकू लागली होती, असे तिने सांगितले होते.

अंबिका नवऱ्याला म्हणाली–"माझा आवाज काय हो, बरा नाही. मला नाही गातायेत."

ते उत्तर ऐकून पती पुन्हां गायनाची गोष्ट काढणार नाही, असे तिला वाटले होते. परंतु भास्कर थोडा रागावून च म्हणाला–"आवाजाचे काय? गातां गातां आवाज चांगला होतो, म्हणे तू प्रयत्न तर करून पहा."

काही काळ लोटल्यावर त्या गावात ओंकार शर्मा नावाचा एक चित्रकला निष्णात आला व त्याने एक चित्रकलेचे प्रदर्शन ठेवले. त्याने प्रदर्शनात ठेवलेली







सर्व चित्रे ग्रामीण वातावरणाला अनुसरूनच होती.

ते प्रदर्शन पाहून दोघे नवरा बायको घरी परतल्यावर अंबिका पतीला म्हणाली– "काय हो, पाहिलंत का ओंकार शर्मांच्या सर्व चित्रात कसे सर्व कसे हुबेहूब आपण पाहतो चहूं कडे तसे आहे, नाही का? तशीच चित्रे तुम्ही काढावी व मला पहायला मिळावी, असे मनात किती येते?"

ते ऐकून भास्कर आश्चर्य चकित होऊन म्हणाला–"मी चित्रे काढू म्हणतेस? चित्रकला म्हणजे तुला इतकी सोपी वाटली, वाटते?"

"चित्रकला सोपी आहे, असे मी नाही म्हणत. प्रयत्न करून पहा जिद्दीने रेघोट्या काढीत राहिले तर चांगली चित्रे येणार नाही असे नाही, असे मोठ्यांचे म्हणणं आहे!" अंबिका म्हणाली.

तोच भास्करला, त्याने बायकोला गायन विषयी जो सल्ला दिला होता तो आठवला. तो तिला म्हणाला–"त्या दिवशी माझ्या मित्राच्या बायकोने गाणे म्हटले, त्या आनंदात मी तुला एक निरर्थक सल्ला दिला होता. ती माझी मोठीच चूक होती. कलेत सर्वांना प्राविण्य मिळणे तितकेसे सहजी होणारे काम नाही. तसे साध्य करून घ्यायचे झालेच तर लहानपणा पासूनच गुरूच्या जवळ बसून साधना करावी लागते. तरी नैसर्गिक रीत्या कलेचा गुण असल्या शिवाय तितकेसे समाधान कारक यश प्राप्त होत नाही."

"असे बोला! आपण लहानपणी हे काम केले नाही. आतां हे कसे होणार?" अंबिका म्हणाली, त्यावेळी तिच्या चेहऱ्यावर दुःख होते.

"आतां आपण करावयाचे ते हेच की एखाद्या कलेत प्राविण्य दाखविणारांचा आदर करणे; त्यांचे गाणे ऐकून चित्रकला पाहून आनंदित होणे!" भास्कर म्हणाला.

नवऱ्याने ललितकलां विषयी सांगितलेली गोष्ट किती वास्तविक होती, याचा विचार करून अंबिकेला आनंदच झाला.






विभीषणासारखीच रावणाची पट्टराणी मंदोदरी सुद्धा नवऱ्याला हित बोध करू लागली–"नाथ, नाक कान कापले म्हणून म्हणा, रामाने लग्न कर म्हटले तर लग्न केले नाही, म्हणून म्हणा, तुमच्या धाकट्या बहिणीला अपमान सहन झाला नाही, म्हणून म्हणा, तुम्ही सीतेला एकटीला पाहून व ती असहाय स्थितीत असतांना, सोने उचलून न्यावे तसे, पशु पक्ष्यांना चोरून न्यावे तसे उचलून पळवून आणलेत तेव्हां ती किती दुःखी असेल याची कल्पना तरी आहे का तुम्हांला? शूर्पणखेसाठी प्रतिकार भावनेने सीतेला उचलून आणलेत, तिचा जो अपमान झाला त्याचा तिला किती राग असेल, कधी विचार केलात का?"

रावण म्हणाला–"होय मंदोदरी, हे मला आतां कळते आहे. परंतु, परंतु–ते काही असू दे, हा रावण कधी मान वांकविणार नाही! तुझा पती भितरा नाही! तू भित्र्यासारखी वागू नकोस. तो राम काय करतो, मी पाहणार आहे."

जंगलातले सर्व वानर एकत्र होऊन रामाला मदत करायला सिद्ध झाले, सुग्रीव, नील, अंगद, सुषेण, जांबुवंत इत्यादिक प्रमुख सेनापती होऊन रामाला मदत करण्यास उभे ठाकले. हनुमान रामाच्या खास विश्वासातला अंगरक्षक. सर्वांनी एकत्र येऊन मोठ्या सैन्यानिशी लंकेवर स्वारी करण्याची सर्व तयारी झाली.



हनुमानाने डोंगर व पर्वत उचलून आणले व ते समुद्रात टाकले.

मोठमोठ्या वानर वीरांनी मोठे खडक व शिळा आणून टाकल्या तर लहान लहान वानरानी दगड धोंडे आणून टाकले.

शंभर योजन दूर असलेल्या लंकेपर्यंत समुद्रावर पूल बांधण्याची तयारी सुरू झाली. नील वानराने पूल निर्माण करण्याच्या कामाचे पर्यवेक्षण करण्याची जबाबदारी स्वतःवर घेतली.

बिभीषणाने आकाशमार्गे येऊन रामाकडे शरणागती मागितली. रामाने त्याला अभयदान देऊन लंकेचा राजा तुला करतो, असे वचन दिले. त्याने लगेच समुद्राच्या पाण्याने त्याला लंकेचा राजा म्हणून अभिषेक केला.

रामाने समुद्रावर सेतू बांधून कोदंडावर रामबाण ठेवला व वानरसेना पाठीमागून निघाली. दोन्ही बाजूला लक्ष्मण व हनुमान चालत होते अशा समारंभाने रामाने लंकेवर स्वारी करण्यासाठी प्रस्थान केले. बिभीषण त्यांच्या मागून निघाला.

हेरातर्फे रावणाला कळले की राम वानरसेना बरोबर घेऊन समुद्रपार करून आला आहे. रावण आश्चर्यचकित झाला. एका मानवाने वानरांचे सैन्य घेऊन समुद्रावर शंभर योजन लांब पूल बांधला आणि त्रिलोकाला थरथर कांपविणाऱ्या रावणासारख्याला जिंकून व ठार करून आपली बायको सीता हिला सोडवून आणले असे म्हणविणार ! हे कसे साध्य होत आहे ? असे होणार का ? घाबरण्याचे कारण काय ? असा विचार करीत असलेल्या रावणाला मंत्री प्रहस्त म्हणाला—"शत्रूला वाटेतच तोंड देऊन त्याला सामान्य समजून युद्ध करणेंच योग्य !"

रावण हसून म्हणाला—"आपल्या कुंभकर्णाला त्याला हवा तितका आहार मिळत नाही. त्यांना लंकेत येऊ दे. सर्व सांपळ्यात सांपडल्या सारखे सांपडतील माझ्या धाकट्या भावाला पोटभर आहार मिळेल."

राम आपल्या सर्व वानरसेने सह समुद्र ओलांडून समुद्र पार करून लंकेच्या किनाऱ्यावर उतरला.

लंका नगरी उंच पर्वताच्या टोकावर निर्मिलेली होती. पर्वताच्या अग्रभागी रावण एका मोठ्या महालात रहात असे.

आपल्या महालातून रामाचे सैन्य किनाऱ्यावर आले ते रावणाने पाहिले. सर्व किनाराभर मुंग्यांच्या रांगांसारखे वानर सैन्य व्यूहरचना करीत होते.

अंगदाला त्याच वेळी वीरोत्साह चढला. तो आकाशात उडाला आणि रावणाच्या महालावर जाऊन उतरला. तो रावणाला म्हणाला—

"ए रावणा ! कधी मागे तुला आपल्या शेपटीने गुंडाळून फेकणारा वाली आठवतो का ? त्याचा मी मुलगा, अंगद ! तू तेव्हां पासून आजपर्यंत त्याच्याशी गौरवयुक्त वागणूक करीत आलास. म्हणून मी सांगतो ते ऐक. अजून वेळ हातची गेली नाही. रामाशी वैर करायचे सोड. त्याला शरण जा. वानर सैन्य आणून राम काय करू शकेल, असे मनात समजून घेऊ नकोस. वानरांत किती शक्ती असते हे पुन्हां तुला सांगण्याची गरज नाही !"



रावणाला राग आला. त्याने तलवार उपसली. अंगदाने उडी मारून रावणाचा किरीट लाथ मारून खाली पाडला आणि परत वानर सैन्य होते तेथे सुखरूप येऊन पोचला.

वानरसेन्याने लंकेला वेढा दिला सैन्यात बरीच रावणाची माणसे ठार झाली आणि परिस्थिती चिंताजनक झाली तेव्हां रावणाने कुंभकर्णाची झोप मोडली त्याला युद्धाला चल म्हणाला—

कुंभकर्णाने घोर तपश्चर्या केली तेव्हां ब्रह्मदेवाने त्याच्या इच्छा सर्व फिसकटवून टाकल्या.

सहा महिने झोप पुरी झाली नाही, तर कुंभकर्णाचे बळ कमी होते त्याने रावणाने



जेव्हा ते सर्व ऐकले आणि त्या असा शाप त्याने दिला सांगितले सदुपदेश केला.

रावण संतापून म्हणाला–"मुला युद्ध करायचे असेल तर कर, नाही तर जाऊन झोप!"

निद्राभंग झाल्यामुळे चिडलेल्या कुंभकर्णाने वानरांना धरून खायला सुरवात केली. तेव्हां रामालक्ष्मणांनी सतत युद्ध केले आणि त्या युद्धात रामाने कुंभकर्णाचा वध केला.

त्यानंतर अनेक शूर राक्षसवीर त्या युद्धात मरण पावले. तेव्हां रावणाचा मोठा मुलगा इंद्रजित युद्ध करायला आला.

रावणाला आपला थोरला मुलगा म्हणजे फार मोठा आधार वाटे. मेघांत शिरून त्याने इंद्राला जिकले होते म्हणून त्याला मेघनाथ हे आणि इंद्राला जिंकणार इंद्रजित ही नावे प्राप्त झाली होती. शिवाय त्याला युद्धातले मंत्रतंत्र चांगले अवगत होते. तो महा मायावी म्हणून ओळखला जाई. चवदा वर्षे ब्रह्मचर्य राखून निद्रा व आहार घेतल्या शिवाय जो राहील त्या वीरपुरुषाच्या हातींच त्याला मरण असल्याचे बिभीषणाने सांगितले.

इंद्रजिताने एक मायावी सीतेची निर्मिती केली आणि रामाला ती दिसेल अशा तऱ्हेने तिचे तुकडे तुकडे करून टाकले.

लक्ष्मणाने ती मायावी सीता आहे, तेव्हां भिण्याचे कारण नाही असे त्याच्या दादाला सांगितले.

त्यानंतर रावणाने विद्युत् जिह्वा नांवाच्या राक्षसा करवी रामाचे डोके तयार करवून ते भाल्याला खोचले आणि ते सीतेला नेऊन दाखवायला सांगितले. परंतु सीतेला ते खरे वाटले नाही.

"असल्या नकलांचे कौशल्य पाहण्यापेक्षा रावणाची खरी डोकी जमिनीवर लोळत असलेली पाहण्याची वेळ जवळ येत आहे!" असे तिने म्हटले.



इंद्रजितने मेघांत लपून रामलक्ष्मणांवर नागास्त्राचा प्रयोग केला. गरुडमंताने सर्व नागांचा संहार केला आणि रामलक्ष्मणांना नागाच्या जाळ्यांतून वांचविले.

सीता रामांच्या सेवेत चवदा वर्षे कठोर ब्रह्मचर्य राखून निद्रा आहार न घेता राहणाऱ्या लक्ष्मणाच्या हाती इंद्रजिताचे मरण लिहिले आहे. हे बिभीषण ने सांगितले.

लक्ष्मण, विभीषण व हनुमंताने जाऊन काही काळे बकरे बळी दिले आणि इंद्रजित यज्ञ करीत होता तो ध्वस्त केला. नंतर लक्ष्मणाने इंद्रजिताचा वध केला.

रावणाने पाताळ लंकेचा अधिपती मैरावण याला रामलक्ष्मणांना कालीसमोर बळीद्यायला सांगितले.

रामलक्ष्मण झोपी गेले असतां मैरावणाने आपल्या मायेने त्यांना प्रतिमा करून टाकले आणि पाताळ लंकेत घेऊन गेला. तेथे त्यांना बली देण्यासाठी सर्व तयारी केली.

हनुमानाला ते सर्व कळले व तो पाताळ लंकेत गेला. तेथे द्वारपालक म्हणून पाहारादेत असलेल्या मत्स्यवल्लभाशी युद्ध करीत असतां सुवत्सला देवीने येऊन तुम्ही दोघे पितापुत्र असल्याचे त्यांना समजावून सांगून ते युद्ध थांबविले.



हनुमानाने सूक्ष्म रूप धारण करून व कालिका देवीच्या देवळात शिरून रामलक्ष्मणांना उचलून खांद्यावर घेतले व बाहेर आला. रामलक्ष्मणांनी मैरावणाशी युद्ध केले.

रामाला आपले दैवत मानणाऱ्या चंद्रसेनेला मैरावणाने तुरुंगात टाकले. तिच्याकडून मैरावणाचे मरण कशात आहे हे हनुमताला कळले व त्याने त्याचा ध्वंस केला. त्यानंतर रामाने मैरावणाला ठार केले.

रामाने चंद्रसेनेला आत्मतत्वाचा बोध केला व पुढच्या जन्मात तिला विष्णूचा लाभ होईल, असा आशीर्वाद दिला.



मत्स्यवल्लभाला पाताळ लंकेचा अधिपती नेमून व रामलक्ष्मणाला खांद्यावर घेऊन हनुमान लंकेला आला.

सर्व मायावी उपाय निष्फळ ठरल्यावर रावणाने शूरवीर योद्धयांना आणि चतुरंग सेनेला जन्म देणारा पाताळ लंका यज्ञ प्रारंभ केला. विभीषणाला ते गुपित माहीत होते. म्हणून त्याने तो यज्ञभंग करायला रामाला सांगितले.

अंगदाने अदृश्यकरणी विद्येच्या सहाय्याने जाऊन मंदोदरीचे केस धरून तिला ओढीत आणून रावणासमोर गेला. रावणाची यज्ञदीक्षा भंग झाली व यज्ञभंगही झाला.

शेवटी रावण हताश होऊन युद्धकरायला निघाला. त्या वेळी पुन्हां मंदोदरीने सीतेला रामाकडे पोंचती करायला रावणाला विनविले.

"रावण हा रावणच असणार!" अशी सिंह गर्जनाकरून रावणाने दहा घोडयाचा रथ तयार करविला व त्यात बसून युद्धाला निघाला.

लक्ष्मणाने इंद्र जिताचा वध केला होता म्हणून रावणाला त्याचा भयंकर राग होता. एकदां बंधमुक्त केल्यामुळे इंद्राकडून रावणाला परोपकार म्हणून शक्ति महायुधास्त्र मिळाले होते. ते रावणाने लक्ष्मणावर टाकले. ती शक्ती लागल्याने लक्ष्मण बेशुद्ध होऊन पडला.

हनुमंताने काही क्षणांत हिमालयपर्वतावर जाऊन सूर्योदय होण्यापूर्वी संजीवनीबूटी आणली. त्यामुळे लक्ष्मण पुन्हां शुद्धीवर आला.

रामारावणाचे युद्ध चालू असतां इंद्राने मातली नावाच्या आपल्या सारथ्याला एका दिव्य रथासह रामाकडे पाठविला.

रामरावणांचे भयंकर युद्ध झाले. त्यात रावणाची डोकी एकामागून एक जमिनीवर लोळून पडत तेव्हां ती पुन्हां जाऊन रावणाच्या धडावर चिकटू लागली.








तेव्हां बिभीषणाने एक गुपित सांगितले. रावणाच्या पोटात अमृत पात्र आहे. ते जोपर्यंत बाहेर येऊन पडत नाही तोंपर्यंत रावणाचा वध होणार नाही. रामाने ब्रह्मास्त्र टाकून ते काम केले.

रावणाचे एकच डोके राहिले व तो तसाच जमिनीवर आदळला.

अशातऱ्हेने रावणाचा भेदसांगितल्यामुळे बिभीषणाला 'घरभेदी' असे नाव कायमचे पडले.

रावण रणांगणावर पडल्यावर लंकेच्या साम्राज्याचा ऱ्हास झाला आणि राक्षसांचे राज्य कायमचे नष्ट झाले.

विभीषण लंकेचा राजा झाला.

रावण आणि कुंभकर्णाच्या वधानंतर जय आणि विजय यांचा दुसरा जन्म संपला.

अशोकवनातून सीता आली.

राम तिला म्हणाला—"सीते! मी त्या दुष्टाला शिक्षा केली व राजा म्हणून आपल्या कर्तव्याचे पालन केले. रावणाने तुला बळजबरीने उचलून लंकेला नेले. मी तुझा स्वीकार करून तुला अयोध्येला कसा घेऊन आणार? आतां तू तुला हवे असेल तशी जा!"

सीतेने तेथे असलेल्यांना आज्ञा दिल्यासारखी खूण केली की अग्नि प्रज्वलित करा.

सीतेने रामाच्या चरणारविंदावर दृष्टी ठेवून नमस्कार केला आणि अग्नीत उडी टाकली. अग्नी भगभग करून जळू लागला.

त्या आगीतून अग्निदेवाने प्रकट होऊन सीतेला नवीन उमललेल्या कमळासारखे दोन्ही हातात उचलून आणून रामाला म्हटले—"रामा, सीताही अग्नीसारखी पवित्र आहे. तिचा स्वीकार कर!"

त्याच वेळी स्वर्गातून विमानात बसलेला दशरथ सर्वांना दिसला. तो म्हणाला—बाळा, रामचंद्रा! सीता अग्नि परीक्षेत पवित्र म्हणून निघाली आहे. तू तिच्या बरोबर अयोध्येला जाऊन राज्य कर." असा त्याने आदेश केला. राम पुष्पक विमानांत सर्वांसह बसला आणि अयोध्येला प्रस्थान केले.





# प्रतिकार

पर्शियातील एका प्रदेशात तबरिस्तान नावाचे एक छोटेखानी राज्य होते. तेथील सुलतानाकडे दोन वजीर होते. थोरल्या वजिराला एक रूपवती मुलगी होती. तिला सुलतानाने पाहिल्यावर तो वजिराला म्हणाला—"तुला आनंद होईल, असं एक सांगतों! मी तुझ्या मुलीशी लग्न करण्याचा विचार करतोआहे. मुहूर्त जितका लौकर ठेवतां येईल, तेवढा लौकर ठेवून मला लवकर कळव तितके चांगले."

वजीर क्षणभर थक्क होऊन पहात राहिल्यावर म्हणाला—"माझी मुलगी चांगली विदुषी आणि हुशार आहे! धार्मिक वृत्तीची आहे. या लग्नाविषयी प्रथम तिला विचारायला हवे!"

"बोला की! तसंच करा! ती आपल्या नशिबाला धन्य म्हणेल!" सुलतान घमेंडीत म्हणाला.

परंतु वजिराने ती गोष्ट मुलीला सांगितल्यावर ती संतापली, एवढेच नव्हे तर चिडून म्हणाली—"अब्बाजान! या सुलतानाशी मी नाही लग्न करणार! कारण हा सुलतान आपल्या इतर बेगमां-सारखा मला सुद्धा एक बटकी करून टाकील!"

ही गोष्ट थोरल्या वजिराने सुलतानाला सांगतांच तो उग्ररूप घेऊन म्हणाला—"मी बळजबरी करून का होईना, तुझ्या मुलीशी लग्न करणार! मला कोण अडवितो, पाहातों!"

आतां राजधानीत राहणं धोक्याचं आहे, असा विचार करून वजीर व त्याची मुलगी घोड्यांवर बसून शहर सोडून निघाले. ती गोष्ट हेरांकडून सुलतानाला कळली. तो आपल्या अंगरक्षकां बरोबर त्या दोघांचा पाठलाग करू लागला.



एका तासानंतर सुलतान वजिराला व त्याच्या मुलीला पकडू शकला. नंतर त्याने निर्दयपणे वजिराची मान उडविली आणि त्याच्या मुलीला धरून राजधानीत आला.

“कायग, तुला इतकी घमेंड का! तू माझ्या सारख्या सुलताशी लग्न करायला नाकारतेस का? तुला आतां कोण वांच-विणार?” सुलतानाने वजिराच्या मुलीला संतापून विचारले.

“मी काही करू शकणार नाही. माझं रक्षण तो अल्ला वाला करील!” वजिराची मुलगी म्हणाली.

ही गोष्ट घडली त्याच्या दुसऱ्याच दिवशी सुलतानाला हेरांनी येऊन, राज्याच्या एका भागात प्रजेने बंड केल्याची बातमी सांगितली. लगेच त्याने थोरल्या वजिराच्या मुलीला पळू न देतां तिचे रक्षण करण्याची जबाबदारी धाकट्या वजिरावर टाकली आणि स्वतः सैन्य घेऊन बंड चिरडून टाकायला गेला.

वजिराच्या मुलीला अंतःपुरातल्या एका लहानशा खोलीत डांबून ठेवण्यात आले. तिचे रूप खिडकीतून पाहून धाकटा वजीर स्वतःच तिच्यावर भाळला. त्याने आपल्या एका विश्वास पात्र दासीला वजिराच्या मुलीकडे पाठविले.

ती दासी तिला म्हणाली–“माझ्या मालकांचे मन तुझ्यावर बसले आहे! त्यांचे एक उद्यान येथून जवळच आहे! त्यांच्या बरोबर त्या फुलवाडीत छान फिरतां येईल. सुलतानाला ही गोष्ट कळणे शक्यच नाही!”

ते ऐकून वजिराची मुलगी अत्यंत दुःखाने म्हणाली–“माझी तूर्तची स्थिती उद्यानात फिरण्यालायक आहे का ग? माझ्या वडिलांची मान माझ्या समोरच उडविण्यात आली. मला बळजबरीने आणून येथे डांबून ठेवले आहे! तू आपल्या मालकाला कधी असा निरोप पाठवू नका, असे सांग!”







धाकटा वजीर थोरल्या वजिराच्या मुलीने जे सांगितले ते ऐकून घाबरला, 'तिने ही गोष्ट सुलतानाला सांगितली तर आपल्याला शिक्षा सुटणार नाही. म्हणून सुलतानाने परतल्यावर ‘वजिराची मुलगी कशी आहे रे?’ विचारल्या बरोबर म्हणाला–“प्रभो! ती आपली बेगम होण्यलायक नाहीच तुम्ही तिकडे गेलात, आणि तिने एका दासीला माझ्याकडे पाठविले, म्हणे ती माझ्या बरोबर आणखी कोणत्याही देशात पळून जायला तयार आहे! तिकडे जाऊन लग्न करून घेऊन आनंदाने राहतां येईल, म्हणे! मी ते मान्य तर केलेच नाही व तिला खूप रागावलो!”

सुलतानाला भयंकर राग आला. म्हणाला–“अस्सं! तरमग या चांडाळणीचा वध कसा करावा, म्हणतोस? तिच्या शिरच्छेद करावा की तिला जिवंत पुरून टाकावे?”

धाकटा वजीर काही उत्तर देणार, इतक्यात एक म्हातारा नोकर म्हणाला–“सुलतान, अशी घाई करू नये. तिला कोठे तरी वाळवंटात सोडून द्यावे! तेथे तिने मरावे की जगावे हे तो परवरदीगार अल्ला ठरवील!”

“ठीक! तरमग तसेच करा.” सुलतानाने हुकूम सोडला.

शिपायांनी तिला एका वाळवंटात, जेथे वाळूचे डोंगर व दऱ्या होत्या अशा भयंकर प्रदेशात नेऊन सोडले. वजिराची मुलगी आकाशाकडे हात उचलून अल्लाची करुणा भाकू लागली. तेव्हां तिला त्यावेळी एका उंट वाल्याने पाहिले.

तो वजिराच्या मुली जवळ येऊन म्हणाला–“बाई, तुम्ही माझ्या घरी या, तुम्हांला तेथे कोणतेही भय अगर भीती नाही!”

वजिराची मुलगी त्याचे आभार मानून म्हणाली–“अहो, मला येथेच राहू द्या. तहान भागवायला जवळपास कोठें पाण्याची जागा असेल तर ती दाखवा, तेवढी कृपा पुरे!”



उंटवाला तिला एका मोठ्या तळ्याच्या काठी घेऊन गेला. ती तेथे एकटीच राहिली. तो उंटवाला जवळच्याच एका देशाच्या राजकुमाराचा नोकर होता. त्या राजकुमाराकडे मोठे सैन्य होते. नोकराने त्याला वजिराच्या मुली विषयी सांगितले.

तो राजकुमार लगेच तेथून निघाला व ती होती तेथे आला. त्या पूर्वी राजकुमाराने इतक्या सुंदर स्त्रीला पाहिले नव्हते.

तिच्या जवळ जाऊन राजकुमार आपली ओळख सांगून म्हणाला–"तू शहरांत येऊन माझं आतिथ्य स्वीकारावे!"

वजिराच्या मुलीने नकार देत म्हटले–"मला याच तळ्याच्या काठी राहू द्या!"

राजकुमार आपल्या गावी परत गेला. परंतु त्याला त्या रात्री झोप लागली नाही. वजिराच्या मुलीला एकटी वाळवंटात राहाली तर धोका होण्याची शक्यता आहे असे राजकुमाराला वाटले.

तो दुसऱ्या दिवशी त्या तळ्याच्या काठी गेला व एका झाडाखाली बसला. सकाळी उठल्यावर वजिराची मुलगी त्याला पाहून चकित झाली. तिने त्याला विचारले–"तुम्ही राज्याचे मालक! राज्य सोडून असे वाळवंटात येऊन राहणं धोक्याचं आहे. तुम्ही परत जाऊन आपल्या राज्याची व्यवस्था पहा!"

"तू म्हणतेस ते खरे आहे! परंतु तू माझ्याशी लग्न करायला मान्य केल्या शिवाय मी राजधानीत परत जाणार नाही." राजकुमार म्हणाला.

ते उत्तर ऐकून वजिराची मुलगी अश्रू ढाळून–"माझे रक्षण करण्याच्या प्रयत्नात माझ्या वडिलांचा निर्घृण खून झाला. त्यांनी इमाने इतबारे नोकरी करून ही त्या सुलतानाने त्यांचा खून केला. त्याचा प्रतिकार होईपर्यंत मी लग्नाचा विचारच करणार नाही." वजिराची मुलगी म्हणाली.

नंतर तिने त्या राजकुमाराला जे घडले होते ते सर्व सांगितले.

लगेच तो राजकुमार राजधानीत परतला आणि आपल्या सेनापती बरोबर एक मोठे सैन्य देऊन तबरिस्तानावर स्वारी करायला पाठविले. सेनापतीने तबरिस्तानच्या सुलतानाला आणि त्याच्या वजिराला कैद करून राजकुमारा समोर हजर केले.

राजकुमार दोघां कैद्यां बरोबर वजिराच्या मुलीकडे आला तेव्हां तिने त्याचा शिरच्छेद करण्याऐवजी त्याला वाळवंटात सोडून द्यायला सांगितले, त्या म्हाताऱ्या नोकराला घेऊन यायला सांगितले. सैनिकांनी त्या नोकराला गौरवपूर्वक आणून वजिराच्या मुलीची भेट करून दिली.

त्या कैद्यां बरोबर राजकुमार आणि वजिराची मुलगी राजधानीत आले. तेथे तिने धाकट्या वजिराला जे घडले ते सर्व खरेखरे सांगायला सांगितले. वजीराने प्राणभयाने थरथर कांपत त्याने सुलतानाला खोटे सांगितल्याचे कबूल केले.

राजकुमाराने वजिराला वाळवंटात सोडून यायला सैनिकांना आज्ञा केली. काही काळ लोटल्यावर त्या वाटेने जाणाऱ्या व्यापाऱ्यांना त्याचे प्रेत दिसले.

आतां सुलतान सुद्धां राजकुमाराच्या हुकमाने कुत्र्याचे मरण मेला. निर्दोष थोरला वजीर ज्या तऱ्हेने कत्तल होऊन मेला त्याच तऱ्हेने राजकुमाराने सुलतानाचा शिरच्छेद केला.

म्हाताऱ्या नोकराला राजकुमाराने आपल्या राज्यातील एका भागाचा अधिकारी तर नेमलाच त्याच बरोबर त्याला पुष्कळ मोठे इनाम देऊन त्याचा गौरव केला.

फार पूर्वी निर्दयपणे मारल्या गेलेल्या पित्याच्या वधाचा प्रतिकार झाल्यानंतर वजिराची दुःखी मुलगी आनंदाने हंसली. आतां ती आपल्याशी लग्नाला तयार होईल असे वाटून राजकुमाराला ही आनंद झाला.



## चांदोबातील नवलाई



### बोलणारा हत्ती

सोव्हिएट रशियातील करगंडा 'झू मध्ये एक हत्ती आहे. तो गर्वाने आपले नाव 'बाटीर' हे उच्चारतो. आणखी आश्चर्याची गोष्ट म्हणजे, तो 'गुड बॉय' (चांगला मुलगा) म्हणतो. तो काय बोलतो ते त्याला कळते असे मात्र नाही. त्याला पहायला येणारांकडूनच हे शब्द त्याने शिकून घेतले आहेत. अनुकरण करण्याचा हा अद्‌भुत जन्मजात गुण त्याच्यात आहे.

### चीनच्या ह्युबे डोंगराळ प्रदेशात वनमाणसे



हिमाच्छादित प्रदेशात आढळणारा हा विक्षिप्त माणूस नाही, तर वनमाणूस आहे बरं! चीनच्या डोंगराळ ह्युबे प्रदेशात तेथील रहिवाशांनी विशालकाय वनमाणूस अलीकडेच पाहिला आहे–७ फूट उंचीच्या या वनमाणसांच्या अंगावर नखशिखांत भुरकट केस आहेत. ते पाने खातात व झाडांच्या शेंड्यावर झोके घेतात.



### चंद्रावरून सूर्य किरणे

फ्रान्स देशातील अंतरिक्षाचे अध्ययन व शोध करणाऱ्या 'फ्रेंच नॅशनल ऑफिस ऑफ एअरोस्पेस स्टडी अँड रिसर्च' मध्ये काम करणाऱ्या क्रिश्चन मार्चेल या वैज्ञानिक शास्त्रज्ञाच्या म्हणण्या प्रमाणे, एका विशिष्ट पद्धतीने तो चंद्रावर मोठे आरसे पोचविणार आहे. हे आरसे 'रोबट' च्या सहाय्याने चंद्रावर बसविण्यात येतील. ह्या आरशांमुळे सूर्यकिरणे पृथ्वीवर प्रतिबिंबित होतील आणि सुरुवातीला कांही भूभागांवर रात्रीच्या ऐवजी दिवस पहायला मिळतील.

## तुम्हांला माहीत आहे का?

१. हर्षवर्धन याच्या दरबाराची शोभा वाढविणारा कवी कोण? त्याने रचलेले ग्रंथ कोणते?

२. एकोणिसाव्या शतकात प्रसिद्धी पावलेले इंग्रज कवि जोडपे कोणते?

३. इंग्लंड मध्ये एकोणीसाव्या शतकात कादंबरीकार म्हणून प्रसिद्धी पावलेल्या दोघी बहिणी कोण?

४. बाल साहित्यात प्रसिद्धी मिळविलेला डॅनिश रचयिता कोण, तुम्हांला माहीत आहे का?

५. आपल्या घराचे नाव निरनिराळ्या अक्षरांनी लिहिणारा प्रसिद्ध इंग्रज कवीकोण?

(उत्तरें ६४ व्या पानावर)



## खोट्यावर खोटे

माधवपूरच्या जमिनदाराकडे गोविंद नावाचा काम करणारा एक मुलगा होता. त्याचा बाप जमिनदाराकडे नोकरी करीत असतां गोविंदच्या लहानपणीच वारला. त्याला त्याच्या आई शिवाय जवळचा नातेवाईक कोणीच नव्हता. जमिनदाराने त्याच्यावर दया करून त्याला आपल्याच घरी, नोकर म्हणून ठेवले. आता गोविंद अठरा वर्षांचा झाला होता.

एकदां जमिनदाराने गोविंदला एक काम सांगितले. त्याच्या मुलीचे लग्न शेजारच्या जमिनदाराच्या मुलाशी व्हायचे ठरले होते. त्यासाठी साखरपुड्याचा मुहूर्त पौर्णिमेच्या दिवशी ठरविण्यात आला होता. परंतु तो मुहूर्त काही कारणामुळे पुढे ढकलावा लागत आहे, हा निरोप भावी व्याह्यां कडे पोचविण्याचे काम गोविंदला सांगितले होते. ते काम त्याला सांगून जमिनदार गावात काही कामासाठी गेला.

गोविंद शेजारच्या गावी जायला निघणार तेवढ्यात दिवाणसाहेबांनी आणि नंतर राणी सरकारांच्या कडल्यांनी काही कामे सांगितली. ती सर्व कामे करून जायला संध्याकाळ झाली. त्या दिवसातला एक तासच उरला.

मुलांच्या गावी जाऊन परत यायला संध्याकाळ होऊन चांगली रात्र होणार रस्ता तसा बेताचाच होता. काळोखातूनच यावे लागले असते. ते त्रासाचेच होणार होते. परंतु मालकांनी जरुरीचे काम सांगितले होते. ते टाळतां येणे शक्य नव्हते.

गोविंद काय करावे, या विचारातच असतां एक म्हातारा नोकर त्याला म्हणाला–"रात्रीच्या वेळी कोठे जाणार रे? कीड मुंगी कोठे असणार सांगतां

श्री श्रीकांत स. नडकर्णी

       



येईल का ? साखरपुड्याला आणखी चार दिवस आहेत. उद्या बरं नाही हे सांगून एक दिवसाची सुट्टी मागून घे. गावातून परत येऊन मालकांनी रात्री विचारले तर निरोप पोंचविला, असे सांगितले की झाले." असा सल्ला म्हाताऱ्या नोकराने दिला.

तो सल्ला गोविंदला चांगला पटला. रात्री मालकांनी परत आल्याबरोबर गोविंदला निरोप पोचला का, चौकशी केली.

"पोंचविला मालक !" गोविंद म्हणाला.

"त्यांच्या घरात कोणाला तरी सांगितलेस का ? की जमिनदारसाहेबांनाच सांगितलेस ?" जमिनदाराने विचारले.

"जमिनदारसाहेब घरीच होते. त्यांनांच सांगून आलों, मालक !" गोविंद म्हणाला.

"ते काय म्हणाले ?" जमिनदाराने विचारले.

"ठीक आहे, असें सांग, म्हणाले मालक." गोविंद म्हणाला.

"त्यांच्या गावी जायच्या वाटेवरच्या ओढ्याला पूर आला होता, म्हणे ? मग तू कसा गेलास रे ?" जमिनदाराने विचारले.

गोविंद थोडादेखील न कचरतां म्हणाला–"मला पोहतां येते ना ! पोहून पलीकडे गेलो. परत येतांना लाकडी पुलावरून आलों."

जमिनदार साहेबांनी हळू हळू मान डोलावीत विचारले–"जमिनदारसाहेबांचे चिरंजीव त्यांच्या मामाच्या घरून काल परत येणार होते, ते आले का ?"

"परत आले मालक ! केव्हां आले ते मात्र माहीत नाही. घरांत दिसले खरे !" गोविंद म्हणाला.

"अस्सं जमिनदार साहेबांच्या मागच्या भिंतीच्या बाजूला आंब्याच्या झाडाला मोहोर आला होता का रे ?" जमिनदाराने विचारले.

ते मोहोर येण्याचे दिवसच होते, म्हणून गोविंदने न अडखळतां उत्तर दिले–"आतां आतांच मोहोर थोडाथोडा येऊ लागला आहे, मालक ?"

गोविंदला अज्ञातऱ्हेने खोट्या पाठी-मागून खोटे सांगत जाणे अवघड जाऊ लागले. मालकांनी आतां तरी सोडले तर बरे होईल, असे गोविंदला वाटले. परंतु शेजारीच एक खुर्ची पडली होती तीवर बसून जमिनदार साहेबांनी विचारले– "त्यांच्या घरची दुभती गाय दूध देत नव्हती, म्हणे, असे मी ऐकलं होतं, आतां कशी आहे रे ?



गोविन्दला ताबडतोब काय उत्तर द्यावे, सुचले नाही. परंतु त्याने विचार केला एवढे मोठे जमिनदार औषधपाणी केल्या-शिवाय राहतील का ? म्हणून त्याने थाप मारली–"आतां गाय चांगली आहे, मालक ! कोणताच आजार नाही."

ते उत्तर ऐकून जमिनदार साहेब थोडेसे स्मित करून म्हणाले–"कायरे, गोविंदा तू आतां पर्यंत जेवला आहेस की नाही ?"

त्याला त्यावेळी चांगली भूक लागली होती. परंतु त्या मोठ्या जमिनदाराकडे भोजन केले नाही म्हटलं तर त्या जमिन-दारसाहेबांना कमी लेखल्या सारखे होईल, असा विचार करून त्याने थाप ठोकून दिली–"त्यांच्या घरच्या लोकांनी पोटभर जेवायला घालूनच पाठविले. आतां घरी जातो, मालक !" कारण त्याला, आणखी किती खोटे बोलावे लागेल, यांची भीती वाटू लागली होती.

जमिनदार त्याच्या कडे खोल नजरेने पहात म्हणाले–"तू खोटे बोलायला केव्हां-पासून शिकलास रे ?"

तो प्रश्न ऐकून आपण खोटे बोलल्याचे मालकाला कळल्याचे त्याच्या लक्षात आलं तो भीतीने घामाघुम झाला.

पण जमिन दारसाहेब शांतपणे हंसत म्हणाले–"कायरे, तू त्या गावी काही कारणाने जाऊं शकला नसशील. ती गोष्ट मला सांगितली असतीस तर मी तुला, उद्यां जा म्हटले नसते का ? पण त्या साठी










एवढं खोटं बोलण्याची गरज काय होती ? एक खोटं लपविण्यासाठी खोट्यांवर खोटे बोलावं लागलं ना ? आतां पर्यंत ही गोष्ट तुझ्या लक्षात आलीच असेल ?

गोविंदला कांपरे भरलं होतेच. तो मान खाली घालून उभा होता.

"आज संध्याकाळी ते जमिनदार साहेब मला गावात भेटले होते. त्यांना मी मुहूर्त पुढे ढकलावा लागत असल्याचे सांगितले. ते घरातच होते असे तू खोटे सांगितलेस. ओढ्याला पूर आला होता म्हटले तर ते खरेच समजून तू आणखी एक थाप दिलीस. तो ओढा कोरडा पडला आहे, ही गोष्ट तुला माहीत नव्हती. होय ना ?" जमिनदारसाहेबांनी विचारले.

"माहीत नव्हते, मालक ! त्या बाजूला फार दिवसां पूर्वी गेलो होतो." गोविंद घाबऱ्या आवाजात म्हणाला.

ते उत्तर ऐकून जमिनदार मोठ्याने हंसून म्हणाला–"जमिनदार साहेबांचा मुलगा अजून मामाकडून परतला नाही. नंतर जमिनदारसाहेबांच्या परसांत आंब्याचे झाड नसून कडुलिंबाचे झाड आहे. त्याच प्रमाणे दुभत्या गाईला आजार वगैरे गोष्टी."

गोविंदने खाली घातलेली मान वर उचलली नाही.

जमिनदार खुर्चीवरून उठत म्हणाले– "गोविंदा, आता या पुढे तू कधी खोटे बोलू नकोस. खोटे हे विस्तवा सारखे समज. आज नाही तर कधी तरी बाहेर पडतेच !"

गोविंद हात जोडून म्हणाला–"माफ करा, मालक ! घरातली कामे बरीच राहिली होती, मालक ! आपण रागवाल की कां गेला नाही, म्हणून खोटे बोललो. यापुढे कधी खोटे बोलणार नाही."

"बर तर जा आत आणि मालकीण-बाईना भेट. त्या तुला वाढतील जेवायला." जमिनदाराने त्याला निरोप दिला.






[ ११ ]

[पिंगळला त्याच्या आईकडून त्याच्या थोरल्या भावांनी तिला कशी मारहाण केली व त्रास दिला कळले. परंतु दोघे भाऊ खोटे रडत आलेले पाहून त्याचा भ्रातृ स्नेह उचंबळून आला. त्याने त्यांना घरात बोलावून घेतले. त्या दोघांनी पिंगळने आणलेल्या धनसंपत्तीला हस्तगत करण्यासाठी त्याला एका तांडेलाला गुलाम म्हणून विकायचा कट केला. त्यानंतर-]

जीवदत्ताने तांडेलाला आपल्या धाकट्या भावा विषयी सांगितले ते ऐकून तांडेल 'खो खो' करून मोठ्याने हंसला. तो कां हंसला हे दोघां भावांना कळले नाही. ते परस्परांची तोंडे पहात राहीले.

तांडेल त्यानंतर थोडा विचार करून व थोडा वेळ थांबून जीवदत्ताकडे खोल नजरेने पहात म्हणाला–"तू म्हणतो आहेस ते सर्व खरे आहे ना? तुमचा पिंगळ नावाचा धाकटा भाऊ तुम्हां दोघांना व तुमच्या आईला फार त्रास देतो आहे, हे खरे ना? लक्षात ठेवा, हं, माझ्या जवळ खोटे बोललेले चालायचे नाही." नाहीतर त्याचा वाईट परिणाम होईल.

"अगदी खरं सांगतो. आहों, तांडेल साहेब ! माझ्या दादाने सांगितले त्यात अगदी थोडे सुद्धां खोटे नाही. इतके दिवस आमच्या धाकट्या भावाने जे कष्ट



दिले ते आम्ही इतके दिवस कसे सहन करीत आलो, ते त्या एकट्या परमेश्वरालाच माहीत!" लक्षदत्त म्हणाला.

तांडेल नंतर दोघांच्या चेहेऱ्याकडे थोड्या संशयी मुद्रेने पहात मान हलवून म्हणाला–"तसे असेल तर तुमच्या धाकट्या भावाला विकत घ्यायला मला मुळीच हरकत नाही. मी त्याला आपल्या जहाजांत दोन तीन वर्षे खलाशी म्हणून ठेवून त्याला खूप कष्टाची कामे देऊन तो सरळ मार्गावर आला की त्याला तुमच्या घरी परत पाठवीन. ठीक आहे ना?"

"तांडेल साहेब, ते करू नका तुम्हांला पुण्य लागेल!" असे म्हणत जीवदत्त थोडा दचकल्या सारखा झाला. "अहो, तो जात्याच दुष्ट आणि गुंड आहे. अशा माणसाला तुम्ही दोनतीन वर्षांनंतर परत पाठविलेत की तो आमचा दोघांचा जीव घेतल्या शिवाय राहणार नाही. नंतर आईला वाटेला लावील. तो म्हणजे डूक धरून बसणारा नागसापच समजा!" त्याला अजिबात परत आमच्यात पाठवूच नका.

"तसे असेल तर त्याला विकायला तुमची आईसुद्धां मान्य करील का? तिने काही तक्रार केली व त्यानंतर त्याने आमच्या विरुद्ध राजाकडे फिर्याद केली तर काय फायदा? विचार करून काय ते करा!" तांडेल म्हणाला.

जीवदत्त व लक्षदत्त दूर जाऊन काही तरी गुप्तपणे बोलल्या सारखं सोंग करून नंतर तांडेलाला म्हणाले ते असे:

"तांडेल साहेब, आम्ही सर्व गोष्टी आमच्या आईजवळ बोलूनच आलो आहो. त्याला कसेही करून घरातून काढावे, असेच तिच्या मनात आहे. तो तिचा छोटा मुलगा असला तरी त्याने दिलेल्या त्रासामुळे ती वैतागली आहे. तरी ती त्याला विकून त्याला गुलाम करून टाका, म्हणून तोंडाने सांगणार नाही. म्हणून तर आम्ही दोघे मिळून आलो आहों."



"अस्सं! तरमग त्याला आज संध्याकाळी सूर्यास्ताच्या सुमारास काही तरी कारण सांगून समुद्र किनाऱ्यावर घेऊन या. त्यानंतर काय करायचे ते मी पाहून घेईन. त्याला खरेदी करण्यासाठी मी देत आहे ती ही रक्कम घ्या!" असे सांगून तांडेल जीवदत्ताला शंभर मोहोरा देऊ लागला.

जीवदत्त तांडेलाने देऊ केलेल्या शंभर मोहोरा न घेतां म्हणाला–"तांडेल साहेब, त्याला समुद्रावर घेऊन येणे आम्हांला शक्य होईल से वाटत नाही. त्याला शंभर कोल्ह्याच्या युक्त्या आणि पन्नास बैलांची ताकद आहे. म्हणून तुम्हीच आमच्या घरी या आणि त्याला कसे ते धरून घेऊन या."

जीवदत्ताला वाटत असलेली भीति ओळखून तांडेल जोराने हंसू लागला. म्हणाला–"त्याच्या सर्व युक्त्या आणि पन्नास बैलांची ताकद माझ्या जवळ चालणार नाही. त्याची डाळ माझ्या जवळ शिजणार नाही, म्हणावं! तो एखादा राक्षस असला तरी मला माझ्या डोळ्यांना दिसला व त्याचा आवाज मला ऐकू आला की पुरे, त्याला हाता पायात लोखंडी बेड्या व साखळ दंड अडकवून त्याच्या कडून खलाश्याचं काम करवून घेणं माझ्याकडे लागलं. बरे तर आज रात्री मी आणखी दोघां खलाशांना बरोबर घेऊन तुमच्या घरी येतो. तुम्ही मात्र सर्व तयारी ठेवा."

"तुम्हांला शंभर नमस्कार. तुम्ही मदत करीत आहां त्याबद्दल आम्ही फार फार आभारी आहो!" असे सांगून आणि तांडेलाने दिलेल्या शंभर मोहोरा घेऊन दोघे तेथून निघाले. त्यांना त्यावेळी परमावधीचा आनंद झाला होता.

"आतां आपण पिंगळला कोणत्याही प्रकारे संशय येऊ नये अशा तऱ्हेने वागले बोलले पाहिजे. तांडेल आपल्या बरोबर आणखी दोघां खलाशांना घेऊन येतो आहे, ही गोष्ट त्याच्या मनात शंका यायला कारण होऊ शकते." लक्षदत्त म्हणाला.

"तसे भ्यायचे मुळीच कारण नाही. त्यासाठी जरूर पडली तर मी एक युक्ती योजून आधीच ठेवली आहे." असे सांगून जीवदत्तने एकदा कोणी पहात नाहीना, हे चारी बाजूला पाहिले आणि लक्षदत्तच्या कानात काहीतरी सांगितले.

लक्षदत्त जोराने हंसला आणि टाळ्या वाजवून आनंदाने म्हणाला–"दादा, बृहस्पतीला सुद्धा तुझ्या समोर मान वांकवावी लागेल! पिंगळने आणलेले धन आपले झाले की जे भाग होतील त्यावेळी तू माझ्यावर अन्याय तर करणार नाहीस ना?"

"अन्याय! छी: छी:! सख्या धाकट्या भावावर असा मी अन्याय करीन? ते आपल्या कुटुंबात कधी झालं आहे का?" जीवदत्त म्हणाला.

दोघे भाऊ हंसत खेळत उड्या मारीत घराजवळ आले. दारातच पिंगळला पाहून लगेच दोघे एकदम कोणते तरी मोठे संकट आल्याचे सोंग करून ते पिंगळ जवळ आले.

पिंगळने दोघांकडे पाहीले आणि विचारले–"काय झालं रे, दोघांची तोंडें अशी उतरलेलीं कां?"

जीवदत्त घोगऱ्या आवाजात म्हणाला–"काही नाही रे, छोटू! आज वाटेत आम्हांला आमचा एक जुना मित्र तांडेल भेटला. तो या गावी काही व्यापाराच्या कामाने आला आहे. त्याने मागे आम्हांला त्याच्या घरी उतरवून खायला प्यायला घातले होते. किती आदर सत्कार केला होता! परंतु आम्ही त्याचा आदर सत्कार एकदां ही करू शकलो नाही. आम्ही जन्मल्या पासूनच दरिद्री नाही का?"

"दादा, तुमचा मित्र म्हणजे माझा सुद्धा मित्रच नाही का रे? आतां आपण दरिद्री नाही. पाहिजे तर आपण अवंती नगरीतल्या सर्व रहिवाश्याना दररोज मेजवानी द्यायची म्हटलं तरी ते आपल्याला शक्य आहे. तुमचा मित्र तो तांडेल आहेना, त्याला त्याच्या चार चौघां अनुयायां बरोबर आज रात्री जेवायला ये, म्हणावं! पाहिजे तर त्याला आपल्या घरीच रहायला येऊ दे!"

"खरंच! खरंच म्हणतोस कारे छोटू?" या शब्दात जीवदत्त व लक्षदत्त मोठ्या आनंदाचा आव आणून म्हणाले.

"खरंच म्हणतो आहे मी तुम्ही तुमच्या त्या मित्राला आज खरोखरच जेवायला घेऊन या." पिंगळ म्हणाला.

"ठीक! तर आम्ही आतांच जाऊन त्याला सांगून येतो." असे सांगून जीवदत्त व लक्षदत्त गावात जातो म्हणून सांगून निघाले.

दोघे जुगारीच्या अड्ड्यावर आणि दारूच्या दुकानात वेळ घालवून संध्याकाळी तांडेलाच्या घरी गेले आणि त्याला बरोबर चलायला सांगितले. तांडेल आनंदाने आपल्या बरोबर दोघां बलदंड खलाश्यांना







घेऊन त्या दोघां भावां बरोबर निघाला.

तांडेलाचे अणि त्याच्या अनुचरांचे पिंगळने हृदयपूर्वक स्वागत केले. ते सर्व एका खोलीत बसल्यानंतर पिंगळ व त्याच्या आईने ती मंत्र-वलेली पिशवी घेऊन त्यांतून निरनिराळे व ताजे गरमगरम खाद्यपदार्थ व पक्वान्ने काढून ती सर्व पाहुण्यांना वाढली. फक्त तांडेलाला त्या मंत्र-वलेल्या पिशवीचा महिमा माहीत नव्हता. जीवदत्त आणि लक्षदत्त आपला केवढा मोठा सत्कार करीत आहेत, असे त्याला वाटले.

दोन प्रहर रात्र उलटेपर्यंत सर्व इकडच्या तिकडच्या गप्पांत रंगले होते. पिंगळ पेंगू लागला की अकस्मात् त्याच्यावर तुटून पडून त्याला बांधून टाकायचे तांडेलने ठरविले होते. परंतु पिंगळला झोंप येत नव्हती. तो गप्पात रंगलेला होता.

आतां वेळ व्यर्थ घालविण्यात अर्थ नाही असा विचार करून तांडेलाने त्याच्या अनुचरांना खूण केली. जीवदत्त व लक्षदत्त दोघांना ती खूण माहीतच होती. चौघे गप्प बसलेल्या पिंगळवर एकाएकी तुटून पडले. काही जणांनी त्याला हात पाय हालविता येऊ नये असे घट्ट धरून ठेवले. जीवदत्त आणि लक्षदत्ताने तो ओरडू नये म्हणून त्याच्या तोंडात बोळे कोंबले.

पिंगळ सुरवातीला काहीच न कळल्याने निश्चेष्टसा होता. परंतु पापणी लवायच्या आत स्वतःला सावरून तो हात पाय धरणाऱ्यांच्या हातून आपल्याला सोडवायचा यत्न करू लागला. परंतु तो एकटा होता आणि त्याला धरणारे पांच जण होते. इतक्यात त्याला त्याचा दासानुदास भल्लूककेतू आठवला. कशाही प्रकारच्या संकटात पडलास की एक विशिष्ट मंत्र म्हटलास की तो तत्क्षण तेथे हजर होईल, असे सांगून त्याने तो मंत्र पिंगळला सांगितला होता. परंतु त्या बिकट परि-स्थितीत पिंगळला तो मंत्र आठवला नाही. तो त्या असहाय्य अवस्थेत तांडेलाचा गुलाम झाला.

शेजारच्या खोलीत पिंगळची आई झोपली होती. तिला हे सर्व काहीच कळले नाही. दोघां खलाशांनी पिंगळचे हातपाय बांधल्यावर त्याला आडवे खांद्यावर उचलून नेले. त्यांचा मालक तांडेल पुढ-पुढ चालत होता आणि ते त्याच्या मागे. जीवदत्त व लक्षदत्त सुद्धा त्यांच्या बरोबर समुद्र तीरावर गेले. ते तांडेलाला म्हणाले—"आमच्या भावाला कोणत्याही परिस्थितीत सोडू नका. तो म्हणजे डूक धरणारा नाग आहे! मी ही गोष्ट तुम्हांला मागेच सांगितली आहे!"

"त्या विषसर्पाच तोंड घट्ट बांधून ठेवले आहे. त्याचे विषाचे दांत कसे काढायचे हे सुद्धा मला माहीत आहे. माझ्या पडावांतल्या लोखंडी दांडयाला लोखंडी पट्टीने त्याचे पाय अडकविले की तो परमेश्वर सुद्धा त्याला तेथून हालू देणार नाही.

जीवदत्त व लक्षदत्त दोघांनी तांडेलाचे एकदां नाही दोनदां आभार मानले आणि घरी परत आले. नंतर अजून उजाडलं नाही, म्हणून झोपेचे सोंग करून उजाडल्या बरोबर घाई घाईने आईकडे



जाऊन म्हणाले—"आई ! पिंगळ कोठे आहे ग ?"

आई त्यांच्याकडे भोळ्या नजरेने पहात म्हणाली—"कायरे इतके घाबरल्यासारखे कां विचारतां आहां ? तो खोलीत झोपला असेल, जाऊन पहा !"

"खोलीत नाही, घरात आणखी असेल म्हणावे तर त्याचा पत्ताच नाही." जीवदत्त म्हणाला.

ते ऐकून त्या परिस्थितीत आईला फार भीती वाटली. ती घाई घाईने खाटेवरून उठली आणि सर्व घर तिने हुडकून पाहिले. तिची ती घाई पाहून जीवदत्त तिला म्हणाला—"आई, माझ्या मनात एक शंका

येते आहे, छोटू, रात्री आपल्या घरी जेवायला आलेल्या तांडेला बरोबर तर दर्यावर प्रवासाला गेला नसेल!"

"तेच झाले असेल. कोणत्या तरी बेटावर जुने पडके किल्ले आहेत व त्यांच्या पायांत गुप्तधन पुरलेले आहेत असे सांगून तो तांडेल धाकटूला सांगत असतांना मी ऐकले होते. तशा वस्तू बाहेर खणून काढणे छोटूला डाव्या हाताचा खेळ वाटतो. पिंगळ तसे सांगतही होता." लक्षदत्त म्हणाला.

भाबड्या आईला त्या गप्पात काही तरी खरे असावेसे वाटले. तिने देवावर विश्वास ठेवून हात जोडले व म्हणाली-"होय, होय! रे! पिंगळ कित्येक दिवसां पासून नशीबीच! त्याची सद्बुद्धी आणि न्यायबुद्धी कशाही प्रकारच्या आंपत्तीतून त्याचे रक्षण करीत आलेल्या आहेत. माझा बाळ लौकर परत येईल." असे म्हणत तिने पुन्हां आकाशाकडे पाहून हात जोडले.

आई म्हणाली ते ऐकून दोघां भावांना कमालीचा राग आला. ते आईकडे विकृत हास्य करून पहात म्हणाले-"तो मोठा बुद्धिवान आहे आणि दुष्ट आम्ही आहों, होय ना? पहिल्या पासूनच तो तुझा लाडका, म्हणून तू पक्षपात करीत आली आहेस. आतां आम्ही या घरात एक क्षण ही राहणार नाही. बाबांनी मागे जे ठेवले आहे ते घरात हुडकून सर्व घेऊन जातों."

आई त्यांना म्हणाली-"तुमच्या वडिलांनी मागे सोडलेले सर्व तुम्ही दोघे केव्हांच घालवून बसलात. आतां घरात आहे ती सर्व पिंगळची कमाई आहे."

ते ऐकून दोघे उग्र रूपधारण करून आईला शिव्या देऊ लागले. त्यांनी, पद्मपादकडून पिंगळने आणलेले सर्व धन आणि मंत्रवलेली पिशवी सुद्धा उचलून नेली.

(क्रमश:)



# श्रावणाची गोष्ट

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमी प्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला-"राजा, या भयंकर स्मशानात अशा रात्रीच्या वेळी तू एवढे परिश्रम करीत आहेस. परंतु तुझी ही मेहनत फुकट नाही असे मात्र नाही. असं कधी झालं तर तू रागावण्यात अर्थ नाही. सर्व आपल्याच कृतीचे फळ आहे अशी मनाशी समजूत करून घ्यावी लागते. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला श्रावण याची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

कांभोज नावाच्या देशाचा चंद्रपाल नावाचा राजा फार दयाळू होता. कोणी त्याच्याकडे मदत मागायला आला तर



त्याच्या तोंडून कधी नकार मिळत नसे. तो त्याला शक्य होईल तेवढे धन सहाय्य करीत असे. त्याच्या दरबारात अनेक कवी व पंडित होते. दररोज संध्याकाळी आपल्या कविता म्हणून दाखवीत.

एक दिवशी श्रावण नावाचा एक कवी राजाश्रय मिळावा, या आशेने आला आणि चंद्रपालच्या कीर्तीचे गायन त्याने एक अशी कविता रचून केले. ती कविता ऐकून राजा खूष झाला व त्याने श्रावणला आपल्या दरबारात चांगला पगार देऊन नोकरीवर ठेवून घेतले.

दुसऱ्या दिवसापासून श्रावण दरबारात येऊ लागला. संध्याकाळी कवी आपापल्या कविता म्हणून दाखवू लागले. पंडितांचा शास्त्रार्थ चालू असतां राजाचंद्रपाल कविता व शास्त्रार्थ लक्ष देऊन ऐकत होता. परंतु श्रावणाला त्याच्या बरोबरचे कवी व पंडित कविता म्हणत किंवा शास्त्रार्थ करीत त्यात काही निरर्थक गोष्टी, शब्द दोष व काव्यदोष आढळू लागले. आपण सुरवातीलाच त्यांचे खंडन करणे रास्त होणार नाही, असे समजून ते सर्व सहन केले. परंतु हळूहळू त्याला ते असह्य वाटू लागले.

परंतु राजा चंद्रपाल त्यांचा दोषपूर्ण शास्त्रार्थ आणि कविता ऐकून खूष होई हे पाहून श्रावणला आश्चर्यच वाटले. परंतु त्याला एका गोष्टीची शंकाही वाटत होती. कदाचित अशा पंडितांना व कवींना काढून टाकलं तर ते निराश्रित होतील म्हणून तर राजा त्यांना काढीत नसेल?

त्याने चवकशी करून पाहिली तेव्हां त्याला असे आढळून आले की एका दोघांना सोडून बाकी सर्व जण चांगल्या स्थितीतच होते.

तेव्हां श्रावणला राजाच्या काव्य रसिकते विषयी आणि त्याच्या स्वतःच्या काव्यकले विषयी शंका वाटू लागली. चंद्रपाल फक्त ऐकतच असे, स्वतः त्याने कधी आपली कविता म्हणून दाखविली नाही. शास्त्रार्थ ऐकून तो फक्त खूष होई, स्वतः कधी त्याने शास्त्रार्थांत भाग घेतला नाही.

पुढे एकदा शंकरानंद नावाचा एक श्रेष्ठ पंडित काशीहून कोशलच्या वाटेवर कांभोज नगरी आला. तो गावात एकच दिवस राहायला थांबला. श्रावणने त्याला भेटून आपली कविता म्हणून दाखविली व विनंती केली—"मी काव्यकलेत आणखी उन्नती करावी व काही शिकायला मिळावे, या हेतूने मी आपणांकडे आलो आहे. प्रस्तुत मी राजाच्या आश्रयाला दरबारात आहे. माझ्या काव्यकले विषयी आपले विचार आपण मला सांगावे."

शंकरानंद स्मित करून म्हणाले—"तुला राजाश्रय मिळाला आहे ना? तो कवी म्हणून नव्हे तर एक व्यक्ती म्हणून. बाबारे, तू स्वतःला कवी म्हणविण्यासाठी पुष्कळ मेहनत करण्याची गरज आहे."

श्रावणनें शंकरानंदांचे आभार मानले आणि परत येऊन चंद्रपालचे प्रधान विशाल यांना भेटायला गेला व म्हणाला—"प्रधान, मला कवी म्हणविण्यापुरते अल्प ज्ञान आहे. तरी त्याची स्तुती करून महाराजांनी आपल्या दरबारात मला आश्रय दिला आहे. त्याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहे. मी आणखी विद्याभ्यास करण्यासाठी काशीला जात आहे. मला आपण निरोप व आशीर्वाद द्यावा ही विनंती करायला आलो आहे."





प्रधानाने श्रावणकडे खोल दृष्टीने पहात म्हटले-"श्रावण तुला कोणाचा किती व कसा आदर करावयाचा हे तर चांगलेच माहीत आहे. शिवाय तू हुशार ही आहेस. परंतु तू निरोप घ्यायचा तो महाराजाचा घ्यावास,"

ते ऐकून श्रावण स्मित करून म्हणाला– "प्रधान, महाराजांनी माझ्यावर दर्शविलेले प्रेम व कृपा मी विसरणार नाही, त्यांच्याशी निराळ्या तऱ्हेने वागण्याइतका मी कृतघ्न नाही."

त्यानंतर श्रावण राजाचाही निरोप घेऊन निघून गेला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा, श्रावणने एकच अशी कविता राजाची प्रशंसा करून म्हटली. त्यावर खूष होऊन राजाने त्याला दरबारात आश्रय दिला. अशी संधी मिळाली असतां ती हातातून जाऊ देणे हा अविवेकच नव्हे का? हे संकट त्याने स्वत: होऊन आपल्यावर ओढून घेतले. सभेतील कोणत्याही कवीची अगर पंडिताची निंदा करण्यात काही अर्थ नाही. त्यांची जेवढी योग्यता व विद्वत्ता आहे तिच्यावर अवलंबून राहून आनंदाने आयुष्य घालवीत आहे. आणखी एक गोष्ट, श्रावणाने स्वत:ला कवी म्हणवून घेण्यासाठी पुष्कळ अध्ययन व श्रम करणे आवश्यक असल्याचे शंकरानंदांनी त्याला सांगितले. अशा व्यक्तीला प्रधानानी तू हुशार आहेस अशी स्तुती केली. त्यात प्रधानाचा हेतू काय होता? ह्या शंकाचे समाधान कारक उत्तर माहीत असूनही तू दिले नाहीस तर त्याचा परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

त्याचे उत्तर देत विक्रमादित्य म्हणाला– "श्रावण हुशार आहे, असे म्हटले तर त्यांत शंकाच नव्हती. त्याच्या सारख्या कवीला राजाश्रय मिळाला या बद्दल शंकरानंदांना आश्चर्यच वाटले होते. त्याला तो कवी म्हणून नव्हे तर एक व्यक्ती म्हणून त्याने काव्य कलेत पुष्कळ मेहनत करण्याची गरज आहे, असे सांगितले. श्रावणला ज्ञानाची भूक होती. स्वत:ची उन्नती करून घेण्याची इच्छा असणाऱ्या व्यक्तीचे गुणदोष सांगणाऱ्या व्यक्तींची गरज असते. असे लोक चंद्रपालच्या दरबारात नव्हते. श्रावणला तशी व्यक्ती तेथे मिळाली नाही. श्रावणची एक सामान्यशी कविता ऐकून चंद्रपाल खूष झाला होता. अशा राजाच्या दरबारात राहून श्रावणला खरा कवी कधीच होण्याची शक्यता दिसली नाही. म्हणून तो आणखी कोठेतरी जाण्याचा विचार करू लागला होता.

राजा चंद्रपाल फारसा हुशार किंवा विवेकी असेल असे श्रावणला दिसले नाही. अशा राजाचे राज्य सुरळीत आणि व्यवस्थित चालत होते त्याला कारण, आड राहून सर्व चक्रे फिरविण्याचे काम प्रधान करीत होता हे. म्हणूनच श्रावण प्रधानाला भेटून त्यांचा निरोप घ्यायला गेला होता. त्याला त्या गोष्टीची चांगली कल्पना झाली तेव्हां हे सर्व ग्रहण करणारी व्यक्ती हुशार असल्याचे प्रधानाने सांगितले तर त्यात चूक नव्हती.

"तुला आश्रय देणाऱ्या महाराजां कडून निरोप घेण्या व्यतिरिक्त माझ्याकडून निरोप घेण्याची गरज नाही." प्रधानाने हे म्हटले त्यात त्याला सावध करण्या शिवाय एक सूचना सुद्धा आहे. म्हणजे राजा चंद्रपालचे अज्ञान श्रावणने जगजाहीर करू नये ही. श्रावण सूक्ष्मग्राही सुद्धा असल्या कारणाने त्याने प्रधानाला हे म्हटलं की राजाचा निरोप घेतल्या शिवाय त्यांची कृपा व प्रेम विसरून जाण्या इतका मी कृतघ्न नाही."

"राजा चंद्रपाल तितकासा हुशार नसेल. परंतु चांगला उदार पुरुष होता. ती गोष्ट श्रावणला व प्रधानाला माहीत होती. राजा विषयी त्यांच्या मनात असलेला आदर व्यक्त करतो. त्यावरून ते किती गुणवान आहेत हे ही कळून येते."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





# नियम भंग करणारा

विंध्य पर्वताच्या प्रदेशात एका सरोवराच्या काठी एक गुरुकुल होते. मातंगस्वामी नांवाचे एक विद्वान गुरु ते गुरुकुल चालवीत असत. त्यांच्या गुरुकुलांत मोठमोठ्या श्रीमंतांची मुले विद्याभ्यास करीत. त्यांच्यात विरूप नांवांचा एक मुलगा होता. तो त्या देशाच्या राजाच्या मेहुण्याचा मुलगा होता.

विरूप हा थोडा खोडकर व खटयाळ मुलगा होता. गुरुकुलातली शिस्त व नियम मोडण्यातच त्याला एक तऱ्हेचा आनंद वाटे. मातंगस्वामींचा उजवा पाय थोडा लंगडा होता. ते पाहून विरूप आपल्या मुलांना गुरुजींची थट्टा करीत. सहपाठी पंगुस्वामी म्हणून हाक मारून सांगे. काही दिवसांनी ती गोष्ट मातंगस्वामींना सुद्धा कळली.

एके दिवशी मातंगस्वामींनी त्या दिवसाचा अभ्यास संपल्यावर मुलांना एक गोष्ट सांगितली. ती अशी:

" गोष्टीही होऊन सुमारे पन्नास वर्षें झाली असतील. या सरोवराच्या पलीकडच्या तीरावर भैरवानंद नावाचे एक विद्वान गुरु एक गुरुकुल चालवीत असत. त्यांना सडशास्त्रांतील पांडित्य बरोबर मंत्रशास्त्रातही चांगली गती होती. विद्याभ्यास पुरा करून विद्यार्थी जाऊ लागले तर त्यांतील कोणी इच्छा व्यक्त केली तर भैरवानंद त्या विद्यार्थ्यांना मंत्र-तंत्र सुद्धा शिकवीत असत.

एकदा सुभानु आणि मातंग नावाच्या दोघां विद्यार्थ्यांनी शिक्षण संपल्यावर मंत्रशास्त्रात थोडा प्रवेश करून देतां का म्हणून गुरुजींना विचारले. भैरवानंदांनी आनंदाने ते कबूल केले आणि त्यांना एक मंत्र शिकविला. नंतर त्यांनी त्यांना बजावून सांगितले–" बाबांनो! तुम्हांला हा मंत्र म्हटला तर वाटेल ते रूप मिळू शकेल. एक दोन नियमांचं मात्र कडकपणे पालन केले पाहिजे. अगदी अत्यावश्यक असेल अशाच वेळी या मंत्राचा उपयोग करावा. फक्त मंत्रशक्तीची परीक्षा घेण्या-साठी किंवा इतरांना दाखविण्यासाठी या मंत्राचा उपयोग करता कामा नये. कोणत्याही कारणाने अंगात काही व्यंग आले तर या मंत्राचा उपयोग होणार नाही."

श्री गो. ना. सावंत

दोघां शिष्यांनी गुरुजवळ तो मंत्र शिकून घेतला आणि राजदरबारात नोकरी मिळावी म्हणून राजधानीच्या शहराच्या वाटेने निघाले. वाटेत एक नदी होती. ती पार करून जायचे म्हणजे एक तरी होता. परंतु नाववाला पलीकडच्या तीरावर गेला होता. तो परत या तीरावर आल्या शिवाय तरीत बसून नदी पार जाणे शक्य नव्हते.

तेव्हां मातंग सुभानला म्हणाला–" त्या काठावर पुरेसे प्रवासी जमेपर्यंत तो नाववाला काही निघणार नाही. आपल्या गुरुजींनी शिकविलेला मंत्र आहे ना, आपण माशाचे रूप घेऊन पैलतिरी जाऊं या!"

" परंतु गुरुजींनी आपल्याला बजावून एक नियम सांगितला आहेना, की फक्त परीक्षा म्हणून मंत्राचा उपयोग करू नये!" सुभानने आठवण करून दिली.

त्या नियमावर चिडून जाऊन मातंग म्हणाला–" तर मग तू तर येईपर्यंत थांब.



मी मासा होऊन पलीकडे जातो." असे सांगून तो माशाचे रूप घेऊन पैलातिरी गेला.

काही वेळाने सुभान नावेत बसून पलीकडे जाऊन मातंगला भेटला. तेथून चालत राजधानीपर्यंत जाणं जिवावर आलं मातंगच्या. तो सुभानला म्हणाला– "कायरे, आपण एकाद्या पक्ष्याचे रूप घेऊन राजधानीपर्यंत उडत गेलो तर? काय ठीक होईल ना?"

सुभानला ते बरोबर वाटले नाही. मातंगने त्याला मूर्ख अविवेकी मानले आणि मंत्र म्हणून कबुतराच्या रूपे आकाशांत उडू लागला. कबूतर होऊन तो बराच वेळ उडत राहल्यावर थोडा दम घ्यायला

    



एका झाडाच्या फांदीवर उतरून बसला. त्याच वेळी आकाशांतून एक ससाणा उडत जात होता. त्याला ते कबूतर दिसले. त्याने जोराने झडप मारली आणि आपल्या पंजांत धरून पुन्हां आकाशात उडू लागला. ससाण्याच्या तोंडून स्वतःचे रक्षण करण्यासाठी मातंग परत माणसाच्या रूपे प्रगटला.

आपल्या पंजात साप असलेले कबूतर माणूस झालेले पाहून ससाणा घाबरला आणि त्याने पंजे ढिले केले. म्हणून फार उंचावरून खाली जमिनीवर एका झुडपावर पडला. त्यामुळे त्याचा जीव वांचला असला तरी अंगाला पुष्कळ लागले आणि उजवा पाय मोडला.

वाटेने जाणाऱ्या काही तीर्थयात्रेला-जाणाऱ्या लोकांनी त्याला पाहिले. त्यांच्या मदतीने मातंग काही दिवसांनी गुरु भैरवानंद यांच्या गुरुकुलात येऊन पोंचला. त्याने जे घडले ते सर्व गुरूला सांगितले व फार दुःखी झाला.

भैरवानंदांनी त्याचे सांत्वन केले व त्याचे औषध पाणी केले. त्यामुळे जखम भरून आली तरी मातंगाचा लंगडेपणा कायम राहिला. शिवाय गुरूने दिलेला मंत्र कायमचा निरूपयोगी झाला. सुभानला मात्र राजदरबारात् नोकरी मिळाली. तो राज्याचा मुख्य शिक्षणाधिकारी झाला.

मातंगस्वामी कथा संपल्याचे सांगून म्हणाले—"गुरूने घातलेला नियम भंग-केल्याने मातंग कायमचा लंगडा झाला आणि मंत्राने लाभलेली अपूर्व शक्ती कायमची घालवून बसला. तो मातंग मीच मातंगस्वामी म्हणून तुम्हांला आज शिकवितो आहे. गुरुभक्ती नसलेल्या शिष्याला कधीच विद्या लाभत नाही." असे सांगत मातंगस्वामी लंगडत लंगडत आपल्या कुटीरात गेले.

त्या दिवसापासून विरूपाने गुरूकुलाच्या एकाही नियमाचे उल्लंघन केले नाही. मातंगस्वामींची, लंगडेस्वामी म्हणून कधी पुढे थट्टा सहपाठ्यां समोर केली नाही.






# वस्तादबायको

एका गावात एक कुटुंब वत्सल माणूस रहात असे. त्याने ज्या बाईशी लग्न केले होते ती मोठी वस्ताद होती. नवरा मऊ स्वभावाचा असल्या कारणाने ती जास्तच चढेल झाली. जमीन मऊ सांपडली की कोपराने खणतात, म्हणे.

बायको लग्न होऊन नवी आली तेव्हां नवरा पुरुषांनी करावयाची सर्व कामे करीत असे. परंतु हळूहळू बायकांनी करावयाची कामे सुद्धां एकेक करून त्याच्यावर येऊन पडू लागली. त्याची बायको शेतावरची कामें मुळीच करीत नसे. तरी घरची कामें त्याला करावी लागत. गाई गुरांची कामे त्यालाच करावी लागत. बकऱ्या मेंढ्याची कामें ही तोच करी. एवढेच नव्हे तर पाणी आणणे, केर काढणे कपडे धुणे आणि चूल पेटविणे सुद्धां त्यालाच करावे लागे.

इतके कष्ट व बायकोची चाकरी करून ही त्याला बायको तोंडाला येई ते बोलायला कमी करीत नसे. त्याने केलेल्या कामात चुका काढीत असे. बायकोच्या शिव्या शाप ऐकायला किंवा काही वेळ दम घ्यायला सुद्धा त्याला वेळ मिळत नसे. म्हणून कामा निमित्तच त्याला इकडे तिकडे करावे लागे तेव्हां त्याची बायको एका जागी स्वस्थ उभी राहून त्याला ऐकू जाईल, इतक्या मोठ्या आवाजात म्हणे—"तुम्हांला एक काम सरळ येत नाही. पहिल्याने कोणते काम करायचे, नंतर कोणते, हे सुद्धा कळत नाही. अशा नवऱ्या बरोबर कसा संसार करायचा हो!" अशी ती कोसकोस भर दूर ऐकू जाईल अशा तऱ्हेने ओरडायची.

बायको इतकी बोलायची परंतु तो माणूस एका शब्दाने उलटे बोलत नसे.




त्याला अशा बायको बरोबर भांडण करणे मुळीच आवडत नसे. त्याला पाहून इतर लोक हसतात हे त्याला कळत होते. तो आपल्या मित्रांना म्हणे–“कशाला हंसता आहांहो! तुम्ही हंसला तरी माझ्या शेतात चांगलेच पीक येते!”

एके दिवशी बायको नवऱ्यावर ओरडली– “सर्व दूध नासले. तुम्ही करावयाचे काम नीट केले नाही, म्हणून सर्व दूध वांया गेले!”

तो आश्चर्य करीत म्हणाला–“दूध नासलं त्यातही माझीच चूक वाटते?”

“नाही तर काय? तुम्ही दुधाचे भांडे नीट घासले धुतले नाहीत म्हणून दूध नासले! बायको म्हणाली.

“दुधाच्या भांड्यापासून सर्व भांडी मीच घासायची हे मला माहीत नाही! तू आत्तां हे सांगते आहेस!”

“मी तरी कोणकोणती कामे करावयाची हो? पुरुषाची मदत म्हणतात ती तुम्ही नको का करायला?” बायकोने चोराच्या उलट्या बोंबा केल्या.

“मला ते सर्व माहीत नाही. मी कोणकोणती कामे करावयाची, त्यांची एक यादी तू करून दे! ती मी केली नाहीत तर तू माझा कान धर! हें नुसते तोंडी सांगून भागणार नाही.”

तो दऊत टाक व कागद घेऊन बसल्यावर त्याची बायको त्याने करावयाच्या कामांची यादी सांगू लागली. ती हनु-मानाच्या शेपटीसारखी वाढतच गेली.

काही दिवस लोटले, संक्रांतीचा सण आला उद्यांच संक्रात म्हणून बायकोने बरीच कामे काढून अंगणासमोरच्या पाण्याच्या खड्याशी ती करू लागली. नवरा कपडे धुवून पिळून देत होता आणि बायको ते वाळत घालीत होती. ते काम चालू असतांना तिच्या तोंडाचे चऱ्हाट चालूच होते–“उद्यां सण आहे रोजची कामेच संपली नाहीत. आतां सणाची कामे केव्हां होणार? तुम्ही यादी करून घेतलीत, काय उपयोग? आजूबाजूला



पुरुष राहतात, पण मी तुमच्या सारखा पुरुष माणूस कधी पाहिला नाही. आमची आई तेव्हांच म्हणाली होती...”

ती बोलतच होती आणि नको व्हायला तो अपघात झालाच नवरा कपडे पिळून तिच्या हातात देत असतांना तिने खड्याच्या बाजूला असलेल्या एका वाकड्या धोंड्यावर पाय ठेवला. नवऱ्यावर तोंड सुख घेण्याच्या आवेशात पाय ठेवतांना दगडनीट पाहिला नाही. तिने पाय ठेवला आणि धम्म-दिशी ती पाय घसरून खड्ड्यात पडली.

“अहो, मी बुडते आहे! मरते आहे! वर काढा!” बायको म्हणाली.

“जा बुडून! खड्डा इतका खोल कोठे आहे? मानेपर्यंतच त्यात पाणी आहे!”

“थंडीने कांपरे भरले आहे हो! लौकर येऊन मला वर काढा!” बायको थंडीने कांपत म्हणाली.

“ते नाही होणार! कामाच्या यादीत हे काम तू नव्हते लिहायला सांगितलेस! कामे पुष्कळ अजून करावयाची आहेत!”

“पहिल्याने मला बाहेर काढतां की नाही? आई आईग! आत जळवे सुद्धां आहेत हो!” असे म्हणत बायकोने किंकाळी फोडली.

“आपण ठरविलेल्या गोष्टी तू आतांच विसरलीस. थांब मी घरी जाऊन यादी घेऊन येतों!” असे म्हणत नवरा घरी जाऊन यादी घेऊन येऊन वाचू लागला.

बायको थंडीने आणि जळवांच्या भीतीने थरथर कांपत म्हणाली–“मी मरते आहे. ती यादी फाडून टाका. मला लौकर बाहेर काढा. तुमच्या पायां पडते!”

“तू ते म्हणालीस बरे झाले! या यादीशी आपला आतां काही संबंध नाही. यापुढे तू बायकांची कामे कर, मी पुरुषांची कामे करीन. आहे कबूल तुला?” नवऱ्याने विचारले.

बायको “हो” म्हणाली. नवऱ्याने तिला खड्यांतून काढून घरांत पोचते केले. तिला ऊब यावी म्हणून जाळ केला.

त्या दिवसापासून बायकोने कधी डोके वर करून तोंड उघडले नाही. तिची कामें तिने नवऱ्याला सांगितली नाहीत.





# मानव जन्म

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असतां बोधिसत्व मगध राज्यात एक गरीब दरीद्री म्हणून जन्मले आणि मगध राजाच्या पदरी नोकरी करू लागले.

मगध आणि अंग देशाच्या मध्ये चंपानदी वहात असे. त्या नदीच्या पात्राखाली नागराज्य होते. त्या देशाच्या राजाचे नांव चांपेय असे होते.

मगध आणि अंगदेश दोघांमध्ये नेहमी युद्धे होत. अशा एका युद्धात मगध राजाचा पराभव झाला. तो आपल्या घोड्यावर बसून पळत पळत चंपानदीच्या किनाऱ्यावर आला. तेथे तो शत्रूच्या हाती कैद होण्याच्या स्थितीत होता. शत्रूच्या हाती मरण येण्यापेक्षां आत्महत्या करून घेणे जास्त बरे, असा विचार करून त्याने घोड्या सकट नदीत उडी घेतली. मगध राजा आपल्या घोड्यासह नदीच्या तळाखाली असलेल्या नागराजाच्या राज्यसभेत जाऊन पोचला.

नागराज आपल्या सिंहासना वरून उठला आणि त्याने मगधराजाचे आनंदाने स्वागत केले. मगध राजाने आपली कहाणी थोडक्यात नागराजाला सांगितली.

"जे झाले त्याची आतां तुम्ही फिकीर करू नका. अंग राजाशी या खेपेस तुम्ही युद्ध कराल त्या युद्धात मी आपल्याला मदत करीन!" असे आश्वासन नागराजने मगध राजाला दिले. वचन दिल्या प्रमाणे नागराजाने मगध राजाला सर्व प्रकारे मदत केली. अंगराजा मगधराजाच्या हाती त्या युद्धात मारला गेला. मगधराजा दोन्ही देशांचा राजा झाला. दोन्ही राज्यांची भरभराट झाली व वैभव वाढले.

त्या वेळे पासून मगध राजा आणि नागराज दोघांची चांगली मैत्री जमली. मगधचा राजा दरवर्षी एकदां आपल्या नोकरांचाकरांसह चंपानदीच्या तीरावर जात असे. त्या दिवशी नागराज आपल्या लव्याजम्यासह सर्व वैभवाचे प्रदर्शन करीत येऊन मगधराजाला भेटे. मगधराजा त्याला. मूल्यवान व सुंदर भेट वस्तू देऊन त्याचा सत्कार करी.

मगधराजाच्या नोकरांचाकरांत बोधिसत्व एक नोकर होते. ते सुद्धां दरवर्षी नागराजाचे वैभव पहात असत. ते वारले तेव्हां त्यांच्या दृष्टी समोर हेंच वैभव नाचत होते. त्या कारणामुळें म्हणून नागराज मरणपावला त्याच्या सातव्या दिवशी ते स्वतः नागराज म्हणून जन्मले.

परंतु पूर्व जन्मी एक पुण्यात्मा असल्या कारणाने त्यांना आपले नागरूप पाहून फार वाईट वाटले. नागराजाच्या वैभवाची इच्छा मनात असल्या कारणाने आपल्याला हा जन्म मिळाला या गोष्टीचा विचार करून त्यांना फारवाईट वाटले. त्यांनी आत्महत्या करण्याचा विचार केला. त्याच वेळी सुमन नांवाची एक नागकन्या ते होते त्या जागी आपल्या सर्व सखीं बरोबर आली. तिने त्यांना प्रणाम केला.

सुमनला पाहतांच नागराजाने आत्म-हत्येच्या विचार बदलला आणि सुमनशी विवाह करून नागलोकांत राज्य करू लागला.



परंतु काही काळ लोटल्यावर त्यांच्या मनात व्रते अनुष्ठाने वगैरे करून पुण्य संपादन करण्याची इच्छा बळावली. म्हणून त्यांनी नागलोक सोडून पृथ्वीवर मानव-लोकात जाण्याचे मनाशी ठरविले. उपवास व्रत करण्याचे दिवस आले की ते आपला राजवाडा सोडून एका हमरस्त्याच्या बाजूला एक मुंग्यांचे वारूळ होते त्याला वेटोळे घालून मनात म्हणत, "मला कोणी गरुडपक्षी उचलून नेऊ दे, किंवा कोणी गारुडा मला घेऊन जाऊ दे!"

परंतु त्यांना वाटले तसे घडले नाही. रस्त्याने जाणारे येणारे लोक वारुळाला वेटोळे करून बसलेल्या नागाला पाहून



त्याला देव समजत त्याला चंदन व फुले अर्पण करून त्याची पूजा करू लागले. जवळपास राहणाऱ्या लोकांनी त्या नाग-राजाच्या बिळा भोंवती एक लहानसे देऊळ बांधले. निरनिराळे लोक येऊन, मूल पाहिजे म्हणून त्यांचा आजार जावा म्हणून नागसापा समोर नवस करू लागले.

नागराज सर्व व्रता उपवासाचे दिवस अशातऱ्हेने वारुळावर घालवून दर महिन्यात कृष्ण पक्षातील प्रतिपदेला परत आपल्या घरी जात असे.

एके दिवशी सुमना त्याला म्हणाली— "स्वामी, आपण पुष्कळ काळ आणि वेळां मानव लोकांत जातां आहां. तो लोक धोक्याचा आहे, भयंकर आहे. तुमच्यावर काही कधी प्रसंग आला तर मला कसे कळणार?" मला कोण येऊन सांगणार.

नागराज सुमनाला एका सरोवरावर घेऊन गेला व म्हणाला—"हे पाणी पहा. मला कधी काही झाले तर हे पाणी गढूळ होईल. कधी गरुडपक्षाने माझ्यावर झडप टाकली तर हे पाणी नाहीसे होईल. तसे काही न होता कोणी गारुडी मला घेऊन जाईल तर हे पाणी तांबडे रक्तवर्ण होईल.

काशीचा राहणारा एक ब्राह्मण तरुण तक्षशिलेला जाऊन तेथे वशीकरण विद्या शिकला. परत येताना तो नागराज वारुळावर वेटोळे करून राही त्याच रस्त्याने काशीला परत जात असतां आला. त्याला नागराज त्या स्थितीत दिसला. लगेच त्या तरुणाने मंत्र टाकून नागराजाला वश करून घेतले. त्याला त्याने एका टोपलीत ठेवले व एका गावांत घेऊन जाऊन तेथे सांपाचा वेगवेगळा खेळ दाखविला.

तो खेळ पहायला आलेले गावकरी खेळ पाहून खूष झाले आणि त्या ब्राह्मण तरुणाला पैसे आणि मूल्यवान वस्तू भेट म्हणून दिल्या.



या सामान्यशा खेडेगावात इतके पैसे मिळाले तर शहरांत खेळ दाखविला तर खूपच पैसे मिळतील! असा लोभ अर्थातच ब्राह्मणाच्या मनात उपजला.

तो सांपाला बरोबर घेऊन काशीला निघाला. तो एका गाडीतून जात होता. काशीला तो एका महिन्याने पोंचला.

तो महिनाभर नागराजाला कडक उपवास घडला. ब्राह्मण तरुणाने सांपाला खायला म्हणून बेडूक घातले, पण सापाने त्यांच्याकडे तोंड फिरवून ही पाहिले नाही.

"मी आहार घेत नाही तोंपर्यंत मला मांत्रिक तरुणाकडून या टोपलीतली कैद सुटणार नाही." ही गोष्ट नागराजाला चांगली कळली होती.

त्या ब्राह्मण तरुणाने काशी नगराच्या जवळ पासच्या गावात सापाचे पुष्कळ खेळ करून खूप पैसा मिळविला.

या सांपाच्या खेळाच्या बातम्या काशी-राजाच्या कानापर्यंत पोचल्या. त्याने त्या ब्राह्मण तरुणाला बोलावून आपल्या करमणुकीसाठी सांपाचा खेळ करायला सांगितले.

मध्यंतरी नागलोकांत सुमनाला एक महिनाभर नागराजाला न आलेला पाहून शंका आली त्याला काही अपाय तर झाला नाही अशी भीती वाटली. खरं काय ते म्हणून ती सरोवराच्या काठी









आली. सरोवरातले पाणी तांबडेलाल झाले होते. कोणीतरी मांत्रिक नागराजाला धरून घेऊन गेला असावा. ती पतीच्या शोधार्थ निघाली. वाटेत चवकशी करीत ती शेवटी काशीला आली.

ती तेथे पोचली तेव्हां नागसापाचा खेळ चालू होता. काशीचा राजा व प्रजा तो खेळ पहात करमणूक करून घेत होते. आपल्या बायकोला पाहून नागराजाने लाजून खेळणे बंद केले आणि चटदिशी टोपलीत जाऊन बसला.

सुमनानें मानव शरीर धारण करून राजाकडे जाऊन विनती केली—"मला पतिभिक्षा देण्याची कृपा करावी!"

इतक्यात नागसाप सुद्धा टोपलीतून सरपटत बाहेर आला आणि सर्वजण पहात असतां एक सुंदर मानव पुरुष रूपे प्रगट झाला.

काशीराजाने त्या नागदंपतीला पाहिले व खूष होऊन त्यांना आपले अतिथी म्हणून एक आठवडाभर ठेविले. नंतर तो राजा नागलोकातील नागराजा आपल्या सर्व सपरिवार स्वतः त्या नागदंपती बरोबर नागलोकांत गेला.

नागलोकांतील ऐश्वर्य, सौंदर्य आणि वैभव पाहून काशीराजाला अवर्णनीय आश्चर्य वाटले.

"इतक्या वैभवशाली आणि सुंदर राजवाड्यात तुम्ही दोघे रहात असतां तुम्ही मुंगीच्या वारुळावर वेटोळे घालून कां पडून होतां? कारण काय?" काशीराजाने विचारले.

"राजा, येथे इतके वैभव असून ही जन्मरहित असण्याची संधी तुमच्या मानव लोकांत शक्य आहे." या शब्दात नागराजाने उत्तर दिले.

ते ऐकून काशी राजाला परमानंद झाला. तो आपल्या राज्यात परत गेला तेव्हां नागराजाने त्याला असंख्य बहुमोल वस्तू देऊन निरोप दिला.






# कृष्णकुमारी

राजस्थानातील उदयपूरचे राज्य महाराणांच्या काळांत अत्यंत वैभवशाली असे राज्य होते. महाराणा भीमसिंह गादीवर असतां अत्यंत सुंदर शहर म्हणून प्रसिद्ध झाले.

त्या सुंदर शहरात महाराणाची मुलगी कृष्णकुमारी रूपवती म्हणून राजस्थानभर तिची कीर्ती पसरली होती. तिचें सौंदर्य पाहून सर्व तिला 'राजस्थान कुसुम' म्हणून ओळखत. ती स्वभावाने चांगली व सुशील होती. उदयपूरच्या प्रजेला तिचा अभिमान वाटे.





जयपूरचा राजा जगत्सिंह याने उदयपूरच्या राजकन्येशी विवाह करण्याचे ठरवून आपला दूत महाराणाकडे पाठविला. लौकरच आपला निर्णय कळवितो असे सांगून महाराणाने दूताला निरोप दिला. राणीचा विचार आणि मंत्र्यांचा सल्ला जाणून घेणे महाराणाला आवश्यक वाटले.



परंतु लगेच काही दिवसांनी जगतसिंग आणि मारवाडच्या राजा मानसिंह यांचे आपसांत युद्ध झाले. युद्धात जगतसिंहाचा पराभव झाल्याचे मानसिंगने जाहीर केले. परंतु जगतसिंगाने आपला पराभव मान्य केला नाही. परिणामी दोघे परस्परांचे हाडवैरी झाले.

युद्ध संपल्यावर मानसिंगाचा प्रतिनिधी उदयपूरच्या महाराणाला भेटला आणि म्हणाला–"आमचे महाराज मानसिंग उदयपूरच्या राजकन्येशी विवाह करण्याची आशा धरून आहेत. युद्धांत आमच्या महाराजांचा जय झाला असल्या कारणाने या विवाहास आपली संम्मती मिळेल असा आमचा विश्वास आहे.





महाराणा व महाराणी विचारात पडले. जगतसिंग व मानसिंह दोघे ही बल्लाढ्य राजे होते. कोणालाही नकार दिला तर त्याच्याशी उदयपूरचे वैर अटळ आहे. त्यावेळी दोघांपैकी कोणा एकालाही तोंड देण्या इतकी शक्ती उदयपुरात नव्हती.

मानसिंग याचा अमीरखान नावाचा एक मित्र होता तो मानसिंगला उदयपूरच्या राजकन्येशीच विवाह करावा, असे आपल्या मित्राला प्रोत्साहन देत राहिला. त्या प्रोत्साहना मुळे मानसिंह उदयपूरला वारंवार आपला दूत पाठवू लागला.





शेवटी अमीरखान स्वत: उदयपूरला जाऊन महाराणाला भेटला. त्याने धमकावले की तू आपली मुलगी मानसिंगला दिली नाहीस तर आम्ही उदयपूरचा सर्वनाश करू. तू आपल्या मुलीचा वध केलास तरी चालेल. परंतु जगतसिंगाशी तिचा विवाह होता कामा नये, या शब्दात त्याने धमकावले.

आपल्या आईवडिलांवर आलेले तें संकट कळल्यावर राजकन्या कृष्णकुमारी अत्यंत दु:खी व उदास झाली. आपल्या मुळे उदयपूर नगर नष्ट व्हावे हे तिला कदापि पसंत नव्हते. तरी तिची काही चूक नसतां तिच्या माता-पितरांवर मोठे संकट आले. त्यांनी तिच्याशी बोलायचेच सोडले.





काही दिवस लोटण्याच्या आतच जगतसिंग व मानसिंग उदयपूरवर स्वारीला आले. उदयपूर जिंकून राजकन्येला हरण करून न्यायचा त्यांचा विचार होता. नगरावर संकटाची सावली पडली. राजाला व राजपरिवारातील सर्वांना काय करावे, हेच सुचेना.

एके दिवशी राजकन्या झोपली असतां गाढ अंधःकारात कोणी व्यक्ति तिच्याजवळ आल्याचे तिने पाहिले आणि ओरडली—"बाबा !" तो आलेला जवानदास हा महाराणाचा नातेवाईकच होता त्याने एक तलवार दूर फेंकली आणि पळून गेला.






आपला मृत्यूच नगराचे रक्षण करू शकेल, म्हणून थोरामोठ्यांनी या कामासाठी जवानदासला नेमले होते, हे राजकन्येने ओळखले. लगेच तिने आपल्या सखींना विष आणून द्यायला सांगितले. तिला फार वाईट वाटले तरी हंसत ती विष प्याली. अशा तऱ्हेने तिने आपल्या कुटुंबाचे व राज्याचे संरक्षण करण्यासाठी आत्मार्पण केले.



# उतावळेपणाचे काम

बसरा शहरात अब्दुल रजाक नावाचा एक व्यापारी रहात असे. त्याल दोन जुळी मुले होती. एकदां तो व्यापारानिमित्त जहाजात प्रवास करीत निघाला आणि एका बेटावर येऊन पोंचला. त्याला पुष्कळ दिवस प्रवास करावा लागला होता. त्या गावी कीमती वाढल्या असल्या कारणाने त्याने जो माल विकला त्यात त्याला पुष्कळच फायदा झाला. त्या बेटाच्या सुलतानाने स्वतःच त्याच्या गलबताजवळ येऊन खूप मूल्यवान वस्तू विकत घेतल्या.

रजाकने त्या पूर्वी आपल्या गलबतातून अनेक देशात प्रवास केला होता. सुलतानाने रजाकला आपल्या महालात मेजवानी दिली आणि तो ज्या ज्या देशांचा प्रवास करून आला होता, त्या त्या देशांतील मुख्य मुख्य गोष्टी विचारून घेतल्या. रजाकसारख्या प्रवासी व्यापाऱ्याकडून निरनिराळ्या देशांची माहिती करून घेण्याची तीव्रइच्छा त्याच्या मनात होती. म्हणून सुलतानाने त्याला आपल्या दरबारात काही दिवस रहायला सांगितले.

अशा तऱ्हेने अनेक वर्षे लोटली. रजाकची बायको काळजी करू लागली की नवरा इतकी वर्षे परत कां आला नाही ? ती आपल्या दोघां मुलांना बरोबर घेऊन त्या बेटावर जायला निघाली.

काही दिवसांनी ते एका बंदरात येऊन पोचले.

त्या बंदरात रजाक ज्या देशात गेला होता, त्या देशातून एक जहाज त्या दिवशी रात्री येणार असल्याचे रजाकच्या बायकोला कळले. तिने आपल्या दोघां मुलांना पाठवून त्या जहाजावरून आपल्या वडिलां विषयी काही माहिती मिळते का, विचारून यायला सांगितले.














दोघं जुळी भावंडे त्या जहाजावर गेली. ते जहाज आणखी कोणाचे नव्हते, त्यांच्याच वडिलांचे होते. रजाक सुलतानाचा निरोप घेऊन आपल्या गलबतात स्वदेशी परत येत होता. जुळी मुले जहाजात गेली तेव्हां रजाक त्याची पैशाची पिशवी दिसली नाही, म्हणून आपल्या खलांशांजवळ चवकशी करीत होता. ज्या चोराने पिशवी चोरली होती त्याने गलबतात नुकत्याच आलेल्यां जुळ्या मुलांना दाखवून त्या दोघांनी पिशवी चोरली असल्याचे सांगितले.

रजाक त्या मुलांना ओळखू शकला नाही व अत्यंत रागाने त्या दोघां मुलांना समुद्रात फेंकून द्या असा त्याने खलाशांना हुकूम सोडला. त्यांनी लगेच त्या दोघां मुलांना धरून समुद्रात फेंकून दिले.

रजाकची बायको मुले परत आली नाही म्हणून रात्रभर काळजी करीत राहिली आणि उजाडल्या बरोबर गलबता-जवळ गेली. तिला पाहून रजाकला फार आनंद झाला.. परंतु तिने जेव्हां आपल्या दोघां जुळ्या मुलांचा उल्लेख केला तेव्हां रजाक आपले दुःख आवरू शकला नाही. रात्री त्याने ज्या मुलांना समुद्रात फेंकविले ती आपलीच मुले असल्याचे रजाकला कळले.

मुलं कशीतरी किनाऱ्यावर येतील ही आशा धरून दोघां आई वडिलांना रहाने लागले. दोघांनी कित्येक दिवस समुद्र किनाऱ्यावर हुडकत राहल्यावर मुलं मिळाली नाहीत म्हणून स्वदेशी प्रयाण केले.

आणखी काही काळ लोटला. दोघांनी कोणाला तरी दत्तक म्हणून घ्यायचे ठरविले. एके दिवशी रजाक गुलामांच्या बाजारातून एका तरुण मुलाला विकत घेऊन घरी आला.

त्याची बायको त्या गुलामाला पाहताच नवऱ्याला म्हणाली—"तुम्ही ओळखलं नाहीत का? हा आणखी दुसरा तिसरा कोणी नसून आपल्या जुळ्या मुलांपैकी धाकटा!" तिने त्या तरुणाला ओढून घट्ट पोटाशी धरले होते.

रजाकला ते ऐकून व त्या मुलाला पाहून जो आनंद झाला तो एवढा तेवढा नव्हता. त्याने त्या धाकट्याला त्याच्या थोरल्या भावा विषयी विचारले. त्याला त्याच्या मोठ्या भावाचे काय झाले माहीत नव्हते. समुद्रात पडल्यानंतर बुचकळ्या खात असतां त्याला एका पडाव वाल्याने पाहून त्याचे रक्षण केले व गुलामांच्या एका व्यापाऱ्याला विकले.

सहा महिने लोटायच्या आत पितापुत्र दोघे काही व्यापाराच्या वस्तु घेऊन आपल्या गलबतात बसून निघाले आणि एका बेटांत येऊन पोचले. धाकटा भाऊ काही अमूल्य वस्तू घेऊन त्या बेटावर राज्य करणाऱ्या सुलतानाला देण्यासाठी त्याच्या महालाकडे निघाला.

सुलतान त्या बहुमूल्य वस्तू पाहून फार खूष झाला. त्याने धाकट्याला काही दिवस त्याचा अतिथी म्हणून रहायला विनंती केली. अशा तऱ्हेने त्या दोघांमध्ये परस्पर स्नेह वाढला. त्याचा सुलतानाच्या परिवारांतील काही जणांना राग आला. त्यांनी छोट्याला जाळ्यात पकडण्यासाठी कट करायला सुरवात केली.

एके दिवशी संध्याकाळी सुलतान एकाएकी आजारी पडला. सुलतानाचे काही अधिकारी त्याचा द्वेष करीत



असल्यामुळे सुलतानाला ते त्याच्या आजारात काही अपाय करणे अशक्य नाही, असे धाकट्याला वाटले. अशा लोकांच्या हातून सुलतानाला वांचविणे आपले कर्तव्य आहे, असा त्याने निश्चय केला.

असा विचार करून धाकटा सुलतानाच्या झोंपायच्या खोली बाहेर उजाडेपर्यंत तलवार उपसून उभा राहला. उजाडल्यावर सुलतानाला थोडे बरे वाटले.

रात्री अधिकाऱ्यांनी धाकट्याला सुलतानाच्या झोपायच्या खोली बाहेर तलवार उपसून फिरत असल्याचे पाहिले होते. म्हणून ते सुलतानाचे कान भरू लागले—" रात्री व्यापाऱ्याच्या मुलाला

     



झोंपायच्या खोलीकडे जातांना आम्ही पाहिले त्याच्या हातात तलवार होती. आम्हांला पाहून तो गप्प राहिला. नाहीतर त्याने तुमचा खूनच केला असता. त्याला तावडतोब फाशीची शिक्षा करावी."

सुलतान काही वेळ विचार केल्यावर म्हणाला—"असली घाई आणि उतावळेपणा करून कोणत्या दुष्टांच्या रागाला मी कारण होईन. सांगणे कठीण. तरी त्याला तुरुंगात टाका. पुढे काय करायचे ते सर्व चौकशी करून ठरवीन."

ही बातमी कळल्यावर रजाक सुलताना-कडे येऊन म्हणाला—" सुलतान, माझा मुलगा अपराधी आहे की नाही, या विषयी प्रथम चौकशी करावी. घाईगर्दीत करू नये. काही काही वेळां त्यामुळे नुकसान होण्याची शक्यता आहे. मी अशीच एकदां घाईगर्दी केली व परिणामी मला आयुष्यभर दुःखच अनुभवावे लागले."

सुलतान ते ऐकून चकित झाला व त्याने विचारले—"कोणते ते काम ?"

"मी आपल्या पोटच्या जुळ्या पोरांना समुद्रात फेंकून दिले होते. हे तुम्हांला खरे वाटेल का?" असे सांगून रजाकने घडलेली सर्व घटना सांगितली.

सुलतान आनंदाने ओरडला—"म्हणजे अब्बा जान, मी कैदेत टाकला आहे तो माझा धाकटा भाऊ की?" असे म्हणत सुलतानाने रजाकला मिठी मारली.

आपला थोरला मुलगा जिवंत असल्याचे व्यापाऱ्याला कळले. त्याला परमानंद झाला. सुलतानाने लगेच आपल्या धाकट्या भावाला सोडवून बोलाविले.

झालं असे की एका कोळ्याने थोरल्याला वांचविले. थोरला या बेटावर आला. बेटावरच्या सुलतानाला मुलगा नव्हता. त्याने थोरल्याला दत्तक घेऊन मृत्यू समयी त्यालाच सुलतान केले.

अशा तऱ्हेने ही गोष्ट सुखांत ठरली. आई मुलांची भेट झाली आणि पुढील आयुष्य सुखाचे झाले.

त्याने सविस्तर ती गोष्ट सांगितली.





# मोठा आधार

सिंहाचल नावाच्या एका खेडेगावात रघुनाथ नावाचा एक गरीब माणूस रहात असे. तो शेजारच्या शहरात एका दुकानात हिशेब लिहायचे काम करी. त्याबद्दल त्याला दरमहा दोनशे रुपये पगार मिळे. लहानपणीच त्याची आई वारली तेव्हां त्याची धाकटी मावशी सखुताई यांनीच त्याला वाढविले. त्यांना एक मुलगी होती. तिचे लग्नाचे वय झाल्यावर त्यांनी तिचे लग्न करून दिले. मुलगी सासरी निघून गेली. मावशी भाच्याकडेच रहात असे.

रघुनाथ दिसायला बेताचाच होता. नंतर सामान्य पगारवाला. तरी सुदैवाने त्याचे लग्न एका घाऱ्या गोऱ्या सुंदर मुलीशी झाले. त्याच्या बायकोचे नाव लावण्यवती. तिचे आईवडील गरीब होते म्हणून गरिबाच्या घरातच मुलीला देणे त्यांना परवडले.

हे लग्न व्हायच्या आधी लावण्या स्वतःच्या रूपावर इतका गर्व करी की कोणत्या तरी मोठ्या जमिनदाराच्या मुलाशी आपले लग्न होईल म्हणून स्वर्ग स्वप्ने पहात असे. परंतु रघुनाथशी लग्न झाले तेव्हां तिच्या सर्व आशा आकांक्षांवर पाणी पडले. तिला ते लग्न मुळीच आवडले नाही. रघुनाथची मावशी सुखताई लावण्याच्या आई वडिलांना म्हणाली होती—"आम्हांला हुंडा, मानपान वगैरेची मुळीच हाव नाही. मी देवाजवळ अशीच शपथ घेतली आहे. लावण्याचे आईवडील म्हणाले तुम्ही मागितलात तरी हुंडा देण्याची ताकद आम्हांला नाही."

परंतु ते सर्व संभाषण ऐकून लावण्या मात्र मनांतल्या फार कुढली. आईवडील तर मुलीच्या ऋणांतून मुक्त होणार म्हणून आनंदात होते.



काही असो लावण्या सासरी आली ते सासर तिला मुळीच आवडले नाही. म्हणून सासरी आली त्या दिवसापासून ती हुंडा न मागणाऱ्या सखुताई मावशींवर चिडलेलीच होती. त्यांना ती आपला शत्रूच समजे.

एक महिना जेमतेम लोटला असेल ती एकेदिवशी रात्री नवऱ्याला म्हणाली– "हल्लीच्या काळात स्वतःच्या सापूला सुद्धा संभाळणे कठीण झाले आहे, मावस सासुबाईंना कोण संभाळणार हो! तुम्ही आपल्या मावशी बाईंना त्यांच्या मुलीच्या घरीजा, म्हणावं!"

"हे तू काय म्हणतेस ग! मावशी म्हणजे आपल्याला मोठी नाही का? तिचा केवढा आधार आहे! घरातली मोठी माणसंच अडी अडचणीला हवी असतात." रघुनाथ म्हणाला.

ते ऐकून लावण्या थोडी चिडून म्हणाली– "अहो येथे आपल्यालाच पुरे पडत नाही. तुम्ही समुद्रपार नोकरी करतां का? या दुष्काळात आणखी एकाला पोसणं म्हणजे संकटच नाहीं का?"

शेजारच्या खोलीत सखुताई झोपली होती, ती पाणी प्यायला म्हणून उठली होती. तिने ते संभाषण ऐकले. तीने उजाडल्या बरोबर काही कारण सांगितल्या शिवाय मुलीकडे जायचे ठरविले. रघुनाथला त्याचे फार वाईट वाटले. परंतु बायकोच्या भीतीने तो काही बोलला नाही.

त्याने भाड्याची गाडी ठरविली आणि मावशीला पोंचवून परस्पर कामावर शहराकडे गेला. परंतु उशीर झाल्यामुळे काम संपवून निघायला संध्याकाळची वेळ होत आली.

शहरातून गावी जायची वाट थोडी लांबची होती. एक जवळची वाट रानातून जात असे. तरी त्याचे पाय त्याच वाटेला लागले. लौकर घरी पोचायच्या विचारांत पाऊलवाट सुद्धां नसलेल्या वाटेने तो निघाला होता. तो रानाच्या अगदी मधोमध दाट झाडी होती तेथे पोंचला तोपर्यंत चांगली रात्र झाली होती. परंतु पौर्णिमेचे लखलखचांदणे पडले होते.

तो एका झाडाखाली पोंचला असेल-नसेल, झाडाची पाने वाजली आणि एक कर्ण कठोर आवाज झाला–"कोण, ते कोण येते आहे? ते मागतील ते दिले पाहिजे!"

रघुनाथने मान वर करून पाहिले. ते जांभळाचे झाड होते. तो म्हणाला– "जांभळाचे झाड काय देणार? जांभूळच ना?"

दुसऱ्या क्षणाला त्याच्या पायाजवळ एक जांभूळ पडले. ते उचलून त्याने पिशवीत टाकले आणि रघुनाथ पुढे निघाला.

आणखी काही अंतर चालून गेल्यावर आणखी एका झाडाची पाने हलली व बाजूला त्या पाठोपाठ कानठळ्या बसतील एवढा मोठा आवाज झाला–"काही देणार नाही, तुला मी काही देणार नाही!"

ते झाड कवठाचे आहे, हे रघुनाथने चटदिशी ओळखले, म्हणाला–"कवठाचे झाडच ना? ते काय फार तर एक कवठ देईल!"

दुसऱ्या क्षणाला एक कवठ झाडावरून रघुनाथच्या पायाजवळ येऊन पडले. रघु-नाथने ते सुद्धा उचलून आपल्या पिशवीत ठेवले. तो आणखी काही अंतर चालून गेला असेल आणखी एका झाडाची पाने हलली आणि वाजली. त्या पाठोपाठ आणखी मोठा कर्णकठोर आवाज झाला– "पोंचते करीन, घे! विचारले त्याच्यावर विचार करणार नाही, देईन! घे!"



रघुनाथने कान बंद केले आणि लक्ष-पूर्वक पाहिले. ते आंब्याचे झाडच ना? काय देणार? देऊन देऊन एक आंबा!"

लगेच त्याच्या पायाजवळ एक आंबा येऊन पडला. रघुनाथने तो आंबाही आपल्या पिशवीत ठेवला. काही वेळाने तो घरी येऊन पोचला.

लावण्याने पिशवीत ती तिन्ही फळे पाहिली व आश्चर्यचकित होऊन तिने विचारले–"हा मोसम नसून ही फळे कशी काय हो मिळाली?"



रघुनाथने जे घडले ते सर्व जसेच्या तसे सांगितले.

लावण्याने रघुनाथ कडे रागाने पहात विचारले—"त्यावेळी बुद्धी कोठे गहाण ठेवली होतीत का? तुमच्याशी बोलली ती झाडे नव्हती, ती भुते तरी होती किंवा वनदेवी असतील. ती फार परोपकारी असतात हे तुम्हांला माहीत नाही, वाटते? उद्या संध्याकाळी त्याच वाटेने या. त्याच्या जवळून काय मागून घ्यायचे, ते मी सांगते!"

तिला रात्रभर झोपच आली नाही. काय मागावे, याचाच विचार करीत राहिली. खूप विचार करून काय मागायचे हे ठरवून तिने नवऱ्याला सांगितले.

दुसऱ्या दिवशी रघुनाथ अंधार पडल्या नंतर जंगलाच्या वाटेने निघाला. तो जांभळाच्या झाडाजवळ पोंचतांच पाऊस लागला. पानांच्या आवाजा बरोबर त्याला त्या रात्री ऐकू आलेले वाक्यही ऐकू आले.

बायकोने सांगितले होते ते आठवून रघुनाथ म्हणाला—"जांभळाच्या झाडा! मला सौंदर्य दिलेस तर किती आनंदित होईन मी, म्हणून सांगू!"

झाडावरून त्याच्या अंगावर पाण्याची धारच पडली. विजेच्या उजेडात रघुनाथने आपले अंग पाहिले. ते गोरे पान झालेले पाहून त्याला अत्यानंद झाला.

तो कवठाच्या झाडाजवळ पोंचण्याच्या आत कानाचे पडदे फाटतील एवढा विजेचा कडकडाट झाला आणि जांभळाचे झाड जळू लागले आणि कोसळले.

कवठाच्या झाडाजवळ पोंचल्यावर म्हणाला—"कवठाच्या झाडा, अमूल्य ऐश्वर्य दिलेस तर किती छान होईल रे!"

त्याच्या पायाजवळ एक रिकामी पिशवी पडली. ती रघुनाथने हातात घेतली मात्र पिशवीतून सोन्याची नाणी जमिनीवर खणखण आवाज करीत पडू लागली. त्याला ती पिशवी सोडून जाणे शक्यच नव्हते. त्याने भराभरा ती नाणी उचलून भरली आणि ते ओझे उचलून चालू लागला.



तो आंब्याच्या झाडाजवळ पोंचला असेल नसेल. एक वीज कडाडली आणि कवठाचे झाड कोसळले.

रघुनाथ आंब्याच्या झाडाच्या फांद्याकडे पाहून म्हणाला—"आंब्या, तू माझ्यावर नशिबाचा वर्षाव केलास तर चांगले होणार नाही का?

त्या पाठोपाठ त्याच्या डोक्यावर काही-तरी पडल्यासारखे झाले. परंतु त्याने चाचपून पाहिले, त्याच्या हाताला काहीच लागले नाही. रघुनाथ तेथून निघाला मात्र, आंब्याच्या झाडावर सुद्धां वीज पडली.

त्यानंतर रघुनाथने घराची वाट धरली. जोराचा गार वारा सुटला असल्या कारणाने आणि मोहोरा भरलेल्या पिशवीचे ओझे वहात असल्या कारणाने रघुनाथला पुढे पाऊल टाकणे सुद्धा कष्टसाध्य भासू लागले. तो एका उंचवट्यावर चढून उतरू लागताच पाय घसरला आणि बाजूला असलेल्या चिखलाच्या खड्ड्यात पडला. सोन्याची नाणी भरलेली पिशवी चिखलाच्या तळाला गेली. त्याचे सर्व अंग खांद्यापर्यंत चिखलात रुतले.

आतां रघुनाथला आपण वांचत नाहीसे वाटले. परंतु त्याचे अदृष्ट अनुकूल होते. अकस्मात शेजारी एक झाड होते, त्याची फांदी मोडून त्याचा हात पोचेल एवढ्या अंतरावर चिखलात पडली. त्या फांदीचा आधार घेऊन तो चिखलांतून कसाबसा बाहेर आला.













रघुनाथ पूर्वेकडे पांढरे फाटू लागण्याच्या सुमारास घरी पोचला आणि बेशुद्ध होऊन पडला. पतीला त्या अवस्थेत पाहून लावण्या फार घाबरून गेली. काय करावे, विचारायला घरात कोणी अनुभवी मोठे माणूस नाही. किंकर्तव्य विमूढ स्थितीत लावण्याने सखुताईंकडे निरोप पाठविला.

दुपारच्या सुमारास खंडीभर दुःखाचे ओझे वहात सखुताई आल्या. तिने उपचार केले व एका महिन्यानंतर रघुनाथ बरा झाला. त्याला जंगलात मिळालेले सोने आणि शरिराचा सुंदरपणा गेलाच, अंगावर लागलेल्या जखमांचे वण दिसू लागले!

घडले त्याचे वर्णन ऐकून सखुताई लावण्याला म्हणाल्या–"तू आपल्या नवऱ्याला, पहिल्या भुताजवळ सौंदर्य मागायला सांगितलेस सौंदर्यापेक्षा आरोग्यच मुख्य आहे! त्याच्या वांचून दुसऱ्या भुताने दिलेले सोने फुकटच! शेवटच्या भुताजवळ त्याने अदृष्ट मागितले तेच कामाला आले. व तो वांचला!"

"तुम्ही तेव्हां सल्ला द्यायला नव्हता, मावशी! म्हणून मी अविवेकाने ती इच्छा प्रगट केली, म्हटले आणि इतके कष्ट सहन करावे लागले." डोळ्यात पाणी आणून लावण्या म्हणाली.

"अजून काही बिघडले नाही ग! त्याचे नशीब चांगले आहे. त्याने कष्ट केले तर तो लौकर वर येईल. आयुष्य भर सुखाने रहा!" असे सांगून सुखताई परत जायची तयारी करू लागल्या. त्या पेटीत आपली लुगडी वगैरे नीट ठेवू लागल्या.

डोळ्यात आलेले पाणी टिपीत लावण्या दोन्ही हात जोडून म्हणाली–"मावशी, मी मूर्खपणा केला, त्या बद्दल क्षमा करा. तुम्ही कोठेच जाऊ नका. तुमच्या शिवाय आम्हांला मोठा आधार कोण आहे?"

लावण्यात झालेला बदल सखुबाईंनीच नाही, रघुनाथने सुद्धा ओळखला. त्यांना फार आनंद झाला.





# विसरभोळा नोकर

आत्रेयपूरचा जमिनदार श्यामराव यांच्या कचेरीत सिद्धू नावाचा एक नोकर होता. तो भयंकर विसरभोळा होता. आत्तां ऐकलेले थोड्या वेळाने विसरे. मालकाने एक काम सांगितले की दुसरेच एखादे करू लागे. पण तो नम्र स्वभावाचा आणि खूप मेहनती होता म्हणून त्याने किती ही चुका केल्यातरी जमिनदार त्याला माफ करी आणि गप्प राही.

एकदां रात्री जमिनदार साहेबांचे एकाएकी पोट दुखूं लागले. त्यांनी सिद्धूला बोलावून लक्ष्मण शास्त्री वैद्यबुवांकडे जाऊन पोट दुखी करिता योग्य औषध काय ते घेऊन यायला सांगितले. सिद्धू वैद्यबुवांकडे गेला, आणि पाव तासात त्यांनी दिलेले औषध घेऊन आला. परंतु ते औषध घेऊन ही त्यांचे पोट दुखणे बंद झाले नाही.

उजाडल्यावर वैद्यबुवा जमिनदार साहेबांची तब्येत कशी आहे, पहायला आले व त्यांनी विचारले–"कसं आहे हो, डोके?"

जमिनदार साहेब संतापले त्यांनी विचारले–"मला डोके दुखी आहे म्हणून कोणी सांगितलं? मी सिद्धूला पोट दुखते आहे, म्हणून सांगून पाठविलं होतं. तुम्ही माझा जीव घ्यायला डोके दुखीचे औषध पाठविलेत की काय? तुमच्या मुळे रात्रभर तळमळत पडलों आहे!"

वैद्यबुवा दचकून म्हणाले–"तुम्ही असं कां बोलतां आहां? सिद्धूने तुम्हांला डोके दुखी असल्याचे सांगितले. म्हणून डोके दुखीचे औषध पाठविले होते.

जमिनदाराला चूक झाली ती सिद्धूचीच हे कळले. रात्री त्यांना जे कष्ट सहन करावे लागले त्यांची आठवण झाल्यावर







त्यांनी सिद्धूला बोलावून त्याला फैलावर घेतले–"कायरे, तुझ्या विसर भोळेपणा मुळे मला रात्रभर कष्ट सहन करावे लागले. तुझ्या सारख्या विसर भोळ्याला-नोकर म्हणून मी ठेवले, ही माझीच चूक! तुझ्या या विसर भोळेपणा मुळे माझा कधीतर जीवच जाईल. आज पासून तू निघून जा!" असें सांगून त्याला जो पगार मिळावयाचा होता तो देऊन कामा-वरून काढून टाकले.

दुसऱ्या दिवशी सिद्धू नेहमी प्रमाणे जमिनदाराच्या घरी कचेरीत हजर झाला.

जमिनदारांनी रागानेच त्याच्याकडे एकदां पाहिले व म्हणाले–"कायरे, तुला मी काल कामावरून काढून टाकतो आहे, म्हणून सांगून तुझा सर्व पगार वगैरेसुद्धा दिलाना! पुन्हां कशाला आला आहेस?"

"होय मालक, तीच गोष्ट मी विसरलो. यापुढे मी कामावर येणार नाही." असे म्हणत सिद्धू कपड्यातील काही पैसे काढून म्हणाला–"मला काल तुम्ही हे पैसे कशाला तरी दिलेत, ते ठेवून घ्या!" असे सांगून जमिनदाराने पगार म्हणून सांगून दिलेले पैसे त्यांच्या समोर ठेविले आणि तेथून निघाला.

जमिनदाराला त्यावेळी सिद्धूच्या विसरभोळेपणा बद्दल राग यायच्या ऐवजी हंसू आले व थोडी कींवही आली.

त्यांनी त्याला परत बोलाविले व म्हणाले–"अरे विसरभोळ्या! हे पैसे तुझेच आहेत! काल तुला कामावरून काढतांना तुला द्यायचा होता तो पगार दिला होता. हे घे ते पैसे."

"अरे हो, की! तीच गोष्ट मी विसरलो." असे म्हणत सिद्धूने ते पैसे घेतले आणि निघून जाऊ लागला.

जमिनदाराने त्याला थांबायला सांगितले. म्हणाला–" मी तुला पुन्हां कामावर ठेवीत आहे. आंत जा!" असे सांगून दुसऱ्या एका नोकराला विसर भोळेपणावर औषध काही आहे का हे विचारायला वैद्यबुवांकडे पाठविलें.





# विष्णुपुराण

रामाचा राज्याभिषेक झाल्यावर तो लक्ष्मण, भरत व शत्रुघ्न यांच्या मदतीने राज्य कारभार पाहू लागला. रामाची कारकीर्द सुरू होतांच प्रजा सर्व प्रकारे सुखी झाली.

एकदां एका खेडेगावात राहणारा एक ब्राह्मण आपल्या पांच वर्षांच्या मुलाचे प्रेत घेऊन राज द्वारी आला आणि रडू लागला. त्याला तो एकुलता एक मुलगा होता. त्याचे अकाली मरण झाल्याने तो रडत होता. त्याच्या म्हणण्या प्रमाणे राजा जर उत्तम प्रकारे राज्य कारभार पहात असेल तर मुलाला असे अकालमरण येणेच शक्य नाही. इक्ष्वाकु वंशात असे पूर्वी कधी घडलेच नाही. रामाच्या राज्यांतच देश या दशेला पोंचला आहे.

रामाला ते कळल्यावर त्याने फार चिंतित होऊन आपल्या मंत्र्यांना आणि वसिष्ठादी ऋषिवर्यांना बोलाविले आणि त्यांना ब्राह्मणाच्या मुलाचे अकालमरण झाल्याचे सांगितले. त्यावर नारदाने शंबुक नावाचा एक शूद्र तपश्चर्या करीत असून ते कार्य युगधर्मा विरुद्ध असल्या कारणाने बालक मरण पावल्याचे सांगितले.

राम लक्ष्मणाला म्हणाला–"तू जाऊन त्या ब्राह्मणाचे सांत्वन कर आणि त्या मुलाचा देह तेलात सुरक्षित बुडवून ठेव." नंतर तो धनुष्यबाण घेऊन पुष्पक विमानात बसला आणि पश्चिम, उत्तर आणि पूर्व



दिशांकडील देश फिरून पाहिला. नंतर तो दक्षिणेकडे गेला. तेथे त्याने एका सरोवरात डोक्यावर उभा राहून तपश्चर्या करीत असलेल्या एका माणसाला पाहिले.

राम पुष्पक विमानांतून उतरला आणि तलवार उपसून त्याने शंबुकाचे डोके उडविले. शंबुकाचे डोके डोळे उघडून रामाला पाहून म्हणाले–"राघवा! मरण हे अटळच आहे. तू त्याला कारण झालास, एवढेच! वर्णाश्रम धर्माच्या बंधनात सांपडलेल्या निरनिराळया वर्णांचा जो समाज आहे त्याचा तू राजा आहेस. राजा हा प्रजेचा सेवक असतो. त्या कर्तव्यकर्माचे तू पालन केलेस. म्हणून तुला वाईट वाटून घ्यायचे काही कारण नाही. तुला कोणतेही पाप यामुळे लागणार नाही. मी आपल्या जाती व वृत्ती पलीकडचा एक योगी आहे! विष्णूकडून सायुज्य मुक्तीचा लाभ मला होत आहे." असे सांगून डोळे मिटले.

शंबुकाची बायको कपिला रामाला म्हणाली–"हे सीतापती! राजाच्या कर्तव्याचे पालन करीत असतां तुझ्या समोर पुढे पुढे नवेनवे प्रसंग येतील. त्यांची ही सुरवात-नांदी आहे! मी माझ्या पतीबरोबर आनंदाने जात आहे. तू दृढचित्त होऊन आपल्या कर्तव्याचे पालन कर!" असे सांगून तिने पतीच्या चितेवर उडी टाकून सहगमन केले.

राम परत येत असतांना वाटेत घुवडाचे एक झाड होते. त्याच्या ढोलीत एक घार शिरली होती. तिला शिक्षाच म्हणून रामाने तिच्या डोक्यात एक चापटी मारली. त्या पाठोपाठ त्या घारीचे रूप गेले आणि ब्रह्मदत्त नावाचा राजा शापमुक्त होऊन गेला.

विश्वामित्राने रामाच्या कडे येऊन शकुंत नावाच्या राजाने अपमान केला होता म्हणून त्याचा वध करावा म्हणून आज्ञा केली. राम लगेच गुरूची आज्ञा



शिरसावंद्य मानून शकुंतचा वध करण्यास निघाला.

हनुमंताची आई अंजनादेवी हिने शकुंताला आश्रय दिला. हनुमन्ताने आईचा मान राखण्यासाठी 'रामनामाचा जप करीत डोळे रामबाणाला मिटून निधडया छातीने तोंड दिले. रामाने सोडलेला बाण हनुमंताच्या छातीत लीन झाला.

ज्यांच्यामुळे रामहनुमान यांचे हे वैर झाले त्या विश्वामित्रांनी शकुंताला क्षमा केली आणि तेथून निघून गेले.

एकदां मध्य रात्रीच्या सुमारास एक कुत्रा रामाच्या शयन गृहा जवळ आला आणि त्याने न्याय मिळावा म्हणून आर्तनाद केला. रामाने लगेच येऊन कुत्र्याच्या जखमेतून रक्त वहात होते ते थांबविले.

कुत्रा म्हणाला–" गेल्या जन्मी मी पुजारी होतो म्हणून कुत्रा म्हणून जन्मलो, निष्कारण मला मारणाराला पुजारी म्हणून नेमावे हीच त्याला योग्य शिक्षा होईल. त्याची जखम भरली गेली व तो कुत्रा आनंदाने परत गेला."

राज्य व्यवस्था उत्तम तऱ्हेने चालली होती, इतकी की कोणत्याही प्राण्याला सुद्धा त्रास होऊ नये याची काळजी राम बाळगीत असे. "अशा राज्यात परक्याच्या



घरात राहून आलेल्या पत्नीला घरात घ्यायचे लाजिरवाणे काम करणे राजकर्त्या-रामासारख्याला कसे शोभते?" असे दुर्वचन एका सामान्य माणसाच्या तोंडी बाहेर पडले.

रामाने लक्ष्मणाला म्हणून सांगितले, सीतेला जंगलात पोंचवून सोडून ये लक्ष्मण क्रोधा वेशात–"म्हणाला त्याला उत्तर देत राम म्हणाला–"लक्ष्मणा, विचार कर, एक सामान्य माणूस म्हणाला तर कित्येक जण मनात असूनही बोलत नसतील, असे नाही का वाटत तुला? राज्य म्हणजे जमीन नव्हे, जमिनीवर राहणारी प्रजा आहे! त्या न्यायाने व



धर्माने रक्षण करणे म्हणजे तलवारीच्या धारेवर चालण्या सारखे आहे. स्वार्थाला येथे जागा नाही. हृदयाला दगडासारखे करून कर्त्तव्य पालन करावे लागते!" असे लक्ष्मणाला सांगून पाठविले.

मुनिपत्नी बरोबर रहावेंसे वाटते आहे, असे सीता एकदां म्हणाली होती त्याची आठवण करून देऊन लक्ष्मणाने सीतेला रथांत बसवून देऊन अरण्यात सोडले. पण त्याला वाईट वाटले व तो म्हणाला–"हनुमंताने तेव्हां संजीवनी आणून मला कशाला वांचविले?" त्याने असे म्हणत आपली छाती बडवून घेतली.

वाल्मीकि मुनी सीतेला आपल्या आश्रमांत बोलावून घेऊन गेले. सीतेला आश्रमात लवकुश ह्यांचे सुंदर जुळे झाले.

अयोध्येत अनावृष्टी मुळे दुष्काळ पडला. सीतेच्या विरहाने आधीच दु:खी झालेल्या रामाला अश्वमेध यज्ञ करावा असे थोरा मोठ्यांनी सांगितले. सीतेची सुवर्णमूर्ती करून रामाने यज्ञ दीक्षा घेतली.

वाल्मीकी ऋषींना रचलेले रामायण गात लवकुश अयोध्येला आले. मुनिबालक म्हणून त्यांचे वर्णन करण्यात आले होते. रामाच्या मनात त्यांच्या विषयी वात्सल्य भाव उत्पन्न झाला. रामाने त्यांना अनेक भेट वस्तू दिल्या.

यज्ञाश्व जात असतां लवकुशांनी त्याला धरून आश्रमात बांधून ठेवले व त्याला सोडले नाही.

शत्रुघ्न घोड्याला सोडविण्यासाठी ससैन्य आला. त्याला व नंतर भरत आणि लक्ष्मणाला सुद्धां युद्धाला आले असतां लवकुशांनी घायाळ केले. शेवटी स्वत:रामाला युद्ध करावे लागले.

आईचे स्मरण करून लवकुशांनी रामावर बाण सोडला. राम सुद्धा बेशुद्ध होऊन पडला. सीतेने स्वत: येऊन रामाला शुद्धीवर आणले. सर्वजण त्यानंतर एका-मागून एक शुद्धी वर आले.











वाल्मीकींनी लवकुशांना व सीतेला रामाला सोंपविले. राम सीते सह सिंहासनावर बसला व लवकुशांना मांडीवर घेतले. त्याने त्यांना युवराजपद दिले.

नंतर रामाने सीतेला तिचे पावित्र्य अयोध्यावासियांसमोर सिद्ध करायला सांगितले.

सीता अयोध्या नगरीच्या केंद्रस्थानी उभी राहून आकाशाकडे पाहून अयोध्येत पाऊस पडाव अशी प्रार्थना करू लागली. त्या पाठो पाठ आकाश मेघाच्छादित झाले व मोठा पाऊस पडला.

नंतर सीता भूमातेकडे पहात म्हणाली– "आई, रघुवंशाचे कुलदीपक आपल्या वडिलांकडे पोंचले. आतां मला कसलीच इच्छा उरली नाही. आतां मला पोटात घे!"

जमीन थोडीशी हादरली आणि दुभंगली. दिव्य कांती चहूकडे पसरली. भूदेवी रत्नजडित सिंहासनावर बसून प्रगट झाली. तिने सीतेला आपल्या उराशी धरले आणि भूगर्भात अदृश्य झाली. पुष्पवृष्टी झाली. आणि दुभंगलेली जमीन पुन्हां एक झाली.

रामाने जमिनीला भेदून टाकतो म्हणून धनुष्य हातात घेतले. तेव्हांच आकाशवाणी झाली–"रामा, भूदेवीवर राग काढणे हिताचे नाही. सीता भूमीतून अवतरली आणि परत भूमीत अंतर्धान पावली.

मुलांची काळजी घेत रामाने अनेक वर्षे राज्य केले. एकदां यमधर्मराज ब्राह्मण रूपे आला. म्हणाला–"तुला एक दैवी रहस्य सांगावयाचे आहे. लक्ष्मणाला पाहाऱ्यावर ठेव. त्याने कोणाला आत येऊ दिले तर त्याला मृत्युदंड मिळेल, असे सांग, रामाने ते मान्य केले. लक्ष्मण द्वारपालकाचे काम करीत होता. यम आपल्या स्वस्वरूपात प्रगट होऊन म्हणाला– "तुझे अवतारकार्य संपले आहे. तू वैकुंठाला विष्णु होऊन रहा."

त्याचवेळी दुर्वास ऋषी येऊन म्हणाले– "तत्क्षण मला आत जाऊ दिले नाही तर मी रघुवंशालाच शाप देईन." म्हणून लक्ष्मणाने आत जाऊ दिले आणि सरयू नदीत बुडून मरण पावला.

रामाने लवकुशांचा राज्याभिषेक करून दिला आणि राज्यकारभार त्यांच्या हातात दिला.

तो श्रावणाचा महिना होता. शरयू नदीलापूर आला होता. त्या दिवशी पौर्णिमा होती व चंद्रग्रहण ही होते.

मंगलवाद्ये वाजत होती. भरत व शत्रुघ्नाला दोन्ही बाजूंनी चालत होते. राम सरयू नदीवर निघाला. प्रजा रामाच्या मागून चालत होती.



रामाने नदीत प्रवेश केला. पाठोपाठ दोघे भाऊ सुद्धा पाण्यात उतरले. त्याच वेळी ग्रहण सुटले आणि पूर्णचंद्रबिंब दिसू लागले. आकाशातून त्याच वेळी पुष्पवृष्टी झाली. साम, देवगांधार, हिंदोळ वगैरे राग निरनिराळ्या वाद्यांवर व वीणेवर वाजू लागले. दिशा दुमदुमू लागल्या.

त्या समयी चांदणे लख्ख पडले होते. पुष्पवृष्टी होत होती. सरयू नदीच्या लाटांवर फुले तरंगत होती. सरयू नदी जणूंकाही फुलांबरोबर खेळत होती.

त्यापूर्वींच लक्ष्मण शेषनाग होऊन व सीता लक्ष्मी होऊन विष्णूच्या स्वागतास उभे होते. भरत व शत्रुघ्न शंखचक्र होऊन तयार होते. विष्णु रामावतार संपूर्णकरून वैकुंठ लोकी पोचला. लक्ष्मी पाय चेपू लागली आणि शेषनागाच्या शय्येवर विष्णु पहुडला.

रामाने उत्तम मानवावतार घेऊन पित्याच्या आज्ञेचे पालन केले. वनवासास गेला. कार्य सिद्धी झाली. वानरांच्या सहाय्याने समुद्रावर सेतू बांधला. गर्विष्ठ रावणाचा वध केला. राक्षसांचे राज्य नष्ट करून सीतेला सोडवून एक पत्नीव्रताचा आदर्श दाखविला. दृशावतारात रामावतार हा उत्तम अवतार अशी कीर्ती पसरली. आचंद्रार्क रामराज्य ही कीर्ती गाजत राहील असे रामाने राज्य केले.









अशा तऱ्हेने सूत महर्षींनी रामकथा समाप्त केली आणि कृष्णावतारा विषयी सांगू लागले.

एकदा शंकराने त्याचे भक्त अशा राक्षसांतील प्रमुखांना थट्टेत विष्णूला आनंदित झालेले पाहून असह्य झाल्याने डोळे मिटले. त्या डोळ्यांतून घोर आकार असलेला सहस्रकवच नावाचा राक्षस उत्पन्न झाला. त्याला एक सहस्रकवचें होती. त्याच्या अजेयत्वाची खूण म्हणून त्याला कुंडले होती. त्याने एक भयंकर गर्जना केली—"मी फक्त बुद्धिभ्रष्ट राक्षसच नाही रुद्राचा अंश असलेला त्याच्या कृपेने जन्मलो आहे. त्याला हिंमत असेल तर त्या विष्णूला म्हणावे, तू माझ्यावर काय आणि कसा बलप्रयोग करतोस मी पाहणार आहें." त्याची आरोळी ऐकून त्रिलोक हादरले.

विष्णूने नरनारायण नामे जुळ्या ऋषींच्या रूपे अवतार धारण केला. नरनारायणांनी सहस्रकवचाला जिंकण्या-इतके बल प्राप्त व्हावे म्हणून तपश्चर्या सुरू केली. इंद्राने त्यांचा तपोभंग करण्यासाठी अप्सरांना पाठविले. नारायणाने आपल्या मांडीतून ऊर्वशी नावाच्या अप्सरेला जन्म दिला. ऊर्वशी समोर रंभा वगैरे अप्सरा फिक्कया दिसू लागल्या. इंद्राने नरनारायणां-जवळ क्षमा मागून त्यांना नमस्कार केला. नारायण त्याला म्हणाला—"तू ऊर्वशीला घेऊन जा." अप्सरां बरोबर ऊर्वशी स्वर्गाला गेली.

नर एकटा तपश्चर्या करू लागला तेव्हां एकटा नारायण धनुष्य बाण घेऊन सहस्रकवचाशी युद्ध करीत असतां एक हजार वर्षे लोटली. नऊशेनव्याण्णव कवचे नारायणाने तोडून टाकली. सहस्रकवच उरलेल्या एकाच कवचासह सूर्य मंडलात जाऊन लपला.

बढाया मारून शेवटी पळालासना, मितऱ्या! याच्या समाचाराला कृष्णा-वतारात जाता येईल!" विष्णूने असा निश्चय केला.





# समर्थ अधिकारी

दंतपुरी नावाच्या राज्याचा राजा पद्मनंद वेष पालटून देशभ्रमण करीत असतां एका गांवी एकाएकी अनपेक्षितपणे आजारी पडला. त्या गावात सीताराम नावाचा एक शेतकरी होता. तो वेळेवर राजाच्या मदतीला धावला व त्याने राजाचा औषधो-पचार एका वैद्याकडून करविला.

आपला आजार बरा झाल्यावर राजा पद्मनंद आपण कोण आहों हे न सांगता म्हणाला—"तुम्ही माझ्यावर जे उपकार केले आहेत ते मी आयुष्यभरात विसरणे शक्य नाही. राजधानीत मला लोक चांगले ओळखतात व माझा चांगला मान आहे. तुम्हांला जे काही हवे असेल ते मागून घ्या!"

शेतकरी नम्रपणे म्हणाला—"मला काही एक नको माझा दुसरा मुलगा दंडक याला मी चांगले शिकविले आहे. तो आतां शेतावर काम करणार नाही म्हणतो आहे. त्याला एखादी नोकरी द्या, म्हणावे तर थोडा, उद्धट व उर्मट मुलगा आहे, सर्वांशी भांडतो, पुढे त्याचे कसे होणार, याचीच काळजी मला वाटते आहे."

पद्मनंद लगेच म्हणाला—"तुम्ही आपल्या मुलाला माझ्याबरोबर पाठवा. मी त्याचे भविष्य चांगले करून देतो. त्याला मार्गाला लावतो. तुम्ही काळजी करू नका."

दंडक सुद्धां राजधानीत जायचे म्हणून बरेच दिवसापासून हट्ट धरून बसला होता. बापाने आनंदाने त्याला पद्मनंदाबरोबर राजधानीला पाठविले.

राजधानीत गेल्यावर पद्मनंदाने त्याला एका धर्मशाळेत उतरविले व त्याची सर्व व्यवस्था करून दिली. वाटेतल्या अनुभवा-वरून दंडकला नोकरी देऊन त्याच्याकडून काम करवून घेणे कठीण असल्याचे पद्म-



पद्मनंद शमतकाला म्हणाला–"मी दंडक नावाच्या माणसाला तुझ्या हाताखाली नेमीत आहे. तो थोडा चढेल माणूस आहे. थोडा उद्धट उर्मट आहे नोकरी जाईल याची त्याला भीती वाटणार नाही. शिक्षा किंवा दंडाची त्याला मुळीच भीती नाही. तू योग्य व समर्थ व्यक्ती म्हणून माझे व सर्वांचे मत आहे. त्याला तू मार्गावर आणू शकशील म्हणून तुझ्या हाताखाली नेमीत आहे."

"महाराज, मी त्याचे डोके ठीक करण्याचा शक्य तो प्रयत्न करीन. त्याला माझ्याकडे पाठवावे." शमंतक म्हणाला.

नंदला कळले होते, तरी शेतकऱ्याला दिलेले वचन टाळायचे नव्हते.

शमंतक नांवाचा एक माणूस राज्याच्या हिशोबाचा म्हणजे प्राप्ती व खर्चाच्या हिशोबावर तपासनीस म्हणून काम करीत असे. दंडकला धर्मशाळेत ठेवल्यानंतर राजाने शमंतककडे निरोप पाठविला. त्याच्या हाताखाली कामे करणारे आठदहा जण अधिकारी होते, या प्रत्येकाच्या हाताखाली आठदहा जण काम करीत.

शमंतक हा फार योग्य व समर्थ अधिकारी होता. हाताखालचा कसाही माणूस असो त्याला मार्गावर आणण्याचे कसब त्याच्या अंगात होते.

दुसऱ्याच दिवशी दंडक शमंतकला जाऊन भेटला. शमंतकने त्याला काही प्रश्न विचारले. त्याने सर्वांची उत्तरे थोड्या चढेलपणानेच दिली.

तरी शमंतक संतापल्याशिवाय म्हणाला "तू मला फार आवडला आहेस. तुझ्यामुळे आमची कामे पुष्कळशी हाता वेगळी होतील. तुला मासिक पन्नास वराह पगारावर नेमतो."

ते ऐकून दंडकला फार आनंद झाला.

शमंतकने त्याच्या हाताखाली काम करणाऱ्या एका अधिकाऱ्याला बोलावून दंडकला त्याच्या हाताखाली काम करायला सांगितले.





दोनच दिवसांनंतर तो अधिकारी शमंतककडे येऊन म्हणाला–"अहो, तो दंडक काही काम करीत नाही. दफ्तरांत काम होऊ देत नाही. त्याच्याकडून काम करून घेणे मला जमणार नाही."

शमंतक त्याला रागावून म्हणाला–"तुमच्या हाताखाली काम करणाऱ्यांकडून काम करवून घेणे तुम्हांला जमत नाही याचा अर्थ तुमचा असमर्थपणाच दिसतो. तुम्ही त्याच्याकडून काम करवून घ्या किंवा स्वत: त्याचे काम तुम्ही करा."

त्या दिवसापासून तो अधिकारी दंडकची कामेसुद्धा स्वत:च करू लागला. म्हणून तो दंडकवर सदा चिडलेला असे. दररोज त्याला तो धमकावीत असे. "तुझी माहिती महाराजांना कळली तर तुला चांगली शिक्षा होईल. ही शिक्षा तुला सहन होणारच नाही. म्हणून सावध रहा!"

दंडकला या धमक्यांचे काही वाटलं नाही. परंतु राजा कशा स्वरूपाची शिक्षा करतो या गोष्टीची त्याने चौकशी करून घेतली. ते कळल्यावर त्याला ती शिक्षा त्याच्या वरच्या अधिकाऱ्याने सांगितली तशीच असल्याचे समजले.

काही दिवसांनी राजाने शमंतकला बोलवून विचारले–"दंटक कसे काम करतो आहे? मार्गावर येत असल्यासारखाच ना?"

"नाही येणार तर कोठे जाईल, महाराज?" नम्रपणे शमंतक म्हणाला.





राजा ते उत्तर ऐकून गप्प बसला नाही. गुप्तपणे दंडक कसा काम करतो आहे या गोष्टीची सविस्तर माहिती काढून त्याने शमंतकला बोलावून रागावून विचारले– "तुम्ही दंडकच्या वागणुकीत काही बदल आणू शकला नाही. तुमच्याजवळ जे अधिकाराचे बळ आहे त्याचा बल प्रयोग आपल्या खालच्या भोळ्या अधिकाऱ्यावर केलात."

"महाराज, तो भोळा अधिकारी नाही. त्याला दंडककडून काम करवून घेता येत नसेल तर ते त्याचा अयोग्य सिद्ध करतो. आपल्या त्या असमर्थपणाची शिक्षा तो भोगतो आहे." शमंतक म्हणाला.

"त्या अधिकाऱ्याला ते जमले नाही तर दुसऱ्या समर्थ अधिकाऱ्याच्या हाताखाली दंडकला नेमता आले नाही का?" राजाने विचारले.

"दंडक कसा आहे, हे सर्व अधिकाऱ्यांना चांगले कळले आहे. ते त्याला आपल्या हाताखाली कामावर घेणार नाहीत." शमंतक म्हणाला.

"तरमग, माझ्या मते तुम्हीच कमी ठरलात!" राजा म्हणाला.

"तसे नव्हे महाराज! आपण एका माणसाला काम द्यायला मला सांगितलेत. तेव्हांपासून एका माणसाचे काम आमच्या दप्तरात निर्विघ्नपणे होत आहे की!" शमंतक म्हणाला.

"तसे नाही. तुम्ही दंडककडून काम करवून घेऊ शकलात तरच तुम्ही एक समर्थ अधिकारी आहां. हे सिद्ध होईल" राजा म्हणाला.

"मला आणखी काही दिवसांचा अवधी द्यावा. मी आपला समर्थपणा सिद्ध करून दाखवितो." शमंतक म्हणाला.

राजा पद्मनंद याने ते मान्य केले.

शमंतकने दुसऱ्याच दिवशी दंडकला बोलावून घेतले व म्हणाला–"तुला दप्तरात काम करावयाचे आहे की नाही?"



दंडकला दप्तरातच काम करणे आवडत होते. राजधानीत राहून घरभाड्याचा खर्च धरूनही त्याला पंचवीस वराह रकमेपेक्षा जास्त खर्च होत नव्हता. खेडेगावापेक्षा शहरात राहणे त्याला जास्त पसंत होते. तेच त्याने शमंतकला उत्तर दिले.

शमंतक काही वेळ विचार करून म्हणाला–"पण काय रे, तुला ज्याच्या हाताखाली कामावर नेमले आहे त्याच्या म्हणण्या प्रमाणे तू चढेलपणा करतो आहेस, असे तो अधिकारी म्हणतो. पण मी ते मानायला तयार नाही. मला तर तुझ्या नम्रपणाच दिसतो आहे. काही दिवस मीच तुझी योग्यता व समर्थपणा पहावा म्हणतो. त्या अधिकाऱ्याचे म्हणणे खरे ठरले तर तुला कामावरून काढून टाकीन. तू योग्य ठरलास तर त्या अधिकाऱ्याला कमी करीन. शिवाय तुझा पगार पण वाढवीन."

त्या दिवसापासून दंडकच्या वागण्यात कल्पने बाहेर बदल झाला. थोड्याच दिवसात तो योग्य अधिकारी म्हणून सिद्ध झाले.

ते कळल्यावर राजाने चकित होऊन शमंतकला बोलवून विचारले–"एवढा बदल कसा काय झाला?"

"त्याला प्रथम या कामात काय सुख आहे त्याचा अनुभव करविला. नंतर त्याच्या विरुद्ध खालचे अधिकारी तक्रार करीत असल्याचे सांगून, ते मला खरे वाटत नसल्याचे सांगितले. नंतर तो खरोखरच योग्य असल्याचे ठरले तर त्या खालच्या अधिकाऱ्याला कामावरून काढून टाकीन असेही सांगितले. त्या अधिकाऱ्याचा द्वेष करीत असल्याने मन लावून काम करायला सुरवात केली. कामाची संवय झाल्यावर सर्व सुरळीत होऊ लागले."

शेतकऱ्याला दिलेल्या वचना प्रमाणे आपण त्याच्या मुलाला कामाला लावून घेण्यात मदत केल्याबद्दल शमंतकची राजाने पाठ थोपटली.



# चांदोबातील नवलाई



### ‘चांदोबा मामा आपल्यापासून दूर’

असे सांगतात, चांदोबा आपल्या पासून हळू हळू दूर जात आहे. आणि प्रत्येक शंभर वर्षांनी तो छोटा होऊ लागेल ह्या प्रमाणे चांदोबाचे आपल्या पासून दूर जाण्यानी केव्हांतरी पूर्ण सुर्यग्रहण नाहीसे होईल तरी पण असे व्हायला कित्येक लाख वर्षे पाहिजेत.

### ‘घागरीत बसून प्रवास’



स्पेनच्या दोन तरुणांनी कष्टाने एका मोठ्या आकाराच्या घागरीत बसून इब्रो नदीत दोनशे तीस किलोमीटर प्रवास करण्यात यश मिळविले.

### नेपोलियनचे जहाज

सन् इ. मध्ये नील नदीत जे युद्ध झाले. त्यात इंग्रंज आरमारचा प्रमुख एडमिरल नेलसन यांनी नेपोलियन बोनापार्टच्या चार जहाजांना बुडविले होते. काही दिवसांनतर असे समजले की ती चारी जहाजे जशीच्या तशी अलेक्झेंड्रियाच्या तटापासून समुद्रात ५ किलोमिटर दूर पाण्यांत सुरक्षित स्थितित आहेत त्या जहाजाना बाहेर काढण्याचे काम सध्या चालू आहे.

## तुम्हांला माहीत आहे का?

१. साहित्यात पहिला नोबेल पुरस्कार मिळविणारा लेखक कोण?
२. शान्ती करता कोणी पहिला नोबेल पुरस्कार प्राप्त केला?
३. भौतिक शास्त्रात पहिला नोबेल पुरस्कार कोणाला मिळाला?
४. कोणत्या वैज्ञानिकाला रसायन शास्त्रात पहिला नोबेल पुरस्कार मिळाला?
५. चिकित्सा शास्त्रात सर्वात प्रथम कोणाला नोबेल पुरस्कार दिला?



# अपंग

अरुण जन्मत: गोरापान अणि दिसण्यास सुंदर होता. कोणीही त्याच्याकडे पाहिले की, मुग्ध होऊन जात असे. त्याचा चेहरा चंद्रबिंबा प्रमाणे चमकत असे. जसा जसा तो वाढू लागला आपली प्रशंसा ऐकून तो अतिशय गर्विष्ठ बनला.

त्याच गावात एक बहिरी मुलगी. एक बोबडे बोलणारा मुलगा व एक लुळा भिकारी व एक लंगडा वयस्कर माणूस रहात होते. अरुण त्या सर्वांची टिंगल करून त्यांना वाईट वागवित असे त्यानां त्रास देत असे.

आपल्या मुलाचे असे वागणे पाहून अरूणच्या आईला खूप दु:ख होई. ती आपल्या परीने त्याला समजावण्याचा प्रयत्न करी ती म्हणे–“अरुण! अपंग लोकांची आपण मदत केली पाहीजे त्यानां चिडविणे व त्रास देणे ह्यासारखे पाप दूसरे कोणतेही नाही परंतु ह्या गोष्टी त्याच्या कधीही डोक्यात शिरत नसत.

एक दिवस अरुणने त्या अपंग लोकांना खूप त्रास दिला तो सहन न होऊन त्या सर्वांनी एकजुटीने चिडून जाऊन अरुणला मारायचा प्रयत्न केला. परंतु अरूणने शिताफीने आपली सुटका करून घेतली. तेव्हां ते सर्व चारी अपंग जोरजोरात रडू लागले–“आम्ही तुझे काय नुकसान केले आहे की तू रोज येऊन आम्हांला त्रास देतोस केव्हांतरी तुला नक्कीच आमची आठवण होईल. तेव्हांतरी तू आम्हांला दिलेल्या त्रासाचे फळ भोगशील.”

त्यांचे हे बोलणे ऐकून अरूणला हंसू आले तो त्यांच्या बोलण्याला शाप असेल असे समजून घाबरला व त्याच्या मनांत नेहमीची त्यांची भीती बसली.

ही गोष्टी होवून बरेच झाले त्याच्या वडिलांनी गावातील नोकरी सोडून

“वसंधरा”



शहराच्या गावी आपले काम सुरू केले व ते शहरात येऊन राहू लागले. अरुणने तारुण्यात पदार्पण केले. त्याचे जसे जसे लग्नाचे वय होवू लागले तसे त्याच्या वडिलांनी त्याच्या करीता एक सुंदर मुलगी पाहून अरुणचे लग्न करून दिले.

काही दिवसांनंतर अरुणचे आईवडिल वारले. परंतु अरुणच्या वडिलांनी बरीच संपत्ती पाठीमागे कमावून ठेवली होती. त्यामुळे अरुणला वडिल वारल्यानंतर आर्थिक परिस्थिती चांगली असल्यामुळे काहीच कष्ट पडले नाहीत.

थोडया दिवसांनी त्याची पत्नी गर्भार राहिली. तिचे नऊ महिने पूर्ण होताच त्याने तिला माहेरी नेऊन पोचविले व तो परत गावी आला.

त्या दिवशी अरुणला रात्रभर झोप आली नाही. पूर्वी घडलेल्या गोष्टी त्याला आठवू लागल्या आपण जाणून बुजून अपंगाना कसा त्रास देत होतो. त्यांची कशी अवहेलना करीत होतो. व आपण दिलेल्या त्रासाला कंटाळून त्यानी आपल्याला दिलेल्या बोलण्याला आपण घाबरलो हे त्याच्या मनांत वारंवार येऊ लागले व राहून राहून त्याला त्या शब्दाची भीती वाटू लागली. अखेर केव्हांतरी त्याचा डोळा लागला व त्याला स्वप्न पडले.

त्याची बायको बाळंत झाली न तीने एका मुलाला जन्म दिला. तो जन्मःहाच एका हाताने लुळा, पायाने लंगडा, तिरळा व मुका होता तशा आपल्या मुलाला पाहिले व त्याला अत्यंत अर्धमेल्या सारखे झाले.

पण अरुणच्या बायकोला अजिबात वाईट वाटले नाही. तिने आपल्या पतीला पहाताच विचारले–"बघा हो, आपला मुलगा किती गोड आणि छान आहे!"

कितीही काळा असला तरी कावळ्याला आपले पिल्लू आवडतेच तसेच मुल कसेही जन्मले तरी प्रत्येक आईला ते प्रिय असतेच मग ते कसेही असो म्हणत खेदाने अरुण म्हणाला–"हो, हो, बघ किती गोड आणि छान आहे!"





परंतु त्या दिवसांपासून अरुणने असे पाहिले की; त्याच्या बायकोने किंवा इतर लोकांनी त्याच्या मुलाला कधीही अपंग म्हणून हिणवले नाही. परंतु जो कोणी त्याला पाहिल तो त्याच्या सौंदर्याविषयी वाखाणणीच करीत असे.

अरुणच्या मनांत आले की; आपली बायको मुलाच्या प्रेमापोटी तसे म्हणत असेल व इतर लोक आपल्या श्रीमंतीकडे पाहून आपल्या मुलाला नावे ठेवीत नसतील. परंतु हे खरे आहे की; आपला मुलगा अपंगच निपजला गेला आहे. असा विचार त्याचा मनात येताच त्याचे हृदय हेलावत असे, त्याच्या मनांत येत असे की; आपला मुलगा जर इतर मुलांच्यात खेळावयास गेला, तर इतर मुले त्याची टिंगल करतील हेटाळणी करतील त्यामुळे आपल्या मुलाला नेहमी त्याच्या आईजवळ नाहीतर आपल्या जवळच ठेवायचे म्हणजे इतर कोणीही आपण बरोबर असल्या कारणाने चिडवणार नाहीत.

अरुण अशा तऱ्हेने आपल्या मुलाचा सांभाळ करू लागला. आता त्याला समजून येऊ लागले की, आपण लहान असताना अपंग लोकांची टिंगल करीत होतो. ते त्यानां किती दुःखदायक होत असेल. त्याच बरोबर त्याला त्या लोकांनी बोललेले शब्द शापरूपीच वाटू लागले. त्यामुळेच आपल्या मुलाला अशी अवस्था प्राप्त झाली असावी.

अरुणच्या घरासमोरच्या झोपडीत एक साधू येऊन राहिले होते. इतर लोकांच्या तोंडी त्याने त्या साधु-विषयी बरेच ऐकले होते की; त्या साधु-पुरुषाला अनेक अद्‌भुत शक्ति प्राप्त आहेत. त्याने एक दिवस त्या साधुपुरुषाला आपल्या घरी बोलाविले व आपल्या मुलाला दाखविले.

तो साधु मुलाला पहाताच अरुणला म्हणाला–"तुमचा मुलगा दैदिप्यमान आहे. तुम्ही खूप नशिबवान आहात."

अरुणने आपल्या मुलाला घरात पाठविले न त्याने आपल्या मनातील

सर्व व्यथा त्या साधुला सांगितली. त्याच्या गोष्टी ऐकून साधु गंभीर झाले. व अरुणला एक उपाय सांगत म्हणाले—"तू ताबडतोब गांवी जाऊन ज्यांची अवहेलना केलीस त्यांची क्षमा माग त्यात तो लंगडा माणूस जिवत नाही त्याची गावात समाधी आहे. त्याची जाऊन क्षमा माग ते सर्व तुझ्या मुलाचे अपंगत्व नाहीसे करतील.

अरुणने ताबडतोब गावी जाण्याचे ठरविले. गांवी पोहोचताच त्याने बहिरी मुलगी, बोबडा मुलगा व लूळा भिकारी यांची मनापासून क्षमा मागितली. तेव्हां त्या तिघानीं अत्यंत प्रेमाने अरुणला सांगितले—आम्ही शत्रु असला तरी असे वाईट कधी मनांत आणत नाही. तरी पण तुला आम्ही क्षमा करण्याने जर तुझ्या मुलाचे अपंगत्व जाणार असले तर त्याने आम्हाला खूप आनंदच वाटेल."

अतिशय खुष होऊन अरुणने प्रत्येकाला दहा दहा सोन्याची नाणी दिली. आणि तो लंगडा दादा याच्या समाधीकडे गेला.

समाधीच्या समोर पश्चातापाने डोळ्यात पाणी आणून दोन्ही हात जोडून अरुण म्हणाला—"दादा, तुम्हाला लंगडा म्हणून तुमची मी हेटाळणी केली त्रास दिला. त्याबद्दल मला क्षमा करा. व माझ्या मुलाला आशिवाद द्या."

नंतर जेव्हां त्याची झोप मोडली व तो जागा झाला तेव्हां त्याचे हृदय हलके हलके झाल्यासारखे वाटू लागले. त्याच्या मनांत आता कोठलीच चिंता नव्हती. कारण काहीही असो स्वप्नात तरी त्याला सर्व अपंग लोकांनी क्षमा केली होती.

ह्या स्वप्नानंतर एका आठवड्याने त्याला बातमी कळली की; त्याची बायको बाळंत होवून तिला मुलगा झाला आहे.

हे समजताच अरुण आपल्या सासरी पोहोचला आणि आपल्या सुंदर मुलाला पाहून बायकोला म्हणाला—"लहानपणी मी ज्या अपंगाला त्रास दिला होता. त्या सर्वांनी मिळून मला क्षमा केली आहे. व त्यामुळे आपला मुलगा एवढा सुंदर झाला आहे."






[१२]

[दोघां थोरल्या भावांनी इच्छिल्या प्रमाणे पिंगळने तांडेला आपल्या घरी मेजवानी दिली. पूर्वी ठरल्या प्रमाणे तांडेला दोघां खलाशांच्या सहाय्याने पिंगळला बांधून त्याला आपल्या जहाजावर घेऊन गेला. दोघे भाऊ घरी परत आले आणि त्यांनी आईवर मारहाण करून पिंगळने आणलेले सर्व धन व रत्नमाणिक्ये आणि मंतरलेली पिशवी नेली. पुढे—]

जीवदत्त आणि लक्षदत्त दोघांनी पिंगळने धन व रत्नमाणिक्ये भरून आणलेली पिशवी घेतली. तिचे तोंड सोडून तिच्यातील सोने आणि रत्नमाणिक्ये पाहिली व आश्चर्याचा धक्का बसून ते बेशद्धच झाले. पिंगळने थोडेसे धन आणले असेल असे त्यांना वाटले होते, परंतु इतके मोठे धन घेऊन आला असेल या गोष्टीची त्यांना स्वप्नातही कल्पना आली नव्हती.

जीवदत्त म्हणाला—"अरे, हे पैसे आपल्यालाच नव्हे आपल्या सात पिढ्यांना पुरेल एवढे आहे. सर्व दारिद्र्य संपलेच, समज!"

"होय रे दादा, होय! आपल्या जवळ इतके धन आहे, हे जर अवंतीच्या राजाला कळले तर तो आपल्या दोघां मुलींची लग्न आपल्याशी करून देईल. मंत्र्याबरोबर तो आपल्या शोधार्थ येईल." लक्षदत्त उत्साहाने म्हणाला.



दोघे मुलगे आनंदाने अशा तऱ्हेने बोलत असलेले ऐकून त्यांचे वात्सल्य आईच्या मनात उचंबळून आले. ती मुलांनी तिला कशा शिव्या दिल्या होत्या व कशी मारहाण केली होती, ते सर्व विसरली. म्हणाली–"बावांनो, तर मग एक काम करा, पूर्वी सारखे हे धन दुर्व्यसनांत खर्च न करतां, चांगलं लग्न करून संसार मांडा! मी तुमच्या बरोबरच राहून उरलेले दिवस आनंदाने काढीन."

आईने ते म्हटल्यावर दोघे मुलगे सांपासारखे 'भुस्स' करून उभे राहिले आणि म्हणाले–"आम्ही पाहिजे तर लग्न करून संसार करू किंवा बैरागी होऊन जगभर फिरू. ते सर्व तुला कशाला हवं आहे? तुझे आमच्यावर थोडे देखील पुत्र प्रेम नाही, हे आम्हांला चांगले माहीत आहे. तुझे सर्वस्व म्हणजे तो पिंगळ! तू गोडगोड बोलून आम्हांला फसवू शकणार नाहीस. ही सर्व आमच्या वडिलांची इस्टेट आहे. त्यात तुला वांटा मिळेल असे वाटते आहे, होय की नाही?"

"हे सर्व धन तुमच्या वडिलांनी कमावलेले धन नाही रे! पिंगळने कष्ट करून मिळविलेले धन आहे. ते तुम्ही वांटून घेणारच आहांत, त्यात मला काही नको. मला पाहिजे आहे ती फक्त मंत्रवलेली पिशवी! ती माझ्या जवळ असली की तुम्ही केव्हांही आलांत तर तुम्हांला हवे ते पक्वान्न मी वाढीन. पाहिजे तशी मेजवानी सुद्धा तुम्हांला करता येईल. मला मागच्या सारखं दारोदार भीक मागायची गरज उरणार नाही." आई म्हणाली.

"तू खरं म्हणजे आमची आईच नाहीस, मग तू भीक मागू लागलीस तर त्याचे आम्हांला काय?" जीवदत्त निष्ठुरपणे म्हणाला.

"तू म्हणतो आहेस, तेच बरोबर रे दादा! आपल्या वडिलांचे सर्व धन घेऊन आपल्या लाडक्या मुलाला सर्व देऊन टाकण्याचा विचार आहे, तिच्या मनात. अशी बाई आपली आई कशी असू शकेल?" लक्षदत्त भावाच्या 'हो' ला 'हो' देत म्हणाला.

आतां यांच्याशी वाद घालण्यात अर्थ नाही असे ठरवून निराश होऊन ती भितीजवळ जाऊन टेकून बसली.

दोघांनी पिंगळने आणलेल्या धनाचे वांटे केले, नंतर मंत्रवलेल्या पिशवी साठी दोघांचा वादविवाद सुरू झाला. दोघे भाऊ 'ती मी घेणार' 'मी घेणार' म्हणून एकमेकांवर ओरडू लागले. दोघे परस्परांचे गळे धरून बसले, आईने पुन्हां दोघांना किती समजावून सांगितलं–"बावांनो! तुम्ही परस्परांचा गळा दाबून जीव घेऊ नका. तुम्ही मला किती मारहाण केलीत तरी तुम्ही माझी मुलं आहां, ही गोष्ट मी कशी विसरेन? तुम्ही थोडा शहाणपणा करून ती पिशवी माझ्याजवळ ठेवा. परस्पर भांडणाची गरजच राहणार नाही."

"पिशवीचा माझा वांटा मी घेतो." असे म्हणत जीवदत्त स्वैपाकघरात विळीच्या शोधार्थ गेला. विळीने तो पिशवी कापणार होता. पुन्हां आई त्याला अडवून म्हणाली–"बाळा, जीवदत्ता! तेवढे मात्र करू



नकोस! एकदा जर तुम्ही पिशवीचे तुकडे केलेत की तिचा महिमाच नष्ट होईल. ती कोणी सबंधच वापरली पाहिजे, तुकडे करून नाही."

"तर मग पिशवी मीच घेणार!" लक्षदत्त म्हणाला.

"जा रे मूर्खा! मी घरातला मोठा ज्येष्ठ पुत्र आहे! अशा महत्वाच्या सर्व वस्तू वारसा हक्काने मलाच मिळायला हव्यात. शास्त्रांनी पुराणांती, असे स्पष्टपणे जाहीर केलं आहे." जीवदत्त म्हणाला.

अशा तऱ्हेने दोघां भावंडात चालू असलेल्या भांडणाचा आवाज रस्त्यावर



गस्त घालणाऱ्या पोलीस कोतवालाच्या कानावर पडला. त्याला धन वैभव आणि मंत्रवलेल्या पिशवीशी गोष्ट कळली. उजाडल्यावर राजाकडे जाऊन सर्व निवेदन केले.

मुळातच अवंती नगरीचा राजा लोभी व चिक्कू म्हणून प्रसिद्ध होता. त्याला हे गुपित कळल्यावर त्याच्या मनात मोह उत्पन्न झाला. त्याने लगेच आपल्या दंडनायकाला बोलावून त्या दोघां भावांना त्यांच्या घरात मिळतील त्या सर्व वस्तू घेऊन हजर करायला आज्ञा केली. दंडनायकाने बरोबर पोलीस शिपायांना घेऊन जाऊन दोघां भावांच्या मुसक्या बांधल्या. नंतर सर्व घर चाळून काढले. सर्व धन आणि महिमा असलेली पिशवीच नव्हे तर घरात जे जे त्याला लहान मोठे सामान दिसले ते सर्व उचलून गाड्यांत घालून घेऊन गेला.

जीवदत्त आणि लक्षदत्त दोघांना राजाने काय भानगड आहे, स्पष्ट सांगायला दटावले. परंतु दोघांनी नकार दिल्यावर शिपायांकडून चार सहा फटके देवविल्यावर दोघे मार्गावर आले व त्यांनी सुरवाती-पासून घडले ते सर्व सांगितले.

"म्हणजे ही सर्व इस्टेट तुमची नाही, म्हणावयाची !" असे म्हणत राजा आनंदाने म्हणाला–"राज्यांत कोणाच्या इस्टेटीला वारस नसेल तर ते सर्व राज्याच्या खजिन्यात जाते, असा नियम आहे. तुम्ही त्या पिंगळला गुलाम म्हणून विकले आहे. म्हणून त्याला इस्टेटीवर हक्क सांगतां येणार नाही. तो मुळात नागरिकच नाही. आतां तुम्ही, तुमचे नसलेले धन चोरून लुबाडून नेण्याच्या प्रयत्नात होतां. त्याबद्दल तुम्हांला वीस वर्षे सक्त मजुरीची शिक्षा मी करीत आहे !"

दोघे भाऊ गयावया करू लागले– "महाराज! आम्हांला ते धन नको व ती महिमा असलेली पिशवी सुद्धा नको. स्वतंत्रपणे जगायला परवानगी देण्याची कृपा करावी."

परंतु राजा त्यांना माफ करायला तयार नव्हता. तसे केले तर ते प्रजेला सांगत फिरतील की आपण त्यांच्यावर अत्याचार करून त्यांना लुबाडले. प्रजेची आपल्यावर असलेली राजभक्ती कमी होईल. म्हणून तो म्हणाला–

"तुम्ही स्वतःच आपला गुन्हा मान्य केला आहे. एवढेच नव्हेतर आपल्या आईवर इतका अन्याय केला आहे. म्हणून मी तिला दर महिन्याला दहा मोहरा प्रमाणे तिला पोटगी देणार आहे!" या शब्दात राजाने निवाडा दिला आणि उद्यान वनात फिरायला निघून गेला.



शिपायांनी जीवदत्त आणि लक्षदत्त दोघांच्या हाता पायांना बेड्या आणि साखळ दंडांनी बांधले आणि त्यांना मोठमोठी लोखंडी कुलुपे लावून एका कोपऱ्यातल्या काळ कोठडीत ओढीत नेऊन त्यांना डांबून ठेवले. बाहेर दाराला सुद्धां कुलुपे लावली.

दोघे भाऊ त्यांच्यावर येऊन पडलेल्या प्रसंगावर विचार करून फार दुःखी झाले. त्यावेळी त्यांना धाकट्या भावाशी आणि आईशी केलेल्या व्यवहाराबद्दल पश्चात्ताप होऊ लागला. पण आतां वेळ निघून गेली होती. करण्यासारखे काहीच नव्हते. अंधार, दुर्गंध, झुरळे, डांस, ओल्या भिंती व जमीन या नरकात त्यांना यातना भोगाव्या लागत होत्या. पुष्कळ वेळ त्या दुःखात रडत राहिल्यावर दमून गेल्यावर त्यांना झोप लागली.

दोघां भावांनी पिंगळशी दगाकरून त्याला फसविले. तेव्हां पासून तो तांडेलाचा गुलाम झाला होता. आतां तांडेलाने पिंगळला इतर गुलामांना त्याने जेथे ठेवले होते तेथे नेऊन लोखंडी पट्टीला अडकविलेल्या साखळ दंडांनी बांधून वल्हवण्याचे काम दिले. उजाडल्याबरोबर नांगर उचलण्यात आला. तांडेलाचा हुकूम

होताच खलाशांनी जहाज पाण्यात लोटून वल्हवायला सुरवात केली.

हा तांडेल दिसायला सभ्य समाजातला असला तरी तो चांचेगिरी करणारा अट्टल चोर होता. व्यापाराचा माल ने आण करतो, असे सांगून एका बंदरातून दुसऱ्या बंदरात जाणाऱ्या जहाजांना खोल समुद्रात गेल्यावर त्यांच्यावर हल्लाकरून त्यांना लुटणें हेच त्याचे मुख्य काम असे. त्या जहाजातील व्यापाऱ्यांना व खलाशांना तो क्रूरपणाने समुद्रात ढकलून देत असे. कोणाला त्याने जिवंत सोडलेच तर ते आपले खरे स्वरूप साऱ्या जगाला सांगतील ही त्याला भीती वाटे.

गुलामांबरोबर वल्हवण्याचे काम करीत असतां पिंगळने त्याला मल्लूककेतूने शिकविलेला मंत्र आठवण्याचा खूप प्रयत्न करून पाहिला. त्याने किती कपाळफोड केली तरी तो मंत्र त्याला मुळीच आठविला नाही. त्याच्या भावांनी त्याच्या संपत्तीला बळकावून नेण्यासाठी किती कुटीलपणाने तांडेलाशी दोस्ती करून आपल्याला फसविले ते आठवून त्याच्या अंगाची लाही लाही होई. त्याला वाटे आतां आपण तेथे नाही हे पाहून त्यांनी आईला फार बेजार करून सोडले असेल आणि आपण जे धन इतक्या कष्टाने मिळवून आणले ते व्यर्थ व्यसनात घालवून बसतील.

या गुलामीच्या जीवनातून कसे बाहेर पडावयाचे, पिंगळला तीच गोष्ट वारंवार सतावत होती. त्याने अपक्षिल्याप्रमाणे एके दिवशी अचानक एक तुफान समुद्रात आले. पर्वतासारख्या उंच लाटा उठत. त्यांना व भयंकर जोराने चाललेल्या थंडवाऱ्याला तोंड देत त्यांचे जहाज पाण्यात पडलेल्या वाळक्या पाना पांचोळचा-सारखे वाहू लागले. तांडेलाने, त्यांचे जहाज धोक्यात पडले असल्याचे ओळखून आपल्या साथीदारांना व गुलामांना सावध करीत व हुकूम सोडीत जहाजावर सर्वत्र हिंडत होता. संकटांत आणखी एक संकट असे त्याला दूर एक जहाज तुफानात सांपडल्यासारखे दिसले.

त्याने आपल्या जवळच्या दुर्बीणीने ते जहाज लक्षपूर्वक पाहिले ते एक मोठे गलबत होते.

एका खंडातून दुसऱ्या खंडातील देशाशीं व्यापारी माल पोंचविणारे ते जहाज होते. अशा जहाजांत अमूल्य मालाची ने आण होत राहाते, खूप लूट आपल्याला मिळणार ही आशा धरून तांडेल होता. त्याला जणुं काय हा पर्व दिन आल्यासारखा आनंद झाला.

समुद्राच्या मध्ये खोल पाण्यात दोन्ही जहाजे तुफानात फसली होती. जहाजांतले सर्व लोक आपली, सर्व शक्ती लावून आपापल्या जहाजांना वांचविण्याच्या प्रयत्नात होते. तरी आपण या संकटातही












थोडे साहस करून त्या मोठ्या गलबतावर हल्ला केला तर आपल्या हाती मूल्यवान वस्तू येतील हा मोह तांडेलाला झाला. त्याचे अनुयायी अशा संकटांना तोंड देण्यात अनुभवलेले लोक होते. त्या मोठ्या गलबतातले सर्व लोक नौकानयनात निष्णात होते, परंतु त्यांना समुद्री युद्धाचा अनुभव मुळीच नव्हता असे नाही. ते वादळाला घाबरले होते.

वेळ आळीच की, दुसऱ्या जहाजावर तुटून पडण्यास बरे. असा विचार करून तांडेलाने आपल्या जहाजातील खलाशांना व अनुयायांना सावध करून त्यांना तलवारी उपसून व धनुष्यबाण घेऊन तयार रहायला सांगितले.

पिंगळ अंगातले सर्व बळ एकवटून इतर गुलामांबरोबर वल्हवीत होता. त्याचे जहाज त्या मोठ्या व्यापारी गलबता जवळ पोचू लागले. तांडेल शिडाच्या दांडीला टेकून उभा राहिला. त्याचे लक्ष त्या गलबतावर होते. परंतु एकाएकी तो घाबरल्या सारखा झाला.

तो ओरडून म्हणाला–"सर्वजण तलवारी म्यानेत ठेवा आणि धनुष्यबाण बाजूला ठेवा आणि जेवढ्या लवकरात लवकर जहाज मागे फिरवा. ते व्यापारी गलबत नाही. कपडे तेलात बुडवून बाणाने आपल्या जहाजावर ते सोडण्याच्या बेतात आहेत."

तांडेल अजून ओरडतच होता. त्यांच्या जहाजावर ते जळते बोळे येऊन पडू लागले. तांडेलाच्या काही अनुयायांच्या अंगावर पडू लागले. त्यांचे कपडे भगभग जळू लागले. तांडेल वेड लागल्या सारखा मोठ्याने ओरडून सांगू लागला–"सर्व गुलामांना सोडून मोकळे करा. वल्ही सोडून हातात तलवारी घ्या. आपल्या जहाजाचे रक्षण सर्वांनी मिळून करायाचे आहे."

(क्रमशः)



# निर्णय

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमी प्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, हातात घेतलेले काम पुरे करण्याची जिद्द खरोखरीच वाखाणण्या सारखी आहे, कदाचित् इतकी कठोर शिक्षा जर इतरांसाठी घेतली असशील तर मात्र फार सावध राहिले पाहिजेस. कारण कधी कधी सहाय्य ज्यांना मिळते त्यांच्याकडून सन्मान सत्कार तर मिळत नाहीच, उलट अपमान होण्याची शक्यता असते त्याचे उदाहरण म्हणून मी तुला सेनगुप्ताची गोष्ट सांगणार आहे. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

उज्वल देशातील गिरी नगरात कला आणि नीला नावाच्या दोन बहिणी रहात



होत्या. त्यांचे आईवडिल त्यांच्या लहानपणीच वारले होते. त्यामुळे त्यांच्या आजीने त्या दोघी मुलींना लहानाचे मोठे केले. थोड्या दिवसांनी त्यांच्या आजीचे पण निधन झाले.

कला व नीला दोघीही दिसण्यास सुंदर आणि हुषार होत्या. नीलाला उत्तम संगीतकला येत होती. एकदा पावसाच्या अभावामुळे उज्वल देशात दुष्काळ पडला. त्यांच्या देशाचा राजा कुमार वर्मा याने प्रजेच्या हिताकरीता जनतेला सहाय्य करण्याचा प्रयत्न केला. परंतु दुर्दैवाने त्यांच्या शेजारच्या देशातील राजा सेनगुप्ता याने त्याचा फायदा घेऊन तो उज्वल देशावर स्वारी करायला आला. कुमारवर्माने सेनगुप्ताच्या लढयाला शौर्याने तोंड दिले. परंतु तो पराजित झाला. सेनगुप्ताने उज्वल देशावर आपला अधिकार प्राप्त करून कुमारवर्माला तुरुंगात टाकले.

उज्वल देशाच्या प्राप्तीनंतर तेथील जनतेच्या हाल अपेक्षा व दुष्काळ पाहून राजा सेनगुप्ताला खूप वाईट वाटले. तेथील सर्व परिस्थिती पाहून ती सुधारण्याचे त्याने आपले कर्तव्य मानले आणि राज्यभर हिंडून जनतेची चौकशी करून लोकांना तरतऱ्हेची मदत करू लागला.

सेनगुप्त एकदा गिरीनगरानरून जात होता गिरी नगराजवळून अंबा नदी वहात होती. त्यावेळी त्या नदीला फार पाणीही नव्हते. रोजच्या सरावाप्रमाणे नीला नदीवरून पाणी आणण्यास गेली. परंतु परत आली नाही.

कला आपल्या बहिणीच्या शोधार्थ म्हणून घराबाहेर पडली व नदीच्या बाजूला आली. पण तिची बहिण नीला हिचा घडा नदीच्या किनारी तिला दिसला. तो पाहून तीं किनाऱ्या किनाऱ्याने तिच्या शोध काढत पुढे जाऊ लागली. तोच समोरून सेनगुप्ताचे काही सैन्य येताना तिला दिसले. सर्व लोकांना संशय आला की; नीला ह्याच लोकांनी पळून नेले असावे.

ते ऐकताच कला दुःखी झाली. व तिने राजधानीची वाट धरली व ती दरबारात जाऊन पोहोचली. आणि आपला सारा वृतांत राजाला सांगितला.

"तुला कोणाचा संशय आला आहे?" राजाने विचारले.

"असहाय्य स्थितीत एका अबलेचे अपहरण करणाऱ्या माणसांचा" कलाने उत्तर दिले.



हे तिचे उत्तर ऐकून राजा सेनगुप्ताला आश्चर्य वाटले तो म्हणाला–"असे तू आडून आडून बोलू नकोस सरळ सरळ कोण ते सांग."

"महाराज, मी अजिबात न घाबरता सांगायला तयार आहे. मी कोणतीही परिस्थिती आली तरी ठरवूनच आले आहे की आपण कठोर शिक्षा मला दिलीत तरी मी भोगायला तयार आहे माझा आपल्यावर संशय आहे" कलाने सांगितले.

सेनगुप्त क्षणभर स्तिमित झाला आणि जोरात ओरडून म्हणाला–"काय मी तुझ्या बहिणीचे अपहरण केले आहे?"

कलाने जरा देखिल न डगमगता उत्तर दिले म्हणाली–"प्रभो, मला आधी पासूनच माहित होते की आपण माझे उत्तर ऐकून नाराज व्हाल. परंतु हा संशय माझा एकटीचाच नाही तर आमच्या गिरी नगरातील सर्व लोकांचा आहे. आपण तर प्रथम पासूनच आमच्या दुष्काळानी गांजलेल्या लोकांवर व नगरावर कब्जा केलात व आमच्या राजलक्ष्मीला लूबाडून टाकून धर्मद्रोह केलात. तरी अशा स्थितीत आपल्यावर कसा काय विश्वास ठेवायचा की माझ्या असहाय्य बहिणीला तुम्हीच पळवून नेले नसेल! जेव्हां माझी बहीण नदीवर पाणी भरायला गेली तेव्हां तुमच्या

शिपायांना त्या बाजूने जातानां लोकांनी पाहिले व तेव्हां पासून माझी बहिण बेपत्ता झाली." कलाने सांगितले.

कलाच्या बोलण्यामागे करारीपणा होता. राजानेही जनतेच्या विश्वास संपादण्यासाठी कोणतेही कार्य केले नव्हते. त्याने लज्जेने मान खाली घातली.

सेनगुप्त काही वेळ आपल्या विचारांमध्येच गुंग होवून गेला. व मान वर करून त्याने कलाला म्हटले–" मी देवाची शपथ घेवून सांगतो की, मी तुझ्या बहिणीला पळवून नेले नाही. तू माझ्यावर पूर्ण विश्वास ठेऊन परत जा. मी तुझ्या बहिणीचा नक्कीच शोध काढीन."

कला आपल्या गावी परत आली. सेनगुप्त कलाचे साहस व चातुर्य ह्यावर मनोमन खुष झाला. कलाच्या सुंदरतेवर मुग्ध झाला. आणि त्याच क्षणी त्याने ठरविले की, निलाचा ठावठिकाणा लागताच कला बरोबर विवाह करावयाचा.

कला घरी पोहचली तो तिला नीला घरात असलेली दिसली. तिच्याबरोबर संगीताच्या वर्गातील एक तरुण पण होता. युवकाबरोबर पळून जाऊन तिने एका देवळात लग्न करून घेतले व ती त्या दिवशी परत आली होती. तिने तिच्या बहिणीला ह्या करिता सांगितले नाही की, हे समजताच तिची बहिण तिला लग्नाला परवानगी देणार नाही.

त्या नवविवाहितांना आशिर्वाद देऊन कला लगेच राजधानीला परत आली. आणि राजाकडे आपल्या चुकीची क्षमा मागू लागली.

सेनगुप्त हसून म्हणाला–" ह्यात क्षमा करण्यासारखे काय घडले. मी आत्ताच तुमचे राज्य सोडून परत जात आहे तुमच्या राजाला परत राज्यकारभार सोपवीत आहे–" कला, तू माझ्यावर मोठे उपकारच केले आहेस. त्याचे बक्षिस हे घे" असे सांगून एक किंमती बक्षिस कलाला देत राजा आपल्या वराल देशात परत निघाला.

वेताळाने येथवर गोष्ट सांगितली व विचारले–" राजा, सेनगुप्ताने घेतलेला निर्णय आश्चर्यजनक नाही कां? जिने भरल्या दरबारात राजाचा अपमान केला. त्याचा विचार करावयाचा सोडून राजाने मनांत तिच्याशी लग्न करण्याचा विचार कसा केला? सगळयात विचित्र गोष्ट अशी की; उज्वल देश जिंकून परत त्याचा त्याग त्याने कशाकरीता केला? हे काम अविवेकी नाही कां? या शंकेचे समाधान कारक उत्तर माहीत असून तू दिले नाहीस, तर परिणाम तुला माहीतच आहे तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला–" सेनगुप्ताने घेतलेल्या निर्णयामध्ये आश्चर्य करण्यासारखे काही नाही. भर दरबारात





राजावर आरोप करण्यात यशस्वी झालेल्या कलाशी विवाह करण्याचा निश्चय काही जगावेगळी गोष्ट नाही. परंतु त्याला उशिरा कळले की; तिला उशिराने कां. होईना आपली चूक समजली. नीलाच्या गैरहजेरीचा पुढे मागे काही विचार न करीता तिने राजावर आरोप ठोकला होता. असे वागणे कोणत्याही सामान्य स्त्रीला जमत नसते आणि एकट्या स्त्रीलातर एक संकटच होऊन बसले;असते म्हणून सेनगुप्ताने कला बरोबर विवाह करण्याचा निश्चय बदलून टाकला व तो राज्यातून निघून गला.

आता राहिली राज्याचा त्याग करण्याची गोष्ट जर कोणत्याही देशाचा राजा दुष्ट व अत्याचारी असला तरी दुसऱ्याच्या राज्यावर अधिकार गाजवून त्याने प्रजेवर कितीही उपकार केले, तरी त्या राजाला प्रजेचा विश्वास कधीही मिळत नाही. प्रेम संपादन केले तरी सेनगुप्तने पूर्वीच्या राजाला कैदेतच ठेवले होते त्यामुळे त्याच्या प्रति प्रेमभाव जनतेला कळण्यास मार्ग नव्हता. कुमारवर्मा राजा दुष्ट ही नव्हता व अत्याचारीही नव्हता.

राजा कुमारवर्मा आपल्या दुष्काळात गांजलेल्या जनतेला कोणत्या ना कोणत्या तऱ्हेने मदत करीत होता. त्यामुळे सेनगुप्ताने कितीही राज्यावर व जनतेवर प्रेम दाखवून मदत केली तरी तो राजा राज्य करण्यास, प्रजेचा विश्वास संपादण्यास अपात्रच होता, ही गोष्ट सेनगुप्ताने त्याच वेळी जाणली आणि त्याने पुन्हा कुमारवर्माला त्याचे राज्य सोंपविले. त्याने हा निर्णय खूप विवेकीपणाने राजनैतिकतेने व जागरूकतेने घेतला कारण त्याला कळले की आपल्या विषयी आदर प्रतिष्ठा लोकांच्यात आणण्यास हीच गोष्ट उपयोगास येईल."

अशा प्रकारे राजाचे मौनभंग होताच वेताळ प्रेतासह नाहीसा झाला आणि झाडाला जाऊन लोबंकळू लागला.

(कल्पित)





# पदाची योग्यता

धनगुप्त विदर्भ राज्याचा खजिनदार होता. खजिन्यातले काम जेव्हां वाढले. तेव्हां धनगुप्ताने आपल्या मंत्र्याच्या सल्लयाने दोन अधिक व्यक्तींना नेमण्याचे ठरविले. तेव्हां मंत्र्याने त्याच्याकडे दोन-जणांना पाठवून प्रत्येकी बारा मोहरा पगार ठरवून नेमण्यास सांगितले. पण धनगुप्ताने दोनाच्या ऐवजी तीन जणांची कामच्या जागी नियुक्ति केली.

हे ऐकून मंत्र्याला खूप राग आला. परंतु त्याविषयी मंत्र्याने धनगुप्ताजवळ कोणताही जाब विचारला नाही. सरळ राजाकडे जाऊन तक्रार केली-"प्रभो, आपल्या खजिन्यातला खजिनदार धनगुप्त याने कामच्या वाढीचे कारण सांगून दोन अधिक माणसांची नेमणूक करण्याची परवानगी मगितली होती. परंतु त्याने आता दोनांच्या ऐवजी तीन जणांना कामावर नेमले आहे.

राजा म्हणाला—"हा तर आपल्या नियमांचे उल्लंघन करणारा आहे. हे काही बरोबर नाही." त्यानंतर त्याने धनगुप्तला दरबारात बोलावले व त्याला त्याचा जाब विचारला.

"महाराज, मंत्री महाशयानी मला अधिक कामाकरीता दोन माणसे जास्त ठेवून त्यांना प्रत्येकी बारा मोहरा वेतन देण्यास सांगितले होते. परंतु मी तीन माणसांना ठेवून प्रत्येकी आठ मोहरा वेतन देत आहे." धनगुप्त राजाला म्हणाला.

राजा क्रोधाने लाल लाल झाला व धनगुप्ताला म्हणाला—"तू असे कां केलेस?

धनगुप्त विनयपूर्वक उत्तर देत म्हणाला—"महाराज, मंत्र्याने दोन व्यक्तिना माझ्या-कडे पाठविले त्या माणसाच्या परिचयानंतर मला असे वाटले की; एका माणसाची मदतीच्या दृष्टीने आणखीन जरूरी आहे.







त्यांना मध्येच थांबवून मंत्री म्हणाला– "महाराज, मी ज्या दोन माणसांना पाठविले होते. त्या अत्यंत विश्वासनीय अशा आहेत. आणि ह्या कामा करीता जबाबदारी घेणाऱ्या आहेत. त्यामुळे मी ह्या दोन व्यक्तिची चांगली पारख करून त्यानां त्या कामावर नेमण्यास सांगितले आहे."

"मंत्री महाशय, हे काम तुम्ही अत्यंत चांगले केले. कारण पैशांच्या व्यवहार करणारा माणूस हा पैशांशी संबधीत असतो. खजिन्यात काम करणारा ईमानदार व सोबत सामर्थ्यशाली पण असावा लागतो. असे म्हणत राजाने धनगुप्ताकडे पाहिले.

"महाराज, मंत्री महाशयांनी ह्या पदांकरीता ज्या माणसांना माझ्याकडे पाठविले होते. त्यात एकजण मंत्र्याच्या मित्राचा मुलगा आहे. व दुसरा महाराणीच्यां दूरच्या नात्यातला आहे." धनगुप्त म्हणाला.

राजाला त्याचे उत्तर ऐकून हसू आले तो म्हणाला–"कायं तुझ्या दृष्टीने खजिन्यातल्या असलेल्या छोटया कामावर नेमायला ही माणसे योग्य नाहीत कां?

"महाराज, हा प्रश्न योग्यता व अयोग्यतेचा नाही. अशा प्रभावाच्या माणसांकडून कठोर वागून काम करून घेता येत नाही. म्हणून मी एका साधारण माणसाला ह्या पदावर नेमले. मी खूप विचारांन्ती हा निर्णय घेतला की वेळ पडल्यास ह्या दोघांचे काम सुद्धा मी ह्या माणसांकडून करून घेऊ शकेन. आणि म्हणूनच मंत्र्याने दिलेल्य पगारापेक्षा जास्त वेतन मी देत नाही ह्याचा सुद्धा विचार केला आहे. धनगुप्ताने आपले म्हणणे मांडले.

राजाने महामंत्र्याकडे पाहिले ते पहाताच मंत्र्यांनी गुपचुप आपली मान खाली घातली.

त्यानंतर राजाने हुकूम काढला की, काम जो मनपुर्वक करेल त्याच्यांत पक्षपात करणार नाही. अशा योग्यतेच्या माणसांनाच कामावर ठेवावे.





# दुष्परिणाम

विमला जरूरी पेक्षा कमी बोलणारी बाई होती. लग्न झाल्यावर ती जेव्हां सासरी आली तेव्हां तिला कळून आले की; आपला पती एखादी छोटी गोष्ट असली तरी त्याचा खूप मोठा विपर्यास करून सांगतो. त्याची ही गोष्ट तिला मुळीच आवडली नाही. सुरवातीला तिने खूप गोड बोलून त्याला समजवायचा प्रयत्न केला परंतु त्याच्यावर त्या सांगण्याचा काही एक परिणाम झाला नाही. तिने नंतर आपल्या सासुला सांगूनही त्याला बदलण्याचा प्रयत्न केला. शेवटी निराश होऊन विमलाने आपल्या पती बरोबर व इतर नातेवाईकांशी सुद्धा 'होय' किंवा नाही ह्या व्यतिरिक्त जास्त बोलणे सोडले.

एकदा विमलाला तिच्या मैत्रिणीच्या लग्नाकरीता गांवी जाण्याची वेळ आली ही गोष्ट समजताच गजाननने आपल्या बायकोला उपदेश करण्यास सुरवात केली– "मैत्रिणीच्या लग्नाला अवश्य जायला पाहिजे. कुटूंबापेक्षांही चांगला संबंध मैत्रीत असतो. मैत्रीत स्वार्थ कधीच असू नये. खरे तर अडचणीच्या वेळी मित्रच उपयोगी पडतात. लग्न सोहळा म्हणजे महत्वाचा भाग आहे तरी जायला पाहिजेस वगैरे वगैर."

विमला गजाननचे सर्व संभाषण ऐकून हसून म्हणाली–"एवढे रामायण सांगायची काही जरूर होती? फक्त एवढेच सांगता आले असते, "लग्नाला जाऊन ये" असे सांगून विमला मैत्रिणीच्या लग्ना करीता गावाला जायला निघाली. मैत्रिणीच्या घरी पोहोचल्यावर विमलाने तिच्या बरोबर थोडयाफार गप्पा मारल्या व एकटीच कोणाशीही काहीएक न बोलता

       



लग्न सोहळा पहाण्यात गुंग होऊन गेली."

तेथील आजूबाजूच्या बायका ते पाहून आपापसात बोलू लागल्या–"पहा, विमला किती गर्विष्ठ आहे. कोणाशीही बोलणे तर सोडाच हसणे सुद्धा नाही. हे सर्व बोलणे विमलाने ऐकले परंतु तिने त्यांच्या बोलण्याची फिकिर सुद्धा केली नाही.

दुपारच्या जेवणानंतर विमलाने आपल्या मैत्रिणीचा निरोप घेतला व ती परत निघाली. भाड्याची गाडी शोधण्याकरीता ती चौकात आली तेव्हां तिची मैत्रिण सरोजला तिच्या पती बरोबर एका गाडीतून जातांना तिने पाहिले. सरोज पहाताच त्यांनी गाडी थांबवली परंतु विमलाने त्याच्यांकडे पाहिले न पाहिल्यासारखे करून तोंड वळवले व दुसरीकडे पाहू लागली. सरोजला व तिच्या पतीला हे तिचे वागणे पाहून खूप वाईट वाटले. व ते तेथून निघून गेले.

विमलाने चौकात उभे राहून बराच वेळ वाट पाहिली. पण गाडी मिळाली नाही. अंधार पडू लागला आणि त्याच सुमारास तिला एक गाडी येतांना दिसली तिने ती गाडी दुप्पट पैसे ठरवून घेतली व ती गाडीत बसली. विमला अर्धा रस्ता गेली असेल नसेल तोच गाडीवानाने, गाडी थांबवली.

"काय झाले? तुम्ही गाडी कां थांबवली?" विमलाने घाबरतच विचारले.

त्यावर त्या गाडीवानाने खिशातून एक सुरा काढला व विमलाला दाखवत म्हणाला–"गाडीतून खाली उतरा आणि काय असतील नसतील ते पैसे व हा गळ्यातला हार मुकाट्याने काढून द्या."

ते सर्व ऐकून विमला गभगळीत झाली. व पैसे दिले नाही तर आपले मरण नक्की समजून तिनें आपल्या जवळचे शंभर रुपये गाडीवानाच्या हातात दिले.

"तो हार काढा" गाडीवानाने धमकावले.

विमला आपल्या थरथरत्या हाताने हार काढू लागली तेवढ्यात तिला दुसरी एक गाडी वेगाने येताना दिसली. ती पहाताच गाडीवानाने तिचा हार हिसकावून काढण्याचा प्रयत्न केला. परंतु तेवढ्या गडबडीत तो हार तुटून खाली पडला. गाडीवान तो हार न उचलून घेताच घाबरून तेथून गाडीत चढून पळून गेला. नंतर खाली पडलेला हार शोधून विमलाने आपल्या पदरात बांधून ठेवला. व ती पायीच आपल्या गांवी पोहचली.

विमलाने घरी आल्या बरोबर आपला पती गजानन ह्यास सर्व गोष्ट सांगितली. ते ऐकून गजानन आपले डोके बडवून घेत म्हणाला–"तू सुद्धा किती मुर्ख आहेस? सरोजशी बोलून त्यांच्या बरोबर आली असतीस तर ही दशा झाली नसती. माझचे चुकले की तुला एकटीला पाठवले दुसरी चूक तुला शंभर रुपये दिले व सोन्याच हार करून दिला." अशा प्रकारे गजानन बायकोवर तोंडसुखघेऊ लागला. विमला म्हणाली–"वेळ आली की तुमच्या चुका सुद्धां तुम्हांला दाखवून देईन आता प्रथम आपल्या सोनाराकडे जाऊन माझी माळ दुरूस्त करून घेऊन या.

गजानन गावातल्या प्रसिद्ध सोनाराच्या दुकानांत कामाला होता. शंभर रुपये चोरीला गेल्याच्या दुःखात तो मग्न होता. त्यामुळे तो आपल्या बरोबर हार न्यायला विसरला.

त्याच दिवशी त्याच्या दुकानात एक टकल्या माणूस दागिने खेरेदी करण्यास





आला. गजाननने त्याला तऱ्हेतऱ्हेचे सोन्याचे दागिने दाखविले. गजाननने त्याला वेगवेगळे कलाकुसरीचे हार दाखवून त्याचे कौशल्य काय हे सांगण्यास सुरवात केली. त्यावर तो टकल्या माणूस चिडून म्हणाला– "मी काय कोणी आंधळा किंवा बहिरा नाही. ते सर्व हार मोठे आहेत मला नाजुक आणि पातळ असा हार हवा आहे तुमच्याकडे तसा हार नाही कां?

ह्यावर गजाननने नाजुक व पातळ हाराला दोष द्यावयास सुरवात केली व सांगितले–"राग मानू नका, तुम्हाला माहित आहे कालचीच गोष्ट असे म्हणून गजाननने आपल्या बायकोचा घडलेला सारा वृत्तांत त्या माणसास सांगितला व म्हणाला हार नाजुक व बारीक होता म्हणून ओढता क्षणीच तुटला. माझ्या बायकोने तो दुरूस्त करून आणण्यास सांगितला परंतु मीच तो घेऊन येण्यास विसरलो.

टकल्या माणुस हसून म्हणाला– "वजनी व मोठे हारांचे तर चोरांना व दरोडेखोरांना आणखीनच जास्त आकर्षण तुमच्या दुकानांत नाजुक व बारीक हार नव्हते तर प्रथमच सांगायला पाहिजे होते. ते सोडून आपल्या घरचे सारे पुराण मला कशाला सांगत आहांत? असे म्हणत तो टकल्या दुकानांतून बाहेर पडला.

संध्याकाळी गजानन जेव्हां घरी परत आला तेव्हां विमलाने त्याला विचारले– "काय माळ दुरूस्त करून घेऊन आलात कां?"

"आज तर ती माळ घेऊन जाण्यास मी विसरूनच गेलो. बरं तर उद्या जाताना आठवणीने द्यायला विसरू नकोस" गजानन म्हणाला.

ते ऐकताच विमलाने आश्चर्याने विचारले–"काय! तो हार मिळाला नाही."

गोष्ट अशी झाली की, दुपारच्या वेळी एका माणसाने दार ठोठावले व मी दार उघडताच त्याने असे सांगितले की–"मी तुटलेली माळ घेऊन येण्यास विसरलो तरी ती घेऊन येण्याकरीता मला पाठविले आहे. नशीब बलवन्तर की! माळेवरच भागले.

त्याने असे दर्शविले की; त्याला आपल्या घरातील सर्व काही माहिती आहे. त्यावरून विश्वास ठेवून ती तुटलेली माळ मी त्याच्या हाती सोपविली.

"त्या माणसाला माझ्या घरची माहिती कशी समजली? आणि तु सुद्धा काही विचार-पूस केल्याशिवाय तो हार त्याला दिलास कां? गजाननने विमलाला रागावून विचारले काय तो माणूस टकल्या होता कां?"

"हो, हो त्याच्या डोक्यावर एकही केस नव्हता." विमलाने सांगितले.

"अरेरे, मीच चुक केली दुकानात एक टकल्या माणूस आला त्याच्या बरोबर बोलता बोलता मी आपल्या घरची सारी गोष्ट त्याला सांगितली पण मला कल्पना आली नाही की, तो माणूस चोर असेल म्हणून" गजाननने पश्चातापाने म्हटले.

"वाजवीपेक्षां जास्त बोलण्याने असेच गैरफायदे होतात." शेवटी "दुसऱ्या सांगे ब्रह्मज्ञान स्वतः कोरडे पाषाण."

तेवढ्यात त्यांची मोलकरीण सिताबाई तेथे आली आणि त्यांचे बोलणे ऐकून म्हणाली– "आपणा दोघांना राग येणार नसेल तर एक गोष्ट सांगू कां? विमलाबाई कमी बोलण्या-मुळे शंभर रुपये घालवून संकटात सापडल्या, आणि गजाननसुद्धा जास्त बोलण्यामुळे हार घालवून बसले, मालकिण बाईनीं मला कमीं बोलते म्हणून कामावर ठेवून घेतले आहे, आणि शेजारच्या सरोजताईनी मला अश्या करीता कामावर ठेवले आहे की, त्या जे जे विचारतील त्याची पूर्ण गल्लीतील माहिती मी त्यांना देते. अश्या गोष्टीनी मी दोघींनाही आवडते." परंतु बोलणे जेवढ्यास तेवढेच ठेवले पाहिजे नाही कमी, नाही जास्त."

सिताबाई जास्त शिकलेली नव्हती परंतु तिच्या अनुभवामुळे तिने जे काही सांगितले ते गजाननला खूप पटले आणि त्यांनी आपापली चुक कबूल केली.












# परिवर्तन

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असताना त्यावेळी बोधिसत्वांनी स्वर्गाचा अधिपती इंद्राच्या रूपे अवतार धारण केला. ब्रह्मदत्त जेव्हां वयात आला. त्यावेळी तो फार अहंकारी व दुष्ट होता. म्हातारी माणसे, जनावरे व जून्या वस्तु ह्याविषयीं त्याच्या मनात घृणा होती. कधीही म्हातारा प्राणी घोडा किंवा इतर जनावरे त्याला समोर आली की; त्याचा राग अनावर होत असे. कोणतीही जूनी वस्तु दिसली की; तो ती नष्ट करण्याची आज्ञा देत असे.

कोणी म्हातारा माणुस त्याच्या नजरेस पडला तर तो त्याची मानगुट पकडून त्याला ढकलून देत असे. व अशा लोकांना पायांनी लाथाडत असे म्हाताऱ्या बायकांना तऱ्हेतऱ्हेने त्रास देत असे.

ब्रह्मदत्ताच्या अशा प्रकारच्या वागण्याला काही सीमाच उरली नाही. प्रजा खूप दु:खी व कष्टी झाली. प्रजेतील लोक राजाच्या ह्या जाचाला कंटाळून आपापल्या म्हाताऱ्या आईवडिलांना दूर सोडून येऊ लागले व कष्टी होऊ लागले. आपल्या आईवडिलांना आपल्यापासून दूर ठेवण्याच्या पापाला कारण होऊ लागले. अशा पापानी नरकलोक भरू लागला. व स्वर्ग लोक रिकामा राहू लागला.

त्याचवेळी स्वर्गांचा प्रमुख इन्द्र ह्याचे पद बोधिसत्वाना मिळाले होते. स्वर्गात कोणालाच येत नसलेले पाहून इंद्राला खूप काळजी वाटू लागली. शेवटी त्यांनी ह्यावर एक उपाय योजना केली.

आपल्या युक्तीचा उपयोग करून त्यांनी एक वृद्ध माणसाचे रूप घेतले व एका मोडक्या तोडक्या गाडीत दोन शेणांनी व कचऱ्यांनी भरलेल्या बादल्या ठेवल्या व त्या गाडीला दोन म्हातारे बैल जोडून ते काशीच्या रस्त्याला चालू लागले.

अशा तऱ्हेने बोधिसत्व जात असतां समोरून अत्यंत दिमाखाने आणि मोठ्या लव्याजम्यासह राजा ब्रह्मदत्त हत्तीवर बसून येताना बोधिसत्वाना दिसले. त्या दिवशी राजाकरीता सारे नगर सुशोभित करण्यात आले होते. नगराची शोभा अवर्णनिय दिसत होती. असे वाटत होते की, पृथ्वीवर स्वर्गंच तर अवतरला नाही नां!

समोरून मोडक्या गाडीत एका म्हाताऱ्याला येत असतांना पाहून राजा ब्रह्मदत्त रागाने लाल झाला व ओरडून म्हणाला—"अरे मूर्खा, माझ्या नजरे समोरून दूर जा. तुला माझ्या समोर अशा अवस्थेत यायची हिंमत कशी काय झाली?"

राजाला अशा तऱ्हेने ओरडताना पाहून त्याच्या अधिकाऱ्यांना व आजूबाजूच्या लोकांना खूपच आश्चर्य वाटू लागले. ते सर्वजण मनातल्या मनांत म्हणाले—"राजा असा काय वेड्यासारखा ओरडत आहे?"

परंतु गोष्ट अशी होती की, म्हाताऱ्याच्या रूपात बोधिसत्व एकट्या राजालाच दिसत होते, इतर सर्वजणांना दिसत नव्हते. बोधिसत्वांनी अशा तऱ्हेने मंत्रजाल टाकले की, ब्रह्मदत्तला सर्वांनी त्यावेळी वेडे ठरवावे. व आपण राजाशिवाय कुणास दिसू नये.



राजा अतिशय संतापला, तेव्हां बोधिसत्वांनी जवळ जाऊन राजाच्या डोक्यावर एक घाणीची बादली ओतून टाकली. ते पाहून राजा खूप घाबरला व आपल्या हत्तीला त्याने वळून पळण्याचा इशारा केला व पळू लागला. तेव्हां बोधिसत्वांनी दुसरी बादली राजाच्या डोक्यावर ओतली. त्या घाणीमुळे राजाचे सारे अंग घाण व ओले झाले. राजा संतापाने थरथर कांपू लागला.

तेव्हां क्षणार्धात राजा समोरून ती गाडी अदृष्य झाली. सर्व काही नाहीसे झाले. आणि समोर एका भव्य रूपात बोधिसत्व इंद्राच्या रूपे प्रकट झाले.

राजाने समोर साक्षात् सर्व आयुधासमवेत इंद्राला पाहून भयाने थरथर कांपू लागला व त्याने इंद्राला साष्टांग प्रणिपात केला.

तेव्हां इंद्राच्या रूपात असलेले बोधिसत्व म्हणाले–"राजा, बोल! कोण गर्विष्ठ आहे, तू कां मी? मला म्हाताऱ्याच्या रूपात पाहून कोण आंधळा झाला. काय तू नेहमीच तरूण राहू शकतोस काय? तुला कधीच म्हातारपण येऊ शकणार नाही काय? तेव्हां नेहमीच म्हाताऱ्यांचा व जुन्या वस्तूचा तुला तिटकारा कां? तुला माहित नसेल की; तुझ्या अशा वागण्याने जनता किती दुःखात आपले दिवस कंठीत आहे. तुझ्या असल्या अत्याचारांना घाबरून जाऊन प्रजेतील लोकांनी आपल्या पुज्य आईवडिलांना लांब ठेवले आहे. त्यांचे कर्तव्यपालन होत नाही. त्यामुळे त्याच्या डोक्यावरचे पापाचे ओझे वाढत चालले आहे तुझ्या राज्यातील प्रजा पापाच्या संख्येमुळे. वाढत आहे. आणि त्याने नरकलोक भरू लागला आहे. तू कधी स्वतःहाला समजवायचा प्रयत्न केलास कां? की आपल्या राज्यातला कोणीच माणूस स्वर्गलोकी जावू नये.

"त्यामुळे आत्तापासुनच तुझा मूर्खपणा सोड व चांगल्या मार्गाचे अंवलंबन कर. नाहीतर हातातील हे शस्त्र तुझ्या डोक्याचे तुकडे करेल. "राजा आत्तापासून सावध रहा" अशा तऱ्हेने बोधिसत्वाने राजाला उपदेश केला व अंतर्धान पावले.

त्या दिवसा पासून ब्रह्मदत्तच्या वागण्यात बोलण्यात विलक्षण फरक पडला तो म्हाताऱ्या आदर करू लागला. राजाच्या वागण्यातील बदलामुळे लोकांनी आपल्या म्हाताऱ्या आईवडिलांना आपल्याजवळ बोलावून घेतले व त्यांची मनोभावे सेवा सुश्रुषात आनंदात राहू लागले प्रजेमध्ये सुख व शांती नांदू लागली.

परंतु कोणीही बोधिसत्वांना पाहिले नसल्यामुळे राज्यातील अधिकाऱ्यांना प्रजेतील लोकांना ह्याचा उलगडा शेवट पर्यंत लागला नाही की, राजात असा एकाएकी बदल कसा काय घडून आला.





## ईस्ट इंडिया कंपनीचा प्रारंभ

अठराव्या शतकाच्या सुरवातीलाच इंग्रजांच्या ईस्ट इंडिया कंपनीचा भारतावर हळू हळू जम बसू लागला. इंग्रजांची व्यापारी जहाजे सामन भरभरून भारतात येऊ लागली. परंतु भारताचा माल इंग्रजाच्या माला पेक्षाही अधिक चांगला होता. त्यामुळे त्याच्या मालाचा खप चांगला होऊ शकला नाही.

त्यामुळे ईस्ट इंडिया कंपनीचे कामगार लोक भारतातील कुशल कामगारांकडून त्यांची मशिने काढून घेऊन ती. नष्ट करू लागले. व त्या लोकांना खूप मारहाण करून अर्धमेले, करू लागले अशा तऱ्हेने ईस्ट इंडिया कंपनीने भारतातील त्यांच्या विरुद्ध काम करणाऱ्या लोकांना आपल्या वाटेतून दूर केले.





कंपनीने भारतात काही काही गावांतून नीळीचा धंदा सुरू केला. आजूबाजूच्या कामगार लोकांना बोलावून कामाला लावले. काम झाल्यानंतर काम-गारांना पैसा न देताच मारझोड करून हाकलून लावले.



इंग्रज सरकार आपल्या चुकीच्या युक्त्यांनी व कपटांनी भारतातील छोट्या मोठ्या जमिनदार व राजे लोकांकडून त्यांच्या जमिनी व संपत्ती राज्ये बळकावू लागले. त्यामुळे इंग्रज लोक फक्त व्यापारातच अग्रेसर, नाही तर जमिनदारी मध्ये सुद्धा वर्चस्व गाजवू लागले.

इंग्रजानी आपला अधिकारी वॉरन हेस्टींग ह्याला बंगालचा गव्हर्नर म्हणून नेमले. त्यावेळी बंगालचा राजा नंदकुमार ह्याने वॉरन हेस्टींग विरुद्ध दुप्पट वसुलीच्या कारणांमुळे सुप्रिम कोर्टात त्याच्या विरुद्ध फिर्याद केली. त्यावेळी न्यायालयाचा जज्ज हावॉरन हेस्टींगचा मित्र निघाला. नंदकुमारालाच बनावट हस्ताक्षराच्या आरोपाखाली जज्जनी फांशीची शिक्षा ठोठाविली.





तीर्थयात्रा करणाऱ्या यात्रेकरूंवर इंग्रजानी कर बसविले ते पहाताच साधू संन्याशानी कंपनीच्या विरुद्ध तक्रारी करण्यास सुरवात केली. अशा-तऱ्हेने इंग्रजाच्या शासना विरुद्ध विरोध करण्यांत साधु सन्यांशाचा मोठा हिस्सा होता. ते अग्रेसर होते.

भवानी पाठक किंवा देवी चौधराणी ने ह्या झगड्यात भाग घेतला व तिने साधु-संन्यासाचे नेतृत्व पत्करले. नावेत बसूनच तिने घर केले. व शूरपणे लहान लहान नावेतून तिने शत्रुला तोंड देऊन आपले शौर्य दाखविले.





देवी चौधराणीने सैन्य आपापल्या छोट्या नावांतून बसून इंग्रजांच्या जहाजावर अचानक हल्ला करीत व त्यांना बुडवून साधु सन्यासी आपल्या छोट्या नावांतून जंगलातुन वाहाणाऱ्या नदीतून पळून जात.

साधूंच्या त्रासाला कंटाळून नंतर पूर्व मध्य भारतातील शेतकरी वर्गाने इंग्रज सरकार विरुद्ध लढा देण्यास सुरवात केली परंतु त्यांच्या हल्याला इंग्रजांनी बंदुकीनी तोंड दिले त्यामुळे घाबरून बरेचजण इंग्रजाना फितुर होऊ लागले.





तरी पण इंग्रजांना आपला विस्तार करायला त्रास होऊ लागला. कर्नाटक राज्याचा राजा कित्तुर ह्याने आपल्या पाठीमागे आपले दोन मुलगे राज्याला वारस म्हणून सोडून तो स्वर्गवासी झाला. राणी चेन्नमा हिने त्या दोन्ही मुलांचा सांभाळ करून राज्य चालविले.

दुर्दैवाने त्या दोन्ही राजकुमारांचा देहान्त झाला. त्यातील मोठ्या राजकुमाराला एक दत्तक मुलगा होता. परंतु इंग्रजांनी कित्तुर राज्याला वारस नाही, म्हणून आपले सैन्य त्याच्या राज्यावर सोडले व राज्य बळकावण्याचा प्रयत्न केला. परंतु राणी चेन्नमाने शौर्याने इंग्रजांना तोंड दिले.



राणीच्या सैन्यानीं किल्ल्याच्या बुरूजावरून तोफा डागून व गोळ्यांचा वर्षाव करून इंग्रजांचा सेनापती ब्लॅक व डिप्टन याला ठार केले व कंपनीचा प्रतिनिधि ठाकरे याला सुद्धा मारून टाकले सन् १८२४ च्या युद्धात इंग्रजांचा पराभव झाला. परंतु राणी चेन्नमा त्यांच्या तावडी सापडून त्यांची कैदी बनली. तरीही बंडखोरीचा वणवा पेटतच राहिला.



# तीन वार

रामपुर नावाच्या गावी एक गोविन्द नावाचा गुराखी रहात होता. त्याच्या पत्नीचे नाव वत्सला होते. ती खूप समजुतदार व हुषार होती. गोविन्द सुद्धा तिच्या बुद्धीमत्तेची प्रशंसा करीत असे. त्यामुळेच कीं, काय तो कोणतीही गोष्ट तिच्या सल्ल्या शिवाय करीत नसे.

दोघांची सांपत्तिक स्थिती चांगली होती त्याचे स्वतःचे घर होते, व त्या व्यतिरिक्त दुभत्या गायी होत्या. तो गायींना चरावयास जंगलात घेऊन जात असे.

जंगलात एका वृक्षाच्या खाली मुनी नेहमी ध्यान लावून बसत असत. गोविन्दाने त्या मुनींना बरेच वेळा पाहिले होते. परंतु तो त्यांच्या जवळ कधीच गेला नव्हता.

एक दिवस गोविन्द नेहमी प्रमाणे आपल्या गायी चरावयास जंगलात घेऊन गेला. एकाएकी अंधारून आले आणि पाठोपाठ जोरदार वादळ व पाऊस पडू लागला. म्हणून गोविन्द आपल्या गायींना घेऊन घरी परत जाण्यास निघाला. परंतु वाटेतच त्याला मुनीची झोपडी दिसली. पण मुनी कुठेच दृष्टीस पडले नाहीत झोपडी भोवतालची झाडे वादळामुळे उन्मळून पडलेली होती फांद्या इतस्ततः पडलेल्या होत्या. गोविन्दने जवळ जाऊन फांद्या बाजूस सारल्या तेव्हां एका मोठ्या फांदी खाली मुनींचा अचेतन देह पडलेला दिसला. गोविन्दने मुनींना दोन्ही हातानी उचलले व तो त्यांना घेऊन कुटीरात आला थोड्या वेळाने मुनींनी डोळे उघडले जसे काही ते अताच ध्यानातून उठले आहेत. आणि त्यांनी गोविन्दाला पहाताच विचारले–"मुला तू कोण आहेस? आणि तुला काय हवे आहे?" गोविन्दाने जगलांत वादळ व पावसामुळे

सुनिला ग. देव



झालेली हानी व त्यांच्या अंगावर पडलेली फांद्या झाडे यांची गोष्ट सर्वच्या सर्व मुनींना सांगितली व तो म्हणाला– "मुनीवर्य, आपले तपोसामर्थ्य खूप मोठे आहे! एवढी फांदी अंगावर पडून सुद्धा जरा सुद्धा कुठेही खरचटले नाहीं ते कसे काय? असे म्हणून गोविन्दाने त्याच्याकडून घरी जाण्याची अनुमती घेतली.

तेव्हां मुनीने त्याला थांबायला सांगितले व म्हणाले–" मुला, तुझ्या कडे पाहून असे वाटते आहे की; तू सर्वांवर दयाप्रेम करतोस त्यामुळे मी तुझ्यावर प्रसन्न झालो आहे. व तुला तीन वर देतो तुला काय पाहिजे ते तू मागून घे.

गोविन्दाने थोडवेळ विचार केला. परंतु त्याला काय मागून घ्यावे ते न समजून त्याने मुनींना सांगितले–" मुनीवर्य, मी घरी जाऊन माझ्या पत्नीला विचारून सांगतो मला काय मागून घ्यावे व काय नको ते अजिबात कळत नाही."

"बरे तर, तसेच कर परंतु परत इकडे येण्याची आवश्यकता नाही. तू तुझ्या बायकोला विचारून जे तीन वर पाहिजेत ते मागून घे. ते तुला ताबडतोब मिळतील." मुनी त्याला म्हणाले.

गोविन्द अत्यंत आनंदाने घरी परत आला. व जंगलात घडलेली सर्व गोष्ट त्याने आपल्या बायकोला सांगितली.

वत्सलाने ती गोष्ट ऐकून बराच वेळ विचार केला व ती आपल्या नवऱ्याला म्हणाली–"तसे पहाल तर आपल्या जवळ जे काही आहे त्याने आपले आयुष्य पूर्ण सुखी व समाधानी आहे. परंतु मुनीने दिलेल्या वरांना अव्हेरणे बरोबर दिसणार नाही. तरी आपण एक झाडू एक काठी व एक दोरी असे तीन वर मागून घेऊ. त्या वस्तु आपल्याला पुरेशा आहेत."

गोविन्दाने विचार केला की, एवढ्या थोर मुनींनीं दिलेल्या वरदानाच्या रूपे असल्या गौण्य वस्तू मागणे बरोबर दिसणार नाही. तरी पण त्याचा आपल्या बायकोच्या बुद्धीमतेवर पूर्ण विश्वास होता. म्हणून बायकोने सांगितलेल्या तीन वस्तु त्याने वराच्या रूपात मागून घेतल्या. दुसऱ्या क्षणीच त्या तिन्ही वस्तु तेथे प्रकट झाल्या. वत्सलाने काठी आपल्या नवऱ्याच्या हातात दिली. व दोरीने आपल्या गायींना बांधले व केरसुणी घेऊन ती स्वतःहा घर झाडू लागली. दुसऱ्या दिवशी गोविन्द नेहमी प्रमाणे गायींना चरावयास जंगलात घेऊन निघाला. जाता जाता तो मुनींच्या झोपडी जवळ आला तेव्हां मुनी वादळामुळे पडलेली झाडे फांद्या बाजूस करून जागा साफ करीत होते. गोविन्दाला पहाताच मुनीने हसून विचारले–"काय, तुला मिळालेले तीन वर मागून घेतलेस काय?"

गोविन्दाने मुनींना नमस्कार करीत म्हटले–" हो, मुनीवर्य मी तीन वरांच्या रूपाने, एक झाडू एक काठी व एक दोरी गायींना बांधण्या करीता मागून घेतल्या.

हे ऐकून मुनी आश्चर्यचकित झाले व म्हणाले–" इतके दिवस तप साधना करून जे तपोबल मी प्राप्त केले त्याचा त्याग करून तुला तीन वर प्राप्त करून दिले त्याची अशा साधारण वस्तु मागून तू तुझी मनोकामना पूर्ण केलीस. ही फारच विचित्र गोष्ट आहे.

"गुरुदेव, मी सर्व काही काम माझ्या बायकोलाच विचारून करतो. तिनेच हे तीन वर मागण्यास सांगितले." गोविन्दने सरळ पणाने सांगितले.










हे उत्तर ऐकून मुनींच्या मनात सुद्धा गोविन्दच्या बायकोंने इतक्या साधारण वस्तुची मागणी कां केली ? हे जाणून घेण्याची जिज्ञासा उत्पन्न झाली. ह्या पाठीमागे काही गुढ आहे कां ? का ती अज्ञानी आहे ?

ते समजून घेण्याकरीता मुनी स्वतःहा गोविन्दच्या घरी आले व त्याने वत्सलाला पाहून विचारले–"मुली, तुमचे हित, होण्या करीता मी तुम्हांला तीन वर दिले होते. परंतु असल्या तुच्छ वस्तु मागण्या पाठीमागचा तुझा हेतू काय ? कोणत्याही चांगल्या उत्तम गोष्टी किंवा धनसंपत्ती मागून घेतली असतीत तर ती तुम्हाला अधिक उपयोगी पडली असती.

वत्सलाने खालीवांकून मुनींना नमस्कार केला. व विनयपूर्वक म्हणाली–"गुरूवर्य ! आपल्या वरांमुळे आम्हांला नक्कीच कोणतीही गोष्ट मिळू शकली असती. श्रम किंवा कष्टांशिवाय मिळालेली कोणतीही गोष्ट अपायकारक होऊ शकते तशी संपत्ती सुद्धा कारण होऊ शकली असती."

मुनी म्हणाले–"हे ठिकच आहे. परंतु तरी तुझ्या ह्या मागण्या पाठीमागचा हेतू काहीतरी असला पाहिजे.

"गुरूदेव ! खरे पहाता ह्या गोष्टी छोट्या नाहीत. आपल्या तपोसामर्थ्यामुळे हा झाडू साधा झाडू नाही. ह्या झाडूने घर स्वच्छ केले की, घर पवित्र होते व जेथे स्वच्छता व पवित्रता आहे तेथे लक्ष्मी नेहमीच नांदते.

"आपल्या कृपेमुळे आम्हांला ही काठी प्राप्त झाली परंतु कोणत्याही संकट समयी ही काठीच आमचे रक्षण करू शकते."

तसेच आपल्या कृपा प्रसादामुळे ही दोरी आम्हांला मिळाली आहे की, त्यामुळे आमच्या घरापासून गायीगुरे दूर जाणार नाहीत. सदैव आमचा गोठा गुरांनी भरलेला राहील. ह्या प्रमाणे ह्या वस्तुपासून आम्हाला कशा-चीही कमी कधी भासणार नाही. वत्सलाने आपल्या मनात होते ते सर्व सांगितले.

वत्सलाच्या बुद्धी चार्तुयावर मुनी प्रसन्न झाले. व त्याने दोघांना आर्शिवाद दिला व ते आपल्या आश्रमात परत गेले.





# न घडणाऱ्या गोष्टी

राज्याभिषेकापूर्वी युवराजाने देशाटन करणे हा कुंदन राज्याचा परंपरागत रिवाज होता. युवराज समीर हा परंपरेला अनुसरून देशाटन करीत एका गावाच्या सीमेपाशी जात असता एक बाभळीचा कांटा त्याच्या पायात रूतला व भळभळ रक्त वाहू लागले. समीर खाली बसला. त्याला काय करावे हे न समजून तो इकडे तिकडे पाहू लागला.

त्याच सुमारास एक शेवंता नावाची शेतकऱ्याची मुलगी त्यावाजूने जात होती तिने समीरला त्या अवस्थेत पाहिले. तिला त्याची कींव आली, तिने त्याच्या पायातला कांटा काढला निरगुडीचा पाला चुरून त्याच्या जखमेवर लावून आपल्या साडीच्या पदराचा तुकडा फाडून तिने त्याची जखम बांधली. समीरने आपली कृतज्ञता दाखवून म्हटले–"तू, जी माझी मदत केलीस त्याचा मी आजन्म ऋणी आहे. तरी त्याच्या बदल्यात तुला काय पाहिजे ते तू मी तुला देईन."

शेवंता उपहासाने हसत म्हणाली–"प्रथम तुम्ही स्वतःच पायात गेलेला कांटा काढायला शिका मग माझ्या विषयी विचार करा."

समीर हसत म्हणाला–"आजपर्यंत अशी कामे करण्याची वेळ माझ्यावर कधीच आली नाहीत. तुम्ही मला ह्या देशाची राणी बनवू शकता कां ? शेवंताने विचारले.

तो प्रश्न ऐकून समीरने शेवंताकडे लक्षपूर्वक पाहिले व तिच्या सौंदर्याने तो मुग्ध झाला. त्याने म्हटले–"तू भाग्यवान आहेस. योग्य व्यक्तीला प्रश्न विचारलास, तुझी इच्छा पूरी होईल."

युवराज समीरचे बोलणे ऐकून शेवंता जरासुद्धा विचलीत झाली नाही व तिने



दृढतापूर्वक सांगितले–" सुंदर तरूणींना पाहून काही लोकांच्या मनांत खोटे बोलण्याची इच्छा उत्पन्न होते."

"तुम्ही जर खरोखरीच माझ्याशी विवाह करणार असलात, तर माझ्या दोन अटी पूर्या करा. सूर्यास पश्चिमेकडे उगवण्यास सांगा व गंगेला आपल्या राज्यातून वाहण्याचा हुकूम द्या.

शेवंताचे बोलणे ऐकून समीर बावरला परंतु थोडावेळ थांबून म्हणाला–"हे अशक्य काम कोणालाही जमणे शक्य नाही तू उगाच गंमत करू नकोस."

"मी गंमत करीत नाही, ज्यांचा अधिकार राज्यावर होणार आहे त्यांना कोणतेही कार्य करणे शक्य आहे" शेवंता म्हणाली.

समीर थोडा वेळ विचार करून म्हणाला–"मला एका महिन्याची मुदत दे. मी तुझ्या मागण्या नक्कीच पुऱ्या करून दाखवीन.

शेवंताने समीरच्या बोलण्याला संमती दिली. समीर देशाटन करून राजधानीत परत आला. आणि सर्व मंत्र्याना एकत्र बोलावून म्हणाला–"तुम्ही सर्वजण माझे म्हणणे लक्षपूर्वक ऐका, सूर्य पश्चिमेकडे उगवला पाहिजे, व गंगा नदी आपल्या राज्यातून वहात जायला पाहिजे. ह्या-करीता काय केले पाहिजे लवकर उपाय शोधून काढा."

युवराजाने हा प्रस्ताव मंत्र्याच्या समोर मांडल्याबरोबर सर्वजण घाबरून गेले. व आश्चर्याने म्हणाले–"युवराज, देशाटन करीत असतांना आपण कुठे भांग वगैरेतर नाही ना घेतलीत?" वेळेची गती बदलणे कोणालाही आजपर्यंत शक्य झाले नाही. आणि दुसरी गोष्ट म्हणजे दूरच्या प्रदेशांत वहाणाऱ्या गंगा नदीला आपल्या राज्यात आणणे शक्य कोटीतील गोष्ट नाही. पण अशा संकटात मी असतांना राजाच्या रूपं तरी मला काहीच मोल नाही कां? असे असेल तर मी ह्या राज्याचा राजा होण्यासही तयार नाही मी एखाद्या सामान्य माणसासारखे राहून माझे जीवन घालवीन" समीर म्हणाला.

ह्या गोष्टी जेव्हां राजाच्या कानावर गेल्या तेव्हां राजाने समीरला बोलावणे पाठविले व समीरला उद्देशून म्हणाला–तू ज्या गोष्टी विषयी मागणी केली आहेस ती ऐकून असे वाटते आहे की; तुला राजाचे पद सांभाळायचे नाही. त्यातून अशा तऱ्हेची एक पळवाट काढीत आहेस.

ह्यावर युवराज समीरने महाराजांना शेवंता विषयी सर्व गोष्टी सांगितल्या.

महाराजांना आश्चर्य वाटले ते म्हणाले–"तू एवढ्याशा खेडवळ मुलीच्या बोलण्यावर विसंबून राहून असला निर्णय घेणे बरोबर होणार नाही.

"ती मुलगी खेडवळ नाही. परंतु एक हुषार समजुतदार आहे" समीर म्हणाला.

"ह्या गोष्टीची आपण परीक्षा घेवू." असे म्हणत राजाने आपल्या सेवकाला पाठवून शेवंताला आपल्या अंत:पुरात येण्याकरीता बोलावणे धाडले.

शेवंताला जेव्हां कळले की समीर खरा खरा युवराज आहे तेव्हां तिने समीर पुढे गुढगे टेकून हात जोडले व म्हणाली. "युवराज अज्ञानामुळे मी आपल्याला काहीबाही सांगून बसले. कृपा करून मल क्षमा करा."

तेव्हां समीर म्हणाला–"तुझी चुक अशी क्षमा करून मागण्यासारखी नाही. तू जी इच्छा प्रकट केली होतीस ती मी पूर्ण करू





थकलो नाही. तरी त्या बदल्यात तू त्या गोष्टी करून दाखविल्या पाहिजेस नाहीतर तुला कठोर दंड भोगायला लागेल."

युवराजाच्या तोंडून असे बोलणे ऐकून शेवंता घाबरली नाही. तिने गंभीर होत म्हटले—"मी जे म्हटले आहे ते मी खरे करून दाखविन परंतु ते खरे करून दाखवायला मला काही अधिकार पाहिजेत"

"मी तर ह्यावेळी युवराज आहे. ह्या देशाचा राजा नाही तरी तुला जे काही अधिकार हवेत ते तू राजाकडे जाऊन मागून घे." समीर म्हणाला.

राजाने बराच वेळ ह्या गोष्टींचा विचार केला. त्यानां वाटले शेवंता खरोखरीच हुशार, समजुतदार मुलगी आहे. तिला अधिकार द्यायचे म्हणजे तिला राणी करावे लागले. राणी झाल्यावर तिला शिक्षा देणे योग्य होणार नाही.

थोड्या विचाराअन्ती राजाला एक उपाय सुचला त्याने शेवंताला म्हटले— "हे पहा, आज पासून ह्या राज्याची तू राणी, व समीर तुझा प्रधान सेनापती होईल. तू जर राजद्रोह केलास तर राणीच्या पदावरून तुझी हकालपट्टी केली जाईल. परंतु तू बोललेले शब्द खरे करून दाखवशील तेव्हां तुझे लग्न युवराजाबरोबर करून देण्यात येईल. पण हे सर्व तू एका महिन्याच्या मुदतीत केले पाहिजेस." शेवंताने राजाने दिलेल्या अटी मंजूर केल्या. नंतर शेवंता राज्याची राणी झाली. शासन कार्यांत लक्ष न घालता राजा अंतःपुरात राहू लागला. समीरने सेनेकडे लक्ष पुरविले.

राणीच्या पदावर आल्याबरोबर शेवंताने गुन्हेगाराची शिक्षा कमी केली. शासन अधिकारी काढून टाकले. तिने लोकांचे कर कमी केले. लोकांचा आदर मिळवला एका आठवड्यात तिने राज्यात अमुलाग्र बदल केला. व ती सर्वांची प्रिय बनली.

राणी झाल्यानंतर वीस दिवसांनी शेवंता राजा व युवराज समीरला यांना म्हणाली— "आता तुम्ही दोघेजण माझ्याबरोबर वेष बदलून गावातून फेर फटका मारायला चला. मी लोकांच्यात जो काय अमुलाग्र बदल केला आहे तो तुम्ही स्वतःच्या डोळे यानी पाहा."

त्यानंतर तिघे वेष बदलून राज्यात फेरफटका मारण्यास निघाले. तेव्हां सूर्योदयाची वेळ होती शेवंताने रस्त्यावरून जाणाऱ्या एका माणसास बोलावून विचारले— "ही कोणती दिशा आहे?"

"पश्चिम आहे, एका झटक्यात त्या माणसाने उत्तर दिले. ते ऐकताच महाराजा व युवराज दोघांना आश्चर्याचा झटका बसला. नंतर राजाने व समीरने सुद्धा रस्त्यावरून जाणाऱ्या बऱ्याच लोकांना असाच प्रश्न केला तेव्हां प्रत्येकाच्या तोंडी तेच उत्तर सूर्य उगवणारी दिशा पश्चिम आहे.

त्यानंतर ते तिघे गावांच्या मध्यावरून वहाणाऱ्या तारा नदीच्या जवळ आले. शेवंताने त्याच वेळी जवळ उभ्या असलेल्या एका माणसास विचारले "अहो दादा, ह्या नदीचे नांव काय आहे माहीत आहे कां?"

"ही गंगा नदी आहे," त्या माणसाने झटक्यात उत्तर दिले. त्यानंतर बऱ्याच जणांनी अशीच उत्तरे दिली ह्यावर खाली वांकून नमस्कार करीत शेवंता म्हणाली— "महाराज मी म्हटलेल्या गोष्टी खऱ्या करून दाखविल्या आहेत ज्या तुमच्या मते असंभव होत्या."



"ही गोष्ट तर खूपच आश्चर्यकारक आहे की सूर्य नेहमी प्रमाणे पूर्वेलाच उगवत आहे परंतु सर्व लोक पश्चिमेकडे उगवतो म्हणून सांगतात. तसेच नगराच्या मध्यातून वहाणाऱ्या तारा नदीला सर्वजण गंगा नदी म्हणून संबोधताहेत. तू हे कसे काय सिद्ध करून दाखविलेस." महाराजाने शेवंताला विचारले.

"महाराज मी बऱ्याच दिवसांपासून विचार करीत होते की आपल्या राज्यातील शासन पद्धतीमुळे जनता सुखी व संपन्न नाही. तेव्हां ती बदलून प्रजेला सुखी करण्यासाठी मी आपल्या कारभारात ढवळाढवळ केली. मी हे माहीत करून







घेतले की; जनतेला कोणत्या तऱ्हेने वागवले की जनता सुखी होईल त्यासाठी राणी पदाची आवश्यकता होती कारण राणीच्या जागेला जनता आदरभाव दाखवेल. त्याप्रमाणे मी प्रथम राणीची जागा मागून घेतली नंतर जनतेला ज्या ज्या अडचणी होत्या त्या त्या दूर करण्यात मदत केली. त्यामुळे माझ्यावर प्रजेचा विश्वास निर्माण झाला. नंतर दोन आठवड्याने माझ्यावरील विश्वासामुळे आदर भाव वाढला व मी म्हणेन तेच खरे असे जनतेच्या मनात आले. त्याचा फायदा घेऊन मी असा जनतेमध्ये प्रसार केला की; माझे स्वास्थ ठीक नाही. जर माझ्या प्रकृतीमध्ये फरक पडावा असे प्रजेला वाटत असेल तर पूर्व दिशेला पश्चिम आणि तारा नदीला गंगा नदी असे म्हटले पाहिजे तरच राणीचे स्वास्थ लवकर ठीक होईल. माझ्यावरील प्रेमामुळे जनतेने तसेच म्हणायचे ठरवले आहे वाटते", शेवंता म्हणाली.

ते ऐकून आनंदाने समीरने टाळ्या वाजवून म्हटले—" अरे व्वा, माझ्या डोक्यातच आले नाही, की ही गोष्ट इतकी सोपी असेल."

परंतु महाराज गंभीर होत शेवंताला म्हणाले—" बेटी, मी तुला माझी सून म्हणून स्वीकारायला तयार आहे. ह्याचेकारण तू तुझी बुद्धीमता किंवा माझे वचन पाळले, हे नाही तर एवढ्या थोड्याशा दिवसांत सर्व प्रजेचे प्रेम संपादन करणे त्यांचा आदर प्राप्त करणे हे होय. प्रजा तुझा आदर करते. माझ्या देशाला तुझ्या सारख्या महाराणीची नितांत गरज आहे म्हणून मी तुला माझ्या देशाची खरी राणी बनवून ह्या देशाकडून आदर मिळवू शकतो.

त्यानंतर काही दिवसांनी समीरचे लग्न शेवंताशी मोठ्या थाटामाटाने साजरे झाले. समीर राजा बनला. खऱ्या अर्थी तो राजा असला तरी सेनापतीचे काम सांभाळून त्याने सर्व राज्यकारभार शेवंतावरच सोपवला आणि एक उत्तम राजा म्हणून नाव मिळवले.





# बुद्धीची करामत

क्रौंच द्वीपचा राजा भर्तारसिंह याने आजूबाजूच्या देशांच्या राजांना आपला मित्र करून घेतले. परंतु पुष्कर द्वीपचा राजा प्रसेन याच्याशी काही त्याला मैत्री करता आली नाही व तो राजा त्याच्या डोकेदुखीचे कारण बनला. त्याला विचार पडला की प्रसेनशी मैत्री कशी करून घेता येईल.

शेवटी राजाने हे काम करण्यासाठी ओंकार नांवाच्या बुद्धीमान मंत्र्याला पाठविले.

पुष्कर द्वीपचा राजा प्रसेन याला आपल्या बुद्धीमतेचा गर्व होता. मंत्र्याला चकित करून परत पाठविण्याचा विचार केला.

ओंकार किल्ल्याच्या दारापाशी जातो न जातो तोच प्रसेनच्या शिपायांनी येऊन किल्ल्याचा दरवाजा बंद केला. प्रसेन आपल्या सिंहासनावर बसून हे सर्व पहात होता.

राजाला पहाताच ओंकारने वाकूनच राजाला नमस्कार केला. राजा उपहासाने हसत म्हणाला—" ओंकार, किल्ल्याच्या दरवाजाच्या शेजारीच कुत्र्यांना आत येण्या करीता एक दार आहेत्यातून आत ये.

ह्यावर ओंकारने झटक्यात उत्तर दिले— "होय, महाराज येईन मी कारण आपले राज्यच जर कुत्र्यांचे असेल तर मला त्या दारांतून यायला काहीच हरकत नाही.

हे उत्तर ऐकून राजाचा चेहरा पांढरा फट्ट पडला.

"अरे, हा तर माझ्या बोलण्यातून सही सलामत सुटला असा विचार करीत प्रसेनने त्याला किल्ल्याच्या प्रवेश द्वारातून आत बोलावून आपल्या सिंहासनाजवळच्या खुर्चीवर बसायला सांगितले.

ओंकार दिसायला बारीक आणि बुटका होता. राजांनी पुन्हा त्याची खोड काढण्या-









करीता म्हटले–"मंत्री महाशय, तुमच्या राज्यातील लोक सुद्धा बुद्धी प्रमाणेच बुटके आणि बारीक असतात कां ?

ह्यावर मंत्र्याने फटकून उत्तर दिले–"महाराज, आमच्या देशात तऱ्हे तऱ्हेच लोक आहेत. तसाच आमच्या राज्याचा एक रिवाज आहे की, नीच लोकांच्याकडे बारीक बुटके लोक व प्रतिभावान लोकांकडे उंच आणि जाड लोकांना पाठविण्यात येते. त्यामुळे आपल्याकडे मला पाठविले आहे." हे ऐकून राजा आणखीनच हताश झाला.

"मूर्ख, ह्याखेपेसही सुटला त्याचा पाणउतारा कसा करावा?" अशा विचारात राजा क्षणभर पडला.

तेवढ्यात राजाचे शिपायी एका कैद्याला पकडून घेऊन आले आणि त्यांनी तक्रार मांडली–"महाराज, हा माणूस कौंचद्वीपचा रहीवासी आहे आणि त्यांने आपल्या देशात चोरी केली आहे."

राजाने बदला घेण्याच्या विचाराने मंत्र्याला विचारले–"काय, हो मंत्री महाशय, काय तुमच्या राज्यातले सर्वच लोक चोर आणि दरोडेखोर आहेत?

पण मंत्री खूप चतुर होता. तो म्हणाला–"महाराज, हा तुमच्या देशाचाच महिमा आहे की, जो कोणी तुमच्या राज्यात पाय ठेवतो, त्याच्या मनांत फक्त चोरी करण्याचाच विचार येत असेल. परंतु आमच्या राज्यात चोरी नांवाला सुद्धा होत नाही.

त्याचे हे उत्तर ऐकून राजा क्षणभर गडबडला. त्याने विचार केला की, कौंच-द्वीपच्या राजाशी शत्रुत्व मोले घेणे म्हणजे पराजयच, राजाने मंत्र्याला इनाम देण्याचे ठरवले ह्यावर मंत्री म्हणाला–"महाराज मला एवढेच मागायचे आहे की, दोन्ही राज्यांत नेहमी मैत्रीभाव रहावा.

त्या दिवसापासून दोन्ही राज्यात सलोखा निर्माण झाला.





# विष्णुपुराण

सत्ययुग आणि त्रेतायुगानंतर द्वापर युग सुरू झाल्यावर राक्षस मानव रूप धारण करून पृथ्वीवर जन्मले आणि सर्वत्र राहू लागले. ते भूमीला भार होऊ लागले तेव्हां भूदेवीने विष्णूकडे जाऊन रक्षण करण्यास प्रार्थना केली.

विष्णू अभयदान देत म्हणाला–"देवी, मी कृष्णावतार घेऊन तुझें दुःख कष्ट दूर करीन."

आदि काला पासून विष्णूचा हाडवैरी अशा कालनेमी नावाच्या राक्षसाने कंस होऊन जन्म घेतला. तो मथुरेचा राजा उग्रसेन याचा मुलगा झाला.

सुरासुरांच्या युद्धात राक्षसांचा नायक होऊन युद्ध करणारा विप्रचित्त मगध देशाचा जरासंघ राजा झाला. त्याने अनेक राजांना कैद करून आणून भैरवाला त्यांचा बळी दिला. कंस हा जरासंधाचा जावई.

उग्रसेनाच्या धाकट्या भावाची मुलगी देवकी आणि यदुवंशाचा राजा वसुदेव यांचा विवाह झाला. कंस त्यांना रथात बसवून निरोप देत असतां आकाशवाणी झाली–"देवकीच्या पोटी जो आठवा मुलगा होईल त्याच्या हाती कंसाचा वध होईल."

कंस देवकीचा वध करू लागला तेव्हां वसुदेवाने मध्ये पडून कंसाला वचन दिले की तिचे आठवेंच अपत्य नाही तर सर्वंच अपत्यें तुला सोंपवीन त्याने त्या प्रमाणे सहा अपत्ये कंसाला सोंपविली.



देवकी सातव्यां वेळी गरोदर झाली तेव्हां विष्णूचा अंश असा आदिशेष पिंडरूपे असतां तो वसुदेवाची दुसरी बायको रोहिणीच्या पोटांत गेला. नंतर विष्णूने नंदगोपाची बायको यशोदा हिच्या पोटी मुलगी होऊन जन्म घेण्यास योगमायेस सांगितले.

त्यानंतर ती आठव्या वेळी गरोदर झाली तेव्हां कंसाने तिला वसुदेवासह तुरुंगात ठेवले.

श्रावण महिन्यातील कृष्णपक्षात अष्टमीच्या दिवशी चंद्र रोहिणी नक्षत्रात असतां मध्यरात्रीच्या वेळी सर्व पाहरेकरी गाढ निद्रेत असतां देवकी प्रसूत होऊन विष्णू कृष्णरूपे जन्मला. तुरुंगाची दार आपोआप उघडली.

विष्णूच्या आज्ञेने वसुदेव तान्ह्या मुलाला यमुना नदी पार करून घेऊन गेला. त्याच वेळी सर्व निद्रावस्थेत असतां यशोदा प्रसूत झाली व तिला एक मुलगी झाली. यशोदेच्या जवळ निजत असलेल्या त्या मुलीला उचलून घेऊन तिच्या जागी वसुदेवाने कृष्णाला ठेवून दिले.

तुरुंगात पोंचतांच सर्व दारे बंद झाली आणि मुलगी नुकतीच जन्मल्या सारखी मोठ्याने रडली.

कंसाने तिला दगडावर आपटण्यासाठी उचलतांच ती निसटून आकाशांत खदखदां हंसून म्हणाली–"अरे कंसा, तुला ठार करणारा सुखरूप आहे रे!" नंतर दुर्गादेवी रूपे होऊन ती अंतर्धान पावली.

कंसाला राग आला व त्याने वसुदेव देवकीच्या सहा मुलांना त्यांच्या समोरच ठार केले.

नारद कंसाकडे येऊन म्हणाला–"कंसा, तू उग्रसेनाचा मुलगा नाहीस, तू कालनेमी आहेस! तुझा वध करणारा विष्णू सुरक्षित आहे, हे ऐकलेच आहेस.

उग्रसेनाशी विवाह झाल्यानंतर, विरह दुःखाने त्याची राणी एकटी असतां एका राक्षसाने उग्रसेन रूपे जाऊन तिला फसविले. तेव्हां कालनेमीने तिच्या गर्भात प्रवेश केला व कंस होऊन जन्मला.

कंसाने उग्रसेनाला तुरुंगात टाकून स्वतः सिंहासन बळकाविले. त्याने सर्व राक्षसांना एकत्र केले. त्याने पूतना राक्षसिणीला सर्व तान्ह्या मुलांना ठार कर म्हणून सांगितले. ती गावोगांव फिरत तान्ह्या मुलांना ठार करीत एक सुंदर स्त्रीचे रूप घेऊन कृष्णाला दूध पाजू लागली. कृष्णाने तिचे दूध पीत असतां तिचे सर्व रक्तच शोषण करून तिचा जीवच घेतला.

भोंवऱ्याच्या रूपे तृणावर्त राक्षसाने कृष्णाला आकाशांत उडवून नेले त्याला, आणि गाडीच्या रूपे कृष्णाला ठार करण्यास आलेल्या शकटासुराला बालकृष्णाने ठार केले.

बालकृष्ण बालक्रीडा करी ते पाहून यशोदा माता त्याचा खट्याळपणाचे सुद्धां कौतुक करी. त्यात कृष्णाच्या बाललीला पाहून सर्व गोकुळच आनंदित झाले.

एकदां कृष्णाचा खट्याळपणा पाहून यशोदेने त्याला उखळाला बांधून ठेवले. कृष्ण उखळा सकट दोन वृक्षां मध्ये जाऊन अडकला आणि दोन्ही वृक्ष उखळ ओढल्याने उपटले गेले आणि त्या वृक्षांचे दोन गंधर्व प्रगट झाले. ते दोघे शापाने वृक्ष झाले होते.



त्याने एकदां माती खाल्ली, म्हणून रागावून आईने तोंड उघडायला सांगितले. त्याने तोंड उघडून विश्वरूपच दाखविले.

कालिया नागाच्या फणांवर तांडव नृत्य करून त्याचे मर्दन केले.

गोकुळांतील सर्व लोक वृंदावनला जाऊन राहू लागल्यावर गोवर्धन पर्वताची पूजा करू लागले. त्याचा देवेंद्राला राग आला. त्याने वज्रायुध टाकून विजांपाठोपाठ वृष्टी सुरू केली. तेव्हां कृष्णाने गोवर्धन पर्वत आपल्या करंगळीवर उचलून धरला आणि सर्व गोपी गोपालांचे रक्षण केले. त्यामुळे इंद्राचा गर्व-भंग झाला.












कृष्ण वेणुगोपाल होऊन गोवृंदाला चरायला नेऊ लागला. त्याचे वेणुगान ऐकून सारे वृंदावन डोलू लागे.

कृष्ण बलरामांना ठार करण्यासाठी कंसाने धनुर्यागाचे निमित्त काढून त्यांना मथुरेला बोलावून आणविले. त्यांना ठार करण्यासाठी कंसाने केलेले सर्व कट फुकट गेले. कृष्णाने कंसाला त्याच्या सिंहासनावरून केस, धरून खाली ओढले आणि मुष्टि प्रहार करून ठार केले.

वसुदेव देवकी आणि उग्रसेन यांना घातलेल्या हतकड्या काढून सोडविले. त्यानंतर कृष्णाने उग्रसेनाला मथुरेच्या गादीवर पुन्हा बसविले.

कृष्ण व बलराम दोघे यदुवंशाचे तरुण पुढारी झाले.

आपल्या मुलीचे सर्व ऐश्वर्य व वैभव हस्तगत करणाऱ्या गुंडांना-म्हणजे कृष्ण-बलरामांना चांगला धडा देण्याच्या हेतुने जरासंधाने तेवीस अक्षौहिणी सैन्यासह मथुरेवर स्वारी केली. कृष्णाने जरा संधाचा पराभव करून त्याला पळवून लावले.

यवन व म्लेंच्छ जातीचा राजा कालयवन नांवाच्या राक्षसाला कृष्णाच्या विरुद्ध जरासंधाने मथुरेवर पाठविले.

कृष्ण कालयवनच्या हाती न फंसता मुचिकुंद झोंपत असलेल्या गुहेत शिरून लपून बसला.

मुचिकुंद हा इक्ष्वाकु वंशीय मांधाता याचा मुलगा मोठा राजा होता. त्याने देवांना युद्धांत पुष्कळ सहाय्य केले होते. देवांनी त्याला वर मागायला सांगितले. तेव्हां द्वापर-युगात कृष्णाचे दर्शन होईल, तेव्हां तुला सिद्धी मिळेल असे सांगितल्या-वरून तोंपर्यंत निद्रा घ्यावी, व निद्राभंग करणाऱ्याचा मी पाहतांच शेवट व्हावा व तो भस्म व्हावा, हा वर मागितला.

कालयवनने मुचिकुंदला कृष्ण समजून त्याला लाथ मारली. मुचिकुंदची झोप मोडली. त्याने डोळे उघडून पाहतांच कालयवन भस्म झाला.











कृष्णाने मुचिकुंदला दर्शन दिले. त्याने त्याला बदरिकाश्रमात जाऊन तपश्चर्या केल्यास मोक्ष प्राप्ती होईल असे सांगितले.

जय विजय हे तिसऱ्या वेळी जन्म घेऊन कृष्णाचे शत्रू झाले. त्यांची नावे अनुक्रमे शिशुपाल व दंतवक्त्र अशी या जन्मी होती.

चेदि देशाचा राजा दमघोष याच्या पोटी शिशुपाल चार हात व तीन डोळे या स्वरूपात जन्मला. कोणी त्याला उचलून घेतले आणि तिसरा डोळा आणि दोन हात अदृश्य झाले तर त्याच्याच हाती त्याला मृत्यू येईल, अशी आकाशवाणी झाली. कृष्ण व बलराम यांची सात्वती ही नात्याने आते होत होती. त्यांना घ्यायला तिने सांगितले. कृष्णाने उचलून घेतांच मुलगा साधारण मुला सारखा झाला.

"शिशु पालने शंभरवेळा जरी काही गुन्हा केला तरी त्याला माफकर," असे सात्वती कृष्णाला म्हणाली कृष्णाने तसे वचन दिले.

शिशुपालने राजा झाल्यावर जरासंधाशी मैत्री करून अत्याचार सुरु केले. त्याचा धाकटा भाऊ दंतवक्त्र तोही त्याच्या बरोबर अत्याचार करू लागला.

जरासंध पुन:पुन्हा मथुरेवर स्वारी करू लागला तेव्हां त्याचा पुष्कळवेळा पराभव करून कृष्णाने त्याला पळवून लावले आणि दुष्ट राजांची खोड मोडली.

कृष्णाने समुद्रा जवळ थोडीशी जागा मागून घेऊन समुद्रा मध्ये विश्वकर्म्या-कडून सुरक्षित अशी द्वारका नगरी बांधविली. त्यानंतर त्याने त्या ऐश्वर्य संपन्न नगरीत आपल्या सर्व नातेवाईकांना पाठविले.

जरासंधा अगदी शेवटी शिशुपाल, दंतवक्त्र, पौंड्रक, वगैरे राजांना मदतीला बोलावून मथुरेवर चालून आला. त्याने मथुरेला वेढा दिला.

त्यापूर्वीच कृष्णाने या देवांना व मथुरेच्या प्रजेला द्वारकेला पाठविले आणि स्वत: प्रवर्षण गिरीवर गेले आणि पर्वताच्या शिखरावर पोचले.

जरासंध वगैरेंनी प्रवर्षण गिरीला चारीबाजूनी आग लावून जाळून टाकले. कृष्ण व बलराम आकाशमार्गे सुरक्षितपणे द्वारकेला येऊन पोचले.

जरासंध व शिशुपाल कृष्ण व बलराम जळून गेले असतील असे समजून परत जात असतां कृष्णाने द्वारकेहून शंख वाजविला. तो ऐकून दोघे चकित होऊन परस्परांच्या तोंडाकडे पाहू लागले.



शिशु पालने सूड उगविण्यासाठी मथुरेला आग लावली जाळून टाकले.

जरासंधाने द्वारकेवर स्वारी करण्यासाठी जहाजांत व पडावात बसवून सैन्य पाठविले. परंतु एक मोठे तुफान आले आणि सर्व जहाजे व पडाव बुडून गेले. जरासंधाला किनाऱ्यावर उभे राहून सर्व पहाण्याशिवाय गत्यंतर उरल नाही. तो त्या तुफान लाटा पहात राहीला. तेवढ्यात त्याला कृष्णाच्या तोंडचे पूर्वजांचे कथन व गडगडाटी हास्य ऐकू आले व समुद्राच्या मध्यावर एका डोंगरावर उभे राहून हसतांना कृष्ण दिसला.

"जरासंधा, तुला माझे काहीही वाईट करता येणार नाही, हा समुद्र द्वारके पर्यंत तुला नेऊच शकणार नाही. तुझ्या नशिबी माझ्या हातून मरण लिहीलेले नाही. आता थोड्या दिवसानंतर तुझी माझी भेट फिरून होईल.

विदर्भ राजाची मुलगी रुक्मिणी, लक्ष्मीच्या रूपे जन्माला आली होती. तिने लहानपणीच कृष्णाला मनापासुन वरीले होते. तिचा मोठा भाऊ रुक्मी हा कृष्णाच्या शत्रुपक्षाला जाऊन मिळाला होता. व त्याने रुक्मिणीचा विवाह राजा शिशुपाल ह्याच्या बरोबर करण्याची तयारी चालविली होती.

तेव्हां रुक्मिणीने ही गोष्ट समजताच कृष्णाकडे निरोप पाठविला की; ह्या







लग्नांत अडथळा आणून कृष्णाने स्वत: आपल्याशी लग्न करावे.

लग्नापूर्वी रुक्मिणी दुर्गामातेची पूजा करून परत येत असता कृष्णाने रुक्मिणीला रथात आपल्या हाताचा आधार येऊन बसविले. व समोरून येत असलेले रुक्मि, शिशुपाल व जरासंघ यानां तोंड दिले.

तेवढ्यात बलराम आपल्या यादव वीरांचे सैन्य घेऊन कृष्णाला येऊन मिळाला. कृष्णाने सैन्यात शिशुपालाला मारून टाकले. जरासंघाला बलरामाने पराभूत करून परत पाठविले. आणि सर्व शत्रु सैन्याला हैराण करून सोडले.

जेव्हां विजय मिळवून कृष्णाने शंख वाजविला व रुक्मिणीला रथात बसवून घेऊन जाऊ लागला तेव्हां वाटेत रुक्मिने कृष्णाला थांबविले. परंतु कृष्णाने रुक्मिला बंदिवान केले. व त्याचे मुंडन करून त्याला त्याच्या नशिबावर सोडून दिले. परंतु त्यानंतर रुक्मिने फिरून कधी कृष्णाकडे डोके वर करून पाहिले नाही.

क्षत्रियांना साजेल असा रुक्मिणीचा विवाह पळवुन आणून कृष्णाच्या बरोबर अत्यंत दिमाखाने झाला.

कृष्णावर श्यमतंक मणि चोरल्याचा व सत्राजितचा भाऊ याला मारल्याचा आरोप लावला गेला. हा आरोप खोटा आहे हे दाखवून देण्या करीता कृष्ण त्या मण्याच्या शोधार्थ निघाला, जंगलात एका गुहेत त्याला तो मणी दिसला. तेव्हां जांबुवानाशी युद्ध करून त्याने तो मणी हस्तगत केला व त्याची मुलगी जांबुवती हिच्या बरोबर विवाह केला. आणि तो मणि सत्रजितच्या हातात देऊन त्याने भुदेवीच्या रूपात असलेला सत्रजितची मुलगी सत्यभामा हिच्या बरोबर सुद्धा विवाह केला. त्यानंतर कृष्णाने एका पाठोपाठ मित्रविन्द कालिन्दी लक्षणा, भद्र व नाग्नजिती अशा बायकां-बरोबर विवाह केले. ह्या आठ बायकांच्या बरोबर अष्ट सिद्धी प्राप्त करून कृष्णाने द्वारकेला राजधानी करून यादवांचा राजा बनून राज्य केले.





# सुल्तान आणि नोकर

अमन देशाचा राजा सुलतान अबदुल्ला हा एक शंकेखोर स्वभावाचा तरूण होता. त्याच्या मनांत कुठलीही शंका आली की, एखाद्या माणसाने असा गुन्हा केला आहे. तर तो त्याची विचारपुस न करीता त्याला विनाकारण कठोर शिक्षा करीत असे.

एक दिवस अबदुल्ला शिकार करायला जंगलात गेला होता. त्यांच्या बरोबर बरेच शिपायी व त्याचा नोकर शौकत होता. थोडे आत गेल्यावर त्यानां एका जागी हरीण दिसले अबदुल्लाने त्याला बाण मारला परंतु तो चुकवून ते हरीण पळून गेले.

अबदुल्लाने त्या हरीणाला धरण्याकरीता चारी बाजूला शिपायांना पाठविले. ते सर्व हरीणाला पहायला धावले. एका झाडाच्या आत घुसून बसलेल्या हरीणाला पाहून त्याला ते अबदुल्ला जिकडे होता तिकडे जाण्या-करीता हुसकवू लागले त्याचवेळी त्याचा नोकर शौकत ह्याने आपला बाण सोडला व नेमका तो बाण मध्ये आलेल्या अबदुल्लाच्या डाव्या हाताला लागून गेला व त्याला बरेच लागले.

अबदुल्लाला खूप राग आला व त्याने आपल्या सौनिकांना शौकतचा वध करण्याचा हुकूम सोडला.

तेव्हां शौकत भीतीने थरथरत गुढगे टेकवून विनंती करून म्हणाला–"महाराज मी आपल्याला लागावे ह्या विचाराने बाण सोडला नाही. मी हरीणाला मारण्याकरीता बाण सोडला व आपण मध्ये आलात व आपल्याला लागले तेव्हां मला क्षमा करा. अल्ला संकटाच्या वेळी जरूर मदत करेल.

शौकतचे हे बोलणे ऐकून अबदुल्लाचे काळीज हेलावले व त्याने शौकतला क्षमा

करून सोडून दिले. त्यानंतर राजा व त्याचे सर्व सैनिक राजधानीला परत आले.

समुद्रात एका बेटावर सुलतानाचे वर्चस्व होते. तो वर्षातून एकदा केव्हांतरी त्या बेटावर सफर करावयास जात असे, तसा तो एक दिवस आपल्या जहाजात बसून निघाला, थोड्यावेळाने समुद्रात तुफान वादळ होवू लागले व सुलतानाचे जहाज कोलमडले व एका मोठ्या खडकावर आपटून फुटून गेले.

जहाजाच्या एका तुकड्याला पकडून सुलतान कसाबसा पोहत राहिला व बऱ्याच वेळाने एका कोणत्यातरी प्रदेशाच्या किनाऱ्यावर येऊन पडला.

तो एक निर्जन देश होता. सुलतान फाटक्या कपड्याने विस्कटलेल्या केसांनी बराच दूर पर्यंत चालत राहिला संध्याकाळ होवून गेली तेव्हां तो एका किल्याजवळ येऊन पोहोचला.

सुलताना विषयी माहिती असणारा माणूस कोणीही नव्हता. त्यावेळी तो असल्या फाटक्यावेषात होता. त्यामुळे ह्या देशांत जर मी सुलतान आहे असे सांगितले तर लोक आपल्याला वेड्यात काढतील असे समजून तो कोणाशीही काहीही न बोलता एका कठड्यावर जाऊन पडून राहिला. त्याचा डोळा लागतो न लागतो तोच कोणाच्या तरी लाथेच्या माराने सुलतान धावरून उठून बसला.

त्याच्या शेजारी कोणाचे तरी प्रेत पडलेले पाहून त्या राज्यातले शिपायी त्याला दरडावून विचारीत होते–"तू ह्या माणसाची हत्या कां केलीस?"

"मी कोणाचीही हत्या केली नाही. मी ह्या मेलेल्या माणसास आताच पहात आहे" सुलतान म्हणाला.

शिपायांनी त्याला पकडून आपल्या राजाच्या समोर नेवून उभे केले राजाने त्याला कैदेत ठेवण्याचा हुकूम दिला.

राजाने सुलतानाचे डोके उडवायचा हुकूम सोडला नाही. त्यानेच सुलतानाला खूप आनंद झाला ज्यावेळेस तो राजा होता. तेव्हां कित्येक लोकांचे अपराध नसतांना त्याने डोके उडवले होते. आता त्याचा विचार करू लागला–"अरेरे त्या मधे कित्येक बिचारे निरपराधी असतील."

अबदुल्लाच्या कैदखान्याच्या खोलीला उंचावर एक खिडकी होती. एक कावळा बरोबर त्या खिडकीत बसून कांव कांव करून ओरडू लागे. त्या ओरडण्यावर चिडून जावून संतापाने अबदुल्लाने एक दगड कावळ्याच्या अंगावर भिरकावला तो दगड कावळ्याला तर लागलाच नाही पण सणसण् आवाज करत खिडकी-तून बाहेर गेला. अबदुल्ला चिंताग्रस्त होऊन आपल्या मनात म्हणाला अजून माझ्यातली घाई ही गोष्ट गेली नाही.

दोन क्षण गेले, असतील तोच दोन शिपायी तुरुंगाचा दरवाजा उघडून आत आले व त्यांनी अबदुल्लाच्या बाह्या पकडून त्याला दरवाजातून बाहेर फेकले. तेव्हां बाहेर उभ्या असलेल्या दोन, चार तरुणांच्या मध्ये अबदुल्ला तोंडघशी जाऊन पडला.

त्या तरुण मुलांच्यात एक तरुण त्या देशाचा युवराज होता. ते सर्व तेथे खेळत होते. अबदुल्लाने कावळ्याला मारलेला दगड त्यांच्यांतल्या युवराजाच्या डाव्या



हाताला लागून गेला व त्याला जबरदस्त लागला.. तेव्हां युवराजानी रागाने दात आठे खात शिपायांना हुकूम सोडला "तुम्ही जाऊन त्या दुष्टाला बाहेर आणा व त्याचे मुंडके उडवा."

शिपायी अबदुल्लाला घेऊन जात होते. तेवढ्यात युवराज जोरात ओरडून म्हणाला "थांबा."

युवराज अबदुल्लाच्या जवळ जाऊन त्याला निट निरखून पाहू लागला व म्हणाला–"तुझ्या डाव्या हाताला हे इतके लागलेले वण कसले आहेत?"

अबदुल्लाने युवराजाला झुकून अभिवादन केले व म्हणाला–"हुजूर, मी जो दगड



मारला. तो कावळ्याला म्हणून मारला परंतु चुकून तुमच्या डाव्या हाताला लागला तसेच एकदा जंगलात शिकार करीत असता चुकून हरीणाला मारलेला बाण माझ्या डाव्या हाताला लागला.

"अशी गोष्ट आहे कां? तर तू त्या तरुणाला काय शिक्षा दिलीस?" युवराजाने विचारले.

"युवराज, मी त्याला शिक्षा दिली नाही, परंतु क्षमा करून सोडून दिले" अबदुल्ला म्हणाला.

"तू, त्या तरुणासारखीच स्वतःहाची सुटका करण्या करीता क्षमेची याचना करीत नाहीस कां? सुलतान अबदुल्ला?" युवराजाने विचारले.

अशा प्रकारे आपल्या नावाचा उच्चार करणाऱ्याकडे अबदुल्ला चकीत होऊन लक्षपूर्वक पाहू लागला. तो कोणी दूसरा नव्हता तर काही वर्षापूर्वी त्याच्याकडे नोकरीवर असणारा मुलगा शौकत हा होता परंतु त्याच्या पूर्व नावाने हाकां मारण्याची अबदुल्लाला हिमत झाली नाही कारण तो आता युवराज होता.

त्यानंतर युवराजाने अबदुल्लाला मोठ्या प्रेमादराने जवळ घेऊन आलिंगन केले व म्हणाला–"आपल्या चेहऱ्याकडे पाहिल्या बरोबरच मी आपल्याला ओळखले होते हे. पाहिले एका काळात मी तुमचा नोकर होतो. तेव्हां मी माझ्याच वडिलांशी भांडून आपल्याकडे नोकरीला लागलो होतो. नतंर माझे वडिल माझ्या शोधातच होते. शोधणाऱ्या एका माणसाने मला पाहिले व मी नाही म्हणून माझे वडील किती दुःखी आहेत हे सांगितले तेव्हां मी आपणास न सांगताच आमच्या गावी निघून आलो.

हे ऐकून अबदुल्लाला अत्यंत आनंद झाला. शौकतने अबदुल्लाला आपल्या वडीलांच्यापाशी आणले. त्याच्या वडीलांनी अबदुलाला राजाला उचीत होणारे नजराणे दिले व त्याच्या संरक्षणाकरीता काही शिपायी बरोबर देऊन त्याला त्याच्या देशी पाठविले.



# काळजीचे रहस्य

एकनाथ एक निर्धन माणूस होता. तरीही नेहमी हसतमुख असे. परंतु काही दिवसांपासून तो उदास दिसे.

एकनाथच्या अशा अचानक बदलाचे कारण काय हे जाणण्या करीता लोकनाथने त्याला विचारले–"दोस्ता! काय कारण आहे तू असा एकाएकी कसा बदललास." तुला काय होत आहे? मला सांग.

एकनाथने दिर्घ श्वास घेतला व म्हणाला–"लोकनाथ, मी तुला ह्याचे कारण सांगणार होतो. परंतु विसरून गेलो. मी आजपर्यंत निर्धन होतो. त्यामुळे मला कशाचीही काळजी नव्हती आणि मी खूप आनंदी होतो. परंतु काही दिवसांपूर्वी माझा मामा वारला त्याला कोणीही मुलबाळ नव्हते. त्यामुळे त्याची दोन लाखाची ईस्टेट मला मिळाली. आणि दहा दिवसांपुर्वी माझी मावशी मेली तिचा नवरा पहिल्यांदाच वारला व त्यानांही कोणी मुलबाळ नव्हते त्यामुळे त्यांचे एक लाख रुपये मला मिळाले." इतकी संपत्ती पाहून.

हे सर्व ऐकून लोकनाथ आश्चर्य चकित होत म्हणाला–"एवढी सगळी संपत्ती मिळून तर तुला जास्त आनंद व्हायला पाहिजे पण उलट तू खूपच उदास वाटतोस.

"अरे तेच तर कारण आहे, आता माझ्या नात्यातला लोकांपैकी मुलबाळ नसलेला कोणीच उरला नाही लोकनाथने श्वास घेत म्हटले.



## चांदोबातील नवलाई




### अजस्त्र अशा डायनॉसॅरसचा नाश कसा झाला ?

सुमारे साडे सहा कोटी वर्षापूर्वी डायनॉसरस हे प्राणी पृथ्वीवर होते परंतु अचानक नाहीसे कसे झाले ? ह्या संबंधी वैज्ञानिकांचा निष्कर्ष आहे की, अंतराळातील एक ग्रह सुटून पृथ्वीवर येऊन आपटला त्यामुळे पृथ्वीवर मोठा प्रलय झाला. व त्यामध्ये यांचा संपूर्ण नाश झाला.

### प्राण्यांवर माणसांचे नियंत्रण

आजतागायत इतिहासकार हेच सांगत आले की, प्राण्यांवर माणसाचे नियंत्रण इ. स. पू. सहा हजार वर्षापासून आहे. परंतु नुकतेच लंडन मधिल विश्वविद्यालयातील पालवान नावाच्या पुरातन विज्ञानीकाने आपल्या संशोधनाने शोधून काढले की, एक लाख वर्षापूर्वीपासून माणसाने प्राण्यांवर विशेषता घोड्यांवर नियंत्रण करायला शिकवले होते.



### स्वस्तिकाचे चिन्ह

स्वस्तिकाचे चिन्हं आहे. प्राचीन काळापासून युनानी व मध्य युगातील खिस्ती पण ह्याला पवित्र मानतात. परंतु पूर्वीच्या प्राचीन ग्रंथांमध्ये सुद्धा ह्या आकृतीचा काही उल्लेख सापडत नाही.

टेक्सासच्या के. सी. जे रान्सम अथवा हान्स याच्या द्वारे पुच्छल ताऱ्याची प्रकाश किरणे पृथ्वीच्या चुंबकीय भागांपासून जेव्हां गेली. तेव्हांपासून आकाशात तशा तऱ्हेची आकृती प्रथम पहायला मिळाली.

## तुम्हांला माहीत आहे का ?

१. "अभिज्ञान शाकुन्तलम" या संस्कृत नाटकाचा लेखक कोण आहे ?
२. "इलियड आणि ओडेसी" या ग्रीक महाकाव्यांचे कवी कोण आहेत ?
३. "पॅराडाइज लॉस्ट" ह्याचे कवी
४. "अर्थशास्त्र" याचे लेखक कोण ?
५. उत्तम साहित्यात नोबेल पारितोषिक मिळविणारा विजेता ब्रिटिश प्रधान मंत्री कोण होता ?



## आळशी नमुना

गजाननला आपल्या वडिलांजित चार एकर चांगली सुपीक जमिन मिळाली होती. पण तो खूपच आळशी होता. त्या जमिनीत स्वत : शेतीभाती न करीता. ती दुसऱ्यांकडून करून घेऊन येईल त्या पैशात संसार सांभाळत होता. त्याची बायको त्याच्या ऐदीपणावर चिडून जाऊन त्याला म्हणत असे की नुसते बसून काय रहाता शेतीभाती नाही. तर काहीतरी धंदा करा. तेव्हां तो म्हणत असे "कशाला ते, आपल्याला काही कमी पडते कां ? आरामात सर्व चालले आहे."

आराम ह्याचा अर्थ काय नुसते बसून खायचे आहे. मी तर ह्याची वाट पहाते आहे की; तुम्ही जास्त पैसे मिळवून मला केव्हां एकदा चंद्रहार व पाटल्या करून घालता. परंतु तुमची मिळकत पाहून तर वाटते की ह्या जन्मी शक्य होणार नाही.

गजाननला सुद्धा बरेच दिवसांपासून वाटत होते की; बायकोला सोन्याचे दागीने करावेत. तेव्हां शेजारपाजाराच्यांत आपला मान् प्रतिष्ठा जास्त वाढेल. परंतु त्याची मिळकत घरसंसार चालवायलाच मुष्कील होती तेव्हां अशा परिस्थितीत आपल्या बायकोची मागणी कशी पुरी करणार.

एक दिवस त्याने आपल्या मित्राची संमती विचारली—"मित्रा, मला सांग, पैसा कसा कमवावा ?

त्यावर त्याच्या मित्राने एक दोन प्रकार त्याला सांगितले. पण गजाननला कोणतेच आवडले नाहीत.

"तू सांगितलेल्या प्रकाराने एक तर वेळ खूप जाईल व ते कठिण असण्यासारखे काम आहे. तर मग सोपा एका दिवसात भरपूर पैसा मिळवता येईल असा एखादा उपाय सांग." गजानन म्हणाला.



"तुझा विचार तर विचित्रच आहे. एका दिवसांत गडगंज संपत्ती मिळवायची म्हणजे चोरी करण्याशिवाय दुसरा उपाय नाही."

शेवटी गजाननने चोरी करण्याचे ठरविले. परंतु आपल्या गावातच चोरी केली तर आपल्याला ओळखणारी माणसे खूप आहेत. म्हणून शेजारच्या गावी जाऊन चोरी करण्याचे ठरविले.

दुसऱ्या दिवशी पहाटे उठून त्याने बायकोला सांगितले–"हे बघ, मी पैसा मिळवायला शेजारच्या गावात जात आहे. येतांनाच तुला चंद्रहार व पाटल्या घेऊन येतो."

ते ऐकून ती आनंदित झाली.

दुपारपर्यंत नारायण दुसऱ्या गा पोहोचला. तेव्हां तेथे गावचा बाजा भरला होता. त्याने बाजारात आलेल्या प्रत्येक व्यक्तिला निरखून पहाण्यास सु केली. कारण त्यात जो श्रीमंत दिसेल त्याच्या घरी रात्री चोरी करायची.

त्याच वेळेला त्याची नजर एका शेतकरी जोडप्यावर पडली. तो आपल्या बायकोला म्हणत होता–"अग हे बघ! घरी जाताच हे चंद्रहार व पाटल्या असलेले गाठोडे नीट लपून ठेव. बर कां?"

हे ऐकताच गजानन जागच्या जागी थांबला. त्याने विचार केला की, आपला कार्यभाग थोडक्यातच मिटला.- तो पैसा चोरून त्या पैशांचे दागीने करून बायकोला घालणार होता परंतु त्याच वस्तु जर चोरी करावयास मिळाल्या तर ह्यापेक्षा भाग्याची दुसरी गोष्ट कोणती.

गजाननने त्या जोडप्याला नीट नजरे खालून घातले. व हळू हळू त्यानां नकळेल असा पाठीमागून जात राहिला. ते बाजा-रातून जसे घरी पोहोचले. तसा गजानन पुढे येत म्हणाला–"अहो भाऊ साहेब, मी एक परदेशी आहे. येथे माझे ओळखी पाळखीचे कोणी नाही. तेव्हां आजची रात्र मला आपल्या घरी आसरा मिळेल काय?



शेतकऱ्याने गजानला आदराने आत लावले व म्हणाला–"आजची रात्रच ग जोपर्यंत आपले काम ह्या गावात ोपर्यंत रहा."

त्या रात्री शेतकऱ्याच्या बायकोने चांगले सुग्रास अन्न करून त्याला पोटभर वाढले. परंतु पोट भरून जेवले तर झोप येईल म्हणून त्या भीतीने गजानन अर्धपोटीच पानावरून उठला.

रात्री झोपण्यापूर्वी शेतकऱ्याने बायकोला पुन्हां दागीने नीट लपवून ठेवलेस नां? म्हणून विचारले.

बायकोने नीट लपवुन ठेवले म्हणून उत्तर दिले.

गजाननला आपले कार्य पूर्ण होणार म्हणून अतिशय समाधान वाटले. त्याने शेतकऱ्याच्या बायकोने गाठोडे कुठे लपविले ते निट पाहून ठेवले व अर्धी रात्र उलट-ताच तो त्यांच्या खोलीत आला.

शेतकरी दमल्यामुळे घोरत पडला होता. त्याची बायकोपण गाढ झोपली होती.

गजाननने विचार केला–"हे लोक तरी किती विश्वासू आहेत, घरात एवढे सोने नाणे ठेवून एका आश्रिताला रहावयास सांगून निश्चितपणे घोरत पडले आहेत. तरी पण आपल्या दृष्टीने ते तर चांगलेच फायद्याचे आहे.

तो कोनाडयापाशी गेला. व ते गाठोडे उचलून पाहिले. ते खूपच जड होते. त्याला आश्चर्यवाटले की; चंद्रहार व पाटल्याचे गाठोडे एवढे जड कां? त्याने ते ओढून काढायचे ठरवले. तेवढयांत त्याचा एक पाय स्टूलाला लागला व स्टूल खाली पडले.

तो आवाज ऐकून शेतकरी व त्याची बायको धडपडून उठले व त्यांनी समोर गजाननला पाहिले गजाननला अर्धमेल्या सारखे झाले व तिथून जाताही येईना.

शेतकऱ्याने गजाननला विचारले– "त्या कोनाडयापाशी तुझे काय काम होते? खरं तर चंद्रहार व पाटल्या तेथे नाहीत. आमच्या शेतात पेरण्या करीता घेतलेले

बी-बियाणे आहेत." असे म्हणत पोट धरून हसू लागला.

"दिसायला तर साधा-भोळा सज्जन वाटतोस. आणि चोरीच्या आशेने आलास होय? त्याच्या बायकोने विचारले."

"नाही, नाही मी चोरी करण्याच्या आशेने आलो नाही. तुम्ही लोक खूप चांगले आहात परंतु कोणावरही असा विश्वास चटकन ठेवू नये आपल्याला ह्या गोष्टीचा धडा मिळावा ह्या हेतूने मी कोनाड्यातील सोने दुसरीकडे लपवणार होतो व तुम्हांला रडवून मग देणार होतो." आपली चुक सावण्याकरीता गजानन खोटे बोलला.

शेतकरी हसून म्हणाला—"काहीही असो तुझा कसा कां? हेतू असेना. आमच्याकडे गुंजभर सोने सुद्धा तुला सापडणार नाही. एवढेच नव्हे तर आमची म्हणायला आम्हांला जमीन सुद्धा नव्हती. परंतु मागचे चार वर्ष मेहनत मजुरी करून पै पै जोडून आता थोडी जमीन आमची स्वतःहाची म्हणून विकत घेतली. त्यातून मिळणाऱ्या पैशाने मी बायकोला चंद्र[हार] व पाटल्या करून घालीन. त्यामुळे आज बाजारातून बी-बियाणे खरेदी केले त्यालाच चंद्रहार व पाटल्या ह्याने [समज] लागलो.

शेतकऱ्याच्या तोंडचे ऐकून गजाननची अक्कल ठिकाणावर आली. शेतकरी जर थोड्याश्या जमिनीतून कष्ट करून वर्षाच्या आत बायकोला दागिने करून घालणार आहे. तर आपली स्वतःहाची चार एकर जमिन असून त्याचा काय उपयोग. आळस सोडून जर स्वतःहाच शेतीकडे लक्ष घातले तर फक्त चंद्रहारच नाही तर अनेक दागिने बायकोला करून घालता येतील.

तेव्हां गजाननने शेतकऱ्याचे कृतज्ञतेने आभार मानले व तो आपल्या गावी परत आला. त्याने स्वतःहा कष्ट करून शेतीकडे पहायला सुरवात केली. व थोड्या दिवसातच आपल्या बायकोला नविन नविन दागिने बनवून देऊ लागला.






[ १३ ]

[ पिंगळ्याच्या दोन्ही मोठ्या भावांनी घरातली सगळी संपत्ती आपापसात वाटून घेतली. ते मंत्रभलेल्या पिशवी करीता भांडू लागले. हे समजताच राजाने दोघांना तुरुंगात टाकले. ज्या जहाजातून जात होते. त्याचे व दुसऱ्या एका जहाजाचे युद्ध सुरू झाले. तांडेलाने आपल्या गुलामांना मुक्त करून स्वतःचे रक्षण करण्याकरीता हातात आयुधे दिली. पुढे—]

तांडेलाच्या हुकूमामुळे सर्व कैद्यांना मुक्त करण्यात आले. त्यांना स्वतःच्या व जहाजाच्या रक्षणार्थ शस्त्रे देण्यात आली. त्यावेळेस तांडेल कैद्यांकडे अति प्रेमादराने पहात म्हणाला—"तुम्ही सर्वजण ह्या क्षणापासून गुलाम नाहीत तर योद्धे आहांत. आता आपले जहाज संकटात सापडले आहे. आपल्या जहाजावर ताबा मिळविण्याकरिता दुसरे जहाज चालून येत आहे. जर कां आपण हरलो तर आयुष्यभर त्यांचे कैदी म्हणून जगायला पाहिजे. म्हणून तुम्ही शौर्याने लढ्याला तोंड द्या. आयुष्यभर बंदी कैद्याचे जिवन जगण्यापेक्षा क्षणभर स्वातंत्र्य प्राप्त करून जगणे बरे. तरी जीव धोक्यांत घालून युद्ध करा. सर्वांना आपण धैर्याने तोंड दिले पाहिजे. सर्वांनी निर्भयपणांनी सैन्यांला हाकलून लावले की, जय आपलाच."





तांडेलाच्या तशा बोलण्यावर गुलामांनी विश्वास केला नाही. कारण पूर्वी तो त्यांच्याबरोबर क्रूरतेने वागला होता. तरी पण अशा स्थितीत तसे वागणे बरोबर नाही. कारण शत्रुचे सैन्य तेलांत बुडवून पेटवलेले गोळे त्यांच्या जहाजावर टाकत होते आणि जर कां जहाजाने पेट घेतला तर सर्वांनांच जहाजासकट जलसमाधी मिळणार होती. तेवढ्यांत पिंगळच्या मनात एक विचार आला. आपल्या जहाजाचे रक्षण करणे हे तर महत्वाचे आहेच. परंतु प्रथम शत्रुला तोंड द्यायचे आहे. नाहीतर त्याच्या तावडीत सांपडलो तर आयुष्यभर कैदी म्हणून गुलामासारखे मरेपर्यंत जगणे भाग पडेल आणि जर शत्रुबरोब लढा दिला नाही, तर मरण हे नक्कीच. त्यामुळे ह्या सैन्याला तोंड देणे जास्त व तांडेलाचे जिवंत रहाणे सुद्धा घ.. बनू शकते. त्यामुळे प्रथम त्याला मारून टाकून शत्रु सैन्यांशी हात मिळवणी करता येईल.

पिंगळने सर्व प्रकारे समजावून सांगून गुलामांना सावध केले. प्रथम तांडेलाचा नाश केल्याने आपल्याला काय फायदा होईल हे सर्व सांगितले. नंतरच शत्रु सैन्याला तोंड देणे रास्त ठरेल. सर्व जहाजातील गुलामांनी पिंगळचे म्हणणे मान्य केले. शूर व हुषार पिंगळला सर्वांनी आपला नायक नेमले.

पिंगळने तत्काल समुद्राच्या भिषण आवाजात आपला आवाज काढीत जोरात सांगितले–"तांडेल व त्याच्या साथीदारांचा संहार करा. त्यांना पिटाळून लावा हाणा मारा." असे म्हणत तो पुढे चालून जाऊ लागला.

सर्व गुलाम एकजुटीने सिंहासारखी गर्जना करीत तांडेल व त्याच्या साथी-दारांवर तुटून पडले.

तांडेलाला कल्पना नव्हती की, असे काही घडून येईल. आता त्याची परिस्थिती फारच वाईट झाली. एका बाजूंनी त्रुचे सैन्य त्यांच्या जहाजावर तेलाचे ोळे पेटवून टाकण्याच्या तयारीत होते. दुसरीकडून त्यांच्याच जहाजावरील गुलाम त्याच्यावर हल्ला करून येते होते.

"हा तर राजद्रोह आहे. धोका व दगा-बाजी आहे! प्रथम ह्या गुलामांना मारून टाका." असा आपल्या अनुचरांना त्याने हुकूम सोडला. तो आपली तलवार बाहेर काढून गुलामांवर तुटून पडला. त्याच्या चलाखी व हुशारीने पिंगळचे चार पाच साथीदार आपला जीव घालवून बसले. ते पाहून इतरजण घाबरून भीतीनें थरथर कांपू लागले व पळून जाऊ लागले.

पिंगळने आता धोका असण्याचा संभव आहे हे ताडले. त्याने- तांडेलावर हल्ला केला व आपल्या साथिदारांना दिलासा देत म्हणाला–"हे पहा बंधुनो, मी माझ्या तलवारीने तांडेलाचा बळी घेतो. तुम्ही जर भीतीने पळून जाऊ लागलात तर हा समुद्रच तुम्हांला खाऊन टाकले. तेव्हां आपले प्राण पणाला लावून तुम्ही शर्थीने लढ्याला तोंड द्या. स्वातंत्र्या करीता आपल्यालाच पुढे व्हायला पाहिजे."

पिंगळच्या दिलाश्याने गुलाम लोकांचे समाधान झाले. ते त्यांचा उत्साह



द्विगुणीत करून तांडेलाच्या साथीदारांवर तुटून पडले. तांडेल चालून आला. तांडेलाला पिंगळचा वार लागला. तो लागताच 'जय भैरवी' म्हणत तांडेल जोर-जोरात ओरडत पिंगळवर चालून आला. त्याने जाणले की, आपल्या गुलामांचा संहार प्रथम करावयास हवा. शेवटी शत्रुशी सामना देणे योग्य.

तांडेलाचे शारीरीक बळ खड्गयुद्धया-तील कौशल्य पाहून पिंगळ विस्मय-चकित झाला. त्याला समजून आले की, ह्याच्या बरोबर समोरासमोर युद्ध करणे महासंकटात सापडण्यासारखे आहे. म्हणून त्याने गनिमीकाव्याने युद्ध करून विजय

प्राप्त करण्याचे ठरविले. तो तांडेलाच्या समोरून झटकन नाहीसा झाला. त्याच्या तशा पळण्याने तांडेलाचा वार चुकला व तो तोंडघशी दोरीत पाय अडकून पडला. ही चांगली वेळ आहे समजुन पिगळने त्याच्या पाठीत भोसकण्या करितां तलवार उपसली तेवढ्यात त्याने पलीकडे लुडकून तो वार उलटवला. पिंगळची तलवार लाकडात घुसली व तिचे दोन तुकडे झाले

तांडेल क्रूर हास्य करीत उठला व म्हणाला–"अरे रे! तू तर गुलामांचा नायक आहेस. बिचारा असा कसा अडकला. तुझ्या नेतृत्वाने बिचारे गुलाम तुझे म्हणजे मान्य करून लढा द्यावयास तयार झाले. आणि आता तुझ्यामुळे त्या बिचाऱ्याची कशी द[illegible] होणार आहे. आता तयार हो. तुला आ[illegible] त्यांचे नेतृत्व केलेस, म्हणून अशी [illegible] करणार आहे की, तुझे तुकडे तुकडे क[illegible] समुद्रात फेकून देईन व त्या पाठोपाठ तुझ्या सर्व साथीदारांचे..."

तांडेल आता भयंकर रागाच्या भरात होता. त्यामुळे त्याने पिंगळकडे पाहिजे तसे लक्ष दिले नाही. पिंगळने आपली तलवार मोडताच येणारे संकट ओळखले व दुसरी तलवार मिळते का! म्हणून आजूबाजूला पाहिले. परंतु जवळ तलवार नव्हती. त्याचे साथीदार तांडेल व इतरांच्या [illegible]रोबर लढत होते. त्या संधीचा फायदा [illegible]गळने घेतला.

क्षणार्धात पिंगळने जवळ पडलेला दोर- [illegible] उचलला व त्याचा फांस तयार केला. [illegible]डेलाच्या पाठीमागून जाऊन त्याच्या गळ्यात टाकला. तो पकडून तो त्याला फरपटत ओढत नेऊ लागला. गळ्यातील दोरखंड ओढले जाऊ लागले आणि तो धप्‌दिशी खाली पडला. त्याने आपल्या हातातील तलवारीने दोर कापण्याचा प्रयत्न केला. तेव्हां पिंगळने आपल्या उरलेल्या साथीदारांना बोलावले. दोघेजण धावतच जवळ आले. त्यांनी तांडेलाला खाली पडलेले पाहिले व आपल्या तलवारीने भोसकायचा प्रयत्न केला. पण तो व्यर्थ झाला.

पिंगळ तांडेलाच्या बरोबर लढण्यात गुंग झाला होता. त्यामुळे आपल्या चारी-बाजूला काय चालले आहे हे त्याला माहित नव्हते. त्याने तांडेलाला ठार केले. आणि आपल्या साथीदाराच्या हातातील तलवार खेचून घेऊन जेथे हल्ला चालला होता तेथे पळाला. त्याने पाहिले तर तांडेलाचे काही साथीदार मृत्युमुखी पडले व बाकीचे जाय बंदी झाले होते.

ते सर्व चालू असतानाच शत्रु सैन्याचे जहाज अगदीच जवळ आले. त्याने दूरूनच पाहिले की, त्यांच्या जहाजात सुद्धा काहीतरी







गडबड उडाली आहे. त्यामुळे आपल्याला सहजतेने त्यांच्यावर हल्ला करण्यास हरकत नाही.

परंतु पिंगळने पुढे येणाऱ्या परिस्थिती बद्दल काहीच योजले नाही. तो विचार करू लागला की, शत्रु सैन्याशी लढा देण्यास आपले साथीदार उपयोगी नाहीत. म्हणून आपण बंदी झालो तर पुन्हां आयुष्यभर गुलामांचे जिणे जगणे आले. त्याने तांडेलाची दुर्बिण घेतली. तो शत्रु सैन्याच्या जहाजाकडे पाहू लागला की, त्यांच्या जहाजात किती माणसे आहेत. त्याने पाहिले तर जहाज माणसाने खचाखच भरलेले होते.

पिंगळने त्यांना सुचना देण्याकरीत पांढरा झेंडा फडकावयाचे योजले. आणि आपली लढण्याची तयारी नाही सांगण्याकरीता त्यांच्या मालक कळावे व आपण आपल्या रस्त्याने निघून जावे म्हणून ठरविले. परंतु त्या जहाजतील लोक तसे करण्याला मान्यता देतील काय? अशी एक शंका त्यांला आली.

असा विचार करीत त्याने निश्चय केला की, आपल्या जहाजावर शत्रु सैन्यांला येऊ द्यावयाचे नाही व त्यांच्या जहाजाला शक्यतो लांबच असू द्यायचे व त्यातुन मैत्रीचा निर्णय ठरवायचा. म्हणून त्याने पांढरा झेंडा आपल्या जहाजावर फडकवला. ते पहाताच शत्रुच्या जहाजावर जयजयकार व जल्लोष ऐकू येऊ लागला.

पिंगळने लगेच जहाजाचे सुत्र आपल्या हाती घेतले व शत्रु सैन्यांच्या जहाजातील लोकांना आपल्या जहाजात काय काय घटना घडल्या आपण काय केले. त्याने आपल्या तांडेलाला कसे मारले व त्यांच्या साथीदारांना कसे कैद केले. व पूर्वी त्याने आपल्या सर्वांना गुलाम म्हणून कसे वागविले हे सर्व सांगितले व आता आम्ही कुठच्या तरी बंदराला ...गून आपापल्या घरी परत जावू ...पण आमच्या बरोबर मैत्री संपादन ...न आपापल्या वाटेने निघून जावे सांगितले.

ह्या गोष्टी ऐकून जहाजातील लोकांच्यात थोडी गडबड उडाली. थोड्या वेळाने त्यांचा आवाज बंद झाला व जहाजाच्या आतुन एक पहाडी आवाज ऐकू आला.

"बोटीवर गुलाम म्हणून जगणाऱ्या तुम्हां लोकांना जहाजावर आपला हक्क गाजवता येणार नाही. जहाजाच्या तांडेलाला व त्यांच्या साथीदारांना मारून तुम्हांला दंड व शिक्षा भोगल्या शिवाय जाता येणार नाही. नाहीतर एक नां एक दिवस आमच्या जहाजातील लोक तुमचेच अनुकरण करून आमचा अंत करतील. म्हणून तुम्ही तुमचे जहाज नांगर टाकून थांबवा व मुकाट्याने आमच्या स्वाधीन व्हा."

ही घोषणा ऐकून पिंगळला अतिशय आश्चर्य वाटले व त्या बरोबर भीती सुद्धा वाटली. त्याला समजून आले की, व्यापारां करीता चालवले जाणारे हे चोरडाकूंचे जहाज आहे. अशा जहाजाच्या स्वाधीन होणे म्हणजे पुन्हां गुलाम म्हणून विकत जाण्यासारखे आहे.



पिंगळने विचार केला व आपल्या साथीदारांना पुढची थोडीफार कल्पना दिली. ते सर्व एकमताने शत्रु सैन्याशी लढायला तयार झाले. त्यांनी सर्वांनी असा विचार केला की; शत्रुच्यां हाती सांपडून आयुष्यभर गुलामी पत्करण्यापेक्षा लढता लढता पाण्यांत पडून मेलेले बरे.

ह्या निर्णया नंतर त्यांनी आपल्या जहाजावरचा पांढरा झेंडा खाली उतरवला. जहाजाच्या आतून जयजयकाराचा ध्वनी ऐकू येऊ लागला. त्यांच्या दृष्टीने शत्रुची लोकसंख्या खूप होती म्हणून त्याने आपले जहाज होता होईल तो लांबवरच ठेवले.






आपल्या जहाजातुन त्यांच्या जहाजावर बाणानीं वर्षाव करावा व त्यांच्या जहाजातील माणसांना जलसमाधी द्यावी असे ठरविले. पिंगळने सर्वांना एकजुटीने लढा द्या म्हणून सांगितले. तसे झालेच नाही तर आपल्या जहाजांनी त्यांच्या जहाजाला टक्कर मारायची हा एकच उपाय शेवटी निश्चित केला.

परत लढाई सुरु झाली. पिंगळच्या जहाजातील लोकांनी धनुष्याला बाण जोडून सोडण्याची तयारी केली. तेवढयांत पिंगलने जहाज मागे घेण्याची खूण केली. त्याने ठरविले की शत्रुच्या जहाजापासून होता होईल तेवढे आपले जहाज लांब ठेवणे योग्य परंतु त्याला कळले की आता शत्रुच्या तावडीतून सुटणे शक्य नाही. पहाता पहाता शत्रुचे जहाज जवळ आले.

पिंगळने एकच हुकूम सोडला. शत्रुवर विजय मिळवायचा आहे. किंवा लढता लढता मरण ओढवून घ्याय आहे. पिंगळने ओरडून आपल्या स साथीदारांना सांगितले–" आपले जह जेवढ्या जलदगतीने नेता येईल नेऊन त्यांच्यां जहाजावर आदळाव आहे." पहातात ते काय! जहाज वेगाने शत्रु सैन्याच्या जहाजाच्या दिशेने जाऊ लागले. ते पाहून शत्रु सैन्य भयकंपित होऊन हाहा:कार माजवू लागले.

पहाता पहाता जलद गतीने पिंगळचे जहाज शत्रु सैन्याच्या जहाजावर जाऊन आपटले व दुसऱ्या क्षणीं कर्कश किंकाळयाने सारे आकाश दुमदुमून गेले.

दोन जहाजांच्या टकरीने जहाज फुटले व पिंगळ आपल्या जागेतून हवेत ऊंच उडाला व समुद्रात जाऊन पडला. जसे काही कोणीतरी सारी शक्तीपणाला लावून त्याला लांब फेकले आहे.

(पुढे चालू)



## हव्यासाचे फळ

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमी प्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेंव्हा प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–" राजा, या भयंकर स्मशानात अशा रात्रीच्या वेळी तू एवढे परिश्रम करीत आहेस. परंतु तुझी ही मेहनत फुकट गेली असे मात्र नाही. त्याचे उदाहरण म्हणून मी तुला विजयशर्मा व अजयशर्मा ह्या पिता-पुत्राची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

वैशाली नावाच्या राज्यात विजयशर्मा नावाचा भिक्षुक ब्राह्मण रहात होता. भिक्षुकीत त्याची चांगलीच मिळकत होती. त्याचे कुटुंब लहान होते. त्याच्या व्यतिरिक्त त्याला पत्नी एक मुलगा व एक मुलगी होती. कोणतेही आर्थिक कष्ट न पडता त्याचे



आयुष्य आनंदात जात होते. तरीं पण त्याच्या मनात एक प्रकारचा असंतोष होता. कोणताही राजसभेतील अधिकारी, कवी, किंवा पंडित यांचे वैभव पाहिले की, त्याच्या मनात एक प्रकारची असूया निर्माण होत असे. कोणत्या तरी प्रकाराने राजाच्या दरबारात नोकरी करून आयुष्य ऐषआरामात घालवावे अशा विचारात मग्न असे.

विजयशर्माचा मुलगा वयात आल्यावर भिक्षुकीच्या कामात वडिलांना मदत करू लागला. विजयशर्माच्या डोक्यात एक नविन युक्ति आली. जर हिमालयात जाऊन तेथील ऋषीमुनींच्या सानिध्यात राहीले व सिद्धी प्राप्त करून त्यांच्या द्वारे अपूर्व शक्ति मिळविल्या तर जास्त लवकर श्रीमंत बन येईल. विजयशर्मा कोणाला काहीही सांगता एक दिवस हिमालयात निघून गे तेथे जाऊन एका मुनींच्या आश्र राहीला व श्रद्धेने त्यांची सेवा करू लागला, त्यांच्या सेवेत रात्रंदिवस राहू लागला.

मुनींनी विजयशर्माच्या येण्याचे कारण अंर्तज्ञानाने जाणले आणि त्याला म्हणाले– "वत्सा, तू एक गृहस्थ आहेस तुझ्या मुला व मुलींचे लग्न लावून देण्याची जबाबदारी तुझी आहे. त्यामुळे तू घरी परत जा. आजपर्यंत मोठ्या श्रद्धा आणि भक्तिने तू माझी सेवा केली आहेस, काही इच्छा असेल तर ती मला सांग मी ती पूर्ण करीन."

त्यावर विजयशर्मा म्हणाला–"स्वामी, मला अशा तऱ्हेचा मंत्र सांगा की; त्या मंत्राच्या प्रभावाने जी इच्छा होईल त्याचे फळ मिळेल."

मुनीने ते ऐकले व म्हणाले–"मुला, मी तुला एका मंत्राचा उपदेश देतो त्या मंत्राच्या प्रभावाने तुला काही अपूर्वअशा शक्ति प्राप्त होतील. परंतु तू धनाच्या मोहाला बळी जाऊ नकोस, ह्या मंत्राचा उपयोग जनतेच्या हिता करीता कर." अशा तऱ्हेने मुनीने मंत्र सांगितला.

विजयशर्मा नंतर आपल्या घरी परतला. त्याच्या अनुपस्थितीत त्याचा मुलगा जय हा भिक्षुकी करून घर सांभाळत ता.



विजयशर्मा जेव्हां गावात परत आला हां वैशाली राज्यात भयंकर दुष्काळ पडला होता. प्रजा नाना तऱ्हेचे हाल भोगत होती यापूर्वी दोन वर्षे सुद्धा पाऊस नसल्यामुळे राज्यात दुष्काळ होताच. राजाने पाऊस पडण्याकरीता नाना तऱ्हेचे रुद्रयाग, वरूण जप वगैरे उपाय केले. परंतु कशाचाही उपयोग झाला नाही.

यावर राजाने राज्यात दवंडी पिटविली– "जर का कोणी आपल्या मंत्र-तंत्राच्या प्रभावाने राज्यात पाऊस पाडेल त्याचा राजा सुर्वणाभिषेक करेल."

सुर्वणाभिषेकाचे समजताच विजयशर्माचा उत्साह जास्तच वाढला. आपल्या मुलाला जवळ बोलावून तो हळू आवाजात म्हणाला–"मुला, मी पुष्कळ तऱ्हेचा त्रास सोसून हिमालयात जाऊन आलो. तेथे एका सिद्ध पुरुषाच्या कृपेने मला एक मंत्र मिळाला. त्या मंत्राचा उपयोग राज्यात पाऊस पाडण्या करीता होईल. राजाने राज्यात पाऊस पाडणाऱ्यास सुर्वणाभिषेक करण्याचे ठरविले आहे. तेव्हां ह्या मंत्राच्या प्रभावाने दोन गोष्टी साध्य करून घेता येतील–एक म्हणजे राज्यात सर्वत्र पाऊस पडून दुष्काळ नाहीसा होईल व दुसरे म्हणजे धनसंपत्ती वाढल्यामुळे राज्यात आपला मान सन्मान वाढेल."

आपल्या वडिलांचे बोलणे ऐकून अजयच्या आनंदाला पारावार राहिला नाही. त्याने अत्यंत आनंदाने विचारले– "काय आपण खरोखरच मंत्राच्या प्रभावाने पाऊस पाडू शकता? जनता पाण्याच्या अभावाने अत्यंत हाल भोगते आहे. तेव्हां आपण ताबडतोब मंत्राचा प्रभाव पाडून राज्यात पाऊस पडेल असे करा."

राज्याच्या कल्याणाची गोष्ट तर आहेच परंतु प्रथम राजाला सांगितल्या शिवाय पाऊस पडला तर राजा कसा विश्वास करेल की मीच माझ्या मंत्राच्या

प्रभावाने पाऊस पाडला? तेव्हां त्यांनी केलेल्या सुवर्णाभिषेकाला मी वंचित होऊन बसेन. आपण प्रथम राजाला जाऊन सांगितले पाहिजे की; मी माझ्या मंत्राच्या सहाय्याने राज्यात पाऊस पाडू शकतो. तेव्हां ते आपल्यावर विश्वास ठेऊन आपल्याला सुवर्णदान देतील." विजयशर्मा म्हणाला.

अजय कधीही आपल्या वडिलांच्या विरुद्ध काहीही बोलत नव्हता. परंतु ह्यावेळेस त्याला राहावले नाही. त्याने जरा जोर करुनच वडिलांना सांगितले–"बाबा, आपण आपल्या भिक्षुकीतच चांगली कमाई करून आनंदात घरदार चालवू शकतो. सुवर्णदानाचा आपल्याला काय फायदा?" आपल्या मुलाचे तसे बोलणे ऐकून विजयशर्मा रागाने लाल झाला व म्हणाला– "तुला तर जगाचा अजिबात अनुभ[illegible] नाही, माझे म्हणणे ऐक." असे म्हण[illegible] मुलाला रागावत त्याने स्वतःहाला मि[illegible] लेला मंत्र आपल्या मुलाला सांगितला व तु[illegible] तो कामी येईल असे अजयला सांगून त्याने मंत्रोपदेश करायला सुरवात केली.

"मुला, प्रथम तू स्नान करुन ईश्वराचे स्मरण कर. नंतर उत्तर दिशेला एका पायावर उभा रहा. हा मंत्र तीन वेळा म्हण म्हणजे पाऊस पडायला लागेल. तशाच तऱ्हेने पाऊस बंद करण्याकरीता तीन वेळा हा मंत्र पुन्हां म्हण म्हणजे पाऊस बंद होईल." असे सांगून विजयशर्मा राजदरबारात जाण्यास निघाला.



विजयशर्माने राजास सर्व गोष्टी [illegible]गितल्या त्या ऐकून राजाला खूप आनंद [illegible]ला. राजा त्याला म्हणाला–"पंडितजी, [illegible]ण ताबडतोब पाऊस पडेल असे करा. [illegible]स जो पाडेल त्याला सुवर्णदान करणार आहे. विश्वास ठेवा मी आपल्या वचनाचे पालन करीन."

त्यानंतर विजयशर्मा वैशाली नगराच्या उत्तरेकडे असलेल्या तलावाकांठच्या शिवाच्या देवळात गेला. तेथे त्याने आंघोळ केली. नंतर काठांवर उभा राहून उत्तरेकडे तोंड करून मंत्राचे तीन वेळा पठण केले. त्याच-क्षणी वैशाली नगरावर काळोख दाटून आला ढग गडगडू लागले. आणि धुवाधार पाऊस कोसळू लागला. ते पाहून विजयशर्मा शिवाच्या देवळात गेला. प्रजा आनंदाने नाचू लागली राजा आपल्या सर्व लव्याजम्यासह पावसात भिजत शिवमंदिरात आला व विजयशर्माला म्हणाला–"महात्मन, आपल्या अनुग्रहामुळे देशात पाऊस पडला. राज्याचे रक्षण झाले. पाऊस थांबवण्या करीता जोपर्यंत मी सांगत नाही तोपर्यंत असाच पाऊस पडत राहू दे. असे म्हणून, एका मोठ्या थाळीत सोन्यांनी भरलेल्या सुवर्ण मुद्रा आणि नवरत्न राजाने आणून विजयशर्माच्या हातात दिले. आणि तो परत गेला.

मंदिराच्या बाहेर भिषण काळोख व मुसळधार पाऊस पडत होता. देवळात विजयशर्मा एकटाच राजाकडून





मिळालेले धन आनंदाने निरखित होता. त्याचे डोळे ते नवरत्न पाहून चमकत होते. तेवढ्यात चार चोर देवळात घुसले. आणि त्यांनी रामशर्मावर सुऱ्याचे वार केले तो मेलेला पाहून सर्व धनसंपत्ती गोळा करून ते देवळातून पसार झाले.

त्या दिवशी संध्याकाळपर्यंत पाऊस पडतच राहिला. शेवटी राजाने पाऊस थांबवावा असे ठरविले. तो निरोप पोहच-विण्याकरीता मंत्र्याला शिवाच्या मंदिरात पाठविले. परंतु देवळात पोहोचताच मंत्र्याला विजयशर्मा मेलेल्या अवस्थेत दिसला.

मंत्र्याने येऊन राजाला विजयशर्मा मेल्याची बातमी सांगितली. राजा ते ऐकून अत्यंत दुःखी झाला. त्याने विचार कर मंत्र्याला विजयशर्माच्या घरी पाठविले व एखादवेळेस विजयशर्मांचा मुल पाऊस थांबवण्याच्या उपयोगास येईल.

अजयशर्मा आपल्या वडिलांना मृ आल्याचे ऐकून अत्यंत दुःखी झाला. त्याची आई व बहीण छाती पिटून रडू लागली. मंत्र्याने त्याचे सांत्वन करून त्याना समजावले व म्हणाला–" तुम्ही शांत व्हा पावसाच्या अभावाने मरुभूमी बनणाऱ्या वैशाली राज्याला विजयशर्माने आपल्या मंत्रबळाने वाचविले विजयशर्माच्या मरण्यानें तुमच्याच कुटूंबाला नाही तर राज्यातील प्रत्येकांना दुःख झाले आहे. परंतु यापुढे असा प्रश्न आहे की; ह्या जलप्रलयाला थांबवून पुन्हां राज्याचे रक्षण करणे ते फक्त विजयशर्माच्या एकुलत्या एका मुलाच्याच हातात आहे."

अजयशर्माने आपल्या दुःखाला आवर घातला. आपल्या घरात उत्तर दिशेकडे तोंड करून एका पायावर उभा राहून त्याने वडिलांनी शिकवलेला मंत्र म्हटला. तो म्हणताच तावडतोब पाऊस पडावयाचा थांबला.

मंत्र्याने त्याला अभिवादन केले व म्हणाला–" उद्या राजदरबारात तुमच्या वडिलांपेक्षाही जास्त मोठा सत्कार राजा करणार आहे. तेव्हां सकाळच्या प्रहरीच ी हत्तीची अंबारी घेऊन तुम्हांला घेऊन ण्यास येईन.

दुसऱ्यां दिवशी पहाटे मंत्री आपल्या साथी- ांसह हत्तीची अंबारी घेऊन अजयशर्माच्या आला. घराच्या दाराला मोठे कुलूप पाहून त्याला आश्चर्य वाटले व दुःख झाले.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा, अजयशर्मा मानसन्मानाचा त्याग करून घरदार सोडून निघून गेला. खरे तर त्याच्या वडिलांनी मोठ्या कष्टाने मिळ-विलेल्या सर्व मंत्रशक्ति त्याला प्राप्त झाल्या होत्या व राजाकडून मिळणारी अमाप धनसंपत्ती सुद्धा त्याला मिळणार होती. ते सर्व घेऊन त्याला आयुष्य चैनीत घालवता आले असते नां ? कोणी चोर आपल्याकडे सुद्धा धनसंपत्ती पाहून आपली हत्या करेल, ह्याने घाबरून घर सोडून गेला होता कां ? ह्या शंकाचे समाधान-कारक उत्तर माहीत असूनही तू दिले नाहीस तर तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील.

त्याचे उत्तर देत विक्रमादित्य म्हणाला– "अजयशर्मा आपल्या वडिलांप्रमाणे महत्वा-कांक्षी नव्हता. थोडक्यात संतुष्ट होणारा होता. त्याने त्याच्या वडिलांच्या बरोबर जे भाषण केले त्यावरून असे समजून येते. अजयशर्मा धनसंपत्तीचा लोभी नव्हता. तेव्हां त्याला त्याच्या वडिलांकडून मिळालेल्या मंत्रशक्तिचा उपयोग जनतेच्या कल्याणाकरीता करण्यासारखा होता. परंतु नगराची स्थिती आता सुधारलेली होती. त्याला धनसंपत्तीचा उपयोग करता आला असता. चोर डाकूंची भीती त्या पाठीमागे त्याला त्रास देऊ शकत होती. ह्या सर्व कारणांमुळे राजाकडून मिळणारा सन्मान, धन याला डावलून तो आपल्या घरातील माणसांसह कोणत्यातरी अज्ञात जागी निघून गेला.

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हा झाडाला जाऊन लोंबकळू लागला.

(कल्पित)



# वैद्याची हुषारी

वैद्य बुवा एक दिवस मुलीचे लग्न ठरविण्याकरीता शेजारच्या गावी गेला होता. तेथे त्याला आपल्याच गावातील एका माणसाची गांठ पडली. त्याने सांगितले आपले जमिनदार शामसिंह एकाएकी तापाने आजारी आहेत. हे समजताच शंकराचार्यांनी बोली न करता ए[illegible] घोड्याची गाडी ठरवली व त्या गाडीवानाला एक रुपया देऊन घाटा पर्यंत सोडावयास सांगितले.

तो घाटाशी येऊन पोहोचला. पहातो तो नदीला पूर आला होता. त्यामुळे नावाडी जास्त पैसे मिळण्याच्या आशेने हो नाही करू लागला. त्यावर वैद्यबुवांनी नावाड्याला अर्धा रुपया जास्त देण्याचे कबूल केले व तो नदीपार आपल्या गांवी जाऊन पोहोचला.

घरी पोहोचताच आपली औषधाची पेटी घेऊन तो जमिनदाराच्या घरी पोहोचला. शामसिंह पलंगावर तळमळत पडला होता. वैद्यबुवांनी घाईघाईने शामसिंहाच्या तोंडात काही औषधे घातली. आणि परत गावी गेला.

गावातील माणसे वैद्यबुवाची प्रशंसा करू लागले. व म्हणाले—"वैद्यबुवा, हल्लीच्या काळात रोग्याची काळजी घेणारे व त्याच्या सारखे दयामाया दाखविणारे वैद्य बोटावर मोजण्या इतके सुद्धा पहायला मिळत नाहीत."

वैद्यबुवा थोडावेळ ऐकत राहिले व एकदम म्हणाले—"प्रेम, आणि आदर ह्या गोष्टीतर सोडाच. परंतु खरी गोष्ट अशी आहे की ; मी जर घाईने न जाता औषध दिले नसते, तर शामसिंह औषधा शिवायच बरे झाले असते. ह्यापूर्वी दोन वेळा असेच झाले होते." आता तरी मी त्यांना औषध देऊन आलो आहे. म्हणजे औषध व जाण्यायेण्या करीता झालेला खर्च त्यांच्याकडून वसुल करण्याकरीता मला काहीच त्रास होणार नाही.






# देवांचे परीक्षा

विद्यानगरात दासबोध नावाचा एक मोठा भक्त रहात होता. तो शेजार पाजारच्या गावांतून हिंडून भक्तिचे उपदेश करी आणि देवाच्या महिमेचे गुणगान करीं, एके दिवशी त्याने आपल्या जवळच्या लक्ष्मीनगरातील लोकांना तसा उपदेश ऐकवला—

ईश्वर प्राणीमात्रांची सृष्टी करतो. तो त्यांच्याकरीता खाण्यापिण्याची आधी-पासूनच सोय करून ठेवतो. मातेच्या गर्भात मुल असताना दुधाची सोय सुद्धा करून ठेवतो. त्याचप्रमाणे मुंगीसारख्या प्राण्यांची खाण्याची सोय सुद्धा करून ठेवतो. सर्वांचे पालन पोषण करतो.

सर्व लोक तन्मयतेनें व अभिरूचीने त्यांचे उपदेश ऐकत होते आणि श्रद्धा व भक्तिभावाने आनंदित होत होते. परंतु श्रोतांमध्ये असलेल्या मुकुंदाला त्या म्हणण्यामध्ये काहीतरी चूक आहे असे वाटू लागले. त्याने उभे राहून भक्ताला विचारले—"जर कोणी न खाण्याचा हट्ट धरून बसला तर त्याला ईश्वर कसा खायला घालू शकेल ?"

"मुला, ती काही तितकीशी कठीण गोष्ट नाही. तो मनांत आणेल त्याला खायला घालू शकेल. कोणी लाख प्रयत्न केले तरी देवांचाच जय होतो." भक्त दासबोधाने सांगितले.

मुकुंदा खूप हट्टी स्वभावाचा होता. तो ती गोष्ट स्वतः करून पहायला निघाला. त्या दिवसांपासून खाणेपिणे सोडले, व मनांतल्या मनांत विचार केला—"आता पाहू मला कोण खायला प्यायला घालते."

जेव्हां तो घरी आला, तेव्हां बायको ताट वाढून त्याचीच वाट पहात बसली होती तिने त्याला जेवावयास बोलावले.














"मला भुक नाही. मी आज जेवणार नाही." मुकुंदा थोड्या त्राग्याने म्हणाला.

बायकोने त्याला थोडे समजावणीच्या सुरात म्हटले–"आपल्या आवडीची कारल्याची भाजी केली आहे. थोडी तरी खाऊन पहा!"

"मी सांगीतले नां? मला भुक नाही तरी परत परत कशाला विचारतेस. मुकुंदाने पत्नीला दटावले.

त्याची मुलेपण जेवावयास बसली होती. ती सुद्धा सर्वजण वडिलांच्या पाशी येऊन खाण्या करीता हट्ट धरून बसली.

मुकुंदाने विचार केला की; आपल्या प्रयत्नाला घरात राहून काही यश येणार नाही. तेव्हां त्याने घरातून बाहेर पडून गावाच्या वेशीपासच्या मोठ्या झाडाच्या पारावर जाऊन बसण्याचे ठरविले. त्यापूर्वी त्या गावातील एका बाईला भूत लागले होते. त्यामुळे त्याच्या घरच्या माणसांनी एका मांत्रीकाला बोलावून तिचे भूत काढण्यास सांगितले. त्याने येऊन एका हंड्यात पक्वान्न मिठाई घालून गावाच्या वेशीपासच्या झाडाच्या पारावर नेऊन ठेवण्यास सांगितले त्या लोकांनी तसे केले. भूत त्याने पळून जाईल.

मुकुंदा त्याच झाडाखाली बसला होता. त्याला त्या पक्वान्नाचा घमघमाट आल्याने खाण्याचा मोह झाला. परंतु त्याने देवांची परिक्षा पहाण्याकरीता आपल्या जिभेला आवर घातला.

अर्धारात्र उलटली. त्याने आपल्या भुकेवर संयम राखला. पहाटेच्या सुमारास काही चोर चोरी करून आपापले हिस्से वाटण्याकरीता त्या झाडाच्या पारावर आले. तेथे पक्वान्नाचा घमघमाट सुटलेला पाहून त्यांच्या तोंडाला पाणी सुटले. रात्री हे इथे कुणी आणून ठेवले. म्हणून त्या चोरांना संशय आला. परंतु भुकेमुळे त्यांनी इकडेतिकडे पाहिले नाही. व पक्वान्नाचा फडशा उडविण्याकरीता त्यावर तुटून पडले.

[illegible] एका [illegible] बाकीच्यांना सावध करण्याकरीता सांगितले घाई करून तुम्ही खाण्याच्या मागे लागू नका. आपल्याला पकडण्या करीता तर हे अन्न आणून ठेवले नसेल कशावरून, ह्यात विष असण्याची सुद्धा मला शंका येते आहे.

त्यामुळे शंका येऊन इतर चोरांनी झाडाच्या आजुबाजुला कोणी आहे कां? म्हणून शोधण्याची धडपड सुरू केली. आणि अचानक झाडाच्या एका कोपऱ्याशी बसलेल्या मुकुंदाला सर्वांनी पाहिले. त्यांची शंका खरी ठरली. त्यांनी सर्वांनी मुकुंदाला दरडावत विचारले–"काय तर, तूंच ह्या अन्नात विष कालवून इथे ठेवलेस नां? तर आम्ही ते खाऊन मरून जाऊ आणि आमच्या सर्व संपत्तीचा तू मालक बनशील. दुष्ट कुठचा! आता हे सर्व अन्न तूंच प्रथम खाल्ले पाहिजेस."

परंतु मुकुंदाने भाबडेपणाने त्यांना उत्तर देत म्हटले–"मला ह्या पक्वान्नांविषयी काही एक माहीत नाही. मी कुठल्यातरी वेगळ्याच कारणांकरीता येथे बसलेलो आहे. मी उपासाचे व्रत घेतले आहे त्यामुळे मी काहीही खाऊ शकत नाही."

ते ऐकून तर चोरांच्या मनातील शंका आणखीनच खरी ठरली. त्यामुळे चोरांनी त्याला खूप मार दिला. तरी मुकुंदा खाण्यास तयार झाला नाही. तेव्हां चोरांनी त्याला जबरदस्ती हातपाय बांधून त्याच्या तोंडात अन्न कोंबण्यास सुरवात केली. अखेर मुकुंदाला ते गिळणेभाग पडले.

पक्वान्न खाल्यानंतर सुद्धा जेव्हां मुकुंदा मेला नाही. तेव्हां चोरांनी इतर सर्व राहिलेले अन्न खाऊन टाकले. व चोरीचा माल वाटून ते आपापल्या रस्त्याने परत निघून गेले.

"शेवटी देवांचाच जय झाला. मी न खाण्याचा पण केला, परंतु त्याचे पालन करणे मला जमले नाही. भक्त दासबोध बरोबरच उपदेश करत" असे म्हणत मुकुंदा अंधारातून पाय ओढत आपल्या घरी येऊन पोहोचला.







# विलक्षण स्वप्न

फार पूर्वीची गोष्ट आहे. कोशल देशात बिंबिसार राजाचे राज्य होते. तेव्हां ब्रह्मदत्ताने जेतवनात भगवान बुद्धाच्या रूपाने जन्म घेतला.

एका रात्री राजा झोपी गेला असता. त्याला एक विचित्र स्वप्न पडले. त्या स्वप्नाचा अर्थ त्याला समजला नाही. तो रात्रभर तळमळत राहीला. कारण त्याने अशा तऱ्हेचे स्वप्न कधीच पाहिले नव्हते. त्याला अशी भीती वाटू लागली की; स्वप्नाच्या अर्थाचा काही अनर्थ घडू नये. त्याने उजाडताच दरबारातील विद्वान पंडीत ब्राह्मणांना बोलावून घेतले व स्वप्नाचे काय रहस्य ते विचारले.

पंडीतानी ते स्वप्न ऐकले व त्यांना अतिशय आनंद झाला. राजाकडून घेता येईल तितके धन मिळविण्याचा हाच एक उपाय आहे. ह्याचा पुरेपुर फायदा घ्यावयाचा असा विचार करून त्याने राजाला स्वप्नाचा अर्थ कशातऱ्हेने सांगावयाचा ह्याचा विचार करीत ते राजाकडे येऊन म्हणाले—"महाराज, हे स्वप्न असे भयंकर आहे की; त्याचा अर्थ ताबडतोब सांगता येणे कठिण. ह्याच्यावर असलेल्या ग्रंथाचा अभ्यास करून आम्ही बरोबर अर्थ शोधून काढू व आपल्याला दोन, चार दिवसात सांगू तेवढी सवलत द्यावी."

राजाने पंडीताना एक आठवड्याची मुभा दिली. त्यानंतर आठवड्याने ब्राह्मण राजाकडे येऊन म्हणाले—"राजा, आपल्याला पडलेल्या स्वप्नाचा ग्रंथांच्या सहाय्याने आम्ही पुष्कळ अभ्यास केला व शेवटी असा निष्कर्ष काढला की; आपल्याला पडलेले स्वप्न भयंकर अशुभ व कोणत्याही संकटाचे कारण होऊ शकते. आपल्या कुटुंबात व राज्यात काहीतरी गंभीर असे होणार आहे."

राजा ते ऐकून चिंताग्रस्त झाला. व म्हणाला—"ह्या अनर्थाला टाळण्याकरीता काहीतरी उपाय आहे कां? तुम्ही पुन्हां विचार-विमर्श करून मला चांगला मार्ग सांगा!"

"हो महाराज! आम्ही त्यावर सुद्धा एक उपाय शोधून काढला आहे. आपल्या राज्यातील चौकात एक यज्ञ करावा लागेल. यज्ञाच्या समाप्ती नंतर ब्राह्मण भोजन व ब्राह्मण मागतील ते दान त्यांना द्यावे लागेल. तसे केल्यास आपल्या कुटुंबावरची व राज्यावरची आपत्ती टळेल." पंडीतांनी राजाला सल्ला दिला.

राजा बिंबिसारने ब्राह्मणानीं सांगितल्या प्रमाणे करण्याचे ठरवून आपल्या खजिन-दाराला यज्ञ खर्च देण्यास सांगितले.

महाराणी खूप बुद्धीमान व हुषार होती. तिने ब्राह्मणांनी सांगितलेल्यावर विश्वास केला नाही. तिने ते सर्व समजताच राजाकडे जाऊन विनंती केली—"आपण घाईने आपल्या स्वप्नाचा अर्थ करून कोणताही निर्णय घेऊ नये. खरे पहाता हे ब्राह्मण विद्वान वाटत नाहीत. सर्वात अधिक बुद्धीवान असा ब्राह्मण भगवान बुद्ध जेतवनात राहिला आहे. आज



त्यांच्याकडे जाऊन त्याच्या सेवेत राहून आपल्या स्वप्नांचा अर्थ विचारावा व ते सांगतिल त्याप्रमाणे करावे."

राजाने राणीचे म्हणणे मानले. तो स्वत. काही नोकरांच्या बरोबर जेतवनात पोह्चला. व भगवान बुद्धाला त्याने आपल्या महालात येण्याविषयी विनविले.

भगवान बुद्ध राजमहालात येताच राजाने सांगितले—"भगवान्! आपण सर्वज्ञानी आहांत आपल्याला कोणतीच गोष्ट गुप्त नाही. मी काही विचित्र स्वप्न पाहिले. त्या स्वप्नांमुळे मी खूप चिंतेत आहे. कृपया मला त्या स्वप्नांचा अर्थ आपण सांगावा!"



"राजा, आपण आपल्याला पडलेल्या स्वप्नांचा वृतांत ऐकवा म्हणजे मी त्याचा अर्थ आपल्याला सांगेन बुद्धांना राजाच्या भोळेपणाला पाहून हंसू आले.

"सर्वांत प्रथम मी चार म्हशी पाहिल्या. त्या एकमेंकीशी भांडत व रेंकत राजमहालात घुसल्या खूप लोक त्या म्हशीचे भांडण पहायला तेथे एकत्रित झाले पण त्यानंतर म्हशी आपली भांडणे सोडून आपापल्या रस्त्याने निघून गेल्या. ह्याचा काय अर्थ भगवान!" राजाने आपले स्वप्न सांगितले.

ह्या स्वप्नाचा व आपल्या कुटुंबाचा काहीएक संबंध नाही. परंतु ह्या स्वप्नाचा अर्थ असा निघतो की; आपल्या वंशा नंतरच्या येणाऱ्या पिढीतील राजे पापी होतील. त्यावेळेस त्याच्या राज्यात येणारे पावसाचे ढग पाऊस न पाडताच पर[illegible] जातील. त्यामुळे जनता असंतुष्ट राहील. भगवान् बुद्धाने अर्थ सांगितला.

"भगवान! छोटयाश्या रोपालाच मी मोहोर व फळे आलेली पाहिली. ह्याचे काय रहस्य असू शकेल.

हे स्वप्न सुद्धा त्या युगालाच अनुसरून आहे. त्या युगांत मुलींचे बालविवाह होतील त्या वयात येण्याच्या आतच माता होतील. भगवान बुद्धाने राजाला सांगितले.

राजाने आणखी एका स्वप्नाचा अर्थ विचारला–" भगवान, छोटया वासरांचे दूध गाई पित आहेत."

"येणाऱ्या काळात सर्व मोठी म्हातारी माणसे आपले पोट भरण्याकरीता लहानांन-वर अवलंबून रहातील. भगवान बुद्धाने स्पष्ट केले.

राजा ते ऐकून अत्यंत संतुष्ट झाला. त्याने भगवान बुद्धांना सांगितले–"मी स्वप्नात पाहिले की शेतकरी लोक शेतात बैलांना जूं ला बांधण्याचे सोडून छोटया वासरांन बांधताहेत."

त्या काळात राजा आपल्या चांगल्या विश्वासपात्र मंत्र्याना त्यांच्या पदावरून हाकलून त्यांच्यां जागी अशिक्षित व अयोग्य अशा लोकांना आणून ठेवणार आहे. हाच ह्या स्वप्नाचा अर्थ.

त्यानंतर मी एक विचित्र घोडा पाहिला. त्याच्या दोन्ही बाजूला तोंडे होती. व दोन्हीं तोंडाने तो चारा खात होता. ह्या विचित्र स्वप्नाचा काय अर्थ होवू शकतो.

ह्या स्वप्नाचा अर्थ मोठा मजेदार आहे. येणाऱ्या काळात न्यायाधिश न्याय बरोबर न करता दोन्ही पक्षांकडून पैसा उकळतील व त्यानां योग्य निवाडा न देता शिक्षा करतील.

"एक माणुस दोऱ्या वाटत चालला आहे. दोऱ्या वाटून झाल्यावर उरलेल्या दोऱ्या खाली टाकून देत आहे. त्या माणसाचा डोळा चुकवून एक कोल्हा ती दोरी उचलून पळून जाऊन चावत बसला आहे." ह्याचे काय रहस्य.

"लोक जास्तच दरिद्री होऊ लागणार. पुरुष खूप कष्ट करून पैसा मिळवतील व त्यांच्या बायका तो सर्व खर्च करून टाकतील" त्याने अर्थ सांगितला.

संतोषाने राजाने अजुन काही स्वप्नाच्या विषयी विचारले–"मी राजमहालात जवळच एक मोठा घडा पाण्याने भरलेला पाहीला. त्याच्या भोवती बरेच रिकामे घडे होते. तेथे सर्व जातीपातीचे लोक पाणी घेऊन आले होते व त्या मोठ्या घड्यात



ओतत होते. तो घडा भरून वाहून जात होता परंतु जवळच्या रिकाम्या घड्यामध्ये कोणी पाणी ओतत नव्हता तर असे कां ?

भगवान बुद्धाने ह्याचा अर्थ सांगितला–
"भविष्यकाळात अन्याय व अधर्म वाढत जाईल. लोक राजाच्या भीतीने कमावलेला पैसा राजाच्या खजिन्यात आणून ओतत जातील. व त्याच्या घरात काहीच पैसा अडका शिल्लक रहाणार नाही."

"आणखी एका स्वप्नात मी एका भांड्यात अन्न शिजवलेले पाहिले. परंतु ते एकसारखे शिजवले जात नव्हते. भांड्यांच्या एका बाजूला अन्न गळून जात होते व दुसऱ्या बाजूला बरोबर शिजत













# टिपू सुलतान

म्हैसुर राज्याचा अधिकारी हैदर अल्ली याने ब्रिटीश सरकारच्या सैन्याच्या समोर आपली मान झुकवली नाही. त्यामुळे ईस्ट इंडिया कंपनीच्या बरोबर त्यांचे हाडवैर सुरू झाले व शेवट लढाईत झाला.

जुनाट फोडाच्या दुखण्याने इ. सन् १७८२ मध्ये हैदर अल्लीचा मृत्यु झाला. शेवटच्या घटके पर्यंत तो इंग्रजांच्या बरोबर लढा देत राहिला. हैदर अल्लीच्या मृत्यु नंतर त्याचा मुलगा टिपू सुलतान ह्याने अधिकाराची सूत्रे आपल्या हाती घेतली. व इंग्रजाना तोंड दिले. त्याचे शौर्य व पराक्रम पाहून इंग्रजांची बोबडी वळाली.





शेवट युद्धात इंग्रजाचा पराभव झाला. ब्रिटीश कंपनीचा अधिकारी ब्रिगेडियर मॅथ्युस हा टिपू सुलतानाकडे जायबंदी झाला. इ. स. १७८४ मध्ये इंग्रज टिपू सुलताना बरोबर समेट करण्यास तयार झाले.



टिपू सुलतानाच्यात व इंग्रजांच्
बरेच दिवस सलोखा राहिला. प
गव्हर्नर जनरल कार्नवालीस हा टिपू सुलतानाच्या विरुद्ध नेहमी भांडण करण्यासाठी टपून बसलेला असे. त्याने त्या वेळेस तिन वेळा आपले सैन्य त्यांच्यावर पाठविले. व दोन वेळेस स्वतः चालून गेला.

इंग्रज सैन्याने श्रीरंगपट्टणम सोडून आपला सर्व ठिकाणी कब्जा केला. इ. स. १७९२ मध्ये टिपू सुलतानाने सलोखा करण्याच्या विचाराने आपला अर्धा हिस्सा इंग्रजांना देऊन टाकला. तरीपण इंग्रजांचे समाधान झाले नाही. टिपू सुलतानाने आपले दोन मुलगे त्यांच्याकडे गहाण ठेवले पाहिजे असा जोर केला.





टिपू सुलतानाला त्यांचे ते म्हणणे अजिबात आवडले नाही. त्याने हैद्राबादच्या निजामाकडे आपले दूत पाठविले व त्यांना कळविले की ; त्याने आपली एक मुलगी सून करून घ्यावी व आपले एकमेकांशी संबंध पक्के करावे.

       



[प]रंतु त्यापूर्वीच हैद्राबादच्या निजामाने [इं]ग्रजांशी सहमत केले. त्यानंतर टिपु सुलतानाने इग्रंजाच्या विरुद्ध लढाई करण्याकरीता अरब, टर्की, फ्रान्स व अफगाणिस्थान अशा देशांत आपला दूत पाठवून त्यांच्याकडे मदतीची याचना केली. परंतु त्याला मदत करण्यास कोणीही पुढे आला नाही.





टीपूला समजले की; फ्रान्सचे सैन्य मॉरीशसमध्ये आहे. त्या बातमीने त्यांने आपले गुप्तहेर पाठवून फान्सचा गव्हर्नर मलार्टिकच्या जवळ मदतीची याचना केली. परंतु तेथे फान्सच सैन्य नव्हते. परंतु मलार्टिकला टिपू बद्दल खूप आदर होता. म्हणून त्याने आपल्या सर्व सैन्याला बोलावून भारतात जाऊन टिपूच्या सैन्यात भर्ती होण्यास सांगितले.

ही गोष्ट भारतातल्या नव्या ब्रिटीश गव्हर्नरला समजली. त्यांना वाटले की, टिपू सैन्यांची युद्धांची तयारी करीत आहे. त्यामुळे इ. स. १७९८ मध्ये युद्धाची घोषणा झाली. ब्रिटीशांना निजामांनी व महाराष्ट्रीयानी हात दिला त्यामुळे त्यांचे सैन्य जास्त बलशाली झाले.





शत्रु सैन्याने एकजुटीने तिन्ही दिशां[नी] श्रीरंगपट्टणमला वेढा दिला. एकटे शत्रुचे सैन्यच पस्तीस हजारांहून जास्त होते. त्यामुळे टिपूच्या सैन्याला निर्भर व्हावे लागले.

इंग्रजानी टिपूकडे असा संदेश पाठविला की ; तू आम्हाला शरण येऊन आपले राज्य दे म्हणजे तुला आम्ही योग्य तऱ्हेने वर्षाची बेगमी देऊन तुझे रक्षण करूं परंतु ह्या म्हणण्याला टिपूने डावलून टाकले व शेवटच्या घटके पर्यंत तो लढा देत राहिला.





आपल्या सैन्यातल्या कित्येकांना टिपूने इंग्रजाच्या सैन्याला जाऊन मिळताना पाहिले परंतु हिंमतीने शत्रु सैन्याला लढा दिला. त्याने आपल्या हिंदू धर्माला कधीही पाठ दाखविली नाही. जशा तऱ्हेन महाराणा प्रताप मुसलमानांचा कट्टा विरोधी होता. तसाच टिपू सुलतान इंग्रजांचा होता अशा तऱ्हेने टिपू सुलतान इतिहासात अमर झाला.



# रागाचे औषध

अरूणा लग्नानंतर सासरी आली. तेव्हां सर्वजणांनी तिच्या नवऱ्याच्या बुद्धीमता व योग्यते विषयी सांगितले. तसेच त्याला झटकन राग यतो हेही सांगितले. त्यामुळे अरूणा नवऱ्याला कोणत्याही गोष्टी करीता राग येऊ नये, याची दखल घेत असे.

एक आठवडा आनंदात पार पडला. एक दिवस सदानंद अरूणाला म्हणाला– "सर्वजण का! कोण जाणे मला रागीट स्वभावाचा आहेस असे म्हणतात. मी कारण असल्या शिवाय रागावत नाही."

ह्या बोलण्याने अरूणाला थोडसे हायसे वाटले.

एका आठवड्यानंतर सदानंद अरूणाला म्हणाला–"हे पहा! आपले घर तसे पहाता खूप मोठे आहे. त्यांची देखरेख करणे वगैरे तुला एकटीला त्रासाचे होईल म्हणून मी तुझ्या मदती करता एक मोलकरीण ठेवून टाकतो."

"अहो, मोलकरणीची काय जरूर आहे. मी तर घरात दिवसभर एकटीच असते. घरातले सर्व काम मीच करीत जाईन."

बस ह्या कारणामुळे सदानंदला खूप राग आला तो ओरडून म्हणाला–"तुझे म्हणजे जर असे असेल की घरातले सर्व कामकाज एकच माणूस करू शकेल तर आजपासून ते सर्व मीच करतो" असे म्हणत रागारागाने झाडू मारू लागला. घर साफ करून तो ऑफिसला गेला.

"आता आपले घर कसे दिसते?" काही दिवसांनंतर सदानंदने अरूणाला विचारले. परंतु घाबरून जाऊन अरूणाने काहीच उत्तर दिले नाही. सदानंदला तिच्या त्या वागण्याचा भयंकर राग आला. त्याने संतापाने विचारले–"चांगले नसायला काय झाले?"

ह्या घराच्या करीता मी भाडे देतो आहे नां? त्यामुळे अधिक कष्ट करून



पैसा पण मिळविलाच पाहिजे." असे रागाने म्हणत तो पाठीमागे गेला. झाडांना आळी करून तो त्यांना पाणी घालू लागला.

नवऱ्याचे तसे रागवणे अरूणाला विचित्रच वाटू लागले. तो केव्हांही रागावला की; त्याचा त्रास स्वतःहाच करून घेत असे. त्यामुळे दुसऱ्याचे नुकसान कधी करीत नसे.

सदानंदच्या असल्या वागण्याने अरुणा दिवसेंदिवस दुःखी होऊ लागली एके दिवशी तिने आपल्या शेजारणीला ही सर्व गोष्ट सांगितली. सर्व गोष्ट ऐकून शेजारीण तिला म्हणाली–"अरेरे! माझा नवरा जर असा असता तर मला किती आनंद झाला असता."

थोडे दिवस आणखीन निघून गेले. एक दिवस सदानंद आपल्या बरोबर एक साधुला घेऊन घरी आला. बऱ्याच जणांचा साधुला बऱ्याच सिद्धी प्राप्त आहेत ह्यावर विश्वास होता. सदानंद साधुला म्हणाला– "साधु महाराज, माझी बायको सगळ्या बाबतीत खूप चांगली आहे. थोडक्या करता उगाचच माझ्यावर राग उखडून काढते. तो स्वभाव तुम्ही बदला."

साधुने अरूणाला बोलावून विचारले– "मुली, तू आपल्या नवऱ्यावर खूप प्रेम करतेस नां?"

अरूणाने मुक्यानेच मान डोलावली.

"बर, तुला आपल्या नवऱ्याच्या स्वभावात काही बदल व्हावा असे वाटते कां? साधुने परत विचारले.

पुन्हां अरूणाने होकारार्थी मान डोलावली.

"तर सांग, कशा तऱ्हेचा बदल व्हावा? साधुने जाणून घेण्याकरीता विचारले अरूणाने घाबरत नवऱ्याकडे पाहीले.

"तू घाबरू नकोस, आपल्या मनांपासून सांग." साधुने सांगितले.

"ते खूप रागीट आहेत कोणत्याही छोट्या गोष्टींकरीता सारखे रागवत असतात.. त्यांच्या तशा स्वभावात आपण कृपा करून बदल करावा" अरूणा म्हणाली.

"तुझ्या नवऱ्याचा राग एका अटीवर कमी होऊ शकेल. तू एक महिना एकदाच भोजन करावयाचे" साधु म्हणाला.

अरुणाने लगेच साधुचे म्हणणे मान्य केले. साधुने तिला आत पाठवून दिले व नंतर साधु सदानंदला म्हणाला–"तुझी बायको तुझ्यावर मनापासून प्रेम करते. ह्याचा अर्थ असा की; तुझ्या रागावण्याने ती दुःखी आहे."



"स्वामी! हा सगळा देखावा आहे." असे सांगून सदानंदने आपल्याला राग आला की; आपण काय काय करतो. ते सांगितले साधुनीं त्याचे म्हणणे शांतपणे ऐकून घेतले व मंदहास्य करीत म्हणाला– "तुझ्या रागांनी तुझेच जास्त नुकसान होते. परंतु त्याचा उपयोग बायकोला होत नाही. तेव्हां तुलाच समजायला पाहिजे की; ती किती चांगल्या स्वभावाची आहे. अशी बायको मिळणे मोठे भाग्याचे आहे."

सदानंदला साधुच्या बोलण्यात काहीतरी तथ्य आहे असे वाटले. परंतु बायकोच्यामुळे आपल्याला साधुचा उपदेश ऐकून घ्यावा लागला. ह्या कारणांकरीता त्याला बायकोचा खूप राग आला.

साधु घरातून बाहेर पडल्यावर त्याने आपल्या बायकोवर राग काढला व रागाच्या आवेशात त्याने विहिरीतून पाणी खेचून घर स्वच्छ धुवून काढले. अरुणाला काय करावे समजेना. ती घरातून बाहेर पडली आणि संध्याकाळ उलटल्यावर घरी परत आली. सदानंदने नाराजीने विचारले–"तू कोठे गेली होतीस?"

"शेजारच्या घरी काम करायला गेले होते" अरुणा म्हणाली.

"तुझ्या नवऱ्याला काय दुर्दशा आली कां? की तुला शेजार घरची कामे करायला लागावीत." सदानंद दटावून म्हणाला.

"दुर्दशा नाही, पण राग आला होता. तुम्ही उगाच माझ्यावर चिडत होता. त्यामुळे मला सुद्धा खूप राग आला. माझ्या मनांत सुद्धा घर काम करण्याची इच्छा आहे. पण तुम्ही मला काम करू देत नाहीत. त्यामुळे मी शेजारच्या घरी जाऊन काम करून आले." अरुणाने सांगितले.

शेजाऱ्यांच्या घरी काम करून माझी बेअब्रू नाही कां होणार?

आपली अब्रू जाणार नाही. नक्की कारण एका साधुने मला माझे पती अस्वस्थ असल्याने मी जर दुसऱ्याच्या घरी काम केले तर त्यानां स्वास्थ्य लाभेल असे सांगितले-अरुणा म्हणाली.

"काहीही असो, परंतु तू दुसऱ्याच्या घरी काम केलेले मला आवडणार नाही." सदानंद जोर देत म्हणाला.

"जो पर्यंत तुम्ही घरची कामे करीत राहाल तोपर्यंत मी दुसऱ्याची कामे करणार." अरुणाने स्पष्ट सांगितले.

"मी माझ्याच घरातील कामे करतो त्यात तुझे काय नुकसान होते?" सदानंदने विचारले.

"तर मी शेजार घरची कामे केली तर तुमचे काय नुकसान होते?" अरुणाने विचारले.

बायको बरोबर वादविवाद घातल्यामुळे सदानंदच्या लक्षात आले. की बायकोवरच्या अतीशय प्रेमामुळे व तिला जास्त मेहनत कष्ट पडू नयेत म्हणून आपण काळजी घेतो. तसेच बायको आपल्यावरच्या प्रेमामुळे आपण करीत असलेले कष्ट सहन करू शकत नाही.

"अरुणा मला क्षमा कर. मी परत तुझ्यावर रागावणार नाही." सदानंद म्हणाला नंतर त्याने तिला उपास करण्याचे सोडून देण्यास सांगितले. परंतु तिने साधुने सांगितल्यामुळेच माझ्या फळाला यश आले असे समजून एक महिना उपास करण्याचे ठरविले व एक महिना उपास केला. तिच्या बरोबर सदानंदने एक महिना उपास केला. त्यांनी एकमेकांवर विनाकारण रागावण्याचे सोडून दिले व एक दुसऱ्याला मदत करीत आपले आयुष्य आनंदात घालवू लागले.










# नाटकांच्या मोहाचे फळ



आनंद लहानपणापासूनच शिक्षणाकडे दुर्लक्ष करून नाटकांच्या फंदात पडून गावात भटकत असे. शेवटी कंटाळून त्याने गाव सोडले व तो शहरात पळून आला. तेथे एका नाटकांच्या कंपनीत प्रवेश करून साधेसेच काम मिळविले. त्यांचे नाटक आठवड्याने प्रदर्शित होणार होते.

त्या नाटकात आनंदाचे काम म्हणजे–एक मुलगा आईशी भांडण करून घर सोडून निघून जातो. तेव्हां मामा त्याच्या शोधार्थ बाहेर पडून त्याला शोधून काढतो. व म्हणतो–"हे पहा मुला, तुझ्या आईने तुझ्या आठवणीने अंथरूण धरले आहे. दिवस रात्र तुझ्याच नावाचा जप करते आहे. घरी चल." पण मुलगा आपल्या आईकडे जाण्यास साफ नकार देतो. शेवटी आजारातच त्याची आई त्याला भेटायला त्याच्याकडे येते. आईचे प्रेम व माया बघून तो आपल्या घरी परत जायला तयार होतो. नाटकात आनंदच्या मामाचे काम स्वतःहा नाटकाचा मालक सिताराम करणार होता. आनंदला अजूनही नाटकांची वाक्ये तेवढी पाठ झालेली नव्हती. त्यामुळे रोज संध्याकाळी त्याची व सितारामची तालीम चालू असे.

एके दिवशी सिताराम संध्याकाळी खूप उशिरा पोहोचला व म्हणाला–"आनंद, मला खूप जरूरीचे काम आले आहे. मला उद्या पासून येण्यास जमणार नाही. दोघांचेही संभाषण म्हणून तालीम कर."

"ठीक आहे." असे आनंद म्हणाला. व ते आत गेले. त्या घराला पाठीमागे लागूनच जमिनदाराच्या घराची उंच बांधलेली भित होती. ती काही ठिकाणी उखडलेली व त्याला मोठमोठ्या भेगा पडलेल्या होत्या. आनंदने नाटकाचे संभाषण मोठ्याने म्हणावयास सुरवात केली सिताराम–"घरातून तू निघून जाण्यामुळे तुझ्या आईची तब्बेत अगदीच बिघडली चल मी तुला घरी नेऊन पोहोचवतो."

"मामा, त्या घरात पुन्हां म्हणून पाय ठेवणार नाही." असे म्हणत आनंदने रागाचा अभिनय केला.

हे तू काय म्हणतो आहेस मुला ? तू न दिसण्यामुळे तुझी आई किती वाळली आहे याची काही तुला कल्पना आहे कां ? आणि तू येणार नसलास तर तुझ्या आईचा तर अंतच समज-सितारामने म्हटले.

अशा तऱ्हेने दोघांनी थोडावेळ आपापले संवाद म्हटले नंतर सिताराम आपल्या कामाला निघून गेला. आनंदने मागील दारी जाऊन विहिरीवर हात तोंड धुतले व आत येऊ लागला.

तेवढ्यात भितीच्या पलीकडून त्याला टाळ्या वाजविण्याचा आवाज ऐकू आला. त्याला आश्चर्य वाटले. त्याने वळून त्या भितीच्या फटीतून पलीकडे पाहिले.

ह्यावेळेस त्याला कोणाचे तरी शब्द ऐकू आले–"तू ह्या अंधारात मी कोणी भूत किंवा पिशाच्च्य आहे असे समजला असशिल. परंतु मी तसा कोणी नाही. माझ्या अगदी जवळ ये."

तो आवाज ऐकून आनंद धिटाईने पुढे सरकला व त्या आवाजाच्या दिशेने भितीच्या फटीपाशी आला. त्याच्या पलीकडे त्याला एक सफेत दाढी असलेला म्हातारा माणूस दिसला.

त्या म्हाताऱ्याने जरा दटावूनच विचारले–"हे बघ, तुझी आई मरणाला टेपली आहे; तुझा मामा तुला घरी न्यायला एवढ्या विनवण्या करीत आहे. तरी तू घरी न जाण्याकरीता एवढा हट्ट का करतो आहेस ?"

आनंदला समजले की, म्हातारा नाटकातील संवादाना खरे समजून बसला आहे.

त्याने चिडून म्हटले–"कोणीही येऊन माझी मन धरणी करू दे. मी माझ्या घरी परत जाणार नाही.



म्हातारा दोन-तीन क्षण गप्प राहीला व म्हणाला–"मुला, रागावू नकोस. हे घर माझेच आहे. मी पण तुझ्याच सारखा लहानपणी रागाच्या भरात घर सोडून निघून गेलो होतो. माझी आई माझ्याच नावाचा जप करीत हा लोक सोडून गेली. मी काही दिवसानंतर घरी गेलो परंतु त्याचा काय उपयोग."

नंतर आनंदला समजले की, तो वृद्ध माणूस दुसरा तिसरा कोणी नसून एक धनवान जमिनदार आहे. तेव्हां त्याच्या मनात एक युक्ति आली आनंदने अत्यंत चिंताग्रस्त चेहरा करून जमिनदाराला सांगितले–"मी एका गरीब कुटुंबातला मुलगा आहे. त्यामुळे काही पैसा कमवावा ह्या आशेने मी घर सोडून ह्या शहरात आलो. माझे घर इथून खूप लांब आहे, आणि घरी जायचे म्हटले म्हणजे पैशांची खूप जरूर पडेल. ते मी आता कोठून आणू ?"

हे उत्तर ऐकून जमिनदार मोठ-मोठयाने हंसू लागला आणि म्हणाला–"तुला घरी जाण्याकरीता थोडे पैसे देतो थोडा थांब. मी तर एकटाच आहे आणी माझ्याकडे खूप धन-संपत्ती आहे. असे म्हणत तो आत मध्ये निघून गेला.

अर्धा तास झाला. आनंद त्या अंधारात भिंतीजवळ उभा होता. त्याच्या मनात एक शंका आली. तो वृद्ध गृहस्थ खरंच जमिनदार आहे का कोणी भूत-पिशाच्च ? तो भीतीने जमिनदाराच्या वाटेकडे डोळे लावून उभा राहिला. तेवढयात जमिनदार त्या मोडक्या भिंती जवळ आला.

त्याने त्या भिंतीच्या भगदाडातून एक पुरचुंडी त्याच्या हातात दिली आणि म्हणाला–"तू ही पुरचुंडी घे, आणि पहाट होताच आपल्या घरी निघून जा."

आनंद ती पुरचुंडी घेऊन घराच्या आत आला त्याने दिव्याच्या प्रकाशात ती उघडली. त्यातील दहा सोन्यांच्या नाण्यांने त्याचे डोळे दिपून गेले. त्याने परत ते सर्व बांधले व आपल्या पेटीत तळाला ठेवून दिले.

दुसऱ्या दिवशी शेजारपाजाऱ्यांकडून त्याने माहित करून घेतले की जमीनदार खूप उदार स्वभावाचा आहे. संकटात पडले-ल्याच्या मदतीला तो नेहमी धावून जातो.

आनंदच्या मनात पैशांची लालसा निर्माण झाली. त्याच्या मनांत जमिनदारां-कडून आणखी पैसा लुबाडायची दुर्बुद्धि झाली. त्या दिवशी संध्याकाळी अंधार पडू लागला. तेव्हां सिताराम परत आला. दोघे पाठांतराकरीता पाठीमागच्या खोलीत गेले.

सिताराम आपले संवाद म्हणू लागला–"तुझी आई तुझ्या वाटेकडे डोळे लावून शेवटच्या घटका मोजत आहे. अजूनही उशिर करू नकोस. लगेच घरी चल.

"मामा, मी एकदा सांगितले आहे नां. की, मी एकदा ठरवले की माझे बोलणे बदलणार नाही. तुम्ही येथून जा पाहू." आनंदने दृढनिश्चयाने म्हटले.

"मी तुझ्या आईला जाऊन सांगतो की, तुझी तब्बेत ठिक नाही. दोन, तीन दिवसात तुला घेऊन येतो. तोपर्यंत तू तुझा विचार बदलून ठेव व माझ्याबरोबर घरी चल– सिताराम असे म्हणून घरी परत गेला.

आनंदने जाणले की, हे संभाषण जमिन-दाराने ऐकले असावे असे समजून त्याने भिंतीच्या भगदाडातून पलीकडे पाहिले. तेथे जमिनदार उभाच होता. त्याने दरडा-वून विचारले–"मी तुला पैसा दिला. तू घरी जायची गोष्ट सांगितलीस, मग गेला कां नाहीस ?

आनंद खजिल झाला व म्हणाला–"काल मी आपल्याला सांगायला विसरून गेलो. की, मी इथे कित्येक लोकांच्याकडून कर्ज काढले आहे. ते परत केल्याशिवाय इथून जाणे बरोबर दिसणार नाही."

"हो, हो, तुझे म्हणणे बरोबर आहे. तू मला कालच तुझ्यावर कर्ज आहे ही गोष्ट कां सांगितली नाहीस? थोड थांब." असे म्हणत तो वृद्ध जमिनदार आत गेला. आणि आणखी एक पैशांची थैली घेऊन बाहेर आला.

आनंदने मोठ्या उत्कंठेने भितीच्या फटीतून पाहिले आणि हात पुढे केला. जमिनदाराने त्याच्या हातात पैशांची थैली ठेवली व म्हणाला–"आता तू उशिर करू नकोस. सकाळी उठल्या बरोबर आपल्या गांवी निघून जा. तुझ्या आईकडे तू केलेल्या चुकीची माफी मांग."



आनंदने पैशांची थैली घेतली व घरात येऊन परत दिव्याच्या प्रकाशात उघडून पाहिली. ह्याखेपेस सोन्याची् वीस नाणी होती. त्याने ती सुद्धा आपल्या पेटीत तळाशी ठेवून दिली.

अशा तऱ्हेने त्याला जमिनदारांकडून तीस सोन्याची नाणी मिळाली. अजून मिळविण्याच्या आशेने तो दिवसभर काही नां काही तरी युक्त्या शोधू लागला.

त्या दिवशी संध्याकाळी सिताराम त्याच्या घरी पोंहचला व म्हणाला–आनंद, नाटकाचा शेवटचा भाग थोडा बदललेला आहे. आईच्या मरणांनी मुलाच्या मनात तिच्या विषयी प्रेम व त्याला पश्चाताप होत आहे. त्याचा संवाद असा. "अरेरे! सर्व संपले मुलाने आईचे ऋण फेडले. मी तुझ्या आईला सांगितले तुझी तब्बेत ठिक नाही. तेंव्हां तशाच अवस्थेत तुझ्या आईने भाड्याची गाडी ठरवली व ती तुला पहाण्याकरीता निघाली. पण काय उपयोग गाडी गावाच्या बाहेर आली नाही तोच तिची प्राणज्योती मालवली."

आनंदने अनिच्छेने आपली मान डोलावली. तेवढ्यात शेजारून भितीच्या भगदाडातून मोठ्याने वृद्ध जमिनदाराचा आवाज आला–"अरे, दुष्टा पहिल्यापासूनच माझ्या मनात ही शंका आली की असेच होईल. थांब मी येतोच तिथे.

ते ऐकून सितारास घाबरून म्हणाला–"ह्या अंधारात हे कोण ओरडते आहे? कोणी भूत पिशाच्च तर नाही."

आनंदच्या तोंडून आवाज फुटला नाही. तो उभा थरथर कांपू लागला. व आत पळून आला. तेथे त्याला तो वृद्ध जमिनदार व हातांत काठी घेतलेला त्याचा नोकर दिसला.

जमिनदाराने आनंदकडे रागाने पहात विचारले–"मी तुला घरी परत जाण्याकरीता सोन्याची तीस नाणी दिली. तरी पण तू घरी गेला नाहीस. परंतु आपल्या आईच्या मरणाला कारण झालास. तुझ्या सारख्या दुष्टाची सावली पडणें सुद्धा पाप आहे." असे म्हणत त्याने आपल्या नोकराकडे नजर वळविली.

जमिनदाराच्या नोकरांनी साऱ्या घराची पहाणी केली. व आनंदच्या पेटीच्या तळाशी ठेवलेली तीस सोन्याच्या नाण्याची थैली बाहेर काढली. आणि आपल्या मालकाच्या पाठोपाठ बाहेर निघून गेला.

सितारामला खरी गोष्ट माहित झाली. त्याने दांत-ओठ खात रागाने पहात म्हटले–"ह्याचा अर्थ असा की; नाटकांच्या संवादाना खरे समजून जमिनदारानी तुला नाणी दिली. परंतु तू चुकून सुद्धा मला ती गोष्ट सांगितली नाहीस. तुझ्या स्वार्थीपणाचे फळ तुला चांगलेच मिळाले. असल्या लोभी माणसाला आमच्या नाटक कंपनीत काहीही काम मिळणार नाही. तू आताच्या आता येथून चालता हो." अशा तऱ्हेने रागावून सिताराम तेथून निघून गेला.

आता आनंदला खूप पश्चाताप होऊ लागला. त्याने आपल्या आई बरोबरच नाहीतर एका वृद्ध जमिनदारा बरोबर खोटे बोलण्याचे पाप केले होते. आपल्याच गावांत काही धंदा करण्याकरीता त्याच्या आईने आपल्या हातातील बांगडी विकून त्याला पैसे दिले होते. परंतु नाटकांच्या फंदात पडून त्याने सर्व पैसा व वेळ फुकट घालविला होता.

अजून सुद्धा आपण घरी परत गेलो तरी आपल्या आईला आनंदच होईल. असा विचार करून तो मनापासून निश्चय करून गावातच काहीतरी उद्योगधंदा करून आईच्या सेवत रहाण्याचा निश्चय करून दुसऱ्या दिवशी पहाटेच आपल्या गावी निघाला.















# चिक्कूपणाचे दान

गिरीनगरात प्रतापशेठ नावाचा एक जमिनदार रहात होता. तो आजू-बाजूच्या गावातून सुद्धा एक अव्वल दर्जाचा कंजूष व स्वार्थी म्हणून प्रसिद्ध होता. जसा म्हातारपणाकडे झुकू लागला तशी त्याच्या मनांत पापाची कल्पना येऊ लागली व तो देवभक्तित थोडा वेळ घालवू लागला.

त्याच सुमारास गिरीनगरात एक साधू आला. त्याच्या दर्शनाकरीता प्रतापशेठ गेला. व त्यांचे दर्शन घेऊन म्हणाला– "स्वामी मला माझ्या मृत्युनंतर जर स्वर्गात जावे असे वाटले तर त्या करीता काय केले पाहिजे ? आपण कृपया सांगावे."

साधूने त्याला भरपूर दान करावे म्हणून सांगितले. प्रतापशेठने साधूला वचन दिले व तो आपल्या घरी परत आला.

प्रतापशेठचे साधू बरोबरचे बोलणे एका गरीब ब्राह्मणाने ऐकले. तो दुसऱ्याच दिवशी जमिनदाराच्या घरी जाऊन पोहचला. त्यावेळेस प्रतापशेठ आराम करीत होते. गरीब ब्राह्मणाने त्यांना पाहिले तेव्हां ते एका रेशमी झब्यात, गळयात सोन्याची माळ व पांची बोटातून हिऱ्यांच्या अंगठ्या अशा वेषात बसलेले दिसले. गरीब ब्राह्मणाने विचार केला की; काहीही मागितले तरी दानाच्या रूपाने कुठलीही किंमती वस्तुच नक्की मिळेल.

जमिनदाराने मनातून त्याच्या येण्याचे कारण जाणले व त्या गरीब ब्राह्मणाला दुसऱ्या दिवशी येण्याबद्दल सुचविले.

दुसऱ्या दिवशी गरीब ब्राह्मण जमिन-दाराच्या घरी गेला. त्याने पाहिले तो त्याच्या अंगाखांद्यावर काहीही नव्हते अंगांत साधासाच कपडा होता.

जमिनदार हंसून म्हणाला, मला लहान थोर ही भावनाच बरोबर वाटत नाही. एक श्रीमंत एक गरीब हा भेदभाव सहन होत नाही. म्हणून मी एका साधारण नागरीकाचे जिवन जगण्याचा निश्चय केला आहे. आता तू आणि मी दोघेही समान आहोत. त्यामुळे मी तुला काही दान देण्याचा प्रश्नच उरत नाही.

गरीब ब्राह्मण नम्रपणे म्हणाला–"तुम्ही कशी कां ? आपली वेषभुषा बदलली तरी आपली संपत्ती कधीही दुसऱ्याची होऊ शकणार नाही. त्यावर आपलाच हक्क व अधिकार राहू शकतो. त्यामुळे तुम्ही कसेही माझ्यापेक्षां मोठेच आहात. आपण माझ्या वर कृपा करून मला कोणतेही दान करा."

जमिनदार दोन मिनिटे विचार करीत राहीला व गरीब ब्राह्मणाला परत दुसऱ्या दिवशी येण्याबद्दल सांगितले.

दुसऱ्या दिवशी गरीब ब्राह्मणाने जमिनदाराला पाहिले व तो त्याचा भगवा वेष पाहून थक्कच झाला.

जमिनदाराने ब्राह्मणाला पाहिले व म्हणाला–"मी संन्यास घेतला आहे. त्यामुळे ह्या संसारातील धन-संपत्तीचा व माझा काहीच संबंध राहिला नाही.

तर तुम्ही आपल्या साऱ्या धन-संपत्तीचे काय केलेत ?

"जेव्हां मी सगळयाचा त्याग केला तेव्हांपासून ती संपत्ती सर्व माझ्या मुलांची झाली." जमिनदार म्हणाला.

"ठीक आहे, मी आपल्या मुलांकडे जाऊन दान मागतो" असे म्हणत ब्राह्मण आत जाऊ लागला.

जमिनदार त्याला थांबवत म्हणाला– "माझ्या मुलांनी माझ्या समोर अशी प्रतिज्ञा केली आहे की; वडिलांच्या संपत्तीचा एकही भाग कोणालाही दान करणार नाही. ते आपल्या वडिलांचे आज्ञाधारी मुलगे आहेत.

ह्यावर गरीब ब्राह्मण एक दिर्घश्वास घेत आपल्या घरी परतला. जमिनदाराला कोणीही याचक केव्हांही परत भिक्षा मागण्यास येणार नाही या कारणांमुळेच शांत झोप येऊ लागली.






श्रीकृष्णाच्या थोरवीं बरोबर त्याच्या शत्रुंची संख्या पण वाढू लागली. शिशुपाल व जरासंघ यांना बरेच दुष्ट राजे लोक येऊन मिळाले. पौंड्रक नावाचा करूश राज्याचा राजा लाकडाचे हात लावून त्यात शंख चक्र धारण करून व एका हातात गदा घेऊन मीच विष्णु आहे. कृष्ण अवतार नाही. म्हणून सगळीकडे सांगत हिंडू लागला. शिशुपालाचा छोटा भाऊ शालव हा कृष्णाला आपल्या बरोबर युद्ध करण्याकरीता बोलावू लागला. पूर्व दिशेला नरकासूराने अतिशय अत्याचार व गोंधळ माजवून दिला. दक्षिणेकडे बली चक्रवर्तीचा मुलगा बाणासुर याने शंकराच्या रक्षणाकरीता शोणपुर ही आपली राजधानी करून राज्याचा विस्तार राक्षसलोकांच्या संख्येने जास्त वाढविला.

कालयवन याचा लहान भाऊ कालान्तक ह्याची पत्रिका ज्योतिषाने पाहून त्याचे भविष्य वर्तवले होते की; कोणत्याही प्राणी-मात्रांपासून ह्याला मरण नाही. त्याचा फायदा घेऊन. यवन आणि म्लेच्छ सैन्यांच्या मदतीने त्याने जिकडे तिकडे हत्याकांडे करण्याचे सुरू केले. तो देवांची देवळे व मूर्ती उध्वस्त करू लागला.

अनेक देशांवर लढाया करून तो गांधार देशात पोहोचला. तेथे असलेल्या संगमरमर दगडातील मोहीनीची जिवंत भासणारी मूर्ती पाहून तो मंत्रमुग्ध झाला. कृष्णाने विश्वकर्म्याकडून तशी मूर्ती बनवून त्यात

१७. कृष्णाचा विजय





मायावीरूप धारण करून प्रवेश केला होता. ही गोष्ट कालान्तकाला माहीत नव्हती.

त्या दगडीमूर्तीला कालान्तकाने आपल्या अंत:पुरात नेले व विचार केला की ह्या मूर्तीत जीव आणला तर काय छान होईल.

एकदा रात्री सुंदर संगीताचे ध्वनी व बरोबर पायातील पैंजणाच्या आवाजाने कालान्तकाला जाग आली. तो पहातो तर ते शिल्प एका सुंदर स्त्रीचे रूप घेऊन गाते नाचते आहे. तो प्रेमाने जवळ गेला. तिने त्याला बाहुपाशात घेतले. दुसऱ्याक्षणी ती मूर्ती पुन्हा दगडाची झाली. तिच्या मिठीत तो जळू लागला व धप्पदिशी खाली पडला. त्या मूर्तीचे हात पण तुटून गेले. त्याच बरोबर कालान्तक मरण पावला. परंतु यवन राज्यात हात तुटकी मोहीनीची मूर्ती मात्र अजून राहिली आहे.

त्यानंतर श्रीकृष्णाने कालान्तकाच्या सैन्याला सुद्धा पळवून लावले. परंतु सर्व यवन राज्य ज्वालामुखी होऊन भस्मीभूत झाले. ह्याच प्रकारे पश्चिम दिशेचे म्लेच्छ व यवनांचे प्राबल्य नष्ट झाले. पूर्वीकडे प्रागज्योतिषपुर राज्याचा राजा नरका-सुरांच्या अत्याचाराने लोक हवालदिल झाले.

वराह अवतार धारण करून विष्णूने जेव्हां पृथ्वीचा उद्धार केला. तेव्हां भूदेवीच्या पोटी जन्म घेतलेल्या नरकासुराने प्रागज्योतिषपूर ही आपली राजधानी करून तेथे राज्य करू लागला. त्याने असुरांना एकत्रित करून देवांच्यावर चढाई केली व देवांवर जय मिळविला. तेथून देवमाता अदिती हिची कर्णकुंडले तोडून आणली. ऋषिमुनी, साधु-संत व सज्जन लोकांना ते त्रास देऊ लागले. त्याने पृथ्वीवरच नरक बनवला व सोळा हजार कुमारी-कांना आपल्या बंदीवासात ठेवले होते.

नरकासुरांच्या अत्याचारांना कंटाळून देवांनी व ऋषिनीं कृष्णाकडे प्रार्थना केली. की, त्यांने येऊन नरकासुराचा वध करावा. कृष्णाने अभयदान दिले. तो सत्यभामेसह नरकासुराशी लढण्यास निघाला.

नरकासुराला एक वर मिळाला होता भू-देवीकडून त्याला जर मार लागला तर त्याचा अंत होईल. म्हणूनच सत्यभामा भू-देवीच्या अंशापासून जन्मली होती.

श्रीकृष्णाने गरुडवाहनावर सत्यभामेसह बसून प्रागज्योतिषपूरवर चाल केली आणि बऱ्याच असुरांची हत्या केली.

शेवटी एका मदमस्त हत्तीवर बसून नरकासूर कृष्णावर चालून आला. तेव्हां कृष्ण विश्रांती घेत होते. म्हणून सत्यभामेने नरकासुराबरोबर युद्ध केले.

सत्यभामेने आपल्या धनुष्याची प्रत्यंचा कानापर्यंत ओढली व नरकासुराचे लक्ष्य करून बाण सोडला. तो जाऊन नरकासुराच्या वक्षस्थळाला लागला. तो जमिनीवर धाडदिशी कोसळला, परत पुन्हा सर्व बळ एकवटून हातात गदा घेऊन कृष्णावर चालून आला. श्रीकृष्णाने आपल्या चक्रायुधाने नरकासूराचे डोके उडवले.

डोके उडता क्षणीच नरकाने विष्णुच्या रूपात असलेल्या कृष्णाची स्तुती केली व असा वर मागितला की, त्याची स्मृती रहाण्याच्या दृष्टीने एक दिवस आनंदाने उत्सव केला जावा.

नरकासुराच्या वधाच्या दिवशी नरकचर्तुदशी व दुसऱ्या दिवशी आनंदोत्सव म्हणून दिवाळी करण्यात येऊ लागली.



त्यानंतर कृष्णाने नरकाचा मुलगा भगदत्त ह्याचा राज्याभिषेक करविला. अदितीची कुंडले घेऊन तो सत्यभामेसह द्वारकेला आला.

एक दिवस कृष्ण रुक्मिणीच्या महालात बसले होते. त्या वेळेस नारदाने येऊन एक पारिजातकाचे फुल कृष्णाला दिले. कृष्णाने ते फुल रुक्मिणीच्या हातात दिले. ते समजताच सत्यभामा रूसली. तेव्हां कृष्णाने तिची समजून काढत म्हटले–"तू रागावू नकोस, पारिजातकाचे फुलच नाही वृक्षच तुझ्या महालात आणून लावतो."

कृष्ण सत्यभामेसह गरुडवहानावर बसून देव लोकात पोहचला. तेथे अदितीची कुण्डले देऊन वनात विहार करीत असतांना कृष्णाला पारिजातकाचा वृक्ष दिसला. त्याने तो मुळापासून उपटून काढला.

सत्यभामा व कृष्ण तो पारिजात पळवून घेऊन जात असतांना इंद्राने त्यांना पाहिले. व तो त्याच्याशी लढायला आला. इंद्राने कृष्णाच्या अंगावर वज्रायुध फेकले. ते गरुडाच्या पंखाला जाऊन लागले. त्याने आपला पंख झटकून टाकून दिला.

ह्या प्रकारे इंद्राचा गर्व भंग झाला. त्याने सांगितले–"कृष्ण जोपर्यंत पृथ्वीवर राहील. तोपर्यंत हा पारिजातकाचा वृक्ष सुद्धा पृथ्वीवरच राहिल."

सत्यभामेच्या अंत:पुरातला उद्यान फुलाने नेहमी डंवरून येऊ लागला.

कृष्णाने पुत्र प्राप्तीच्या इच्छेने कैलासावर जाऊन शंकराची तपस्या केली व शंकराकडून अनुग्रह प्राप्त केला. त्याच वेळेस शालव व पौंड्रक राक्षसांनी द्वारकेच्या लोकांना खूप त्रास दिला. कृष्णाने परत येऊन दोघांना ठार मारले.

दन्तवक्र, मेलेल्या माणसांचे अंतिम संस्कार करत होता. त्याच वेळेस कृष्ण त्याला सामोरा गेला. कृष्णाने त्याच्यावर प्रति हल्ला केला व बिजय नावाचा जो अंश त्याच्याजवळ होता. तो आपल्यात सामावून टाकला.

कृष्णाचा मुलगा प्रद्युम्न. प्रद्युम्नचा मुलगा अनिरुद्ध ह्याला बाणासुराची मुलगी उषा हिने स्वप्नात पाहिले व ती त्याच्यावर मोहित झाली. तिची सखी चित्रलेखा हिने त्याला मायावी रूपाने उषेच्या महालात आणले. तेव्हां उषाने अनिरुद्धला आपला पती मानले.

बाणासुराने अनिरुद्धला नागपाशाने बंदी करून कैदेत ठेवले. आपल्या नातवाला सोडण्या करीता कृष्ण बाणासुराबरोबर लढायला आला. बाणासुराला वाचवण्या करीता आलेले शंकर भगवान कृष्णाच्या हाती पराजित झाले.

कृष्णाने बाणासुराच्या हजार हातांपैकी दोन हात शिल्लक ठेवून बाकी हात कापून

काढले. त्यामुळे हार मानून बाणासुर कृष्णाला शरण आला व कृष्णाचा नातु अनिरुद्ध ह्याच्याबरोबर आपली मुलगी उषा हिचा विवाह थाटाने करून दिला. त्यामुळे दक्षिणेकडील राक्षस व उत्तरेकडील राजा लोकांचे संबंध जोडले जाऊन त्याच्यांत मैत्रीचे संबंध वाढले.

त्यानंतर कृष्ण पांडवाचा सारथी म्हणून राहिला. बलरामाच्या इच्छेला डावलून त्याने सुभद्रेचा विवाह अर्जुनाबरोबर लावून दिला.

खाण्डववन जळण्याच्या वेळेस कृष्ण आणि अर्जुनानी तेथे रहाणाऱ्या महाशिल्पी व मय राक्षसाची रक्षा केली होती. त्यामुळे त्यांनी पांडवाना वचन दिले होते. की त्यांना एक अद्भुत असा महाल बनवून देऊ. अग्निदेवाने कृष्णाला व अर्जुनाला प्रसन्न होऊन कृष्णाला सुदर्शन चक्र व पांचजन्य शंख व अर्जुनाला गांडीव धनुष्य व देवदत्त शंख म्हणजे अक्षय तुणीर ही आयुधे दिली.

युधिष्ठिराने जेव्हां राजसुय यज्ञ आरंभला तेव्हां जरासंघाचा वध जवळ आला होता.

श्रीकृष्ण भीम आणि अर्जुन भगव्या वेषांत भिक्षा मागण्या करीता एकदा जरासंघाच्या महालात गेले.

जरासंध बकासुर, दुर्योधन किचक हे, भीमसेन ह्यांच्या तोडीने शक्तिशाली होते. त्यामुळे कृष्णाने जाणले की एका-कडून बाकी चारीजणांचा वध करणे चांगले. ह्या पूर्वी भीमाने बकासुराचा वध केला होता. म्हणून त्यालाच जरा-संघाचा वध करावयास सांगणे चांगले. जरासंघाचे मरण हे शस्त्राने होणार नव्हते. तर त्याला मधोमध चिरून त्याला मारणे भाग होते.

श्रीकृष्णाने जरासंधाला सांगितले की; जेवण्याच्या नंतर आमच्यापैकी तु एकाशी तरी कुस्ती करावयास पाहिजे. ह्या अपेक्षेने आम्ही आलो आहोत.

जरासंघ म्हणाला—"हे कृष्णा, तू मला घाबरून प्रवर्षण गीरला पळून गेलास.



अर्जुन हा तर दुर्बल आहे. रहाता राहिला तो भीमसेन त्याच्याशी मी कुस्ती खेळायला तयार आहे."

ह्यावर जरासंघ व भीमसेन ह्याच्यामध्ये भयंकर कुस्ती सुरू झाली. भीमसेनने त्याला खूप लोळवले. वेळ येताच कृष्णाच्या सांगण्याप्रमाणे जरासंघाला मधोमध पकडून दोन भाग केले व पुन्हां जोडले जाऊ नये म्हणून दोन्ही बाजूला उलटे करून टाकून दिले. अशा तऱ्हेने कृष्णाने भीमाच्या करवी जरासंघाचा वध घडवून आणला.

भीष्माच्या विनंतीवरून युधिष्ठिराने राजसुय यज्ञाचे अग्रस्थान कृष्णाला अर्पण केले.

त्या भरसभेत मध्यभागी उभे राहून शिशुपालने श्रीकृष्णाला अग्रस्थान दिल्या-बद्दल नापसंती दर्शवली. त्याने आपली तलवार उगारून कृष्णाला व पांडवाना ठार मारण्याचा निश्चिय केला. त्याने कृष्णावर खोटारडा व चोर म्हणून आरोप केला. व यज्ञाचे फळ मिळण्याच्या योग्यतेचा नाही म्हणून सांगितले.

तोपर्यंत शिशुपालाचे शंभर अपराध पूर्ण होत आले होते.

कृष्णाने भयंकर रागाने आपले सुदर्शन चक्र शिशुपालावर सोडले व त्याचे डोके उडविले. त्यामुळे शिशुपालामध्ये असलेला जय हा ज्योतीच्या रूपाने कृष्णात जाऊन विलीन झाला. अशा तऱ्हेने जयविजय हा तिसरा जन्म पूर्ण झाला. ते आपल्या शापापासून मुक्त झाले व वैकुंठात विष्णुच्या द्वारपालांच्या रूपे जाऊन राहिले.

मय कारागीराने पाडवांनकरीता कुशलतेन बांधलेला अप्रतिम असा महाल दुर्योधन पहाण्यास निघाला व तो पाहून आश्चर्य-चकित झाला. आतील अनेक अदभुत रचना पाहून अनेक वेळा अपमानित झाला एका वेळेस तर रत्नखचित गालीचा समजून त्याने त्यावर पाय ठेवला व पाण्याच्या हौदात धप्दिशी पडला. ते पाहून द्रौपदीला खूप हसू आले. द्रौपदीच्या हसण्यामुळे दुर्योधनाचा







अपमान झाला. तेव्हां शकुनीने दुर्योधनाचे सात्वंन केले व कोणत्याही कारणाने पांडवाना व द्रौपदीला माझे दास करीन व अपमानाचा बदला घेईन तू पांडवाना द्युत खेळण्यास सिद्ध कर असे सांगितले.

सुदामा कृष्णाचा बालपणातील मित्र. श्रीकृष्ण आणि बलराम यांनी सांदीप ऋषीच्या आश्रमात अभ्यास केला होता. तेव्हां सुदामा सुद्धा त्यांच्या बरोबर शिकायला होता.

खूप संतती व द्रारिद्रय यांनी गांजून गेलेला सुदामा आपल्या पत्नीचा उपदेश ऐकून श्रीकृष्णाकडे त्याला भेटावयास गेला. जातांना बायकोने दिलेले पुरचुंडीभर पोहे त्याने कृष्णाकरीता नेले.

श्रीकृष्ण त्यावेळेस द्वारकेमध्ये आपल्या आठ पट्टराण्यांसमवेत झोपळ्यावर बसून झोके घेत होता. लांबून येत असलेला सुदामा पाहून त्याने धावत जाऊन त्याला आपल्या बाहुपाशात घेतले व अगत्याने आपल्या महालात नेले.

त्याने आपल्या राण्यांची सुदामाबरोबर ओळख करून दिली. त्याचे हे आगत्य व आदर पाहून सुदामाला अत्यंत आनंद झाला. कृष्णाने त्याच्या हातातील पुरचुंडी ओढून घेतली व उघडून पाहिली. त्यात असलेले पोहे पाहून त्याने थोडे आपल्या तोंडात टाकले व बाकीचे आपल्या राण्यांना दिले.

कृष्णाने केलेले अत्यंत प्रेम व आदर पाहून सुदामा-कशाकरीता आला होता हेच विसरला. कृष्णाचे स्मरण करीत करीत आपल्या घरी परत आला. तेव्हां त्याला आपले घर ओळखू आले नाही.

त्याच्या घराच्या जागी सुंदर असा महाल उभा होता. त्या महालाची दारे चांदी व सोन्यांची होती. ती प्रकाशाने तळपत होती. त्याचे खांब रत्नामाणकांचे होते. त्याची बायको दागदागिन्यांनी नटलेली होती. सर्व मुले रेशमी कपडे घालून फुलां-सारखी वटवीत दिसत होती.

ह्यानंतर सुदामाने बरीच वर्षं आपले आयुष्य सुखासमाधानाने घालवले.





# अद्भुत मैना

फारस देशात बसरा नावाचे एक मोठे व्यापारी केंद्र होते. त्यामुळे व्यापार करण्यास व पहाण्यास वेगवेगळ्या ठिकाणहून अनेक लोक तेथे येत. त्याना यायचे म्हणजे नगराला लागूनच एक घनदाट जंगल होते त्यातूनच येण्याची एकच वाट होती. त्या जंगलात् एक अद्भुत मैना होती. बऱ्याच जणांनी तिला पाहिले होते व आश्चर्य चकित झाले होते. ज्यांनी तिचे गाणे ऐकले होते ते तिची तुलना गंर्धवगानाबरोबर करत.

त्या मैनेला पकडण्याकरीता बऱ्याच जणांनी प्रयत्न केला. परंतु कोणीही तिला पकडायला गेलेला परत आला नाही. परंतु दगडी मूर्तीत त्यांचे रूपांतर झालेले आढळले.

त्या विचित्र मैनेची गोष्ट बसरा नगरातील राजकुमारी मुलताना हिला समजली. तिच्या मनांत मैना मिळवायची इच्छा निर्माण झाली. तिने आपल्या वडिलांना बोलावून नगरात दंवडी पिटवायला सांगितली–"की, जो कोणी त्या विचित्र मैनेला पकडून आणून राजकुमारीला देईल त्याच्याशी राजकुमारी लग्न करेल."

त्या गावात श्रीमंताची तीन मुले रहात होती. तिघेही बालपणापासूनचे मित्र होते. त्यातील एकाच्या मनांत राजकुमारी बरोबर लग्न करण्याची इच्छा झाली. तो त्या मैनेच्या शोधार्थ जगलात निघाला.

जाणाऱ्या येणाऱ्या वाटसरूना विचारत तो शेवटी ती मैना होती तेथे येऊन पोहोचला. ती मैना जगलांत मध्यभागी एका झाडाच्या फांदीवर बसली होती. तो हळूहळू त्या मैनेला पकडण्याकरीता झाडा-जवळ जाऊ लागला. मैनेने त्याला जवळ



येत असतांना पाहून गायला सुरवात केली तिचे ते मधुर गाणे ऐकून तो मंत्रमुग्ध झाला. व पहाता पहाता गायला लागला. तो गाता क्षणीच त्याची दगडाची मूर्ती झाली.

असाच एक महिना उलटला तो न आलेला पाहून दुसऱ्याच्या मनांत राज-कुमारीच्या बरोबर लग्न करण्याची इच्छा उत्पन्न झाली. व तो त्या मैनेच्या शोधार्थ निघाला. पहिल्या सारखीच दुसऱ्याची पण अवस्था झाली.

तसाच आणखी एक महिना उलटला. पहिले दोघे मित्र परत न आलेले पाहून तिसऱ्या मित्राला कासीमला काळजी वाटू लागली. त्यांच्या शोधार्थ तो निघाला. बऱ्याच जणांनी त्याला न जाण्याबद्दल सांगितले परंतु तो म्हणाला–"मला काही मैना पकडण्याची इच्छा नाही की; राजकुमारीबरोबर लग्न करण्याची." परंतु मी माझ्या जिवलग मित्रांच्या शोधा-करीता जात आहे. जमलेच तर त्यांचे रक्षण करून माझ्या बरोबर त्यांना घेऊन येईन माझा प्राण जरी गेला तरी मी घालवायला तयार आहे.

कासीम पण त्या मैनेच्या शोधार्थ निघाला शेवटी ती मैना ज्या झाडावर बसायची तेथे येऊन पोहोचला. कासीमला पहाताच ती मैना मधुर स्वरात गाऊ लागली. कासीम पण मंत्रमुग्ध झाला. त्यालापण आतून गावेसे वाटू लागले. परंतु त्याने स्वत:वर ताबा ठेवून गाणे म्हटले नाही. कासीम मैनेच्या अगदी जवळ आला तेव्हां मैनेने गाणे म्हणणे बंद केले व ती कासीमकडे पाहू लागली. कासीमने कुशलतेने मैनेला हातात पकडले.

नंतर त्याने प्रेमाने तिला कुरवाळले व म्हणाला–"तुझी सुंदरता अपूर्व आहे. तुझ्या सारखी ह्या जगात दुसरी मैना नसेल. तू माझ्या दोन्ही जिवलग मित्रांना परत जिवंत करणार नाहीस कां?

मैनेने आपले डोके हलवले व म्हणाली–"ठिक आहे, मी तुझी इच्छा पूर्ण करीन.

तुझ्या ह्या दगडरूपी असलेल्या मित्रांच्या डोक्यावरून उडण्याची परवानगी मला दे"

तेव्हां कासीमने त्या मैनेला सोडून दिले. तिने त्याच्या दोन्ही मित्रांच्या डोक्यावरून गोलाकार फेरी मारली. तात्काळ त्या दोन्ही दगडी मूर्तीतून त्यांचे मित्र जिवंत झाले.

कासीम आनंदाने म्हणाला—"तुझ्या सौंदर्याने व सुरेल गाण्यावर मुग्ध होऊन बरेच तरूण येऊन इथे शिळा होऊन पडले आहेत. त्याना परत मानव रूप मिळावे असे तुला वाटत नाही कां?

अद्‌भुत मैनेने त्याचे म्हणणे मानले व तिथे असलेल्या सर्व दगडी मूर्तीच्या डोक्यावरून दोनदा फिरली सर्वांचे मानवात रूपांतर झाले. सर्वांनी कासीमचे आभार मानले. व ते आपापल्या घरी परत गेले.

त्यानंतर कासीम मैनेला म्हणाला—मी तुझे उपकार केव्हांही विसरणार नाही. परंतु तुला एक विनंती करतो. तू माझ्या बरोबर नगरात कां येत नाहीस?

"नक्की येईन" मैना मंजुळ स्वरात म्हणाली. कासीमने लगेच आपल्या बरोबर आणलेल्या पिंजऱ्याचे दार उघडले तेव्हां मैनेने दाराशी येताच कासीमला म्हटले—"हे बघ, माझ्या डाव्या पायाच्या बोटात एक अंगठी आहे. ती काढून आपल्या बोटात



घाल. कोणत्याही संकट प्रसंगी ती तुझ्या उपयोगी पडेल.

कासीमने तिच्या पायातली अंगठी काढून आपल्या बोटात घालून घेतली. नंतर ते तिघे मित्र गप्पा करीत नगरात परत चालले जाता जाता अंधार पडला. त्यामुळे वाट दिसणे मुष्किल पडू लागले. तेव्हां तिघांनी रात्र तेथेच काढायची ठरवले. एक मोठे झाड पाहून त्या झाडाखाली झोपले.

कासीम दमलेला असल्यामुळे गाढ झोपी गेला. पहाटे त्याच्या दोन्ही दुष्ट मित्रांनी आपापसात ठरवून कासीमचे हातपाय बांधले व त्याला जवळच्याच एका विहिरीत टाकून दिले.

बरे तर बरे त्या विहिरीत पाणी नव्हते. तर मऊमऊ रेती होती, म्हणून त्याला फारसे लागले नाही. तरी पण उंचावरून पडल्यामुळे तो बेशुद्ध झाला.

जेव्हां त्याला जाग आली. तेव्हां त्याच्या-जवळ प्रचंडकाय एक राक्षस बसलेला दिसला. त्याला पाहून तो थरथर कांपू लागला.

"तू कोण आहेस?" भीटपणे कासीमने विचारले.

"मी तुझ्या अंगठीत रहाणारा राक्षस आहे. तू जेव्हां विहिरीत पडत होतास तेव्हां तुझी अंगठी घासली गेली. व त्यामुळे मी प्रगट झालो आता सांग, मी तुझी काय सेवा करू?" राक्षसाने विचारले.

कासीमने तावडतोब हुकूम सोडला—"मला ह्या विहिरीच्या बाहेर काढ."

तोच कासीम विहिरी बाहेर आला. त्याला तेथे पिंजरा व त्याचे दोन्ही मित्र कोणीच दिसले नाहीत. तेव्हां तो काय ते समजला. त्याने परत, राक्षसाला विनंती केली—"मला तावडतोब आपल्या शहरात घेऊन चल."

राक्षसाने तावडतोब त्याला शहरात पोहोचवले. तेव्हां राजमहालात राज-कुमारीला मैना मिळाल्याच्या आनंदात सर्व नगरात आनंदोत्सव चालू होता. परंतु त्याचे मित्र मात्र दोघे आपसात भांडत असलेले दिसले. ते दोघे मी मैनेला पकडले ह्या वरून भांडत होते कोणाचे म्हणणे खरे आहे. हे राजाला कळेना.

कासीमने स्वत: राजाकडे जाऊन सांगितले—"की, ह्याचा योग्य निवाडा आपण ह्या मैनेतर्फे कां, करीत नाहीत? ह्याचे बरोबर उत्तर तीच देऊ शकेल.

कासीमला पहाताच दोघे मित्र घाबरून गेले.

राजा दु:खाने म्हणाला—"हे तर मुष्कील आहे. मैना काहीच बोलत नाही."

"तुम्ही तिला माझ्याजवळ आणा ती नक्कीच बोलेले. मी तिच्याकडून खरे तेच काढतो." कासीम म्हणाला.








राजकुमारीच्या जवळून मैनेला कासीम-पाशी आणले. जसा मैनेचा पिंजरा कासीमपाशी आणला. तेव्हां त्याने विचारले "तू खरे सांग जंगलात तुला कोणी पकडले ?"

"मला प्रथम पिंजऱ्याच्या बाहेर काढा. मी पिंजऱ्यात राहून कशाचेही उत्तर देत नाही." अद्‌भुत मैना म्हणाली.

मैनेला सोडण्याची परवानगी राज-कुमारीकडे मागण्यात आली. तेव्हां राजकुमारीने विचार केला की; शेवटी लग्न करायचे आहे, ते मैना पकडणाऱ्याशी तेव्हां त्या बाबतीत खरे असणे जास्त चांगले म्हणून तिने परवानगी दिली.

पिंजऱ्याचे दार उघडताच मैना बाहेर आली. व कासीमच्या खांद्यावर जाऊन बसली. आणि दोनदा जोरात ओरडून म्हणाली–"जंगलात मला तूंच पकडलेस. तूंच पकडलेस."

मैनेच्या तोंडचे ते उत्तर ऐकून त्याचे जिवलग मित्र पळून जाऊ लागले. तेव्हां राजाच्या शिपायांनी त्या दोघांना पकडले.

राजा संतापाने लाल झाला व त्याने शिपायांना हुकूम सोडला–"जा त्या दोन्ही दुष्टांची डोकी उडवा."

परंतु कासीमने राजाला विनंती केली व म्हणाला–"महाराज, त्यानां माफ करा. जंगलात जेव्हां हे दगडीरूपात होते. तेव्हां मी ह्यांना मैनेच्या कृपेने प्राण परत दिले. तरी त्या दोघांच्या मरण्याने मला खूप दुःख होईल. तेव्हां राजाने कासीमची विनंती कबूल केली.

त्यानंतर त्या अद्‌भूत मैनेने आपले पंख फडफडवले व कासीमच्या खांद्यावरून उडून जंगलात निघून गेली.

राजाने राजकुमारीचा विवाह कासीम बरोबर थाटामाटाने लावून दिला.

राजकुमारी व कासीम त्या अद्‌भूत मैनेला पहाण्याकरीता वर्षातून एकदा तरी जंगलात नेहमी जात. तेव्हां त्या दोघांना पाहून मैना सुस्वर स्वरांत गाऊ लागे. ते ऐकून दोघेजणही आपल्या तोंडावर नेहमी काबू ठेवत.



## फोटो जोडनावे चढाओढ :: पारितोषिक रु. ५०

**या फोटोंची जोडनावे सप्टेंबर १९८४ अंकात जाहीर केली जातील**



S. G. Seshagiri



V. Muthuraman

★ या फोटोंची युक्त जोडनावे एकेकाच शब्दात किंवा छोट्या-वाक्यांत असली पाहिजेत. ★ जोडनावे जुलाई महिन्याच्या २० तारखेच्या आंत आमच्या पत्त्यावर पोंचती झाली पाहिजेत ★ आमच्याकडे आलेल्या जोडनावांत सर्वोत्तम ठरतील (दोन्ही जोडनावे धरून) त्यांना रु. ५० चे पारितोषिक दिले जाईल. ★ जोडनावे पोस्टकार्डावर लिहून चांदोबा फोटो चढाओढ, वडपळणी, मद्रास-२६ या पत्त्यावर पाठवावीत.

---

**मे महिन्याच्या चढाओढीचा निकाल**

पहिला फोटो : ईश्वरचिंतन माझे जिवन, मंत्रमार्ग ते सौख्याचे ।

दुसरा फोटो : कष्ट करावे जिवन जगावे, सार्थक होई जन्माचे ।।

नांव : रामराव र जवादे, कादराबाद शेठ्याजवळ, जालना-४३१२०३

**तुम्हाला माहित आहे का ? उत्तरे :**

१. कालिदास. २. होमर. ३. जॉन मिलटन्. ४. कौटिल्य. ५. सर विनस्टन् चर्चिल.

# चांदोबातील नवलाई

## झोपेतून जागे करणाऱ्या गोळ्या



हे तर सर्वानांच माहीत आहे की ; झोप न येणाऱ्यांकरीता झोपेच्या गोळ्या उपलब्ध आहेत, परंतु आता जर्मनीत एका ठिकाणी प्रयोग शाळेत अशा गोळ्या निर्माण झाल्या आहेत की. ठराविक वेळेला त्या गोळ्या झोपेतून जागे करतात. ह्या आता तेथे मिळू लागल्या आहेत.

## सिंहांचा पहारा

इटली मधील नेपुल्स ह्या शहरात जवळच लागून असलेल्या एका गावात एका व्यापाराच्या दुकानांत दोन सिंह पहारेकरी म्हणून ठेवले आहेत.

त्या व्यापाऱ्यांने त्या सिंहाना एका सर्कशीतून विकत घेऊन मोठ्या प्रेमाने पाळले आहे. ते दोन सिंह सुद्धा आपल्या मालक व आजुबाजुच्या लोकांबरोबर मित्रत्वाने रहातात.

तरीपण पोलिसांनी त्या व्यापाऱ्याला विनंती केली की, त्या दोन सिंहाना त्याने प्राणि संग्रहालयात आणून सोडावे.





## नविन उच्चांक

पश्चिम जर्मनीतल्या हेसिल्जन गावात आठ बायकांनी अडीच मीटर उंच खळ्यांसारख्या खांबावर १२२ तास बसून एका वेगळ्या प्रकारच्या 'खेळात' नविनच उच्चांक गाठला.

## तुम्हांला माहीत आहे का ?

१. टेलिफोनचा शोध कोणी लावला ?
२. टेलिस्कोपचा शोध लावणारा वैज्ञानिक कोण होता ?
३. ग्रामोफोनचा शोध कोणी लावला ?
४. लाऊड स्पीकरचा शोध कोणी लावला ?
५. स्टेथेस्कोपचा शोध कोणी लावला ?



# प्रथम परीक्षा

पुष्कर देशाच्या राजधानी जवळील जंगलात गुरुमुख नावाच्या श्रेष्ठ ऋषींचा आश्रम होता. तेथे तर्क मीमांसा, व्याकरण, जादुटोणा वगैरे शास्त्रांतील मोठे मोठे पंडित रहात.

त्या आश्रमात अभ्यास करण्याच्या विचाराने गिरीष आणि नरेश हे दोघे विद्यार्थी राजधानीतून निघून आश्रमात आले. आश्रमात पोहोचताच दोघांनी गुरुमुख मुनींना अभिवादन केले. व आपण येण्याचे कारण सांगितले.

मुनींने त्यांची रहाण्याची व्यवस्था केली. आणि म्हणाले–"मला सर्व प्रथम पहावयाचे आहे की; तुम्ही कोणती विद्या प्राप्त करण्याच्या योग्यतेचे आहात. ह्याला थोडा वेळ लागेल. तेव्हां तुम्ही आश्रमांतील सर्व नियम पाळून काही दिवस येथेच रहा."

एक आठवडा उलटला. एक दिवस आश्रमातील लाकुडफांटा आणण्याची जबाबदारी त्या दोघांवर येऊन पडली. ते दोघे कुऱ्हाडी घेऊन जंगलात लांबपर्यंत गेले.

एका जागी त्यांना वाळलेल्या झाडाचा बुंध दृष्टीस पडला. दोघांनी मिळून त्याचे खोड कुऱ्हाडीने तोडले. तेवढ्यात त्यांना झाडाच्या बुंध्यांत एक सोन्याची नाणी असलेली थैली मिळाली. त्यांना खूप आश्चर्य वाटले. नरेश एक दोन मिनीटेंच पहात राहिला आणि म्हणाला–"गिरीष, आजपासून आपले दारिद्र नाहीसे झाले. हे सोने निम्मे निम्मे आपण वाटून घेऊ. आणि घर जमिन वगैरे खरेदी करून आपले सारे आयुष्य ऐषआरामात घालवू. आता अशा परिस्थितीत कष्ट करून विद्यार्जन करण्याची आपल्याला काहीच जरुरी नाही. आपला उद्देश तर तसाच होता नां की; विद्यार्जन



करून पैसा कमावणे. तर आता आपण दोघे सोने घेऊन आपापल्या घरी परत जाऊ. आता आपल्याला आश्रमात परत जाण्याची जरूरी नाही."

गिरीषला त्याचे बोलणे पसंत पडले नाही. त्याने नाराजीने डोके हलवत म्हटले—"आपण ज्ञानार्जनाकरीता येथे आलो आहोत. ज्ञान फक्त संपत्ती मिळविण्या-करीताच उपयोगी आहे असे नाही. धनच मिळवायचे तर अनेक मार्गाने मिळवता येते. पैशांच्यामुळे आपण विद्यार्जन करु शकतो. भविष्यात विद्येच्यामुळे आपण धन कमावू शकतो. लक्षात ठेव, जसे धन आपल्याला फुकटचे मिळाले तसेच ते नाहीसेही होऊ शकते. परंतु आपण जी विद्या प्राप्त करतो ती आपल्याला सोडून कधीही जात नाही. आणि आश्रमाच्या नियमांप्रमाणे तर आपण आपल्याला मिळालेले, धन आताच्या आता गुरुंच्या हातात नेऊन दिले पाहिजे."

त्याचे ते बोलणे न आवडल्याने. त्याने त्या सोन्याचे दोन वाटे केले व एक गिरीषच्या हातात दिला. व दुसरा आपल्या जवळ कपड्यात लपवून ठेवला. आणि म्हणाला—"गिरीष, मी आता शिक्षणाच्या भानगडीत पडणार नाही. माझे ध्येय धन संपादनेकडे होते. ते मला अनायासे मिळाले. त्यामुळे मी आता घरी जातो. तुला पाहिजे तर तू आश्रमात परत जा. आणि तुला पाहिजे तसे शिक्षण घे. असे म्हणत तो विरुद्ध दिशेने जावू लागला.

नरेषला वाटेत एक ओढा लागला. तो पार करून पलीकडे जाऊ लागला. तो दोन पावले गेला नाही, तोच त्याच्या पायाला कसला तरी स्पर्श झाला. आणि अंगठ्याला एक बारीक दंश झाला.

नरेष भीतीने उलट पळत सुटला आणि त्याने आपला पाय जोरात झटकला. त्याच्या पायाला वेटोळे घालून बसलेला पाणसाप खाली पडला. आणि जवळच्या झाडीत सरसर करीत निघून गेला.

नरेष खूप घाबरला. त्याने पायाच्या अंगठ्या जवळ निरखून पाहिले. तर अंगठ्याजवळ दंश केल्याचे चिन्ह स्पष्ट दिसत होते.

साप चावला हे पाहूनच तो गर्भगळीत झाला. आता जीव जाणार ह्याची त्याला भीती वाटू लागली. तो आपल्याला कोणीतरी मदत करावी म्हणून ओढ्याच्या काठाने पळू लागला.

नरेष थोडावेळ पळत राहीला. त्याने समोर पाहिले तर एक भिल्ल समोरून येताना त्याला दिसला. नरेषने त्याच्या जवळ जात विचारले—"मला साप चावला आहे. त्यावर तुमच्याकडे काही औषध आहे कां?"

त्या भिल्लाने म्हटले—"सर्पदंशावर उपाय करण्याची विद्यातर आमच्या पिढी-तील सर्व लोकांना माहीत आहे. मी औषध लावून तुझे प्राण वाचवू शकेन. परंतु त्या बद्दल तू मला तुझ्या कपड्यात लपवलेले सोने दिले पाहिजेस."

नरेषला अतिशय आश्चर्य वाटले की; आपल्या कपड्यात लपवलेले सोने ह्याला कुठून माहित पडले. तोपर्यंत नरेषच्या तोंडातून फेस येऊ लागला. आता आपले मरण जवळ येऊन ठेपले असे समजून जगण्याच्या आशेने त्याने ते सोने त्या भिल्लाच्या हातात देऊन टाकले.

त्यानंतर तो भिल्ल जवळच्याच झाडीत गेला. त्याने कोणच्यातरी झाडाची पाने



तोडून आणली. आणि चिरडून त्याचा रस त्याच्या नाका तोंडात घातला. क्षण-भराने त्याचे विष एकदम नाहीसे झाले. तो भिल्ल मनांतल्या मनात हसत हसत जगंलात निघून गेला.

नरेषला सोने गेल्याचे खूप दुःख झाले. तो थोडा वेळ विचार करीत राहिला. आणि परत एकदा मनापासून निश्चय करीत म्हणाला की; ऐवीतेवी सारे सोने गेलेच. उपजिविकेचा काही मार्ग उरला नाही. त्यामुळे आता परत आश्रमात जाऊन विद्याभ्यास शिकावा.

नरेषला समोर पहाताच मुनी म्हणाले– "तुमच्या दोघांची मी एक गुप्तरुपे परिक्षा घेतली. त्यात गिरीष उतिर्ण झाला. त्यामुळे त्याला मी आश्रमात शिकण्यास प्रवेश दिला. परंतु तू कोणतीही शास्त्र विद्या शिकण्याच्या योग्यतेचा नाहीस. तू आश्रमाचे नियम पाळले नाहीस. अशा मुलांना आमच्या पाठशाळेत प्रवेश नाही. तेव्हां तू आपल्या घरी परत निघून जा.

नरेष निराश होऊन मान खाली घालून आश्रमातून जाऊ लागला. जंगलातून जातांना त्याच्यावर उपचार करणारा भिल्ल त्याला समोरून येतांना दिसला.

त्याला पाठशाळेजवळ पहाताच नरेषला एक शंका आली. त्याने जवळ उभ्या असलेल्या एका विद्यार्थ्यास विचारले–"अरे मला सांग, हा जंगलात रहणारा कोण आहे?"

त्यावर त्या मुलाने त्याला सांगितले– "अहो महाराज, हा माणूस जंगलात रहाणारा नाही, परंतु जिज्ञासू मुलांना जादुटोणा, मंत्रतंत्र, शिकविणारे आचार्य आहेत. आज त्यांनी जंगली माणसाचा वेष धारण केला आहे."

ते उत्तर ऐकताच नरेषने आपल्या पायाकडे वाकून पाहिले. परंतु त्याला तेथे सांप चावण्याचे चिन्ह किंवा जखम काहीच दिसले नाही. तेव्हां त्याच्या लक्षात यायला वेळ लागला नाही की, गुरूंनी त्याची कशी परिक्षा घेतली. त्यामुळे तो लज्जित होऊन आपल्या घरी परत गेला.






[१४]

[तांडेलाने शत्रुशी लढण्याकरीता आपल्या गुलामांना कैदेतून मुक्त केले. परंतु तांडेलाच्या क्रुर वागण्याने बेजार होऊन गुलामांनी पिंगळचे म्हणणे मान्य करून त्याला आपला नायक केले. आणि तांडेलाला मारून टाकले. त्या जहाजांच्या टकरीने जहाजे फूटुन गेली पिंगळ उडून लांब समुद्रात जाऊन पडला-ह्याच्या पुढे वाचा…]

समुद्रात पडताच पिंगळ एकदा खाली बुडाला. काही क्षणाने पुन्हां पाण्यावर आला. येताच त्याने चौफेर दृष्टी टाकली. त्याने पाहिले तर दोन्ही जहाजे फुटून जाऊन त्याचे तुकडे तुकडे समुद्राच्या पाण्यात पसरले होते व अनेक माणसांच्या किंकाळ्या, आरडाओरडीने साऱ्या परि-सरात हाहा:कार माजला होता. समुद्रातील दृष्य अत्यंत भयंकर होते. दोन जहाजांच्या बुडण्याने अत्यंत कठिण समस्या निर्माण झाली होती. प्रत्येक जण जीव वाच-विण्याकरीता धडपड करीत होता. जसे काही क्रुर श्वापदाच्या जबड्यातच जात असल्यासारखे. ते सर्व पाहून पिंगळचे मन कासाविस झाले.

समुद्राच्या तुफान लाटांमुळे पिंगळला दम लागत होता. जवळपास दुसरी कोणतीच बोट दिसत नव्हती. लांबवर



पर्यंत पाण्याशिवाय दुसरे काहीच नजरेस पडत नव्हते त्यामुळे पोहून जायची त्याची हिम्मत होत नव्हती. अशी दशा त्याचीच नाही तर सर्व जणांची झाली होती. पण त्यामुळे त्याला एकप्रकारे आनंद व दुसऱ्या बाजूने दुःख होत होते.

पिंगळला समजत नव्हते की कोणत्या दिशेने पोहत गेले तर जीव वाचवणे सोपे जाईल. आणि नुसतेच पोहत रहाणे म्हणजे जीव धोक्यात घालण्यासारखे होते. समुद्राच्या लाटा त्याला इकडून तिकडे फेकत होत्या. त्यामुळे मरणाच्या भीतीने जसा माणूस हवालदिल होतो. तशी पिंगळची अवस्था झाली होती. शेवटी त्याची जिवंत रहाण्याची आशा थोडी थोडी नष्ट होऊ लागली.

एक तास तो तसाच लाटांचा मार खात इकडून तिकडे फेकला जात होतो. त्याला कळून चुकले की; आता मरण निश्चितच आहे. त्याने तो निराश झाला. तेवढ्यात त्याच्या हाताला एका वस्तूचा स्पर्श झाला. त्याने मोठ्या शर्थीने ती वस्तू पकडायचा प्रयत्न केला व हाताने ती वस्तू घट्ट पकडली.

तेव्हां त्याला आईचे शब्द आठवले— "मुला दैव नेहमी तुझ्या पाठीशी राहील. त्याच्या आधी त्याचा देवावरचा विश्वासच उडून गेला होता. तो निराश झाला होता. त्याला एकच काळजी लागून राहिली होती की; आपल्या पाठीमागे आपल्या म्हाताऱ्या आईचा सांभाळ कसा होणार. तसे म्हणायला त्याने तिच्याजवळ खूप धन संपत्ती व जादुची थैली दिली होती. की त्यामुळे तिच्या खाण्यापिण्याचे तर हाल होणार नाहीत. त्याचा आपल्या भावांवर अजिबात विश्वास नव्हता. त्या भावांच्या आठवणीनेच त्याचे काळीज हेलावले. परंतु त्याला आशा वाटत होती की, एक ना एक दिवस आपण नक्कीच काठाला जाऊन लागू.

पिंगळच्या हाताला लागलेली वस्तू दुसरी तिसरी नसून जहाजातील ठेवलेल्या पेटाऱ्यांची एक लाकडी फळी होती. तशात बुडत्याला काडीचा आधार तशी अवस्था पिंगळची झाली. त्याने ती फळी ओढून घेतली व त्यावर तो खाली मान घालून पडला. आता केव्हांनां केव्हां तरी किनाऱ्याला जाऊन पडू ही आशा त्याला वाटू लागली. मरणाच्या भीतीने त्याची तहानभुक सुद्धां पळून गेली होती.

लाकडी फळी समुद्रात हेलकावे खात जात होती. पिंगळने त्या फळीला घट्ट पकडून ठेवले होते. फळी हातातून निसटून गेली तर, इतकावेळ त्याने मरणाच्या भीतीने चोहोबाजूला काय चालले आहे हे सुद्धा पाहिले नव्हते.



कित्येक तास लोटले. सूर्यास्त झाला. चोहोबाजूला काळोख दाटू लागला. समुद्राच्या भिषण लाटांच्या आवाजाने व माऱ्याने त्याला अजिबात समजत नव्हते, थोड्या वेळाने तहानेने त्याच्या घशाला कोरड पडू लागली. त्याने तसेच समुद्राचे थोडे पाणी प्याले. परंतु त्याने त्याच्या पोटात ढवळून त्याला उलटी झाली. थोड्यावेळाने त्याच्या पोटात भूकेने दुखू लागले. पोटात आगीचा डोम उठला." व समुद्राच्या भयंकर लाटा व मरणाची भीती ह्यानेच त्याला ग्लानी आली.

जेव्हां त्याने डोळे उघडले. तेव्हां त्याने पाहिले तो अशा ठिकाणी येऊन पडला होता की, वर निळेभोर आकाश व खाली तापलेली वाळू की जसे काही शरीर म्हणजे चूली घातलेले लाकूडच.

ही परिस्थिती पिंगळला मजेदार वाटली. तो मानवर करून आपण कुठे आहोत हे अजमावण्याचा प्रयत्न करू लागला. थकलेल्या अवस्थेत सुद्धा त्याने मान वळवून इकडे तिकडे बघण्याचा प्रयत्न केला. एक गोष्ट पाहून त्याच्या आनंदाला पारावार उरला नाही. त्यांनी जेवढे लांबवर पहाता येईल तेवढे पाहीले. तो वालूकामय प्रदेश होता. पिंगळच्या आनंदाला आता उधाण आले. तशाही स्थितीत अंगात खूप ताकद असल्याच्या आवेशात तो हात टेकून



उठण्याचा प्रयत्न करू लागला. तर अर्धे अंग समुद्राच्या पाण्यातच होते. व पाठीमागे समुद्राचे शांत पाणी सरोवरासारखे वहात होते.

पिंगळला कळून आले की; आपण कोणत्या ठिकाणी येऊन पोहचलो आहोत. एका बाजूला विशाल सागर तर दुसऱ्या बाजूला वाळवंट!

पिंगळने धडपडत दोन पावले उचलली. सूर्याचा ताप सहन न झाल्यामुळे डोळ्यावर हात ठेऊन त्याने लांबवर पाहिले. थोड्यादूरवर काही गिधाडे उडतांना त्याला दिसली. ती एकाच बाजूने उडत जात नव्हती तर एका विशिष्ट ठिकाणी उडत खाली येत होती.

पिंगळच्या मनात थोडी आशा निर्माण झाली. त्याने विचार केला की, गिधाडे जिथे उडत आहेत. तेथे एक तर गांव असावा नाहीतर पाण्याचे डबके तरी असावे. तसा विचार येताच त्याच्या अंगात एकदम सहस्त्र हत्तीचे बळ आले. त्याने आपली दृष्टी गिधांडाच्या दिशेने केंद्रित केली व तो तापलेल्या वाळूतून सपासप चालू लागला.

थोड्या वेळात गिधाडे जेथे उडत होती. त्या ठिकाणी तो जाऊन पोहोचला. तेथे वाळूत पडलेल्या वस्तूवर ती जाऊन बसत होती ते पाहताच त्याला अत्यंत किळस आली.

एका माणसास एका खडकाला हातपाय बांधून मारण्यात आले होते. त्याला ती गिधाडे टोचून टोचून खात होती.

पिंगळने एक क्षणभर त्या माणसाकडे निरखून पाहिले व खाली वाकून एक दगड हातात घेतला व गिधाडांच्या दिशेने भिरकावला. सर्व गिधाडे आकाशांत उडाली. काही परत येण्याकरीता झेपावू लागली.

पिंगळ त्या माणसाच्या जवळ जाऊन पोहोचला. त्याचे डोळे बंद होते. त्याने तो जिवंत असावा असा विचार करून त्याच्या छातीवर हात ठेवून पाहिला. परंतु छातीचे ठोके बंद पडले होते व तो मेलेल्या अवस्थेत होता.

पिंगळला कल्पनाच करवत नव्हती की, अशा ठिकाणी ह्या माणसाला कोणत्या कारणांकरीता, अशी कडक शिक्षा दिली गेली असावी. अचानक त्याच्या डोक्यात एक कल्पना आली. अशा तऱ्हेची शिक्षा म्हणजे जवळपास नक्कीच मनुष्यवस्ती असावी.

आता सर्वात आधी कुठली गोष्ट करावी. याचा तो विचार करू लागला. प्रथम तहान भागवण्या करीता पाणी शोधले पाहिजे ते कुठे मिळेल? त्यानंतर खाणे कुठे मिळेल? खाणेपिणे मिळाले नाही तर जास्त दिवस जगणे मुष्किल. आणि काहीच मिळाले नाही तर भुकेने तडफडून बेशुद्ध पडण्याची पाळी येईल व बेशुद्धावस्थेत कोणीही जीवजन्तु आपल्यावर तुटून पडण्याची शक्यता आहे. त्यामुळे शरीरात ताकद येण्यास खाण्यापिण्याचा शोध काढलाच पाहिजे. परंतु अशा वाळवंट व समुद्रात खायला प्यायला कोठून मिळणार. तो काळजीत पडला.



पिंगळ जेव्हां विचारात मग्न होता. तेव्हां खूप दूरवरून जाणाऱ्या उंटांच्या कळपातील उंटांच्या मालकाने आपल्या दुर्बिणीने पिंगळला व त्या मेलेल्या माणसाला आणि उडालेल्या गिधाडांना पाहिले होते. दुसऱ्याक्षणी त्याने आपल्या उंटाना पिंगळच्या दिशेला जाण्याचा इशारा केला. उंटाच्या जोरदार पळण्याने वाळवंटातील वाळू उंच उडू लागली.

लांबवर उडत असलेली धूळ पाहून पिंगळला आश्चर्याबरोबर खूप आनंद झाला. उंटाच्या तापयांना पाहून त्याला धूळ उडण्याचे कारण समजले. त्याला एक प्रकारे आनंद व त्याबरोबर भीतीपण वाटू लागली. त्याला वाटले वाळवंटातील कोणी लुटारू असले तर आता आपले मरण हे निश्चित. परंतु पळून जावे तर आजूबाजूला तशी लपण्यासारखी



जागा नव्हती. आणि पळायला ताकद नव्हती. तो एक पाऊलही उचलू शकत नव्हता.

उंटाचा कळप त्याच्या अगदी जवळ आला. उंटांच्या मालकाचा इशारा मिळताच प्रत्येकजण उंटावरून खाली उतरला आणि त्यांनी पिंगळला गोलाकार घेरले. उंटाच्या मालकाने उतरून जवळ जात पिंगळला पायांपासून डोक्यापर्यंत निरखून पहात म्हटले–"तू पाताळ भैरवीचा अनुचर तर नाहीस नां?" नंतर त्या मेलेल्या माणसाला खाली वाकून पहात आपल्या लोकांकडे वळून म्हणाला–"हा मेलेला माणूस आपल्याच साथिदारांपैकी एक दिसतो आहे. आपल्या किल्लयावर पहारा देणारे आणखी लोक कोठे गेले? आपला किल्ला तर भैरवीच्या स्वाधिन झाला नाही नां?"

तेवढ्यात उंटावरील एका सैनिकाने आपल्या भाल्याचे टोक पिंगळला लावत म्हटले–"खरं खरं सांग, तुझा मालक भैरवनाथ कुठे आहे? हे प्रश्न ऐकून पिंगळला काहीच समजेनासे झाले. बहुदा भैरवनाथ हा लुटारूच्यां टोळीचा नायक असावा. तर मग हे लोक कोण असावेत? त्याने मनांतल्या मनात विचार केला.

पिंगळ म्हणाला–"मी कोणाचाच साथिदार नाही, नशिबाने थारा न दिलेला असा मी आहे, ह्या महाभयंकर समुद्रात वादळामुळे माझे जहाज फूटून गेले. दैवाच्या कृपेनेच मी वाचून ह्या समुद्राच्या किनाऱ्याला येऊन पडलो आहे. ह्या माणसास जिवंत आहे असे समजून गिधाडापासून वाचविण्यां करीता मी येथे धडपडत आलो. मला हा देश व वाळवंट कोणता आहे हे सुद्धा माहित नाही.

त्यावर फिरून उंटाच्या मालकाने पिंगळला निरखून पाहिले. व उत्साहीत करण्याच्या इच्छेने विचारले–जर तुझे म्हणणे खरे असेल तर तुला घाबरण्याचे काहीच कारण नाही. आणि जर खोटे असेल तर आताच तुझे तुकडे तुकडे करून ह्या गिधाडांना खायला घालीन. आता तू जेथे उभा आहेस. हा आफ्रिकेच्या जवळील समुद्रकिनाऱ्यावरचा अरबी प्रदेश आहे. मी नवाब साहेबांच्या उंटाच्या ताफ्यांचा नायक आहे. आता तू न भीता सर्व खरं सांग. तुमची नाव समुद्रात कशी फुटली. आणि तू ह्या किनाऱ्याला कसा येऊन लागलास?"



पिंगळला ते लोक लूटारु चोर नाहीत. हे ऐकूनच खूप बरे वाटले. परंतु अरब देशातील नवाबाचे सैनिक आहेत. तेव्हां ह्या देशातील उंटाच्या कळपाचा नायक काय कशाही स्वभावाचा असू शकेल आणि आता तर आपल्याला प्राणांची भीती नाही. तेव्हां पूर्वीचे सर्व सोडून जेथून आपण तांडेलाचे गुलाम झालो तेथून सर्व गोष्ट ह्यांना सांगायला काहीच हरकत नाही.

त्याच विचाराने पिंगळने जेथून तो जहाजावर गुलाम म्हणून पकडला गेला. आणि दोन्ही जहाजांमध्ये काय काय घडले ते सविस्तर त्यांना सांगितले.

ते सर्व ऐकून उंटांचा नायक संतोषाने हसला व त्याने विचारले–"तर आता ह्या गोष्टीची शंका नाही की, ज्या जहाजांनी तुमच्या जहाजावर हल्ला केला त्यात सुद्धा गुलामच असावेत."

होय, होय! ह्यात शंका करण्याचे कारणच नाही. मीच त्यांच्या जहाजातील नायकांशी एकजुटी करण्याच्या विचार बोलून दाखविला. परंतु त्याने ते मान्य केले नाही. तेव्हां मीच समजलो की, ते जहाज सुद्धा गुलामाची खरेदी-विक्री करण्याचे व्यापारी जहाज आहे." पिंगळने उत्तर दिले.

उंटाच्या नायकाने होकारार्थी मान हलविली व म्हणाला–"माझे नाव हसन गौरी आहे. तू पण अनेक लोकांचे नेतृत्व केलेस, त्यामुळे तू माझ्या बरोबरीचा आहेस. आता तू मला माझ्या नावाने हाक मारायला हरकत नाही. आम्ही

सर्वजण भैरवनाथ नावाच्या वालुकामय प्रदेशातील डाकूंचा खतमा करण्याच्या इराद्याने इथे पहारा देत आहोत. येथील किल्लयाच्या रक्षणा करीता ठेवलेला तो आमच्या पैकीच एक होता. तो मारला गेला परंतु मला समजत नाही भैरवनाथाने ह्याला कसे कैद केले? असे म्हणत तो आपल्या साथीदारांकडे वळून त्यांना म्हणाला—"आजपासुन ह्या माणसांस आपल्या साथिदारांपैकी एक समजा, बिचारा भूकेने व्याकूळ झाला आहे. ह्याला तावडतोब खायला प्याला द्या."

हसन गौरीच्या ह्या बोलण्याने पिंगळच्या जिवात जीव आला. सैनिकांच्या कडून मिळालेल्या रोटया खाऊन त्याने पाणी प्याले. दुसऱ्या क्षणीच एक उंट दाखवत हसन पिंगळला म्हणाला—"हा एक उंट आजपासून तुझा आहे. आता आपल्याला येथून जायला पाहिजे. माझा अंदाज आहे की, भैरवनाथाने अक्षय किल्ला बळकावला असावा.

असे म्हणत तो एका सैनिकांकडे वळून म्हणाला—ह्या मृत माणसाला एका उंटावर टाका. आपण ह्याची अक्षय किल्लया-जवळ समाधी बांधू ह्याला गिधाडांनी खाल्ले तरी आपल्याला पाप लागेल.

त्यानंतर थोड्याचवेळाने तो उंटाचा ताफा तेथून निघाला. वाळवंटातून उडणाऱ्या वावटळीला मागे टाकीत टाकीत सूर्यास्ता पर्यंत ते अक्षय किल्लयाच्या जवळ येऊन पोहोचले. किल्लयाजवळ एकदम शांत आणि निर्मनुष्य होते. त्याला आश्चय वाटू लागले की, नेहमी किल्लयाजवळ माणसांची वर्दळ असे, आज अशी एकदम स्मशानासारखी शांतता कशी?

हसन गौरीने पिंगळकडे वळून भुवया उंचावत आश्चर्य चकित होऊन पाहीले आणि किल्लयाकडे पाहून हात हलविला.

(क्रमश:)



# कांचन मेखलाचा प्रस्ताव

विक्रमादित्याने आपला हट्ट न सोडता पुन्हां झाडावरून प्रेत सोडून खांद्यावर घेऊन, मौनपणे स्मशानाचा रस्ता धरला. तेव्हां प्रेतांतील वेताळ राजास म्हणाला—"राजा! अशा भयाण रात्री तू कष्ट सोसतो आहेस. पण एवढे मात्र खरे की; तुझे कष्ट व मेहनत फुकट जाणार नाही. काही अनुभवी व विवेकी लोक सुद्धा विचित्र-पणे वागतात. काही लोक अनुकूल परि-स्थिती पाहून आपला प्राण त्याग करतात व त्याच्या आधीन होतात. जे मुळातच द्वेषभाव मनात ठेवतात त्यांच्या दृष्टीने गोष्ट वेगळी. मला भीती वाटते की; तुझ्या बाबतीत तसेच तर होणार नाही ना? म्हणून मी कांचन मेखलाची गोष्ट तुला सांगतो. लक्ष देऊन ऐक." असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

मैथिली देशचा श्रीगुप्त नावाचा राजा होता. तो फार दयाळू होता. त्याच्या



राज्यातील प्रजा अत्यंत सुखी होती. त्याच्याकडे कुलवान नावांचा एक अतिशय हुषार मंत्री होता. तो नेहमी राजाला योग्य तो सल्ला देत असे. मंत्र्याच्या गुणांवर व त्याच्या हुषारीवर राजाचा अतिशय विश्वास होता. त्यामुळे त्याच्या सल्यानेच राजा राज्य करी. अशा तऱ्हेने बरीच वर्षे लोटली. राजा श्रीगुप्त आता वृद्ध झाले. त्यातच त्यांना बरा न होणारा आजार झाला व त्यानां कळले की; आता आपण जास्त काळ जगणार नाही. तेव्हां त्याने आपला मुलगा चंद्रगुप्त ह्याचा राज्याभिषेक करविला. त्याने आपल्या मुलाला जवळ बोलावले व समजावून सांगितले—

"मुला, तू आपल्या मंत्र्याच्या सल्याशिवाय कोणतीही गोष्ट करू नकोस. राज्यकारभात ते माझ्यापेक्षांही कितीतरी पटीने अनुभवी आहेत. त्यांनी सांगितलेल्यात आपला फायदा आहे असेच समज." असे सांगून राजाने आपला प्राण सोडला.

चंद्रगुप्तने आपल्या वडिलांना वचन दिले व कुलवानाला आपला मंत्री म्हणून नेमले.

एकदा चंद्रगुप्तने कुलवानाला शेजारच्या देशाचा राजा जयपाल ह्याच्याबद्दल काही गोष्टी सांगून म्हटले—"मला खात्री आहे की, जयपाल हळूहळू राज्यविस्तार वाढविण्याच्या विचारात आहे व तो त्याकरीता आपल्या राज्यावर चाल करून येईल. तेव्हां आधी आपणच त्यांच्यावर चाल करून जावे ह्यासंबंधी आपला काय निर्णय आहे?

कुलवानाने थोडा वेळ विचार केला व चंद्रगुप्तला म्हणाला—"महाराज, ह्या गोष्टीचा आपण विचार करू नये."

त्याचे म्हणणे ऐकून चंद्रगुप्तला खूपच आश्चर्य वाटले. त्याला अतिशय विश्वास वाटत होता की; आपल्याशी मंत्री सहमत होईल.

"तुम्ही काय! युद्ध आपल्या राज्य विस्तारा करीताच करणार आहात नां? आणि जर त्यात आपला पराजय झाला आणि आपले अर्धे अधिक सैन्य नष्ट झाले तर अशा परिस्थितीचा गैरफायदा घेऊन दुसरा कोणताही राजा आपल्यावर हल्ला करेल. तेव्हां आपल्याचा राज्याला-जास्त धोका असण्याची शक्यता आहे." कुलवान म्हणाला.

मंत्र्याचे म्हणणे चंद्रगुप्तला पटले नाही. तरी पण आपल्या वडिलांपासूनचा अनुभवी म्हणून त्याने युद्ध न करण्याचे ठरविले.

ह्यानंतर एका आठवड्याने चंद्रगुप्त शिकारीला जाण्यास निघाला. तेव्हां मंत्र्याने त्यांना अडवून न जाण्याबद्दल सांगून म्हटले—"महाराज, आजचा दिवस शिकार करण्यास योग्य नाही. आपण दोन दिवस थांबून मग जा वे.

असे म्हणताच चंद्रगुप्तचा सारा उत्साह मावळला. त्याने मंत्र्याला विचारले—"तुम्ही ह्याचे काय कारण असावे ते नाही सांगितलेत."

"चार पांच तासाच्या आत भयंकर तुफान वादळ व पाऊस येणार आहे, आणि जंगलात अशा परिस्थिति कुठेही आसरा मिळणे शक्य नाही. आणि अशी वेळ शिकार खेळायला योग्य नाही." कुलवान म्हणाला.

चंद्रगुप्तने मंत्र्याचे म्हणणे मान्य करून शिकारीला जाणे रद्द केले. परंतु चार-



तासानंतर सुद्धा पाऊस पडला नाही. तसे आकाशात काळे ढग दिसत होते.

तेव्हां चंद्रगुप्तने मंत्री कुलवानाला बोलवणे पाठवले व विचारले—"आपण मला पाऊस पडेल म्हणून संमती दिली नाहीत. पण पाऊस काही पडला नाही."

मंत्री स्मित हास्य करीत म्हणाला—"असेही होते की; राज्यात पाऊस पडला नसेलही परंतु जंगलात भरपूर पडला असेल. माझा अंदाज आहे की, जंगलात भरपूर पाणी चिखल झाले असेल.

मंत्र्याच्या तोंडचे हे बोलणे ऐकून आपल्या शंकेचे निवारण करण्याकरीता चंद्रगुप्ताने काही शिपायांना जंगलात पाहून येण्यास












घाडले. जंगलात खूप पाऊस पडला आहे. व त्यामुळे वाटेतील नदी नाले यांना पूर आले आहेत शिपायांनी येऊन सांगितले.

असेच दोन महिने लोटले. तेव्हां कुलवानाने राजाचे दर्शन घेत म्हटले– "महाराज, गुराख्यांकडून असे कळले आहे की; थोड्या दिवसांतच राजा जयपाल आपल्या राज्यावर हल्ला करणार आहे.

ते ऐकताच चंद्रगुप्त थोड्या रागानेच म्हणाला–"होय कां? मी तर काही दिवसांपूर्वीच त्यांच्या देशावर हल्ला करावयाचा म्हणत होतो. त्यावेळेस आपण मला नकार दिलात कां. तर आपल्या राज्यातले सैन्य कमी होईल म्हणून नां!

कुलवान नम्रतेने म्हणाला– "महाराज, आपले म्हणणे अगदी बरोबर आहे. आपणच हल्ला केला काय किंवा शत्रुसैन्य आपल्यावर चालून आले काय ह्यात दोन्ही राज्यातले सैन्य नष्ट होणारच. त्यामुळे राज्याची व प्रजेची हानी होतेच."

ह्यावर चंद्रगुप्तने कुलवानाकडे विकृत हास्य करून पहात म्हटले–"तर आता आपण मला सल्ला द्याल की; तू युद्ध न करता त्याला शरण जा."

"तशी काही जरूर नाही. सैन्य बळ पहाता जयपालच्या तोडीस तोड आपले सैन्य आहे. तर त्याच्याबरोबर मैत्रीचे संबध जोडले तर जास्तच चांगले होईल. तशी संधी पण चालून आली आहे. त्याची एकुलती एक कन्या उपवर आहे तिच्याशी आपण लग्न केलेत तर आपला मान पण राहील." त्याने सल्ला दिला.

चंद्रगुप्तला माहित होते की; जयपालची मुलगी कांचनमेखला अत्यंत रूपवती आहे. त्यालाही मनापासून तिच्याशीच लग्न करावे असे वाटत होते. तेव्हां त्याने मंत्री कुलवान ह्याचे म्हणणे मान्य केले.

कुलवानाच्या तर्फे आलेला संदेश पाहून जयपाल अत्यंत आनंदित झाला. त्याने आपल्या मुलीला बोलावून ती गोष्ट तिला सांगितली. व त्याबद्दल तिची अनुमति विचारली. राजकुमारी कांचन मेखला यावर विचार करीत म्हणाली– "बाबा, आपण तर राजा चंद्रगुप्तच्या राज्यावर हल्ला करणार होतात. अशा परिस्थितीत हा विचार कोणी मांडला?"

"मुली, मनापासूनच हि गोष्ट मला माहित आहे की; केव्हां ना केव्हां तरी राज्यविस्ताराच्या आशेने राजा चंद्रगुप्त आपल्यावर चाल करून येईल राजा जयपाल म्हणाला.

"चंद्रगुप्तच्या राज्यावर हल्ला, करणार हे समजताच त्याने माझ्याशी लग्न करून आपल्या बरोबर संबंध जोडण्याचा प्रस्ताव मांडला. मला वाटते ह्या पाठीमागे काही गुढ तर नाही?"

राजा जयपाल शांतपणे म्हणाला– "चंद्रगुप्तचा मंत्री कुलवान अत्यंत हुषार व धोरणी आहे. राज्यकारभारात अनुभवी आहे. त्यानेच सल्ला दिला असावा."

कांचनमेखला ह्यावर उपहासाने म्हणाली–"मी असे ऐकले की; चंद्रगुप्त आपला मंत्री कुलवान ह्याच्या अनुमती शिवाय जंगलात शिकारीला सुद्धा गेला नाही. सारी कामे तो मंत्र्याच्या सल्या शिवाय करीत नाही शेवटी माझ्याशी लग्न सुद्धा त्याच्या सल्लया करतील व माझा त्याग सुद्धा करतील. तेव्हां तुम्ही त्यांना



कळवा की; चद्रगुप्तने मंत्री कुलवान ह्याला देशाबाहेर हाकलून देण्याची शिक्षा दिली तरच मी त्याच्या बरोबर लग्न करायला तयार आहे." जयपालने तसा निरोप राजा चंद्र-गुप्तकडे पाठविला. त्याचा तसा निरोप ऐकून राजा चंद्रगुप्त क्रोधाने लाल झाला. व दरडावत म्हणाला-"जयपालची ही हिंमत?"

मंत्री कुलवानाने राजाला शांत करीत म्हटले–"महाराज, मी आपल्या पूर्वजांच्या प्रसेन राज्यात जाऊन माझे उर्वरित आयुष्य घालवतो. मला आज्ञा द्यावी."

ह्यानंतर एका आठवड्याने राजा चंद्रगुप्तने जयपालच्या राज्यावर हल्ला केला परंतु जयपालने न लढता त्याच्या बरोबर

     

मैत्रिचे संबंध स्थापन केले. त्यानंतर चंद्रगुप्तने कांचनमेखला बरोबर विवाह केला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला– "राजा, कांचनमेखलाचे हे वागणे अयोग्य वाटत नाही कां? तिने आपला निर्णय का बदलला? तिने तर असा संदेश पाठवला होता की; राजा चंद्रगुप्तने जर आपल्या मंत्र्याला दंड देऊन राज्याबाहेर काढले तरच ती त्याच्याशी विवाह करेल असे असतांना तिच्या वडिलांनी चंद्रगुप्त हल्ला करून आला असता मैत्रिचे संबंध स्थापन करून आपल्या मुलीचे लग्न त्याच्याशी कसे काय लावून दिले? ह्या शंकाचे समाधानकारक उत्तर माहित असूनही तू दिले नाहीस तर त्याचा परिणाम तुला माहितच आहे तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील."

त्याचे उत्तर देत विक्रमादित्य म्हणाला– "कांचनमेखलाचे वागणे योग्यच आहे. तिला प्रथम पासूनच माहीत होते की; राजा चंद्रगुप्तने आपल्या वडिलांना वचन दिले होते की; मी मंत्र्याच्या सल्लयानेच राज्य करीन. त्यामुळे त्याच्या हो ला हो करूनच तो राज्य कारभार चालवित होता. तो एक प्रकारे परावलंबी होता. त्यामुळे असा माणूस नेहमी आपली बुद्धी घालवून बसतो. व एखाद्याच्या हातातले खेळणे बनतो. परंतु चंद्रगुप्तच्या मध्ये स्वत: निर्णय घेण्याची पात्रता होती. म्हणून त्याने मंत्र्याला राज्याबाहेर हाकलून दिले नाही. व स्वत:हाच्या चार्तुयाने जयपालवर स्वारी केली. हि परीक्षा पहाण्याकरीताच तिने मंत्र्याला राज्याबाहेर हाकलून देण्याकरीता राजा चंद्रगुप्तला सांगितले होते. पण त्याने स्वत:हाच्या निर्णयाने जयपालच्या राज्यावर हल्ला केला. त्यामुळे हे नक्की होते की; चंद्रगुप्तच्या मध्ये असलेली सुप्त शक्ति बाहेर पडली म्हणून तिने चंद्रगुप्त बरोबर विवाह करण्याचे ठरविले.

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृष्य झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)





रामनाथ काही कामा करीता शेजारच्या गावी जायला निघाला. तेव्हां त्याची बायको काही कामात गुंतली होती. त्याने जाता जाता तिला हाक मारून बोलावले व सांगितले–"हे बघ, रात्री जर मला घरी यायला उशिर झाला व मी आलो नाही. तर पहाटे पर्यंत नक्की परत येईन."

रामनाथच्या बायकोला माहीत होते की; आपला नवरा रात्रीच्या अंधाराला खूप घाबरतो. त्यामुळे तिने आठवण करून देत नवऱ्याला म्हटले–"अहो! तुम्ही तर रात्रीचा प्रवास करायला घाबरता मग अंधार पडल्यावर कसे काय घरी येणार?"

ते ऐकून रामनाथन थोडेसे खेदाने म्हणाला–"जेव्हां मी काही म्हणेन त्यात नेहमी मोडता घालण्याची तुला संवयच लागली आहे नां? तू बघच मी सकाळच्या आत घरी येऊन पोहोचतो की नाही."

"पोहोचल्यावर बघू हो! तुम्ही आजपर्यंत म्हणाल ती गोष्ट कुठवर खरी होते ते पहाताच येईल" बायको हसत म्हणाली.

त्या पती-पत्नीला वाद-विवाद घालणे म्हणजे काही विशेष वाटत नव्हते. परंतु कुठलीही गोष्ट बायको म्हणले तशीच होणे हे एक प्रकारचे रामनाथला लाजीरवाणे वाटण्यासारखे होते. म्हणून घरातून जाता जाता त्याने निश्चय केला की कोणतेही कारण न काढता सकाळच्या आत घरी पोहचायलाच पाहिजे.

तो जाता जाता गावाची हद्द सुद्धा ओलांडून गेला नाही. तो शेजारच्या गावचा एक माणूस भेटला. रामनाथने त्याला ओळखले व विचारले–"अरे जगन्नाथ, काय मलाच भेटायला येत आहेस कां?

"हो बाबा! छोटे पंडीत काही कामाकरीता बाहेर गांवी गेले आहेत. आपल्याला






एका आठवड्याने भेटायला सांगितले आहे." जगन्नाथ म्हणाला.

रामनाथ म्हणाला–"ठिक आहे, असे म्हणत तो घरी परत यायला निघाला. परंतु वाटेत त्याचा मित्र गोविन्दच्या घरी जाऊन त्याने ती गोष्ट त्याला सांगितली.

"तर आता असे केले पाहिजे? तू सरळ आपल्या घरी परत जा." गोविंदने रामनाथला सांगितले.

"नाही, नाही. मी गुपचुप आज तुझ्याच घरी राहीन. रात्र होताच घरी परत जाईन ह्याकरीता मी बायको बरोबर पैज लावली आहे. त्यात मला यश आले पाहिजे." रामनाथ मित्राला म्हणाला.

गोविंदाने त्याचे म्हणणे ऐकले. त्याची बायको मोहरी गेल्यामुळे गोविंदने आपल्या अजून दोन मित्रांना बोलावून आणले व पत्ते खेळत बसले. वेळ न समजून पहाटे पहाटे सर्वजण झोपी गेले. जेव्हां ते उठले तेव्हां सकाळचे अकरा वाजून गेले होते. उन्ह डोक्यावर आली होती.

गोविंदने रामनाथकडे केविलवाण्या नजरेने पाहिले व म्हणाला–"मित्रा! तुझ्या बायकोचे म्हणणेच खरे ठरणार दिसते. तू तर दुपारचाच घरी पोहचणार आहेस."

रामनाथला अतिशय दु:ख झाले त्याने गोविंदला म्हटले–"आज मी रात्र पडल्या-वरच घरी जाईन."

रात्रीच्या वेळी परतलेल्या नवऱ्याला पाहून रामनाथची बायको त्याला म्हणाली–"शेवटी मी म्हणाले तेच खरे झाले नां? काल रात्री आलाच नाहीत तुम्ही?

"तू सांगितलेस तसे झाले असते तर त्याचा काय फायदा म्हणून मुद्दामच रात्र करून घरी परत आलो." रामनाथ म्हणाला.

रामनाथच्या बायकोला समजेना की, नवऱ्याच्या अशा वागण्यावर हसावे की रडावे ती नवऱ्याचा चेहरा निरखीत गप्प बसून राहिली.





# सर्वात हुषार

धुमंपुर गावचा पाटील चौधरी रामप्रसाद ह्याला एकच नाद होता. तो म्हणजे गावातील अनेक लहान-मोठ्या माणसांना एकत्र बोलावून त्याच्यांसमोर अनेक प्रश्न उभे करणे व त्या प्रश्नांना योग्य ती उत्तरे मिळाली तर, त्या लोकांना वेगवेगळ्या तऱ्हेची बक्षीसे देऊन, स्वत: आनंद उपभोगणे. एकदा त्याच्या डोक्यात एक कल्पना आली. आपल्या गावात जास्तीत जास्त हुषार माणूस कोण असावा?

त्याकरीता त्याने गावातल्या अनेक लोकांना बोलाविले व सर्वात हुषार कोण आहे असा प्रश्न केला? तेव्हां सगळ्यांनी एकच उत्तर दिले "हे काय! आपल्याला माहित नाही? आपल्या गावात हरी, गिरी व सुरी ह्याच्यांहून हुषार कोणी आहे कां? हे उत्तर ऐकून पाटलाचे काम आणखीनच सुलभ झाले.

एके दिवशी पाटलाने त्या तिघांना बोलावून विचारले "मी लोकांकडून असे ऐकले आहे. तुम्ही तिघेही खूप हुषार आहात. परंतु मला तुमच्या तिघांच्या-मध्ये सर्वात कोण हुषार आहे हे पहावयाचे आहे. त्याकरीता तुम्हांला मी एक प्रश्न विचारतो त्याचे उत्तर देण्याकरीता तुम्ही तयार व्हा.

पाटलाचे बोलणे ऐकून तिघांना खूप आश्चर्य वाटले. त्यांना समजेना की पाटलांनी अशी परिक्षा कां घेण्याचे ठरविले? त्याच्यां समोर ठेवल्या जाणाऱ्या प्रश्नांचा थोडा फार अर्थ समजावा. त्याशिवाय उत्तरे देणे योग्य नाही. असा विचार करून तिघांनी एका सुरात विचारले–"तर सांगा, पाहू! ते प्रश्न काय आहेत."

"तुम्हाला तिघांना वेगवेगळ्या वाळ-वंटात खायला प्यायला न देता सोडून देऊन










तुमच्या पैकी जो कोणी आधी येईल त्याला दहा सोन्याची नाणी बक्षिस मिळतील."

मला अशा तऱ्हेचे बुट बनवून द्या, की, त्यांमुळे पायांना वाळू लागणार नाही, आणि वाळू अडकून जाऊन माझ्या चालण्यात फरक पडणार नाही. तेव्हांच मी आपल्या परिक्षेस तयार आहे." हरीने सांगितले.

"मी ह्या गोष्टीचे रहस्य कळून देईन की मी एक कठीण गोष्ट करून कसा बाहेर पडलो. तेव्हां तुम्ही त्याकरीता माझ्याबरोबर आपल्या एका विश्वासू माणसास पाठवा गिरीने पाटलाला सांगितले.

ते उत्तर ऐकून पाटलाला आश्चर्य वाटले व त्याने विचारले–"ह्यात काय मजा आहे की माझा माणूस तुझ्या बरोबर पाठवायचा सरळ सांग तुझा काय हेतू आहे?

"हुषार माणूस नेहमीच आपल्या बरोबर एखादी सोबत ठेवायला पहातो. कोणत्याही कठिण परिस्थितित त्याच्या संमतीने कोणतीही गोष्ट करणे सोपे जाते. त्यातून तुमचा खात्रीचा माणूस तुम्हांला संकटात पडलेला चालणार नाही. त्यामुळे माझा फायदाच होईल. त्याला वाळवंटातून बाहेर पडायला काहीतरी सोपा मार्ग सांगूनच आपण त्याला माझ्या बरोबर पाठवाल.

सुरी म्हणाला–"ही गोष्ट खरी आहे की खूप हुषार माणूस हिमतीने समजुतीने व हुषारीने सर्व गोष्टींना सामोरा जातो. परंतु जाणूनबुजून त्रास सहन करीत नाही. तुम्ही मला मूर्ख समजा, मला काही वाईट वाटणार नाही. ह्या दहा सोन्याच्या मुद्राचा लोभ करून मी माझा जीव संकटात घालणार नाही. मी त्याकरीता असल्या परिक्षा देणार नाही.

हे उत्तर ऐकून पाटलाच्या लक्षात आले की हुषार ह्याचा अर्थ काय? त्याने विचार केला की; हुषारीची परिक्षा पहाण्याकरीता दहा सोन्याची नाणी फुकट घालवणे ह्यासारखी दुसरी हुषारी नाही. त्यामुळे त्याने आपला विचार सोडून दिला व दहा सोन्याची नाणी वाचविली. आणि स्वतःहलाच अती हुषार समजू लागला.



# एकच वाईट सवय

नारायण हा कुमारस्वामींचा एकुलता एक मुलगा होता. जेव्हां तो लग्ना योग्य झाला, तेव्हां आजुबाजुचे माहितीतले लोक कोणीही नारायणला आपला जावई करून घ्यायला तयार होईनात.

एकदा कुमारस्वामींचा बालपणचा मित्र व्यंकटेश. त्याच्याच बरोबर शाळेत शिकणारा ह्या आपल्या मुलीच्या स्थळांकरीता वराच्या शोधार्थ म्हणून त्यांच्याच गावी आला. व त्याच्या घरी गेला. दोघांमध्ये बराच वेळ बालपणच्या गप्पा गोष्टी झाल्या. त्या गप्पाच्या ओघातच व्यंकटेशने आपल्या मुलीकरीता स्थळ पाहायला आल्याचे सांगितले. व म्हणाला–" मित्रा, आपला मुलगा नारायण ह्याच्या बरोबर माझ्या मुलीचे लग्न झाले तर काय छान होईल! पण मी असे ऐकले की नारायण बरोबर कोणीच संबंध जोडावयास तयार होत नाहीत. काय कारण आहे? त्याच्यामध्ये काही वाईट सवयी तर नाहीत नां?"

तुम्ही त्यालाच जाऊन विचारत का नाहीत? कुमारस्वामी हसत हसत म्हणाला.

त्याच दिवशी व्यंकटेशने नारायणला एकटे गाठून विचारले–"मुला, वाईट वाटून घेऊ नकोस तुझ्यामध्ये जुगार खळणे, दारु पिणे अशा वाईट सवयी तर नाहीत नां?

नारायणने झटक्यात उत्तर दिले–"माझ्यात असल्या काही वाईट सवयी नाहीत."

जेव्हां व्यंकटेशने कुमारस्वामीला ही गोष्ट सांगितली, तेव्हां क्षणभर कुमारस्वामी गप्प राहिला व म्हणाला–"माझ्या मुलात हीच एक वाईट खोड आहे. तो कधीही खर बोलत नाही."





# सूर्याबरोबर पैंज

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत होता तेव्हां बोधिसत्वांनी हंसाच्या रूपाने जन्म घेतला. त्यावेळी चित्रकुट पर्वतावर नव्वद हजार हंस रहात होते. त्यात एका हंसांच्या रूपाने बोधिसत्व रहात होते. त्याच्यात अनेक चांगले गुण होते. तो हंस चांगला वेगाने उडत असे. त्यामुळे तो तेथील नव्वद हजार हंसाचा राजा बनला.

अशा अनेक उत्तम गुणांमुळे व शक्तिमुळे सर्व हंस त्याला राजहंस म्हणून संबोधू लागले.

एकदा राजहंस आपल्या कळपा बरोबर तळ्यात् पोहून घरी परतत असतांना वाटेत तो काशी राज्यावरून जाऊ लागला. ते पाहून काशीच्या राजाला आश्चर्य वाटले. त्याला वाटू लागले आपल्या राज्यामध्ये आकाशात सोनेरी हंसांचा गालीचा तर घातला नाही नां! राजाने कुतुहलाने त्या हंसाच्या झुंडीकडे निरखून पाहिले. आकाशात चांदण्यामध्ये जसा चंद्र तसा त्या हंसाच्या मध्ये त्या शोभायमान राजहंसाला पाहून राजा त्याच्यावर मुग्ध झाला.

काशीचा राजा नरेन्द्र त्या राजहंसाचे राजेशाही थाटाचे रहाणे व त्याचे तेजपुंज शरिर व राजोचित वागणे ह्या सर्व गुणांकडे पाहून खूप आनंदित झाला. त्यांनी सुंदर फुलांच्या माळा घेऊन त्यांचा यथोचित आदर सत्कार केला.

राजहंसाने राजाचे अपूर्व आतिथ्य व प्रेमाने केलेला आदर सत्कार स्विकारून आपल्या सर्व परिवारांसमवेत काही काळ तेथेच राहून तो आपल्या घरी परत आला. त्या दिवसांपासून राजाच्या मनांत त्याच्या-बद्दल ओढ निर्माण झाली. त्याचे मन नेहमी राजहंसावरच केंद्रित होऊ लागले व तो दिवसरात्र त्याचाच विचार करू लागला. तो नेहमी डोळे लावून बसू लागला की कोणत्या वेळेस कोणत्या दिशेने राजहंस परत उडत येईल.

एकदा चित्रकुट पर्वतातील राजहंसाच्या टोळीतील दोन पिल्ले राजहंसाच्याकडे आली आणि म्हणाली–"राजा! आम्ही बऱ्याच दिवसांपासून सूर्याच्या बरोबर पळण्याची शर्यत लावण्याच्या विचारात आहोत.

त्यावर राजहंसाने समजावत सांगितले– "अरे, बाळांनो सूर्याच्या बरोबर पळण्याची शर्यत कसली? कुठे सूर्य आणि कुठे तुम्ही. सूर्य म्हणजे काय हे तुम्हा पिल्लांना काय समजणार त्याचा वेग तुम्हांला कसा कळणार? तुम्हांला त्याच्या बरोबर पळता येणे शक्यच नाही. पैज लावून तुमच्या जिवाला मात्र धोका आहे. त्यामुळे तुम्ही असे वाईट विचार सोडून द्या."



पण त्या दोन्ही हंसांच्या पिल्लांना ते सांगणे आवडले नाही. परत काही दिवसांनी ती दोन्ही पिल्ले राजहंसाकडे अनुमती मागायला आली ह्याखेपस पण राजहंसाने त्यांना विरोध केला.

परंतु त्या दोन्ही हंसाच्या पिल्लांनी आपला विचार सोडला नाही. त्यांनी परत तिसऱ्यांदा राजहंसाला विचारले. पुन्हा त्यांनी परवानगी दिली नाही.

शेवटी आपली शक्ति व असमर्थता न समजता ती दोन्ही पिल्ले आपल्या राजाचे म्हणणे डावलून उडत उडत युगन्धर पर्वताच्या शिखरावर गेली. ते पर्वताचे टोक इतके उंच होते की; जणुकाही आकाशालाच टेकले आहे असे भासे. ती दोन्ही पिल्ले त्या पर्वताच्या टोकावर जाऊन सूर्याच्या बरोबर पळण्याचा विचार करू लागली.

त्यानंतर राजहंसाने आपल्या सर्व परिवारांची संख्या मोजली. तेव्हां दोन हंस कमी आढळले. तेव्हां ही गोष्ट त्याच्या ताबडतोब लक्षात आली, थोडा विचार केल्यावर ती गोष्ट काळजी करण्या-सारखी त्या आहे असे समजून तो चिंतातूर झाला. परंतु परिस्थिती आता काळजी



करण्यासारखी होती? त्याना कुठल्या ना कुठल्यातरी प्रकाराने वाचवावे.

राजहंस उडत लगेच युगन्धर पर्वताच्या शिखरावर पोहोचला. आणि हंसांच्या पिल्लांना दिसणार नाही. अशा तऱ्हेने एका जागी लपून बसला. दुसऱ्या दिवशी सुर्योदय होताक्षणीच ते दोन्ही लहान हंस सूर्याबरोबर पळण्या करीता उडू लागले. राजहंसाने सुद्धा त्यांचेच अनुकरण केले.

त्या दोन्ही हंसातील लहान हंस दुपार पर्यंत उडत राहिला आणि पंखाच्या वेदनेने चक्कर येऊन खाली पडू लागला. पडता-पडता त्याने राजहंसाला पाहिले. आणि काकुळतीने त्याला म्हणाला-"राजा, माझ्या-कडून हे जमले नाही मी हारलो. मला वाचव.

ह्यावर राजा त्याची सांत्वना करीत म्हणाला—"काही हरकत नाही." मी तुला मदत करतो. असे गोड गोड बोलून त्याने त्याला आपल्या पंखावर बसवून घेतले. आणि आपल्या घरी आणून इतर हंसाच्या-मध्ये सोडून दिले.

त्यानंतर थोड्यावेळाने दुसऱ्या पिल्लाचे पंख दु:खू लागले. तो वेदनेने कण्हू लागला. शेवटी खाली पडू लागला. पडता पडता त्याने राजहंसाला पाहिले व दिनतेने आपल्याला वाचविण्या करीता विनवू लागला. राजहंसाने त्याला पण आपल्या पंखावर बसवून चित्रकुट पर्वतावर आपल्या सहचऱ्यांच्यात सोडून दिले.

आपल्या कुटूंबातल्या दोन लहान पिल्लांना सूर्याच्या तापाने होणाऱ्या वेदना पाहून राजहंसाला खूप दु:ख झाले. त्यामुळे तो स्वत:हा सूर्याशी पैंज लावण्याच्या निश्चयाने निघाला. राजहंसाने वेगाने उडावयास प्रारंभ केला. आणि थोड्या-वेळातच सूर्यबिंबाजवळ जाऊन त्याला ओलांडून पलिकडे जाऊ लागला. त्याला फक्त सूर्यशक्तिच पहावयास पाहिजे होती. परंतु त्याच्याबरोबर पैज लावण्याची काय जरूर होती?



अशातऱ्हेने राजहंस थोडावेळ आपल्या इच्छेप्रमाणे उडत राहिला व नंतर भुलोकात उतरून काशी राज्यात येऊन पोहोचला. राजहंसाच्या प्रतिक्षेने व्याकुळ झालेला राजा नरेन्द्र त्याच्या आगमनाने अत्यंत आंनदित झाला.

राजहंसाला आपल्या शेजारच्या सोनेरी सिंहासनावर बसवून घेत एका सोन्याच्या थाळीत खीर व पेल्यात सरबत देऊन त्याने त्याचा आदर सत्कार केला. राजहंसाने ते सर्व खाऊन पिऊन आपला थकवा दूर केला.

राजहंसाने राजाला सूर्याबरोबर लावलेल्या पैंजेचा सारा वृत्तांत सांगितला.

सर्व ऐकून घेऊन राजा राजहंसाच्या अलौकिक शक्तीवर अत्यंत प्रसन्न होऊन त्याला म्हणाला—"हे पक्ष्यांच्या राजा, सूर्याच्याबरोबर पैंज लावून जास्तीत जास्त आपली थोर शक्ति आणि आपली कर्तुत्वता कशी दाखव. ते पहाण्याकरीता मी आसुसलो आहे." राजहंसाने राजाला आपल्या शक्तिचे महात्म्य सांगुन म्हटले—"राजा, आपल्या राज्यात विजेच्या वेगाने धनुष्यबाण चालवणाऱ्या अशा चार धनुर्धारींना इथे बोलव. तसे राजाने चार धर्नुधारींना बोलावले.

राजाच्या उद्यानात मध्यभागी एका चौकोनी चबुतऱ्यापाशी राजहंसाने चारी धर्नुधारींना चारी कोपऱ्यांत उभे केले. त्यानंतर आपल्या गळ्यात एक घंटा बांधून तो त्या चबुतऱ्यावर जाऊन बसला.



"मी इशारा करताच तुम्ही चौघांनी आपापले बाण सोडा. मी येथून उडून जाऊन तुमचे चौघांचे बाण आणून तुमच्या-पाशी देईन. परंतु तुम्ही माझ्या गळ्यात बांधलेल्या घंटेच्या आवाजावरून माझ्या वेगाचा अंदाज घ्या. कोणत्याही परिस्थिती तुम्ही मला पाहू शकणार नाहीत." राजहंस म्हणाला.

राजहंसाने विद्युत् गतीने जाऊन सांगितल्याप्रमाणे त्या चौघांचे सोडलेले बाण त्याच्या समोर आणून टाकले.

राजा व त्याची जनता सर्वांना अचंबा वाटला. सर्वजणांनी आश्चर्याने तोंडात बोटे घातली. त्यावर राजहंस म्हणाला– "राजा, तुम्ही माझा जो वेग पाहिलात तो साधारण आहे. त्यावरूनच तुम्हांला माझ्या खऱ्या वेगाची कल्पना येईल."

राजाने मोठ्या उत्सुकतेने विचारले– "हे पक्षीराज, तुझ्या वेगाचा अंदाज तर आम्ही आताच पाहिला, परंतु ह्याच्याही पेक्षा वेगवान कोणी आहे का?

ह्यावर राजहंस म्हणाला–"का नाही? माझ्याही पेक्षा अधिक वेगवान अशी एक महाशक्ति आहे. ती म्हणजे काळ नावाचा साप हा काळ साप क्षणागणिक जगातील प्रत्येक प्राणिमात्राचा अत्यंत वेगाने नाश करीत चालला आहे."

हे सर्व ऐकून राजा खूप घाबरून गेला.

तेव्हां राजहंसाच्या रूपात असलेले बोधिसत्व काशीच्या राजाला उपदेश देत म्हणाले–"राजन्, जे लोक लक्षात ठेऊन असतात की काळ सर्प नावाची काही गोष्ट आहे. त्यांना घाबरण्याची काहीच जरूर नाही. तू जो पर्यंत चांगल्या तऱ्हेने नीति व धर्माचा सांभाळ करीत रहाशिल. तो पर्यंत तुला कोणत्याही गोष्टीची भीती वाटता कामा नये. त्यामुळे तू योजनापूर्वक आपल्या कर्तव्याचे पालन करीत जा."

बोधिसत्वाच्या उपदेशा प्रमाणे काशीच्या राजाने धर्ममार्गाने आपल्या राज्याचा सांभाळ केला व पुष्कळ यश प्राप्त केले.





## लॉर्ड बेंटिक-लॉर्ड डलहौसी

एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वी पासुन इंग्रजांनी भारतात आपल्या राज्याचा विस्तार अनेक समस्यांना तोंड देऊन हळूहळू सुदृढ आणि घट्ट केला. त्यामुळे भारतातील राजकर्त्यांचा अधिकार कमी झाला.

मध्य भारतात पेंढारी नावाच्या लुटारूंनी गावोगावात जाऊन लुटालूट सुरू केली. त्याच्यावर दाब आणण्या-करीता इंग्रजांनी पुष्कळ प्रयत्न केले. लुटारूंचा पुढारी पठाण अमीर खाँ ह्याने इंग्रजांचे सुत्र आपल्या हाती घेतले. व तो टोंकचा नवाब झाला. चिट्टु नावाचा आणखी एक पुढारी जंगलात पळून गेला. तेथे एका वाघाने त्याला खाऊन टाकले.





त्यावेळेस भारतात काही काही ठिकाणी पती मेल्यानंतर सती जाण्याची चाल होती. सुरवातीला ती श्रद्धा आणि भक्ति याचे प्रतिक मानले जाई; परंतु हळूहळू त्याचे रूपांतर भयंकर वाईट मार्गाने होऊ लागले. त्याला आळा घालण्याकरीता लॉर्ड बेंटिकनी एक कायदा काढला.



त्याच सुमारास काही भागात ठग नावाच्या लुटारूंनी बरीच धळबळ माजवून दिली. लॉर्ड बेंटिंकनी त्याला सुद्धा दबाव आणला व चोऱ्यामाऱ्या लुटालुट ह्यापासून जनतेचे रक्षण केले.

काही प्रदेशांत धान्य उत्पादना करीता नरबली देण्याची चाल प्रचलित होती. ती वाईट गोष्ट त्याने नष्ट केली, लॉर्ड बेंटिंकला समाज सुधारक म्हणून चांगले नांव मिळाले.





जेव्हां भारतातील राजे आपल्या अधिकारापासून परावृत्त होत होते. तेव्हां पंजाबचा महाराजा रणजीत सिह हा आपले शौर्य दाखवित होता. त्याच्या नेतृत्वाखाली सर्व शिख लोक एकजुटीने रहात होते. भविष्य-काळातील विचार करून रणजीत सिंहनी इंग्रज सरकार बरोबर मैत्रीचे संबंध जोडले.













१८४६ साली लॉर्ड डलहौसी भारताचा गव्हर्नर जनरल झाला. रणजीत सिहच्या मरणानंतर भारतात शिख आणि इंग्रजाचे युद्ध सुरू झाले. शेवटी डलहौसीने शिखांना पराजित करून पंजाबला भारतातील, इंग्रजांच्यात सामिल करून घेतले. अशा तऱ्हेने इंग्रजांचे राज्य पेशावर पासून बर्मा पर्यंत जाऊन प्रसरले.





डलहौसीने एक कायदा काढला की ; ज्या राजाला मुलगा नाही, त्याचे राज्य ईस्ट इण्डिया कंपनीच्या अधिकारात जाईल. परंतु त्याला हे माहीत नव्हते की, हा कायदा भारतिय परंपरेच्या विरूद्ध आहे. आणि त्याने तेथील राजांच्या गौरवाला काळीमा लागेल.

ह्या कायद्यामुळे नागपूर, संबळपूर आणि सातारा ही राज्ये ब्रिटिशांच्या स्वाधिन झाली. १८५३ साली झाशीचा राजा गंगाधर राव यांनी एक दत्तक मुलगा घेतला. परंतु डलहौसीने त्याला मान्यता दिली नाही. दत्तक विधानानंतर त्याचा मृत्यु झाला.















त्याच वर्षी महाराष्ट्राची गादी चालवणारा दुसरा बाजीराव याने नाना साहेबाला आपला वारस केले. डलहौसीने त्याला सुद्धा अनुमती दिली नाही. त्यामुळे नानासाहेब इंग्रजाचे कट्टर शत्रु बनले.

साम्राज्यवादी असून सुद्धा डलहौसीने देशाच्या विकासा करीता खूप मेहनत केली. त्याच्याच प्रयत्नाने १८५३ मध्ये मुंबई पासून ठाण्यापर्यंत भारतात पहिला रेल्वेमार्ग सुरू झाला.





त्याच्याच वेळेला जलद संदेश नियंत्रण सुरु झाले. त्याकरीता आठ आणे किमत लावली गेली. कलकत्ता, मुंबई, मद्रास अशा ठिकाणी विश्व-विद्यालय स्थापन करण्याचा खटाटोप पण ह्यानेच केला.



# "मी मूर्ख आहे"

एका गावात एक सावकार रहात होता. त्याचे नाव होते मणिभद्र. त्याच्याकडे अलोट धनसंपती होती. शिवाय एक मोठी बाग पण होती. त्याबागेत सर्वतऱ्हेच्या फळांची झाडे लावलेली होती. तेथेच कोपऱ्यात एका झोपडी तो रहात असे.

मणिभद्र महा कंजूष होता. बागेतील फळे तो स्वतःही खात नसे व दुसऱ्या कोणालाही खाऊ देत नसे.

झाडावरून फळे काढण्याकरीता त्याने बरेच नोकर ठेवले होते. ते फळे तोडून टोपलीत ठेवीत असत, मणिभद्र जातीने सर्व टोपल्या मोजत असे आणि प्रत्येक फळामागे चार आणे आठ आणे, रुपया असा हिशोब लावत असे.

एकदा एका नोकराने एक पडलेला आंबा उचलला व खाल्ला. मणिभद्र ओरडत म्हणाला–"अरे वारे! त्या फळाची किंमत एक रुपया आहे. तुझी दिवसाची मजूरी फक्त आठ आणे आहे. तेव्हां तुला आजची मजूरी मिळणार नाही. आणि आणखी आठ आण्या करीता तुला उद्या माझ्या बागेत काम केले पाहिजे."

नोकर सकाळ पासून काहीही न खाता कामावर आला होता. त्याने एक पडलेला आंबा उचलून खाल्ला तर त्याची एक दिवसाची मजूरी गेली. त्यामुळे मणिभद्रच्या बोलण्याचा त्याला भयंकर राग आला. दोघांमध्ये बोलण्यास बोलणे वाढले. त्यांनी एकमेकांना शिव्या देण्यास व मारण्यास सुरवात केली. नोकराने मणिभद्रला भरपूर चोप दिला. त्या दिवसा-पासून मणिभद्रनी सर्व नोकरांना कामावरून काढून टाकले.

पिकलेली फळे पाहून केव्हां केव्हां मणिभद्रच्या तोंडाला सुद्धा पाणी सुटत

       



असे. परंतु तो आपल्या मनावर ताबा ठेवत असे. व म्हणत असे–"एक आंबा कमीत कमी चार आण्याला तर विकला जाईल. जर मीच खात बसलो तर पैशांच्या मिळकती मध्ये तुटवडा निर्माण होईल."

असेच काही दिवस निघून गेले वेगवेगळी फळे पिकून गळून पडू लागली ती उचलून टोपलीत भरायला एकही कामगार परत आला नाही. शेवटी ती तशी पडलेली फळे पाहून गावातील माणसे मणिभद्रला मजूर लावण्याकरीता सल्ला देत असत. तेव्हां तो म्हणत असे–"मी इतका काही मूर्ख नाही, की मजरांच्यावर विश्वास करू. फळ काढायच्या वेळेस ती फळे हे सर्व खात होते. जर खाल्लेल्या फळाची किमत देण्यास सांगितले तर मारहाण करू लागत. अशा अवस्थेत फूकट मजुरांना ठेऊन निष्कारण डोक्याला ताप करून कशाला घ्या."

एकदा मणिभद्र आपल्या बागेतील फळांची झाडे मोजत मोजत फिरत होता. की, बागते किती झाडे आहेत? कोणत्या झाडाला किती फळे आहेत? किती फळे खाली पडली आहेत?

मणिभद्र बागेत हिंडत असतांना झाडाच्या फांदीवर बसलेला एक पक्षी मधुर स्वरात गाऊ लागला. तो दिसायला चिमणीसारखा होता. त्याची शेपटी इंद्रधनुष्याच्या सात रंगासारखी होती. त्या छोट्या चिमणीचे ते सुस्वर संगीत ऐकून असे वाटत होते की वाळलेल्या झाडांना सुद्धा पालवी फुटत आहे की काय?

पक्ष्याचे ते गोड गाणे ऐकून मणिभद्र मंत्रमुग्ध झाला. त्याने पक्ष्याच्या पाठी-मागून जाऊन त्याला आपल्या हातात पकडले. पक्ष्याने थोडी फडफड करून उडण्याचा प्रयत्न केला व रागारागाने त्याला चोच मारली.

"मणिभद्रा, मला जर सोडलेस तर तुला लाभ मिळणाऱ्या तिन गोष्टी मी तुला सांगेन–" पक्षी म्हणाला.



पक्षाच्या तोंडून अलेली मानववाणी ऐकून मणिभद्र प्रथम खूप घाबरू गेला. व त्याला म्हणाला–"खरंच का तू मला लाभ होईल अश्या गोष्टी सांगणार?"

त्याने विचारले की; धनाचा लाभ होईल अशी गोष्ट असेल तर सांगा.

"हो, हो, खरोखरी धनाचा लाभ होईल अशीच गोष्ट सांगणार आहे." पक्ष्याने ठामपणे सांगितले.

तेव्हां मणिभद्रने चिमणीला हातातून सोडून दिले. दुसऱ्या क्षणीच ती उडून गेली. उडून दुसऱ्या झाडाच्या फांदीवर जाऊन बसली. मणिभद्र कान लावून ऐकू लागला की, पक्ष्याच्या तोंडून केव्हां एकदा लाभाची गोष्ट ऐकायला मिळेल.

मणिभद्रच्या कानावर जेव्हां 'लाभ' हा शब्द पडला. तेव्हां तो आपला विवेक घालवून बसला. पक्षी बोलू लागला–"हे बघ बाबा, कान उघडून ऐक, माझे पहिले वचन आहे–जे नाही त्याची चिंता कशाला."

कया मला एवढे सुद्धा कळत नाही कां? ह्या सर्व गोष्टी तर मी लहानपणी माझ्या शाळेतच शिकलो आहे. तुझ्या असल्या गप्पा ऐकायला मी काही मूर्ख नाही" मणिभद्र रागाने म्हणाला.

मणिभद्र तू खरोखरी मूर्ख आहेस. नाहीतर इतका वेळ मला आपल्या हातात पकडून सुद्धा तुला कळले नाही की, माझ्या शरिरामध्ये एक मण सोने भरले आहे" पक्षाने गंम्मत करीत म्हटले.

एक मग सोने? अरेरे, मी खूप मूर्ख-पणा केला, तुला सोडून देण्यात मी किती चूक केली." असे म्हणत मणिभद्रला पश्चाताप होवू लागला.

ह्यावर पक्षी खळखळून हसत सुटला आणि पंख फडफडवून म्हणाला–"मणिभद्र, तू खरोखरच मूर्ख आहेस, अत्यंत मूर्ख. शेवटी तू कसा विश्वास करतोस की; एका छोट्या चिमणीच्या आकाराच्या माझ्या शरिरात एक मण सोने कसे काय असु शकेल?

मणिभद्र रागाने दात ओठ खात राहिला. परंतु त्याची फिकीर न करता पक्षी पुन्हा: म्हणाला-माझे दुसरे वचन ऐक कोणीही काहीही म्हटले तरी सगळ्याच गोष्टीवर विश्वास करू नये.

"ह्यं: ही गोष्ट! मी लहानपणीच वाचली आहे. ह्यात काय नाविन्य? मणिभद्र आग पाखडीत म्हणाला.

"तू तर असा मूर्ख आहेस: की जणुकाही सर्व काही आपल्याला माहित असल्याच्या घमेंडीत. आता माझी तिसरी गोष्ट ऐक– "आपल्या मुठीत असलेल्या लक्ष्मीचा त्याग करून तू झाडांमध्ये असलेल्या लक्ष्मीला शोधू नकोस.

हे ऐकताच मणिभद्र रागाने लाल झाला व वेड्यासारखा त्या चिमणीला जाऊन पकडू लागला. त्याला अजुनही विश्वास वाटत होता की, तिच्यात खरेच सोने सापडेल. त्याच लोभाला बळी पडून तो त्या पक्षाला पकडून सोने काढण्याच्या प्रयत्नात होता. त्याच बरोबर त्या पक्षाला त्याच्या मूर्खपणाचा चांगला धडा शिकवावा ह्याच विचारात होता. त्यामुळे ती जिथे जिथे उडून जाई तेथे तेथे तो धावून जात होता.

तेवढ्यात एकाएकी तुफान वादळ झाले. आणि झाडाची वाळकी पाने व झाडे उन्मळून पडू लागली.

तेव्हां भीतीने मणिभद्राने डोळे घट्ट मिटून घेतले. जेव्हां त्याने डोळे उघडले. त्यावेळेस त्याच्या बागेतील सर्व झाडे भुईसपाट झाली होती. फांदीवर बसलेला छोटा पक्षी सुद्धा अंतर्धान पावला होता. मणिभद्रच्या झोपडीचे छत सुद्धा वादळाने उडून गेले होते. तेथे फक्त चार भितीच दिसत होत्या.

"लक्ष्मी देवीने मला सर्व बाजूनी धनसंपत्ती दिली. परंतु मी त्याचा उपभोग घेऊ शकलो नाही. शेवटी सर्वच बाग धुळीला मिळाली. जेवढी म्हणून माझ्याजवळ संपत्ती होती. तेवढी पण घालवून बसलो. खरोखरच मी एक मूर्ख आहे." असे म्हणत तो शोक करू लागला.





# प्रामाणिक नोकर

प्रसाद राधानगरीत रहाणारा सुखी आणि संपन्न माणूस होता. त्याचा मोठ्या थाटामाटात विवाह झाला. त्याची पत्नी एका श्रीमंत घराण्यातील होती. तिचे नाव भावना. प्रसादला आपल्या बायकोच्या वाढदिवसा निमित्ताने एक हिऱ्यांचा हार तिला देण्याचे मनांत होते. त्यामुळे हार घेण्याकरीता तो एक दिवस आधीच शहरांत गेला.

शहरातून घरी यायला खूप उशिर होईल व अंधार होण्याआधी घरी परत यायला पाहिजे म्हणून त्याने आपला घोडेवाला द्वारका ह्याला गाडी जोरात हाकांयला सांगितले.

द्वारकाने डोके हलवून घोड्यांना चाबूक हाणला. तशी गाडी वेगाने धावू लागली. थोडी पुढे गेली नाही, तोच कच् कच् आवाज करीत गाडी थांबली–"गाडी कां थांबवलीरे?" प्रसादने द्वारकाला रागावत विचारले.

द्वारकाने गाडी बाजूला उभी करीत एका माणसाकडे बोट दाखवित म्हटले– "मालक! हा माणूस माझ्या बायकोचा मावस भाऊ लिलाराम आहे. हा सुद्धा आमच्या गावातच रहाणारा आहे. ह्याचा आजोबा खूपच आजारी आहे. तेव्हां हा जर गावी लवकर पोहोचला तर आजोबांचे शेवटचे दर्शन तरी त्याला घेता येईल. आपली अनुमती मिळाली तर आपल्या बरोबर ह्याला सुद्धा गाडीतून नेता येईल.

तसे प्रसादला कोणालाही आपल्या गाडीत बसवून न्यायला पसंत पडत नसे. तो खेकसत म्हणाला–" म्हणजे ह्याचा अर्थ असा की, हा आपल्या गाडीतून येणार आहे ठिक आहे. त्याला आपल्या गाडीत बसायला सांग" तेव्हां द्वारकाचा तो

संकेत देव

















नातेवाईक प्रसादला नमस्कार करीत गाडीत येऊन बसला.

गाडी परत चालू झाली. जोरात गाडी पळवण्याकरीता द्वारका घोडयांना चाबकाचे फटकारे ओढत होता. रस्त्यात बरेच खड्डे होते. त्यामुळे गाडी कधी डाव्या तर कधी उजव्या बाजूला कलंडत होती. तेवढयात गाडीचे एक चाक एका खड्यात गेलेच व गाडी खाली वाकली. द्वारकाने गाडीतून चटदिशी उडी मारली. परंतु प्रसाद व लिलाराम गाडीतून खाली पडले. प्रसादचे सर्व सामान फळांच्या टोपल्या व इतर काही वस्तू रस्त्यावर इत:स्तता विखुरले गेले.

लिलाराम उठून उभा राहीला. नंतर द्वारकाने व लिलारामने मिळून प्रसादला उठवण्याकरीता मदत केली. प्रसादच्या उजव्या पायाला थोडे खरचटले होते. नंतर द्वारका व लिलारामने आपली ताकद एकवटून गाडीचे चाक बाहेर काढले. द्वारकाने आजूबाजूला पडलेले सामान गोळा करून गाडीत चढवले आणि गाडी चालू केली. व गावात पोहोचली.

प्रसाद गाडीतून उतरला व लंगडत-लंगडत आपल्या घरी आला. आत जातो तोच त्याच्या बायकोने त्याला अतिशय उत्साहाने विचारले–"माझ्या वाढदिवसाची भेट कुठे आहे?" ते ऐकताच प्रसादला मनांतून अतिशय दु:ख झाले की; बायकोने लगडण्याबद्दल न विचारता प्रथम आपल्या भेटवस्तुबद्दल विचारले.

"रस्त्यात आमची गाडी एका खड्यात पडली. आणी आम्ही मरता मरता वांचलो" प्रसाद घडलेला वृत्तांत सांगू लागला.

"त्या गोष्टी नंतर मी शांतपणे ऐकेन प्रथम माझी भेट म्हणून आणलेली वस्तू कुठे आहे ते सांगा. असे म्हणत तिने त्याच्या हातातून पिशवी हिसकावून घेतली. व त्याच्यातून तांबडी पेटी बाहेर काढली.

भावनाने तांबडया पेटीचे झांकण उघडता उघडता म्हटले–"माझी मैत्रीण आजच सकाळी गावाहून आली. तेव्हां तुम्ही कमी किंमतीची भेट वस्तु तर नाही नां आणलीत? ते पहाते" असे म्हणत भावनाने पेटीचे झांकण उघडले. आणि आश्चर्यचकित होऊन नवऱ्याच्या चेहऱ्याकडे पाहू लागली. त्यात त्याने आणलेला हार नव्हता.

भावनाने रागाने नवऱ्याकडे पाहिले व म्हणाली–"हे काय वाढदिवसाची हीच भेट? असे म्हणत पेटी खाली फेकून देत फणकारत ती स्वयंपाक घरात गेली.

बायकोच्या मूर्खपणाचा प्रसादला खूप राग आला. तो विचार करू लागला–"प्रथम तर कोणी चोरी केली याचा शोध लावला पाहिजे. बहुदा लिलारामचेच हे काम दिसते आहे." असे म्हणत तो बाहेरच्या व्हरांडयात गेला. तेथे द्वारका घोडयाला दाणापाणी घालून घरी घेऊन जाण्याच्या विचारात होता. प्रसादने त्याला पहाताच हटकले–तू बायकोचा भाऊ आहे असे सांगून एका चोराला माझ्या गाडीत आणून बसविलेस. जेव्हां गाडीतून माझे सामान खाली पडले तेव्हां ते उचलून ठेवता ठेवता त्याने माझ्या पेटीतला दहा हजारांचा हार चोरला. आणी रिकामी पेटी माझ्या पिशवीत भरली. आताच्या आता जाऊन त्याच्याकडून माझा हार आणून मला दे."



दहा हजारांचा हार चोरीला गेल्याचे ऐकूनच द्वारकाला कुऱ्हाड कोसळल्या सारखे झाले व तो आपल्या घरी गेला.

द्वारकाची बायको दारातच उभी होती. तिच्यावर दातओठ खात द्वारका म्हणाला–"तुझे नातेवाईक चोर आहेत. तुझा भाऊ लिलाराम ह्याने व आजोबांच्या आजाराचे कारण काढून गाडीत चढला आमच्या मालकाच्या पिशवीतल्या पेटीतला दहा हजार रूपयांचा हार चोरला. तेव्हां आताच्या आता जा आणि तो हार घेऊन ये."

द्वारकाच्या बायकोने जेव्हां ऐकले की, आपले आजोबा मरणाला टेपले आहेत. तेव्हां लिलारामनेच मालकाचा हार



चोरला आहे हे ती अजिबात विसरून गेली. "आजोबा खूप आजारी आहेत?" मला कुणी कळवले कसे नाही." असे म्हणत धावत ती आईच्या घरी निघाली.

प्रसाद लंगडत घरात गेला नाही तोच त्याच्याच घरातून त्याच्या बायकोच्याच वयाची एक बाई दारातून बाहेर पडून गल्लीतून वळून गेली. प्रसादने तिला निरखून पाहिले व विचार केला की; ही बाई कोण असावी? एवढ्यात त्याची बायको तेथे येऊन पोहोचली व त्याचा हात पकडीत म्हणाली— "आपल्या पायाचे दुखणे कसे आहे? माझी मैत्रिण आली होती; माझ्या वाढदिवसाचे तुम्ही काय आणलेत ते पहायला. परंतु तिने माझे चांगलेच डोळे उघडले. आज पर्यंत आपल्या बरोबर मी मूर्खपणानेच संसार केला. मला क्षमा करा.

हे ऐकताच प्रसादचा आनंद गगनात मावेनासा झाला. त्या आनंदात तो आपल्या पायाला लागले आहे व दहा हजारांचा हार चोरीला गेला आहे हे अजिबात विसरला. आपल्या बायकोचा आधार घेऊन खुरडत खुरडत तो घरात आला.

दुसऱ्या दिवशी सकाळीच प्रसाद घराच्या उंबरठ्यात द्वारकाची वाट पहात बसला होता. तेवढ्यांत प्रसादने ज्याच्याकडून हार विकत घेतला. तो सराफ आला. व शरमिंदा होता त्याला म्हणाला—"साहेब मला माफ करा, आमच्या नोकराने काल आपल्याला हाराची पेटी द्यायच्या ऐवजी रिकामी पेटीच चुकून दिली. रात्री आम्ही जेव्हां दुकान बंद करू लागलो. तेव्हां आम्हांला ते समजले." असे म्हणत दुकानदाराने त्याच्या हातात हार काढून दिला.

प्रसादला दुकानाच्या मालकाची ईमानदारी पाहून खूप बरे वाटले. त्याने त्याला फराळ करून जाण्यास सांगितले. परंतु मालकाने आपल्या शिवाय दुकानात सर्व काम अडून रहाते सांगून तो निघून गेला. प्रसादने थोडावेळ द्वारकाची वाट पाहिली. व नंतर आपल्या बायकोला हार देण्याकरीता घरात जाऊ लागला. तेवढ्यात द्वारका तेथे येऊन पोहोचला. प्रसादनेच त्याला हार दाखवत म्हटले—"अरे द्वारका, काल मी हार हरवल्याच्या चिंतेत होतो. त्यामुळे एकमात्र चांगले झाले. तुझ्या मालकिणीमध्ये बराच बदल झाला. त्या दुकानाचा मालक तू येण्यापूर्वीच इथे येऊन हा हार देऊन गेला. आता हारा करीता तुला काळजी करण्याचे कारण नाही. जा आता आपले काम बघ."

द्वारकाने दोन्ही हात जोडत प्रसादला म्हटले—"साहेब, लिलारामच्यावर हार चोरल्याचा आरोप आपण केलात, तो पण माझ्या दृष्टीने फारच चांगला झाला."

"कशा तऱ्हेने" प्रसादने विचारले.

"मी घरी पोहोचताच बायकोला तिच्या आजोबांकडे पाठविले. तेव्हां लिलाराम ह्या आशेने तेथे गेला होता की; आपल्या आजोबांची उरली सुरली इस्टेट आपल्याला मिळेल. म्हाताऱ्याने जेव्हां त्याला काहीच दिले नाही. तेव्हां तो त्याला शिव्या घालत आपल्या गावी निघून गेला. परंतु माझ्या बायकोने रात्रभर आजोबांची सेवा केली. तेव्हां तिच्यावर प्रसन्न होत, आजोबांनी माझ्या बायकोला संपत्ती कुठे लपविली आहे ते सांगितले. आणि माझ्या कडून आपले शेवटचे क्रियाकर्म करण्यास सांगितले." द्वारका म्हणाला.

"अरे वा! वा! तू तर भाग्यवान निघालास. पण हे सांगितले नाहीस की म्हातारा किती संपत्ती मागे सोडून गेला? प्रसादने विचारले.

"मालक, खूप संपत्ती मी व्यापार सुरू करणार आहे." द्वारका विनयाने म्हणाला.

काल रात्री उगाचच आपण द्वारकावर आरोप केला व त्याला बोललो. प्रसादला वाईट वाटले. त्याला त्याचे खूप दु:ख झाले. त्याने त्याच्याकडे दयार्द्र दृष्टीने पहात म्हटले—"शेवटी हारामुळे आपल्या दोघांचेही चांगले झाले आणि हे बघ, तुला व्यापारात माझी काही जरूर लागली तर निसंकोच मला सांग.









# चांगले काम

उज्वल गावात धनगुप्त नावाचा एक प्रसिद्ध सोनार रहात होता. तो देश-विदेशांत मोठ्या कुशलतेने समुद्रीक व्यापार करीत असे. अफाट संपत्ती मिळवून सुद्धा त्याला दान-धर्म अगर धार्मिक कार्य करायला आवडत नसे. परंतु नेहमी इतरांना म्हणत असे–"मला तुम्ही अगदी कंजूस समजू नका. केव्हां तरी धार्मिक कार्य व. जनकल्याणा करीता मला पुष्कळ वेळ मिळेल. तेव्हांतरी लाखों रुपये खर्चुन गावात एक उत्तम असे मंदिर बांधविन.

एकदा गावातलाच पुजारी धनगुप्तच्या घरी आला व म्हणाला–"कृपा करून देवळाच्या जिर्णोद्धारा करीता पैसा पाहिजे आहे. तो आपण दिलात तर बरे होईल."

तेव्हां धनगुप्त दान देण्याच्या मनस्थितीत नव्हता. परंतु त्या पुजाऱ्याला पहाताच त्याला त्याची कींव आली व त्यानी आत जाऊन शंभर सोन्याची नाणी आणली व पुजाऱ्याला दिली. तेवढ्यात धनगुप्तचा नोकर धावत धावत तेथे आला व त्याने एक किंमती मालाने भरलेले जहाज बुडाल्याचे सांगितले.

धनगुप्तने लगेच पुजाऱ्याकडेच पैसे परत मागून घेतले व तो घरात गेला. पुजाऱ्याला समजले की ; आपले येणे उचीत नाही. म्हणून तो परत निघाला. तेवढ्यात धनगुप्त आतून बाहेर आला व त्याने ते सर्व पैसे पुन्हा पुजाऱ्याच्या हातात दिले व त्याच्याकडे पहात मंदहास्य करीत म्हटले–"देवच माझी परिक्षा पहात आहे की, ज्यावेळेस माझ्याकडे संपत्ती भरपूर आहे, तो पर्यंतच मी चांगले काम करावे. काय सांगावे माझा पैसा केव्हां नाहीसा होईल."





# सुक्ष्म दृष्टी

लोकनाथ आणि शामप्रसाद ह्या दोघांची खूप मैत्री होती. लोकनाथ लक्षाधीश होता. तो शेतीभाती करून किराणा व्यापार पण करीत असे. त्याच्याकडे देवराज नावाचा एक कारकुन होता.

शामप्रसाद नेहमी लोकनाथच्या घरी येत असे. त्याच्याबद्दल सर्वांना आदर होता परंतु देवराजला मालकाबद्दल आदरभाव मुळीच नव्हता. तो आपल्या मालकांने विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर देऊन गुपचुप काम करीत असे. तरी पण शामप्रसादने लोकनाथला देवराजवर रागवतांना कधी पाहीले नव्हते.

एकदा शामप्रसाद तिर्थयात्रेला जाऊन दोन महिन्याने परत आपल्या गावी आला. त्याच दिवशी संध्याकाळी तो लोकनाथला भेटायला गेला. तेव्हां त्याचा कारकून देवराज लोकनाथ बरोबर काही गप्पा टप्पा करीत बसला होता. त्याच्या बोलण्यामध्ये पहिल्यापेक्षांही बराच फरक पडलेला होता. मालकांने काहीही विचारले तरी त्याच्या तोंडून–'हो मालक! बर मालक' असेच शब्द बाहेर पडत होते.

शामप्रसादने थोडावेळ लोकनाथला आपल्या तिर्थक्षेत्रांचे वर्णन ऐकवले आणि म्हटले–"मित्रा, मी तुझ्या कारकूनाला तुझ्याबरोबर अशा तऱ्हेने वागलेले बोललेले कधी पाहिले नाही. हे असे कसे!"

त्या गोष्टी नंतर शामप्रसाद जेव्हां एका आठवड्याने लोकनाथच्या घरी परत आला. तेव्हां त्याचा कारकूनच्या देवराजच्या जागी त्याला दुसराच माणुस दिसला.

शामप्रसादने आश्चर्यचकित होऊन लोकनाथला विचारले–"अरे, तुझा तो देवराज कुठे दिसत नाही? त्याच्या जागेवर दुसऱ्या कुणाला घेतले आहेस वाटते?"







"हो, मी त्याला कामावरून काढून टाकले. त्याच्या जागेवर हा नविन माणूस कामाला लावला आहे" लोकनाथ म्हणाला.

"असे कां केलेस? ह्याच्या आधी मी तुझ्याकडे आलो होतो तेव्हां त्याच्यामध्ये बराच बदल झालेला पाहिला होता." शामप्रसाद म्हणाला.

"त्याच बदलामुळे तर त्याला कामावरून काढून टाकले.

लोकनाथचे म्हणणे शामप्रसादला समजले नाही. तो म्हणाला—"देवराज मध्ये आपल्या मालका विषयी जो आदर पाहिजे तो मी प्रथम पाहिला नाही. तेव्हांच मी विचार करीत होतो की, तुम्ही त्याचे वागणे सहन कसे करीत होतात. परंतु आठवड्यापूर्वीच त्याचे तसे वागणे पाहून मी खरोखरच आश्चर्य चकित व आनंदीत झालो होतो."

तुम्ही जो त्याच्या स्वभावामध्ये बदल झालेला पाहिलांत तोच माझ्या शंकेचे कारण ठरला. आणि त्याचा शोध लावल्यावर ती शंका खरी ठरली. तसा देवराज आपल्या कामाला चोख होता. ह्यात काही शंका नाही. परंतु घरातल्या नोकराप्रमाणे—"होय मालक, बर मालक म्हणून माझ्या प्रत्येक सांगण्याला नंदी-बैलासारखी मान डोलवायची त्याला जरूर नव्हती. परंतु त्याच्या कोणत्याही कामात मला कधी घमेंड किंवा मग्रुरी दिसली नाही. परंतु काही दिवसांपासून त्याच्या गोड बोलण्या पाठीमागे काहीतरी मुरत असल्याची मला शंका आली. जेव्हां त्याचा ठावठिकाणा काढला. तेव्हां ती शंका खरी आहे हे समजले. जो माझ्याकडे कामाला येई त्याच्याकडून ह्याने लांच घ्यायला सुरवात केली. त्यामुळे चिडून मी त्याला कामावरून काढून टाकले" लोकनाथ म्हणाला.

शामप्रसाद लोकनाथच्या बुद्धीचातुर्यावर खुष झाला. व मनातल्या मनात त्याने आपल्या मित्राची वाखाणणी व प्रशंसा केली.





शकुनी हा दुर्योधनाची माता गांधारी हिचा लहान भाऊ व गांधार देशचा राजा सुबल यांचा मुलगा होता. राजा सुबलला एका ज्योतिषाने सांगितले होते की, गांधारीचा विवाह होताच, तिच्या पतीला मरण येईल. त्यामुळे राजा सुबलने तिचा विवाह एका मेंढ्या बरोबर लावून दिला. त्यानंतर पुन्हां तिचे लग्न धृतराष्ट्रा बरोबर झाले. लग्न होताच तो मेंढा मेला.

जेव्हां भीमाने विधवेचा जारज मुलगा म्हणून दुर्योधनाची टिगल केली. तेव्हां दुर्योधनाला ही गोष्ट कळली. दुर्योधन रागाने जळफळू लागला. त्याने सुबल व शकुनीला कैद करून आणले आणि तुरुंगात डांबून ठेवले. त्यांचा भयंकर छळ केला.

सुबलला अंधविश्वास खूप होता. त्यामुळे त्यांने शकुनीला मरणाच्या आधी समजावून सांगितले की, त्याच्या हाडाचे फांसे बनवून तू दुर्योधनाबरोबर प्रतिकार कर. त्या फांसाचे एक महत्व राहील की, जो आकडा मनात धरून फांसा टाकशिल त्याचा जय होईल.

शकुनीच्या फांसाचे गुपीत दुर्योधनाला तुरुंगाच्या पाहेरेकऱ्याने सांगितले. तेव्हां दुर्योधनाने शकुनी मामाला तुरुंगातून सोडले आणि आपला मंत्री बनवले.

त्यानंतर हस्तिनापुरमध्ये शकुनी आणि युधिष्ठीर यांच्या मध्ये सोगट्यांचीपैज लागली. त्यात युधिष्ठीर आपल्या बरोबर आपल्या लहान भावांना व द्रौपदीला जुगारात लावून घालवून बसला.



त्याच वेळेला द्वारकेमध्ये श्रीकृष्ण सत्यभामा बरोबर जुगार खेळत होता. तो स्वत: बरोबर आपल्या सात बायकांना सुद्धा घालवून बसला.

त्यावर सत्यभामा रुक्मिणीला म्हणाली— "आक्का, आता तू आणि माझा पती माझी संपत्ती आहे. तुम्हां दोघांना विकण्याचे किंवा दान करण्याचे सर्व अधिकार मला प्राप्त आहेत."

कृष्णाने विचार करण्याचे सोंग करून 'अक्षय' असा उच्चार केला. कोणालाच समजलें नाही की, श्रीकृष्णाने असे का म्हटले.

त्याचवेळेला हस्तिनापुरात कौरवांकडून हारलेले पांडव भरराज्यसभेत असतांना दु:शासनाने सूडाने द्रौपदीच्या पदराला हात घातला. तेव्हां असहाय्य होऊन द्रौपदी आपला पदर घट्ट धरून श्रीकृष्णाचा धावा करीत हात जोडून. "श्रीकृष्ण" "श्रीकृष्ण" म्हणत होती.

तेव्हां भरसभेत भीमाने विडा उचलला की, ह्याचा बदला घेईन. दु:शासनाची छाती फोडून त्याचे रक्त पिईन व दु:शासनाची मांडी फोडून त्याच्या रक्ताने द्रौपदीची वेणी घालीन.

दु:शासन द्रौपदीचे वस्त्र फेडू लागला. तसा वस्त्रांचा ढीग जमू लागला. अति श्रमानी दु:शासन घेरी येऊन खाली पडला.

द्रौपदी जेव्हां मयसभामध्ये दुर्योधनाला पडतांना पाहून हसली होती. तेव्हां दुर्योधनाने पण केला होता. की भरसभेत हिचे वस्त्र फेडीन व हिला दासी करीन तेव्हांच माझे मन शांत होईल. परंतु आता तो आपली मान खाली घालून कर्ण शकुनि व दु:शासना बरोबर राज्यसभेतून बाहेर गेला.

दुर्योधन. शकुनि, कर्ण आणि दु:शासन हे चांडाळ-चौकडी म्हणून प्रसिद्ध होते.

राग, लोभ, मद मत्सर इत्यादी गुण व अधर्म यांचे मूळ कलि पुरुष यांच्या रुपाने दुर्योधनाने जन्म घेतला होता.

नर नारायणाला पाठ दाखवून पळून जाणारा सहस्त्र कवच धारण केलेला एकच कवच पांघरून पळून सूर्याच्या आत जाऊन लपून बसला. तो अविवाहीत असलेल्या कुन्तीच्या गर्भात सूर्याच्या वरदानाने कर्णाच्या रुपाने जन्माला आला.

कुन्ती पांडु राजाची बायको झाली. तेव्हां नर-नारायणाच्या अंश कुंतीच्या पोटी अर्जुनाच्या रुपे जन्माला आला.

नारायण म्हणजे प्रत्यक्ष कृष्ण भगवान होते. कृष्ण अर्जुनाचा नात्याने मेहुणा आणि बायकोचा भाऊ होता.

दुर्योधनाला खूप विश्वास वाटे की; कर्णासारखा धनुर्धारी जेव्हां आपल्या बाजूने आहे. तेव्हां पांडवाना सुलभतेने पराजित करता येईल.

कुन्तीने कर्णाला टोपलीत घालून नदीत सोडून दिले होते. ते मुल सारथ्याची बायको राधा हिला मिळाले. तिने कर्णाला लहानाचा मोठा केले.

त्या कारणाने कर्णाला "सारथीपुत्र" आणि "राधेय" या नावाने संबोधू लागले. दुर्योधनाने कर्णाला अंगदेशाचा राजा केले. त्यामुळे त्याचा आत्मविश्वास खूप वाढला.

कर्णाला अनेक शाप मिळाले होते. त्याच कारणाने ब्राह्मणाच्या रुपात आलेल्या इंद्राला कर्णाने जन्मा पासूनच मिळालेले कवचकुंडले दान केली.



कर्णाच्या मनात आपला प्रतिस्पर्धी अर्जुन याचा युद्धांत पराभव करण्याचा विचार होता. म्हणून तो दुर्योधनाच्या गटात जाऊन समील झाला.

पंचपांडव वनवासात गेले. सत्यभामाने कृष्णाला बुद्धीबळात जिंकले. त्यामुळे तिने नारदाच्या हाती कृष्णाला सोपवले. त्यानंतर नारदाने सांगितले की. कृष्णाच्याच वजनाचे सोने तोलून सत्यभामाला त्याने द्यावे. शेवटी सत्यभामेनेच आपले सर्व अलंकार काढून एकापारडयात ठेवले व कृष्ण दुसऱ्या पारडयात. तरी पण ते सोने त्याच्या वजनाचे झाले नाही. तेव्हां ती परिस्थिती पाहून रुक्मिणीने दुसऱ्या



पारड्यात भक्तिपूर्वक एक तुळशीचे पान टाकले व कृष्णाला नारदाच्या हातून सोडवले.

त्यावर सत्यभामेने रुक्मिणीला म्हटले– "ताई, ह्या क्षणी मी तुझी दासी आहे. तुझी श्रीकृष्णावरची भक्ति म्हणजे काय ह्याचा उलगडा आज मला झाला."

पांडव द्रौपदीसह मत्स्य देशाचा राजा विराट याच्याकडे अज्ञातवासात होते.

भीम त्यांच्या घरी वल्लच्या नावाने स्वयंपाकी म्हणून होता. सैरंध्रीच्या रुपाने द्रौपदी दासीचे काम करीत होती. एकदा द्रौपदीचा किचकाने अपमान केल्या वरून भीमाने त्याचा संहार केला होता. त्यामुळे समान शक्तिवान असे पांचा पैकी तिघे जण भीमाच्या हाती मरण पावले. आता फक्त दुर्योधनच एकटा उरला होता.

बृहन्नलाचे रूप घेऊन अर्जुनाने राजकुमारी उत्तरा हिला नृत्य शिकविले होते. परंतु लढाईच्या वेळेस उत्तर गोग्रहणाच्या वेळेस अर्जुनाने आपले पूर्ववत रूप प्रकट करून असंख्य लोकांना पराजित केले.

श्रीकृष्णाच्या हातून जेव्हां कंस मारला गेला. तेव्हां कालनेमीनी कंसाच्या शरीरातून निघून जाऊन कृष्णांच्या भाचा अभिमन्यु याच्या रूपाने जन्म घेतला.

कालनेमी हा कृष्णाचा कट्टर शत्रू होता. तरी पण त्याने त्याच्या भाच्याच्या रुपाने जन्म घेतला.

सुभद्रा जेव्हां गर्भवती होती. तेव्हां एकदा अर्जुन चक्रव्युह भेदाचे रहस्य तिला सांगत होते. तेवढ्यात श्रीकृष्ण तेथे येऊन म्हणाले– "अर्जुन, माझी बहिण सुभद्रा कोवळ्या मनाची आहे. तीला सर्व युद्धाच्या गोष्टी कशाला सांगतोस?" असे म्हणत निम्या गप्पातून त्याने सुभद्रेला उठवून आपल्या बरोबर नेले.

सुभद्रेच्या पोटातील बाळाने अभिमन्युने चक्रव्युह फोडून आत शिरण्याचे रहस्य तेवढेच जाणले. परंतु चक्रव्युह फोडून बाहेर येण्याचे त्याला समजले नाही.

अभिमन्युला गर्व होता मी एकटाच कौरवांचा संहार करु शकतो. तेवढ्यात श्रीकृष्ण तेथे पोहचले व अभिमन्युच्या पाठीत थाप देत म्हणाले–"अभिमन्यु, तू नेहमी त्याच योग्यतेचा आहेस. मला अभिमान आहे तुझी वीरमाता सुभद्रा माझीच बहिण आहे."

अभिमन्युचा विवाह उत्तरा हिच्या बरोबर झाला. पांडवाच्या अज्ञात वासाच्या वेळेस सुभद्रा व अभिमन्यु द्वारके मध्यचे राहिले होते. बलरामने आपली मुलगी शशिरेखा हिचे लग्न दुर्योधनाचा मुलगा लक्ष्मणकुमार बरोबर करणार होता. अभिमन्युने उत्तरा बरोबर लग्न करणे त्याला अंजिबात पसंत नव्हते.

अभिमन्यु आपल्या आई बरोबर द्वारकेतून निघून अरण्यमार्गाने बाहेर जात होता. त्याच वेळेस भीम व हिडींबा यांचा मुलगा घटोत्कच यांची भेट झाली. घटोत्कचाने आपल्या राक्षसी मायेने जादू करून विवाहाला आलेल्या लोकांना खूप त्रास दिला व शशीरेखाला उचलून पळून नेऊन तिचा विवाह अभिमन्यु बरोबर लावून दिला.

एकदा कृष्णाकडे मदत मागण्याकरीता एक तर्फे अर्जुन व दुसऱ्यातर्फे दुर्योधन द्वारके मध्ये आले.



झोपेतून जागे झालेल्या कृष्णांनी पायाशी बसलेल्या अर्जुनाला प्रथम पाहीले. नंतर आपल्या उशाशी बसलेल्यां दुर्योधनाकडे दृष्टी वळवून पाहिले.

श्रीकृष्णाने त्या दोघांसमोर असे कोडे घातले की–"मी युद्ध क्षेत्रात शस्त्र धारण करणार नाही. मी तुमच्या दोघांपैकी एकाच्या बाजूने राहीन व दुसऱ्या बाजुला माझी सारी यादव सेना राहिल. पण मी प्रथम अर्जुनाला पाहिले तेव्हां प्रथम निवड त्याने करावी."

तेव्हां अर्जुनाने श्रीकृष्णाला आपल्या बाजूने निवडले व यादवसेना दुर्योधनाच्या बाजूने राहिली.











धृतराष्ट्राचा निरोप घेऊन संजय दूत बनून पांडवांकडे आला व त्यानां शांतीचा संदेश देत युद्ध न करण्याबद्दल विनविले.

पांडवांनी श्रीकृष्णाला कौरवांकडे आपल्या बाजूने दूत म्हणून पाठविले. त्यांने कौरवांना समजावून सांगत म्हटले की; पांडवाना त्याने अर्धे राज्य नाहीतर पाच गावे किंवा इंद्रप्रस्थ द्यावे. मी आपल्या दोघांच्या मध्ये समेट घडवून शांती स्थापीत करावी ह्या दृष्टीने आलो आहे.

परंतु कृष्णाच्या बोलण्याकडे दुर्योधनाने लक्ष दिले नाही.

तेव्हां श्रीकृष्णाने कौरवांच्या सभेत गंभीरपणे सांगितले—"मी अर्जुनाच्या रथाचे सारथ्य करीन, त्याच्या रथावर हनुमान असलेला ध्वज फडकत राहील. त्याच वेळेला अर्जुन रथात आपले गांडीव धनुष्य हातात घेऊन तुमचे गाजर मुळघासारखे तुकडे तुकडे करेल.

श्रीकृष्णाच्या तोंडून बाहेर पडलेले शब्द ऐकून दुर्योधन रागाने लाल झाला व आवेशाने म्हणाला-"अरे कृष्णा, तू पांडवाचा दूत म्हणून आला आहेस कां? त्याच्या शौर्याचे गुण गायला व आम्हांला धमकी द्यायला. आताच तुला दोरखंडाने बांधून ठेवतो आणि पहातो तुला कोण सोडवायला येतो ते?" असे म्हणत दुर्योधनाने दु:शासनाकडून एक लोखंडी साखळी मागविली. ते पहाताच कृष्णाच्या बरोबर आलेल्या सात्यकीने आपल्या म्यानातून तलवार बाहेर काढली.

श्रीकृष्णाने सात्यकीला अडवित म्हटले—"मी हातात काहीही न घेता एकजुटीने राहाण्याचा निरोप घेऊन दूत म्हणून आलो आहे. मला त्यांनी कैद करणे हे उचित होईल काय? तुझे सैन्य खूप प्रभावशाली आहे. मी एकटा काय करू शकेन? माझीच चुक झाली, तरी पण तुला मला कैद करावयाचे असेल तर कर."

त्यानंतर त्या चांडाळ चौकडीने श्रीकृष्णाला चारी बाजूने पकडले. परंतु

कृष्णाने आपले विश्वरूप प्रकट केले. त्यासरशी सर्वजण भयभीत होवून तेथून पळून गेले.

गोड बोलून किंवा धाकटपशा दाखवून श्रीकृष्णाने कौरव व पांडवाच्यात समेट घडवून आणण्याचा प्रयत्न केला. तो असफल झाला. आता युद्ध हेच एक बाकी राहीले.

कुरुक्षेत्रात युद्धा करीता निरनिराळ्या देशांचे राजे आपापल्या असंख्य अक्षौहिणी सैन्यासह एकत्र जमले. अशा तऱ्हेने कौरव पांडव यांच्यात महाभारत सुरु झाले. रथांच्या घंटाच्या नादाने घोडयांच्या खिकाळयांने सर्व दश-दिशा दुमदुमून गेल्या. जिकडे तिकडे युद्धाच्या आरंभीच्या रणभेदी वाजू लागल्या. ज्या ठिकाणी एका वेळेस परशुरामाने क्षत्रियांचे रक्त शामंत पंचक नावाच्या कुंडात भरले होते. तोच कुरुक्षेत्र आता पुन्हां क्षत्रियांचे रक्त मागत होता.

संजयला दिव्य दृष्टी प्राप्त होती. त्यामुळे त्याने सर्व युद्धांचा सारांश तयार करून धृतराष्ट्राला सांगितला. जन्मांध व पुत्र प्रेमाने व्याकुळ झालला कौरवांचा राजा धृतराष्ट्र दुर्योधनाला सुद्धा अड-विण्यास असमंथ होता. तो शांतपणं संजयचे वक्तृत्व ऐकत होता. आपला पती आंधळा आहे म्हणून आयुष्यभर डोळयावर पट्टी बांधणारी महान पतिव्रता गांधारी व शंभर कौरवांची आई सुद्धा धृतराष्ट्रा शेजारी बसुन सारा वृत्तान्त ऐकत होती.

संजय युद्धाचे सारे वर्णन करून सांगत होता. व ते दोघे शांतपणे ऐकत होते. संजयने पांडव व कौरवांच्या सैन्यांचे वर्णन करून सांगितले. धृतराष्ट्राने विचारले– "आता मला सांग दोघांच्या सैन्यात काय तफावत आहे ?"

संजय म्हणाला पांडव व कौरव दोघांच्या सैन्याचे रुप समान शक्तिशाली आहे. परंतु कृष्णाला मिळवून पांडव अधिक बलवान झाले आहेत. असे म्हणत त्याने सारा कुरुक्षेत्राचा पुन्हां वृत्तांत सांगितला.





# विचित्र विवाह

फार पूर्वीची गोष्ट आहे. हसन राज्यात अब्दुल नयाज नावाचा नवाब राज्य करीत होता. त्याला एकुलती एक मुलगी होती. त्याने तिला लहानपणापासून अनेक विद्या शिकविल्या व त्यात तिने प्राविण्य मिळविले.

ती मुलगी जेव्हां लग्नायोग्य झाली. तेव्हां त्याला चिंता लागून राहिली. आपल्या वडिलांची काळजी दूर करण्या-करीता तिने वडिलांकडे येऊन म्हटले– "अब्बा जान, कोणत्या तरी तरूणाला केवळ ह्या राज्याचा राजा होण्याकरीता लग्न करून त्याला माझ्या गळयात तुम्ही बांधू नका. मी अशा तरूणाशी लग्न करणार आहे की ; माझ्याच प्रमाणे सर्व विद्यात त्याने प्राविण्य मिळवलेले असावे."

अशा तरूणाचा शोध कसा काय लावायचा? नवाबाने चिंताक्रांत होत विचारले.

ती तर सोपी गोष्ट आहे तुम्ही राज्यभर अशी दवंडी पिटवा की, जो तरूण घोडदौड, खडगयुद्ध तलवारबाजी वगैरे युद्धकलेत राजकुमारीशी पैज लावून राजकुमारीला पराजित करेल, त्याच्याशी राजकुमारी लग्न करेल."

राजा एक दोन मिनिटे विचारात पडला आणि म्हणाला–"अशी दवंडी पिटविणे काय सोपी गोष्ट आहे. परंतु तुला माहीत आहे का, ह्याचा परिणाम काय होईल? कोणताही तरूण उठून तुझ्या बरोबर पैज लावायला येईल, त्याला आपण कसे अडविणार ?"

त्या गोष्टीचा विचार मी पूर्वीच केला. माझ्या बरोबर पैज लावून जो तरूण पराजित होईल, त्याचे घोडे व शस्त्रास्त्रे माझ्या आधीन होतील व त्याच्या पाठीवर माझे नाव कोरले जाईल.

अरबस्थानांतील कथा



मुलीने सांगितल्याप्रमाणे नवाबाने राज्यात दवंडी पिटवायला नोकराला सांगितले.

एका आठवड्याच्या आत आजुबाजुचे अनेक राजकुमार हसन राज्यात आले. त्यांनी राजकुमारीबरोबर, घोडदौड, खड्गयुद्ध व नेम-बाजी वगैरे अनेक परिक्षा-मध्ये पैज लावली व वाईट रीतीने ते सर्व पराजित झाले. आणि राजकुमारीचे नाव अनेकांनी आपल्या पाठीवर लिहून घेतले.

एकदा फारस देशचा राजकुमार हसन राज्यात आला. त्याने तेथील नवाबाची भेट घेतली. नवाबाने त्याचा यथोचित आदर सत्कार करून त्याला म्हटले–"तू एका खूप मोठ्या राज्याचा भावी राजा आहेस, माझ्या मुलीच्या पैजेच्या गोष्टी तर तुला माहितच आहेत. मला वाटत नाही की, तू पैज लावून अपमानित व्हावे. तेव्हां तुझा विचार सोडून दे."

"एवढ्या दूरवर येऊन युद्धविद्यांमध्ये तुमच्या मुलीबरोबर पैज न लावताच परत जाणे ह्यासारखी दुसरी अपमानित गोष्ट कोणती." फारसचा राजकुमार म्हणाला.

शेवटी राजाने आपल्या मुलीबरोबर राजकुमाराची चढाओढ जाहीर केली. दोघांनी घोड्यांवर स्वार होऊन तलवार बाजी सुरू केली बऱ्याच वेळ ते एकमेकां-बरोबर युद्ध करीत राहीले. परंतु ह्याखेपेस राजकुमारीला त्याच्या युद्ध कौशल्याची जाणीव झाली राजकुमाराने संधी आली तरी सुद्धा राजकुमारीची तलवार उडवली नाही व घोड्यावरून तीला पाडले नाही. त्याचा अर्थच तिला स्पष्ट कळून आला. तो तिच्याबद्दल आदर दाखवित होता.

परंतु नवाबाच्या. मुलीला एवढ्या समुदायांसमोर पराजित होणे बरोबर वाटले नाही. तिने ताबडतोब एक उपाय योजला. तिने झटक्यात आपला घुंघट मागे घेतला व फारसच्या राजकुमाराकडे दृष्टीक्षेप टाकला.

राजकुमारीचे ते विलक्षण सौंदर्य पाहून राजकुमार क्षणभर मंत्रमुग्ध झाला. त्यावेळी त्याचे असावधान पाहून राजकुमारीने त्याची क्षणार्धात तलवार उडविली व त्याला घोड्यावरून खाली पाडले.

राजकुमाराला भयंकर राग आला. तो उठायला गेला. तोच चार काळ्या माणसांनी त्याचे हात पकडले आणि त्याच्या पाठीवर राजकुमारीचे नाव लिहीले.

अत्यंत क्रोधाने तो तेथून निघून गेला. त्याच्या मनात नवाबाच्या मुलीबरोबर सुडाची भावना उत्पन्न झाली.

एका महिन्यानंतर राजकुमारी आपल्या मैत्रिणींबरोबर एकदा उद्यानात फिरत होती, तेव्हां एक म्हातारा माणूस कोपऱ्यात बसलेला त्याना दिसला. त्याने आपल्या समोर काळा गालीचा अंथरला होता व त्यावर अत्यंत किमती असे हिरे रत्ने माणके पसरली होती.

राजकुमारीने ते पाहून त्या म्हा-ताऱ्याच्या जवळ जात विचारले–"बाबा! तुम्ही हे सर्व रत्नमाणके विकायला आणली आहेत का?"

"हे सर्व विकायला नाहीत, मुली! जी तरूणी माझ्याबरोबर लग्न करेल तिला भेट म्हणून द्यायला मी आणली आहेत" म्हाताऱ्याने सांगितले.

हे ऐकताच राजकुमारी व तिच्या मैत्रिणी खळखळून हसत सुटल्या. ती



म्हणाली–ह्या म्हातारपणी तुम्हाला लग्न करावेस वाटू लागले काय?

माझ्या बरोबर लग्न केलेल्या तरूणीला नेहमी करता बायको म्हणून राहावयाची जरूरी नाही. माझ्या बरोबर एक दोन मिनिटे त्या वृक्षाच्या सावलीत घोड्यावर बसली तरी पुरे त्यानंतर माझ्याशी तिचे लग्न तुटले समजायचे. त्याकरीता मी तिला ह्या सर्व किमती वस्तु देईन."

नवाबाच्या मुलीला त्याचे उत्तर ऐकून गंमत वाटली. त्याच बरोबर उत्सुकता वाटू लागली. तिने आपल्या सर्व मैत्रिणींना विचारले–"तुमच्या पैकी कोणी या खोट्या-खोट्या लग्नाला तयार आहे काय?



सर्वांनी आपली संमती असल्याचे दर्शविले. थोड्या क्षणात मिळणारी धनसंपत्ती पाहून सर्वजणीच हुरळून गेल्या.

नवाबाच्या मुलीने त्यातल्या एका मुलीची निवड केली. म्हाताऱ्याने टाळ्या वाजवून इशारा केला. त्यासरशी झाडाखाली बसलेला काजी जवळ आला. त्याने राजकुमारीच्या मैत्रिणींशी त्या म्हाताऱ्याचे लग्न लावले.

तो म्हातारा त्या तरुणीला घेऊन झाडाजवळ असलेल्या घोड्याजवळ घेऊन गेला. तिला घोड्यावर बसवून त्याने झाडाभोवती चार फेऱ्या मारल्या व तिला घोड्यावरून खाली उतरवले. नंतर त्यांचे लग्न मोडल्याचे काजीने सांगितले. त्या म्हाताऱ्याजवळचे सर्व रत्नहिरे माणके तिने घेतली.

अशा प्रकारे चार दिवस त्याने तिच्या सर्व मैत्रिणींच्या बरोबर लग्ने केली. व थोड्या वेळानीं सर्वांची लग्ने मोडली. सर्वांना खूप धनसंपत्ती मिळाली.

पाचव्या दिवशी नवाबाची मुलगी मुद्दामच एकटी बागेत गेली. तेव्हां तो म्हातारा समोरच्या गालीचावर रत्नजडीत अलंकार ठेवून पुटपुटत बसला होता.

"आज माहित नाही, कोण भाग्यशाली आहे की, जी माझी बायको होईल. आज तर रोजच्या पेक्षां जास्तच मुल्यवान लाखो किमतीच्या वस्तू मी ठेवून बसलो आहे. हा रत्नहार मी तिला देणार आहे."

खरोखरच त्याच्या गालीचावर डोळे दिपविणारा रत्नहार तिला दिसला. तो पहाताच नवाबाची मुलगी मंत्रमुग्ध झाली. आज ती आपल्या मनावर संयम ठेवू शकली नाही. ती म्हाताऱ्याला म्हणाली— "आज मी थोडावेळा पुरती तुमची बायको बनायला तयार आहे.

काजीने त्या दोघांचे लग्न लावले. म्हातारा राजकुमारीला घेऊन घोड्याजवळ आला. तिला घोड्यावर आपल्याजवळ बसवून घेतले व त्याने झाडाभोवती एक फेरी मारली आणि घोड्याला जोरदार टांच मारली. तसा घोडा जोरात पळू लागला. राजकुमारीला शंका आली ती जोरजोरात ओरडू लागली. तेव्हां म्हाताऱ्याने तिचे तोंड हाताने घट्ट दाबून धरले. ती धडपड करू लागली. तेव्हां त्याने एक फटका मारला तशी ती बेशुद्ध झाली.

थोड्या वेळात ती शुद्धीवर आली. तेव्हां म्हातारा तिच्याकडे एक टक पहात म्हणाला—" मी शास्त्रशुद्धरित्या तुझ्या बरोबर लग्न केलेला तुझा पती आहे."

हे सर्व खरे आहे, पण हे लग्न मोडण्याकरीता असलेला काजी कुठे दिसत नाही? भीतीने ती सर्वत्र पाहू लागली.

तेव्हां म्हातारा जोरजोरात हंसू लागला. त्याने आपली नकली दाढी व मिशी काढून टाकली. तेव्हां राजकुमारीने तावडतोब त्याला ओळखले. तो दुसरा तिसरा कोणी नसून तिच्या बरोबर पराजित झालेला फारस देशचा राजकुमार होता.

"तू मला धोका देऊन माझ्याबरोबर लग्न केलेस." राजकुमारी संतापाने म्हणाली.

"तू मला धोका देऊन पराभूत केलेस. तेव्हां मी तुझ्या बरोबर फसवून लग्न केले तर त्यात चूक काय? फारसच्या राजकुमाराने तिला विचारले.

ते ऐकताच राजकुमारीचा चेहरा लज्जित झाला. तिने लाजून खाली मान घातली.

फारसच्या राजकुमाराला समजले की; आपली पत्नी झाल्या खुषी मुळेच्या राजकुमारीने मान खाली घातली असावी. तो म्हणाला—" तू तर तुझे नाव माझ्या पाठीवर कोरले होतेस. ते तर केव्हांही नाहीसे होणार आहे. परंतु त्याची आवश्यकता नव्हती. त्यापूर्वीच मी तुझे नाव व रूप माझ्या हृदयात कोरून ठेवले होते."

त्या बोलण्याने राजकुमारी लाजेने अर्धमेली झाली. दोघांनी मिळून नवाबाकडे दूत पाठवून एक संदेश धाडला. तो आपल्या मुलीच्या विचित्र लग्नाविषयी ऐकून खूप आश्चर्य करू लागला. त्यानंतर नवाबाने त्या दोघांचा विवाह राजमहालात थाटामाटात लावून दिला.



## चांदोबातील नवलाई



### पशु-पक्ष्यांना पाळा व स्वास्थ्य मिळवा

कुत्री, मांजरे, पोपट, कबुतरे इत्यादी पशुपक्षी पाळून फक्त लोकांचा वेळच आनंदात जातो असे नाही तर, हृदय विकार व रक्तदाब ह्या रोगापासून त्यांचा बचाव होतो.

नुकतेच स्वेडन मधील गोथेनबर्ग येथे "मनुष्य व प्राणी यांच्या संबंधात" असे विज्ञानिकांचे एक संमेलन भरले होते. त्यात त्यांनी असे शोधून काढले आहे की, माणसांच्या स्वास्थ्याच्या बाबतीत माणसांनी घरगुती पशु पक्षी पाळल्यामुळे जास्त हितकारी प्रभाव पडतो.

### भूकंपाची पूर्वसूचना आता जनावरे देऊ लागतील

प्राण्यांच्या हालचाली संबंधीच्या अभ्यासामुळे प्राणी आपल्याला भूकंपाची पूर्वसूचना देऊ शकतील. ही गोष्ट भारताच्या भूकंप विज्ञानिक निर्देशक श्री एच. एन. श्रीवास्तव यांनी आपले पुस्तक "भूकंप व त्याचे पूर्वानुमान" ह्यामध्ये लिहीले आहे.

त्याचे एक उदाहरण म्हणून त्यांनी सांगितले आहे जपानच्या नागोया शहरात जवळच पाण्याच्या अनेक साठ्यांच्या ठिकाणी अनेक उंदीर दिसत होते. परंतु १८७१ मध्ये नोबी मध्ये झालेल्या भूकंपापूर्वी सर्व उंदीर अचानक गाहीसे झाले. आणखीन एक गोष्ट त्यांनी सांगितली. चीन मधील तियेनसिन नावाच्या ठिकाणी १८ जुलै १९६९ मध्ये झालेल्या भूकंपा पूर्वी कोंबडीची पिल्ले खुराड्यात जायला घाबरली. वाघ डरकाळ्या फोडू लागले. याक प्राण्याने खाणेच सोडून दिले. व घोडे व बकऱ्या बेचैनीने इकडे तिकडे पळू लागल्या.

युगोस्लाव्हिया मध्ये १९५५ मध्ये झालेल्या भूकंपाच्या पूर्वी पक्षी व चिमण्या आपापल्या पिंजऱ्यात जोरजोरात चिवचिवू लागल्या.



उत्तर इटली मध्ये १९७६ मध्ये झालेल्या भूकंपा पूर्वी दोन तास एका ठिकाणी सर्व हरीणे एकत्र जमली व त्या गावांतून मांजरी दुसरीकडे निघून गेल्या.

### तुम्हांला माहीत आहे का ?

१. इ. स. ५० मध्ये भारतात ख्रिस्ती धर्माचा प्रथम प्रचार करणारा कोण संत होता ?

२. कोणता धर्म २४ तिर्थंना आपला धार्मिक गुरु मानतो ?

३. बिहारमध्ये इ. सन ४२५ पासून सन १२०५ पर्यंत कोणते विख्यात विश्व विद्यालय कायम राहिले ?

४. पारसी लोकांच्या पवित्र ग्रंथाचे नाव काय ?

५. ख्रिस्तपूर्व प्रथम शताब्दी मध्ये रोमचा प्रसिद्ध वक्ता कोण होता ?



## जसा राजा तशी प्रजा

एकदा विरपुर राज्यात खूप अव्यवस्था माजली, जनता उघड उघड राजाचा व कायद्याचा अनादर करू लागली. राजा गोविंदसिंहने कायदा व राज्य व्यवस्था सुरळीत आणण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. परंतु व्यर्थ. त्याने ह्याचे काय कारण असावे ह्याचा शोध काढण्याची खटपट केली परंतु त्याचाही उपयोग झाला नाही.

विरपुरच्या शेजारचे राज्य रामपुर हे राज्यव्यवस्थे बाबतीत प्रसिद्ध होते. राज्यभर लक्ष्मी आनंद व चैन असे. तेथील प्रजा खूप सुखी होती. तेथील लोकांच्यात राजाबद्दल व न्याय धर्माबद्दल अत्यंत प्रेम होते. त्यामुळे विरपुरचा राजा गोविंदसिंहने रामपुरला स्वतः जाऊन तेथील राज्य-व्यवस्था पहाण्याचे ठरविले.

रामपुरचा राजा कर्मवीर ह्याने गोविंदसिंहचे अत्यंत प्रेमाने स्वागत केले. व तो येण्याचे कारण समजून म्हणाला—"कोणत्याही राज्याची भरभराट व व्यवस्था तेथील प्रजेवरच अवलंबून असते. जर माझ्या राज्यात तसेच सुख व संपन्नता असेल तर त्याचे कारण माझी प्रजाच आहे.

हे ऐकून राजा गोविंदसिंहला संतोष वाटला. त्याला समजले आपल्या राज्यातील व्यवस्थेला कारणीभूत आपली प्रजाच आहे. कर्मवीरच्या तोंडून त्याच्या प्रजेची प्रशंसा ऐकून गोविंदसिंहच्या मनात त्याच्या प्रजेतील लोकांना भेटण्याची इच्छा उत्पन्न झाली. त्याने कर्मवीरला तसे सांगितले. कर्मवीर म्हणाला—"आपण दोघे वेष बदलून गुप्तरूपे राज्यात भटकू.

दुसऱ्या दिवशी ते दोघे राजवेश बदलून रामपुर राज्यात भटकण्यासाठी निघाले. ते दोघे अनेक ठिकाणी हिंडले. प्रत्येक ठिकाणी कर्मवीरचा सत्कार आदराने लोक










सत्कार करीत होते. ते पाहूनच गोविंदसिंहला अत्यंत आश्चर्य वाटू लागले. वेष बदलून सुद्धा तेथील लोक राजाला ओळखून त्याचा भक्तिने आदर सत्कार करीत आहेत. त्याने एके ठिकाणी थांबून तेथील लोकांना ह्याचे काय कारण आहे असे विचारले.

"आमच्या राजाबद्दल आमच्या मनात अत्यंत भक्ति व प्रेम आहे. त्यामुळे आमचा राजा कोणताही वेष बदलून आला तरी आम्ही त्याला ओळखू शकतो" एका माणसाने सांगितले.

हिंडत असतांना कर्मवीरने काही आवडलेल्या वस्तू दुकानांतून खरेदी केल्या. परंतु त्याचे पैसे दुकानदाराने घेतले नाहीत. उलट राजाला म्हणाले–"माझ्या तर्फे भेट म्हणून ह्या वस्तु घ्या. राजा आणि प्रजा दोघांच्यात व्यापारधंदा असता कामा नाही."

राजा गोविंदसिंह कर्मवीरला म्हणाला–"आपली प्रजा खरोखरीच महान आहे. माझ्या प्रजेतील लोकांना आपल्याकडून बरेच शिकले पाहिजे."

त्यानंतर राजा गोविंदसिंह आपल्या राज्यात परत आला.

एका महिन्यानंतर गोविंदसिंह आपल्या राज्यात वेष बदलून भटकू लागला. त्याला कोणीही न ओळखलेले पाहून दुःख झाले. एका जागी त्याने एका वस्तूची किंमत विचारली. राजाला वाटले त्याने आपल्याला पाहून त्या वस्तुची किंमत जास्त सांगितली असावी तो त्या दुकानदाराला म्हणाला–"जर राजाने ही वस्तू तुझ्याकडे खरेदी केली तर काय तू हीच किंमत सांगशिल का?"

"जर राजाने हि वस्तू माझ्याकडे विकत घेतली तर हिच किंमत कां! ह्यापेक्षा जास्त किंमत मी घेईन" व्यापाऱ्याने राजा आहे हे न समजून बेपर्वाईने उत्तर दिले.

गोविंदसिंहला आपल्या प्रजेतील लोकांचे वागणे पाहून अत्यंत वाईट वाटले. तो आपल्या महालात परत येत मंत्र्यांना सर्व गोष्ट सांगत त्यांना म्हणाला–"हे माझेच दुर्भाग्य आहे की, मी असल्या प्रजेचा राजा आहे" रामपुरच्या प्रजेमुळेच त्यांचे राज्य सुखी व संपन्न आहे. त्यांच्या प्रजेसारखी आपली प्रजा बनवायला आपल्याला काय केले पाहिजे? ह्यावर तुम्ही विचार करून सांगा.

मंत्र्यांनी आपापसात विचार विनिमय करून राजाला म्हटले–"महाराज! आपण राजा म्हणून शेजारचे राज्य व तेथील प्रजेतील व्यवस्था सर्व पाहून आलात परंतु आपल्या प्रजेला त्याबाबतीत काहीच माहित नाही. जर तुम्हांला आपली प्रजा त्यांच्या प्रमाणे वागावयास पाहिजे असेल आहे, तर तुम्ही प्रजेतील काही निवडक लोकांना तेथे पहाणी करण्यास पाठवावे."



गोविंदसिंहला मंत्र्यांचे म्हणणं आवडलं त्याने राज्यातील शंभर निवडक लोक एकत्र केले. व त्यांना रामपूरला तेथील राज्यव्यवस्था व तेथील प्रजेला भेटण्याकरीता पाठविले. त्याकरीता त्याने राजा कर्मवीरची संमती विचारली.

दोन महिन्यानंतर सर्व लोक परत येऊन राजाला निवेदन करीत म्हणाले–"महाराज! कोणत्याही राज्याला त्याच्या विकासाकरीता व समृद्ध बनण्याकरीता योग्य व समर्थ राज्यकर्ता व्हायला पाहिजे. रामपुरचा राजा त्या दृष्टीने योग्य आहे.

हे ऐकताच गोविंदसिंह क्रोधाने लाल झाला व म्हणाला–"राजा कर्मवीरने स्वतः हूनच मला सांगितले की; त्याच्या प्रजेमुळेच तेथील व्यवस्था व राज्यकारभार चांगला आहे. माझ्या स्वतःमुळे नाही.

"राजा कर्मवीर खूप विनयशिल आहेत. त्यामुळे त्यांनी केलेल्या कार्याचे श्रेय स्वतः घेत नाहीत. ते प्रजेवर मुलाप्रमाणे प्रेम करतात. व त्यांची प्रजेकरीता सर्वस्व त्याग करण्याची इच्छा आहे. तसेच त्यांच्या स्वभावामुळे व राज्य कारभारामुळे प्रजेला त्यांचा आदर वाटतो व प्रजा त्यांची प्रशंसा करते. स्वतः त्यांची नाही" प्रजेतील त्यांच्या एका प्रतिनिधीनी सांगितले.

गोविंदसिंहने आपले म्हणणे मांडीत म्हटले–"रामपूरची जनता वेष बदललेल्या

राजाला सुद्धा ओळखू शकते, परंतु आपली प्रजा राजाला सन्या वेषात सुद्धा ओळखू शकत नाही. काय कारण असावे ?"

"महाराज! धुळ व चिखलातून ही लोक सोने बरोबर शोधून काढतात. ह्यात ओळखणाऱ्याचे अगर घेणाऱ्याचे कौतुक नाही. परंतु सोन्याचे आहे" त्याच्या प्रतिनिधीने सांगितले.

राजा गोविंदसिंहला त्यांच्या म्हणण्या-मध्ये काहीतरी तथ्य आहे ह्याचा खरा उलगडा झाला. त्यामुळे त्यांनी आपले खरे रूप बदलण्याकरीता प्रयत्न करण्याचे ठरविले.

राजा कर्मवीर सदासर्वदा प्रजेच्या कल्याणाचा विचार करतात ते आपल्या जनतेच्या तक्रारी ऐकून त्याना योग्य तो न्याय देतात. ते स्वतःहा गावात हिंडून प्रजेच्या सुखदुखाःच्या गोष्टी पहातात. त्यामुळे प्रजेचा त्याच्यावर इतका विश्वास आहे की; डोळे झाकून राजाने सांगितलेलं जनता ऐकते. राजाचा सुद्धा प्रजेवर तेवढाच विश्वास आहे जसा प्रामाणिक राजा आहे तशीच त्याची प्रजा सुद्धा आहे. "जसा राजा तशी प्रजा" एका सहकाऱ्याने सांगितले.

ह्या गोष्टीमुळे राजाचे डोळे उघडले. त्याचा विवेक जागा झाला. त्याला वाटू लागलं की; जर रामपुरच्या प्रजेसारखी आपली प्रजा पाहीजे असेल तर प्रथम कर्मवीर सारखे स्वतःह्याला वागायला पाहिजे. त्याला समजले की; राज्यातील धंदाधुंदीला व अव्यवस्थेला आपण कारण आहोत.

राजाने तावडतोब मंत्र्यानां बोलावणे पाठविले व त्यानां उपदेश करत म्हणाला– "जर राज्यात सुख व समृद्धी नसेल तर राज्यकारभार करण्याचा काही अधिकार आपल्याला नाही."

ह्या निर्णयानंतर काही दिवसानी वीरपुर राज्यात प्रजा सुखी संपन्न व राजावर प्रेम भक्ति करू लागली.






[ १५ ]

[दोन्ही जहाजे समुद्रात बुडाली. पिंगळला लाकडी फळीचा आधार मिळाला व ती तरंगत एका वाळवंटात येऊन पडला. तेथे त्याची भेट हुसन गोरी नावाच्या माणसाशी झाली. ते दोघे मिळून वाळवंटातील लुटारूंना पकडण्याकरीता अक्षय किल्ल्याकडे निघाले. त्यानंतर...]

हुसनगोरीने एका दिशेला एक विशिष्ठ खूण करून हात हलविला. पिंगळने मान वळवून त्या बाजूला पाहिले. थोड्या दूरवर त्याला एक जुना पुराणा किल्ला मोठ्या दिमाखाने उभा असलेला दिसला.

किल्ल्याच्या जवळपास उंच डोंगर होते. त्या मधून एक झरा वहात होता. रस्त्याच्या दोन्ही बाजूला खजूरांची झाडे ओळीने उभी होती. किल्ल्याच्या चोहो-बाजूला सामसूम होते. दारावर पहारेकरी किंवा दूसरे कोणी नव्हते.

"हाच का तो अक्षय किल्ला?" पिंगळने किल्ल्याच्या बाजूला आपला हात उंचावत हुसन गोरीला विचारले.

"हो, हो, हाच तो बघ, किल्ल्याच्या बाजूने दूर डोंगरावर जाण्याकरीता एक रस्ता आहे. हा तेहरानहून कैरो पर्यंत



जाणारा राजमार्ग आहे. त्याच्या रस्त्यातच असणारा हा किल्ला सर्वजणांचे विश्रांतीचे स्थान आहे. वाळवंटातील डाकूंपासून स्वतःहाचा बचाव करण्याकरीता हा किल्ला बांधला गेला. ह्या किल्ल्याच्या रक्षणाकरीता दोनशे सैनिक ठेवले आहेत. ते किल्ल्याचे रक्षण करता करता येथे येणाऱ्या व्यापाऱ्यांचे सुद्धा रक्षण करतात. परंतु आज आश्चर्याची गोष्ट आहे. येथ तर एकदम स्मशानवत शांतता दिसते. किल्ल्याच्या बाहेर तटावर सुद्धा एकही शिपायी दिसत नाही ?"

तोपर्यंत ते किल्ल्याच्या अगदी जवळ येऊन पोहोचले होते.

"बहुतेक वाळवंटातील डाकू सरदार भैरवनाथ याने किल्ल्यावर हल्ला करून सर्व सैनिकांना मारून टाकले असावे." पिंगळने आपली शंका बोलून दाखविली.

"तरीही असेल, तू म्हणतोस ते खरे असावे. पण डाकूंच्या पैकी सुद्धा आसपास कोणी दिसत नाहीत. हसन दोरीने आपल्या उंटाचा लगाम खेचला. व दरवाजापाशी जाऊन सावधतेने न्याहाळले.

पिंगळने आपला पण उंट पुढे नेत म्हटले– "हसन भैया, इथंच उभे राहून दाराच्या आत काय झाले असावे, याचा अंदाज लागणार नाही तेव्हा आपण जर दारापर्यंत गेलो, तर काहीतरी खुण आपल्याला नक्कीच दिसून येईल."

"तुझे म्हणणे बरोबर आहे असे वाटते. मुख्यदारापाशी युद्ध झाल्याची लक्षणं सुद्धा दिसायला पाहिजेत आमच्या सैनिकांनी डाकूंना आत जायला सोडले नसावे किंवा डाकूंच्या असंख्य सैन्याने हल्ला तरी केलेला असावा."

हळूहळू पिंगळ व हसन दोघं मुख्य दारापाशी आले.

मुख्य दार बंद होते. ते अशा तऱ्हेने बंद केले होते की, जणूकाही आतून कोणीतरी घट्ट लावले असावे. कित्येक वर्षं तिथं मनुष्य वस्ती नसावी. असे तेथे सर्वत्र वातावरण होते. युद्ध हाणामारी काट-छाट वगैरेचा लवलेशही नव्हता. ते पाहून हसन खो खो हसत सुटला.

त्याने उंटाला दोरीने खेचून खाली बसवले. व तो उसासे टाकत पिंगळला म्हणाला–"पिंगळ, तू तर विनाकारण घाबरत होतास. भैरवनाथ कितीही बहादुर व चलाख असू दे आमच्या सैनिकांबरोबर युद्ध करणे त्याच्या हातचे खेळणे नाही. परंतु आमच्या सैनिकांचा सुद्धा काही थांग पत्ता नाही. ह्याचे आपली एक कारण काय असू शकेल?"

हसन मनातल्या मनात खुदू खुदू हसू लागला. पिंगळने प्रश्नार्थक नजरेने त्याच्याकडे पाहिले.

पिंगळसुद्धा आपल्या उंटावरून उतरला होता. दोघं मुख्य दरवाजापाशी आले. तेव्हा हसन पिंगळच्या खांद्यावर हात ठेवित म्हणाला–"पिंगळ, असे असू शकेल का? सैनिक भरपूर दारू पिऊन तर्र होऊन नशेत किल्ल्याच्या आत झोपले असावेत!"

पिंगळचा ह्या बोलण्यावर विश्वास बसला नाही. त्याने आपली शंका स्पष्ट सांगितली–"जर ही गोष्ट खरी असेल तर आपल्यातल्या एका सैनिकाला मारून टाकून गिधाडांना खायला घालण्याकरीता त्या खडकाला कोणी बांधून ठेवले नसते."



"असे असावे की; दारूच्या नशेत तो किल्ल्याच्या बाहेर येऊन त्या खजुरांच्या झाडीत पडला असावा व भैरवनाथच्या माणसांनी त्याला पकडले असावे.

हसनचे ते उत्तर ऐकून पिंगळ क्षणभर गप्प राहिला. कोणताही निर्णय घ्यायच्या आधी तिथली परिस्थिती कशी आहे आणि मुख्य द्वारा मागचे रहस्य काय असावे याचा अंदाज लागत नव्हता म्हणून तो मुकाट्याने दाराच्या जवळ गेला. दाराची कडीकोयंडी आतून लावलेली होती. त्यामुळे त्याने जोर लावून दार आत ढकलले.

धुम् धडाम् धडाम् असा एक मोठा स्फोट झाला. त्यासरशी पिंगळ आश्चर्य-
















चकित होऊन मागे धावला. त्याच्या तोंडून कर्कश किंकाळी बाहेर पडली. दाराचे तुकडे तुकडे होऊन चौफेर पसरले. आजूबाजूच्या भिंती फुटल्या.

पिंगळला आता समजायला वेळ लागला नाही. दाराला आतून कडी नव्हती व त्या जागी दारुगोळा ठासून भरून ठेवला होता. त्यामुळे कडी घासली जाताच त्याचा स्फोट झाला.

त्या आवाजाने बाकी सर्वजण घाबरले. काहीजण दाराचे व भिंतीचे तुकडे लागून जखमी झाले. उंट मोठ्या आवाजाने सैरभैर पळू लागले. त्या स्फोटामुळे सर्वत्र धूर झाला. आजूबाजूला काही दिसेनासे झाले. चोहीबाजूला एक प्रकारचा गंभीर-पणा जाणवू लागला.

धूर थोडा विरळ झाल्यावर पिंगळने ते दृश्य पाहिले व त्याला कापरेच भरले. त्या झालेल्या स्फोटामुळे बरेच जण जखमी झाले होते. काही मेले होते. काही उंट घायाळ झाले होते. तर काही वेदनेने तळमळत होते. पिंगळ हसन गौरी कुठे दिसतो कां? म्हणून चौफेर पाहू लागला.

हसनगोरी त्या उडालेल्या स्फोटामुळे दूरवरच्या एका खजुराच्या झाडात जाऊन पडला होता. पिंगळ त्याला पाहून तेथे आला. त्याला पहाताच हसनने उठायचा प्रयत्न केला. पण पिंगळने त्याला बगलेत हात घालून उठवत विचारले—"फार जास्त तर लागले नाही नां?"

"नाही, नशिबानेच वाचलो नाहीतर आज फुकटच मेलो असतो. जर स्फोटाच्या जोराने मी दूर फेकलो गेलो नसतो. तर आज काही धडगत नव्हती. सांभाळून उठत हसन गोरी म्हणाला."

"खरे तर, नशिबाने आज आपल्या दोघांनाही वाचवले आहे. मुख्यदाराकडे नजर टाकत पिंगळ म्हणाला. तिकडे बघ आपले अर्धे अधिक सैनिक कामी आले आहे. जे कोणी वाचले आहेत. ते जखमी होऊन वेदनेने विव्हळत आहेत."

थोडावेळ शांत राहून पिंगळ म्हणाला—दाराला हात लावताच काही भयंकर असावे अशी मला शंका येत होतीच. त्यामुळे मी घाईघाईने मागे पळालो. दार जर ताकद लावून उघडायला नको होते.

हसन लागल्यामुळे कण्हत होता. व त्याला चांगले चालता येत नव्हते. त्याने आपल्या कपड्याला लागलेली वाळू झटकत म्हटले—"ही सगळी कारवाई त्या दुष्ट भैरवनाथ डाकूची आहे. आपल्या सैनिकांची व डाकूंची लढाई किल्ल्याच्या आतच झाली. व आपल्या सर्व सैनिकांना मारून टाकून जातांना आपल्याला मारण्याची सुद्धां त्याने चांगलीच योजना केली होती. आपण शिल्लक राहिलेल्या सैनिकांनिशी त्या दुष्ट भैरवनाथचा प्रथम शोध काढला पाहिजे व जसा मिळेल तसा त्याचा नायनाट केला पाहिजे.

नंतर दोघांनी मिळून सर्व जखमी सैनिकांना पाहिले. त्यांना प्रथमोपचार केला. व त्यातल्या चांगल्या सैनिकांना घेऊन ते दोघे किल्ल्याच्या आत शिरले.

आतील दृश्य भयावह होते. जिकडे तिकडे प्रेतांचा खच पडलेला होता.

काहींचे कपडे रक्ताने भरलेले होते. युद्धसामान जिकडे तिकडे विखुरलेले होते. बऱ्याच इमारतींना आग लावण्यात आली होती. किल्ल्याच्या आतील भाग भग्नावशेष झाल्यासारखा दिसत होता.



"आश्चर्याची गोष्ट आहे,! आपले सर्व सैन्य मारले गेले. कळत नाही हे सगळे झाले कसे. डाकू सर्वांच्या सर्व आत कसे शिरले? एकतर किल्ल्याच्या बाहेरच कोणी अडवले नाही किंवा आपल्यातल्याच माणसाने दगा दिला? माझ्या नाहीतर सैनिकांना असे गाजर मुळ्यासारखे मारून टाकणे म्हणजे काही तोंडच्या गप्पा नाहीत. हसनने भराभर आपली शंका व्यक्त केली."

"काय झाले असावे" पिंगळ म्हणाला. "परंतु आता आपल्याला काय करायला पाहिजे ?"










बराच वेळ दोघे मौनपणे आतील भयानक दृश्य पहात राहिले.

पिंगळने आपला विचार बोलून दाखविला म्हटले–"आता आपल्याला एक क्षणही फुकट घालवता कामा नाही. ताबडतोब डाकूंचा शोध लावला पाहिजे. पण एवढ्या प्रचंड वाळवंटात त्याचा शोध लावणे शक्य होईल काय?"

"कां नाही?" असे म्हणत हसनने लगेच आपल्या लोकांना काहींतरी सांगून किल्ल्याच्या बाहेर पाठविले. ते सर्वजण बऱ्याच दूरपर्यंत जाऊन लगेच परत आले.

त्या सैनिकांशी काही बोलून हसन पिंगळला म्हणाला–"उंटांच्या पायाच्या ठशांवरून असा अंदाज लागतो की, भैरवनाथ डाकूंचे लोक येथून दोनचार मैल लांब असलेल्या घळीतील डोंगरात जाऊन विजयानंदाच्या खुषीत भरपूर दारू झोकून तर्र होऊन पडले असावेत."

पिंगळला वाळवंटी लोकांच्या स्वभावाचा काहीच अनुभव नव्हता. त्यामुळे तो हसन जे सांगेल त्याच्या हो ला हो करत होता. त्याने त्याचे ते म्हणणे खरे मानून एक उपाय योजना सांगितली–"जर हे खरे असेल, तर आपण ताबडतोब तिथे जाऊन अचानक त्यांच्यावर हल्ला केला पाहिजे. आपण आल्याचा त्यांना जराही सुगावा लागू द्यायचा नाही.

पिंगळशी सहमत करून त्याने तावडतोब आपल्या उरलेल्या सर्व सैन्याला पहाडाकडे जाण्याचा इशारा केला. व ते दोघे आपापल्या उंटावर बसून पाठीमागून जाऊ लागले.

एका तासाभरात ते त्या पहाडावर येऊन पोहोचले. ज्या वाटेने ते तेथे आले होते ते दोघे बाजूच्या रस्त्याने खालच्या घाटात उतरत असलेल्या रस्त्याने गेले.

पिंगळने घोडे थांबून खोलवर एक नजर टाकली. व हसनला म्हणाला–"आता आपल्याला घाटात खाली न उतरता दोन्ही बाजूला विरुद्ध जावयास पाहिजे. आपले उंट आता इथेच सोडून देणे योग्य व डाकूंचा शोध काढीत काढीत दऱ्याखोऱ्यांतून त्यांना शोधत हिंडले पाहिजे.

हसनने पिंगळचे म्हणणे ऐकले. ते दोघे अर्धे अर्धे सैनिक बरोबर घेऊन विरुद्ध दिशांना निघाले. दोघेजण भैरवनाथला शोधत उंचवटयावर आले. तरी पण डाकूंचा काही थांग पत्ता लागला नाही.

अचानक पिंगळ जेथे उभा होता. तेथून खालच्या घळीत दूरवर काहीतरी गडबड गोंधळ चाललेला त्याला ऐकू येऊ लागला. त्याने आपल्या बरोबरच्या सैनिकांना इशारा करून स्वतः एका मोठ्या शिळेच्या मागे लपला व तेथून खाली काही दिसते का? पाहू लागला.

तेथून थोड्या लांबवर खालच्या घळीत एका सपाट जागी काही लोक नाचत-गात बसलेले व त्यांच्या कपड्यांवरून ते वाळवंटात रहाणारे असावेत असे पिंगळला दिसले.

जेव्हां त्याचा विश्वास बसला की, ते लोक भैरवनाथ डाकूंच्या जमावातील आहेत. तेव्हां त्याने हसन गोरीने सांगितल्या-प्रमाणे हसनला समजण्यासाठी एक शिंग फुंकले.

शिंग फुंकल्याचा आवाज ऐकताच त्या डाकूंचे नाचणेगाणे एकदम बंद झाले.



डाकू सावध झाले आहेत त्यामुळे आता उशीर करून चालणार नाही असा विचार करून पिंगळने एक भली मोठी शिळा खाली त्यांच्या दिशेला जोर करून ढकलली. आणि आपल्या सैनिकांना त्यांच्या बाजूने जाण्याचा इशारा केला.

तो दगड घरंगळत खाली गेला नाही तोच सण् सण् करत एक बाण पिंगळच्या कानाला चाटून गेला.

पिंगळ झटक्यात दगडाच्या सांदीत लपला. त्यामुळे वाचला दुसऱ्या क्षणाला त्याने पाहिले की; डाकूंचा जमाव हातात आले, तिरकमठे घेऊन त्यांच्याच बाजूने वेगाने पुढे येत आहेत.

     


ते पाहून तो थोडा घाबरला. परंतु डोंगराच्या दुसऱ्या बाजूने अनेक दगड डाकूंच्या बाजूला येऊन अचानक पडू लागले.

पिंगळ ते पाहून आनंदित झाला. त्याला समजले की; हसनला आपला संकेत कळला. त्या दगडांच्या मारा पाठोपाठ हसनचे सैनिक सुद्धा त्यांच्यावर हल्ला करून येत असलेले त्याने पाहिले.

दोन्ही बाजूने पिंगळ व हसनचे सैन्य येत असलेले पाहून डाकू लोक सैरभैर धावू लागले. हसनच्या समोर जे डाकू आले सैनिकांनी त्यांना भाल्यांनी भोसकून मारले.

सूर्य हळूहळू मावळू लागला दऱ्या खोऱ्यात अंधार होऊ लागला. पिंगळ डाकूंचा पाठलाग करीत करीत दऱ्यातून खूप खाली निघून गेला.

तेथे बऱ्याच मोठ्या मोठ्या दगडांमध्ये गुहांसारखी भगदाडे होती. त्यात भयाण अंधार दाटला होता. भैरवडाकूंच्या शोधार्थ पिंगळ त्या भगदाडांमधून आत जाऊ लागलाच नाही, तोच वरच्या बाजूने हसनचा आवाज त्याला ऐकू आला— "पिंगळ! फार पुढे जाऊ नको. अंधार खूप झाला आहे. अंधारात त्यांचा पाठलाग करणे म्हणजे धोक्यात पडण्यासारखे आहे. आजची रात्र आपण येथेच कुठतरी काढू सकाळ होताच त्यांना हुडकून मारून टाकू."

हसन असे म्हणत त्याच्याच बाजूला येत होता. पिंगळने हसनचे म्हणणे ठिक समजून तेथील एका मोठ्या दगडावर आपले बस्तान बसवले.

तेवढ्यात एक ओळखीचा आवाज त्याच्या कानावर आला. तो ऐकून पिंगळ विस्मयचकित झाला— "हा कोण पिंगळ आहे? काय हान तर तो पिंगळ नाही— अवंती नगरातील मासेमारी?"

"हा तर पद्मपादचा आवाज वाटतो" आश्चर्याने त्याने चौफेर पाहिले. तेव्हा एका बाजूने एका मोठ्या दगडाच्या पाठीमागून एक माणूस हसत हसत पिंगळच्या रोखाने येत होता. (क्रमशः)



# भिकाऱ्याचे भाग्य

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही. तो झाडाजवळ गेला. प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि स्मशानाच्या दिशेने मौनपणे चालू लागला. तेव्हा प्रेतात लपलेला वेताळ त्याला म्हणाला— "राजा, तू इतके श्रम करीत आहेस. त्याला कारण काय असेल हे मला कळत नाही. जर भाग्यात लिहिले नसेल तर कोणतीच गोष्ट शक्य होत नाही. प्रारब्धच नसेल तर कष्ट व परिश्रम सर्व व्यर्थ. तसेच नाही तर दातातोंडाशी आलेली वस्तू सुद्धा नशिबात नसेल तर तशीच परत निघून जाते. ह्याचे उदाहरण म्हणून मी तुला एका आंधळ्या भिकाऱ्याची गोष्ट सांगतो. लक्ष देऊन ऐक" असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

एका गावात एक आंधळा भिकारी रहात होता. त्या गावाच्या कडेला एक













मोठे चिंचेचे झाड होते. तेथे तो भिकारी झाडाच्या सावलीत रहात असे. तो दिवसभर गावात भटकून भीक मागे आणि रात्री झाडाखाली येऊन झोपे. अश्या तऱ्हेने त्याचे जिवनक्रम चालू होते.

एकदा गावी एक जत्रा भरली. भिकारी तथे भीक मागण्यास गेला. परत यायला खूप उशीर झाला. येता येता तो भिकारी एका दगडात पाय अडकून शेजारच्या पाण्याच्या डबक्यात पडला. आणि खरचटल्यामुळे विव्हळू लागला.

तेवढ्यात कोण्या एका मुलाने येऊन त्याला हात देऊन बाहेर काढले व विचारले–"बाबा, उठा तुम्हांला ते डबके दिसले नाही का?"

"मी आंधळा आहे बाबा! शेजारच्या गावातील जत्रेमध्ये भिक मागून परत येत होतो. मला तू त्या कडेच्या चिंचेच्या मोठ्या झाडापाशी नेऊन सोड." असे म्हणत तो आंधळा उठायचा प्रयत्न करु लागला.

"तू कोण आहेस? त्या मुलाच्या खांद्याचा आधार घेत त्या आंधळ्याने विचारले–"आजच ह्या गावात नविन आला आहेस वाटते."

"माझे अर्धे आयुष्य ह्या गावात गेले. एकूण एक आवाज मी ओळखतो. कोणाच्या घरी पाहुणा म्हणून आला आहेस काय? एका हातात काठी व दुसऱ्या हातानें त्याचा खांदा धरत तो लंगडत त्याला विचारु लागला.

"नाही, मी एक निराधार व कमनशिबी आहे. रोजगारी मिळेल ह्या आशेने दिवसभर हिंडत होतो. परंतु काहीही न मिळाल्याने पाणी पिऊन भूक मारुन ह्या चौथऱ्यावर येऊन झोपी गेलो. तेवढ्यात तुमच्या पडण्याच्या आवाजाने जाग आली आणि तुम्हांला मदत करायला धावलो."

"तुला आई-वडिल नाहीत काय?"

"ते माझ्या लहानपणीच वारले. माझ्या आजोबानेच मला लहानाचा मोठा केले. परंतु काही दिवसांपूर्वी त्याचाही देहान्त झाला. जो पर्यंत आजोबा जिवंत होते तोपर्यंत लाडावल्यामुळे कामधंदा शिकलो नाही. आता मोलमजूरी करु शकतो. परंतु खूप हिंडून ते सुद्धा काम मिळाले नाही."

"बाबा, आले हो चिंचेचे झाड! तुमचे पायाचे दुखणे आता कसे आहे? असे विचारीत तो जायला निघाला.

"देव तुला सुखी ठेवो. माझे दुखणे बरेच कमी झाले आहे. अरे हो! पण, तुझे नाव काय ते नाही सांगितलेस आणि निराधार आहेस मग जाणार कुठे?"

"दिपक" त्याने आपले नाव सांगत म्हटले–त्या चौथऱ्यावर मघाशी झोपलो होतो तेथेच.

भिकारी त्याचा बोलण्यावर हसत म्हणाला–"तो चौथरा तुझा नाही ना? मग कोणीही येऊन तुला हांकलून लावेल. तू इथेच ह्या झाडाखाली झोप. इथून तुला कोणी उठवणार नाही.

त्या दिवसापासून दिपकचे ते झाडच घर बनले. तो त्या आंधळ्याला पुढे देवळा समोर नाहीतर चौकांत अशा जागी नेऊन बसवू लागला. व जो कमाई होई त्यावर दोघे आपला उदरनिर्वाह करु लागले.

एकदा भर उन्हांत आंधळा देवळाच्या पायऱ्यांवरच बसल्याबसल्या झोपी गेला. तितक्यात एक श्रीमंत माणूस भिकाऱ्या जवळ आला आणि त्याच्या भिक्षापात्रात एक छोटी थैली टाकून तो निघून जाऊ



लागला. दिपकने खाण्याची वस्तु असावी असे समजून ती पिशवी झटक्यात उघडली.

"अरे हे काय? ते पाहूनच त्याचे डोळे पांढरे झाले. त्यांत बरीच सोन्याची नाणी होती. शेठने चुकून ती थैली टाकली असावी. असे समजून तो ती घेऊन धावत पळत त्याच्यापाशी जाऊन पोहचला. आणि ती थैली देत म्हणाला–"अहो, ह्यात तर सोन्याची नाणी आहेत."

शेठ हसत म्हणाला–"तू भिकाऱ्याचा नातू आहेस. तुम्हांला आता भिक मागण्याची अजिबात जरुर पडणार नाही."

परंतु दिपक त्याच्याकडे आश्चर्यचकित होऊन पहातच राहीला. व मनांतल्या मनात



म्हणू लागला की; "हे काय भीक म्हणून सोन्याची इतकी नाणी कुणी देतात काय ?"

"केव्हां केव्हां व्यापारात इतका फायदा होतो की, देवळात जाऊन देवाला फक्त नारळ फोडून फुलेफळे देऊन माझे समाधान होत नाही. तेव्हां माझ्या फायद्यातला पाव हिस्सा मी गरीबाला दान देतो. की त्या-मुळे त्या गरीबाचे जिवन सुखदायक बनावे. त्याचे पुण्यतर मला मिळेलच ना ? असे म्हणत तो तेथून निघून गेला.

त्याला ते म्हणणे एकदम पसंत पडले. त्यांनी एवढे धन दिले ते एका गरीबाचे जिवन सुधारण्या करीताच. मग हे सर्व आपण घेऊन आपलेच जीवन का सुधारू नये ?" असा विचार त्याच्या मनात घोळू लागला.

त्या विचाराने त्याची पावले शहराकडे वळली. त्याने शहरात जाऊन भाजीपाल्याचे मोठे दुकान घातले व व्यापार करू लागला. काही वर्षातच त्याचा धंदा चांगला चालू लागला. शहरातील श्रीमंत लोकांत त्याची गणना होवू लागली. गावातील एका प्रतिष्ठीत माणसानं स्वतःहाच्या मुलीचे सुवर्णाचे लग्न त्याच्याशी लावून दिले.

सुवर्णा हुशार व समजुतदार होती. तिला आपल्या नवऱ्याविषयी काहीच माहित नव्हते. फक्त एवढेच माहित होते की तो ह्या गावात अचानक आला आणि त्याने व्यापारधंदा सुरू केला. लग्नानंतर तीन चार वर्षाने एके दिवशी एक भाजीवाला त्याच्या घरासमोर आला. तो दिपकच्या पूर्वीच्या गावचा रहाणारा होता. त्याने सुवर्णाला सांगितले की; दिपकचा आजोबा मेल्यानंतर तो निराधार झाला. पोटची पोट भरण्याकरीता कोणत्यातरी कामाच्या शोधार्थ गाव सोडून शहरात आला.

हे ऐकताच सुवर्णाला उत्सुकता वाटू लागली. संध्याकाळी जेव्हां दिपक घरी आला. तेव्हां तिने आपली उत्सुकता प्रकट करीत त्याला ते विचारले. तिचा प्रश्न ऐकताच तो निरुत्तर झाला.



दिपकच्या गप्प बसण्यामुळे तिला जास्त शंका येऊ लागली व तिने परत खोदून खोदून त्याला विचारले.

"मी हा व्यापार पापाच्या धनानी सुरू केला आहे." दिपकला रहावले नाही. त्याने आपल्या बायकोला खरे काय ते सर्व सांगून टाकले. त्याच्या मनात सारखी चलबिचल होत होती. परंतु पापाच्या पैशाच्यांमुळे अधिक लाभ होवू शकत नाही. आपला धंदा तर चोपटीने चांगला चालला आहे." सुवर्णाच्या उत्तराने थोडासा दिलासा मिळाल्यासारखे वाटले.

दिपक म्हणाला–"जर भिकारी जिवंत असेल तर त्याला आपल्या घरी ठेवून, धनाने प्रायश्चित करावे.

सुवर्णाला कळले की, जरी आपल्या नवऱ्याने दुसऱ्याच्या संपत्तीने व्यापार केला असला तरी त्याच्या मनात वाईट भाव नाहीत. पतीची कहाणी ऐकून तिचे डोळे पाण्याने डबडबले. पदराने डोळे पुसत ती म्हणाली–"तुम्ही ह्या गोष्टीला खूपच उशीर केलात. हे तुम्ही पूर्वीच करायला पाहिजे होते. परंतु त्याने येण्यास नकार दिला तर..." दिपकच्या मनात एक विचार आला.

"तर मी पण तुमच्या बरोबर येईन. त्यांना आग्रह करीन. त्यातून आलेच नाहीत, तर तुम्ही तुमच्या बरोबर थोडे पैसे घेऊन जा. परत येताना त्यांना भेट म्हणून देऊन टाका." सुवर्णा म्हणाली.










सकाळी उठल्या बरोबर तो भिकारी बाबाच्या गावी जायला निघाला. त्याने स्वतःहा बरोबर पाच हजार रुपये घेतले.

त्या गावात पोहोचताच संध्याकाळ झाली. तो सरळ त्या मोठ्या चिंचेच्या झाडाकडे गेला. परंतु भिकारी त्याला तेथे दिसला नाही. व त्याचा रहाण्याचा काही ठावठिकाणाही लागला नाही.

"काय पहात आहेस? तो आंधळा भिकारी बाबा त्या शंकराच्या देवळात रहातो." एका शेतकऱ्याने त्याला ओळखल्या सारखे करीत सांगितले.

दिपक घाईघाईने शंकराच्या देवळाच्या बाजूला निघाला. "अहो बाबा, इथं कोणी आंधळा भिकारी आहे? देवळाच्या पायरीवर चढून त्याने देवळाच्या चौथऱ्या-वर बसून बिडी पीत असलेल्या एका शेत-कऱ्याला विचारले. त्याने दिपकला पाया पासून डोक्यापर्यंत चांगले निरखून घेतले. त्याची नजर त्याच्या गळ्यातील सोन्याच्या साखळीवर पडली. "काय म्हणालात? हां, एक आंधळा इथे रहातो. तो अजून आलेला नाही. थोड्या वेळातच येथे येईल."

दिपक देवळाच्या आतल्या बाजूला गेला व कोपऱ्यात बसून राहिला. थकल्यामुळे त्याचा डोळा लागला. अचानक त्याच्या डोक्यावर कोणीतरी काठीचा प्रहार केल्या-मुळे त्याची झोप उडाली. त्याने पाहिले तेव्हां चोर त्याची पैशांची बॅग व गळ्यातील सोन्याची साखळी घेऊन पळून जात होता. तो दुसरा तिसरा कोणी नसून बिडी पिणारा माणूस होता.

दिपक वेदनेने कण्हू लागला. त्याचा आवाज ऐकून पाठीमागे झोपलेला आंधळा भिकारी उठून दिपकच्या जवळ आला. दिपकने त्याला ओळखले व स्वतः विषयी सांगत म्हटले—"बाबा, मी दिपक आहे. मला क्षमा करा. मी पाप केले आहे."

दिपकने त्याला सोडून जाण्यापासून परत तेथे येईपर्यंतचा सारा वृत्तांत सांगितला व आपल्याबरोबर आपल्या घरी येण्याविषयी विनविले.

भिकाऱ्याने आपल्या धोतरातली एक चिंधी फाडून प्रथम दिपकची जखम बांधली व बनांतल्या मनांतच हसत गप्प राहिला,

"सांगा बाबा, माझ्या बरोबर याल ना? तुम्ही जर का आला नाहीत तर माझी बायको स्वतः तुम्हांला न्यायला येईल. दिपक भिकाऱ्याच्या खांदे धरून हलवित म्हणाला.

तेव्हां भिकारी म्हणाला—"बाळा, नशिब किती बलवत्तर आहे. ह्या देवळातील देवाहूनही प्रत्येकाचे नशिब मोठे आहे. ज्याच्या भाग्यात जी गोष्ट नसते ती परमेश्वराने त्याला दिली, तरी त्याला मिळत नाही. तुझी पैशांची पिशवी चोराने पळवून नेली. जी तू माझ्या करीता आणली होतीस. आणि त्यापूर्वी सुद्धा सोन्याच्या नाण्यांची पिशवी मलाच मिळाली होती. परंतु ती सुद्धा माझ्या नशिबी नव्हती ती तुझ्या भाग्यात होती. त्यामुळे ती घेऊन तू पळून गेलास. व त्याच पैशाने व्यापार करून श्रीमंत माणूस बनलास. माणूस प्रत्येक गोष्ट आपल्या नशिबाने मिळवतो. माझे भाग्य तर उघडच आहे. की; कधीही रात्रीची पहाट होतच नाही त्यामुळे तुझ्या बरोबर जाण्याचा प्रश्नच येत नाही. झोप जा. सकाळ होताच आपल्या घरी परत जा.



सर्वत्र शांतता पसरली भिकारी आपल्या नशिबाला दोष देत होता व दिपक आपल्या पापाचे प्रायश्चित करत होता. कोंबडा आरवताच दिपकची तंद्री भंग झाली व त्याच्या तोंडून शब्द बाहेर पडले—"बाबा, खरंच तुम्ही येणार नाहीत कां?

भिकाऱ्याच्या शरिराची थोडी हालचाल झाली. दिपकला थोडी आशा वाटू लागली. परंतु भिकाऱ्याने कनवटीला लावलेली एक थैली काढली व ती दिपकच्या हातात देत म्हटले. "ह्यात थोडे सुट्टे पैसे आहेत. ते ठेवून घे. लांबचा प्रवास आहे. रस्त्यात भूक लागली तर काहीतरी घेऊन खा.

भिकाऱ्याच्या मार्गेने त्याला गलबलून आले–"मी तुमच्या ऋणाने थकलेलो आहे." असे म्हणत डोळ्यांतून आलेली आसवे पुसत दिपक शहराकडे जाऊ लागला.

यावर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला–"राजा, भिकाऱ्याला प्रथम जी सोन्याच्या नाण्याची थैली मिळाली ती दिपकने गुपचुप लांबवली. दुसऱ्या वेळेस दिपकने त्याच्या करीता घेऊन आलेले पैसे चोरांनी पळविले. त्या दोन्ही गोष्टी त्याच्या दुर्भाग्यानी घडल्या हा करीता त्याच्या नशिबाला दोष देणेच योग्य आहे. परंतु जेव्हां दिपक भिकाऱ्याला स्वतःहाच्या घरी घेऊन जायला आला. तेव्हां तो का गेला नाही ? ते तर त्याच्या इच्छेवर अवलंबून होते. त्या करीता भाग्याला दोष देणं काय उचित होईल कां ? याचे समाधानकारक उत्तर माहित असून तु दिले नाहीस, तर परिणाम तुला माहीतच आहे. तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायांवर लोळू लागतील.

विक्रमादित्य म्हणाला–"हे बरोबर आहे की; दिपकच्या बरोबर जाण्याने त्याचे दुर्दैव नाहीसे झाले असते. परंतु त्याला आपल्या दुर्भाग्याची सावली सुद्धा त्याच्यावर पडणे बरोबर वाटत नव्हते. कारण त्याचा विश्वास होता की, दिपक जोपर्यंत त्याच्या बरोबर रहात होता. तोपर्यंत भिकारीच राहिला. जेव्हां दुसऱ्या वेळेस तो पैशांनी पिशवी त्याच्याकरीता घेऊन आला तेव्हां तो पिशवीच नाही पण त्याच्या गळ्यातला सोन्याचा हार सुद्धा चोरांनी पळविला.

तो दिपकवर मुलाप्रमाणे प्रेम करीत होता. त्याच्या सुखात आपली सावली पडून तो आयुष्यभर भिकारी होण्यापेक्षां आपण आहोत भिकारी तेच बरे असे समजून त्याने दिपक बरोबर जाणे टाळले.

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हा जाऊन झाडाला लोंबकळू लागला. (कल्पित)





# भित्र्याने आयुष्य पळविले

शाम सुंदरपुरचा रहाणारा होता. त्याचे आईवडिल त्याच्या लहानपणीच वारले. त्यामुळे त्याचे पालनपोषण त्याच्या म्हाताऱ्या आजीने केले.

तो दिसायला अगदी धष्टपुष्ट होता. पण कमालीचा भित्रा. त्याला स्वतःहाच्या सावलीची सुद्धा भीती वाटे.

एका संध्याकाळी त्याच्या घरी एक साधु आला. त्याच्या आजीला साधु-संन्याशांविषयी फार भक्ति होती. त्यामुळे तिने त्याचे आपल्यापरीने चांगले आतिथ्य केले. ती जेव्हां त्या साधुला जेवायला वाढीत होती. तेव्हां शाम तेथेच एका कोपऱ्यात बसून होता. तो साधुला भयभीत नजरेने पहात होता. तेवढ्यात स्वयंपाकघरातून एक उंदीर पळत बाहेर आला. त्या उंदराला शामजवळ बसलेल्या मांजराने पाहिले. पण तीने त्याच्यावर झडप घातली नाही व ती म्याऊँ म्याऊँ करत दाराबाहेर निघून गेली.

मांजराने उंदराला बघूनही त्यावर झडप न घातलेली पाहून साधुला खूप आश्चर्य वाटले. तेव्हां त्याच्या आजीने शामला म्हटले–"अरे बाळ शाम, उंदराच्या होणाऱ्या त्रासाला कटाळून तू मांजराला पाळलेस. पण ती सुद्धा तुझ्यासारखीच भित्रीभागुबाई झाली बघ.

साधुला शामविषयी कुतूहल निर्माण झाले. जेवण होताच त्याने शामला आपल्या समोर बसविले. त्याचा हात निरखून त्यावरील रेषा पहात मनाशीच पुटपुटू लागला. नंतर आजीला शामविषयी सांगत म्हणाला–"तुमच्या नातवाच्या हस्तरेषा खूप विचित्र आहेत. त्याला नेहमी भित्रा-भेकड म्हणून तुम्ही रागावू नका."



"स्वामी! मी करू तरी काय? ह्याचे वागणेच असे विचित्र आहे की, राग आल्याशिवाय रहातच नाही. ह्याचा भित्रेपणा जाण्याकरीता काही उपाय असला तर सांगा. मी आपले उपकार जन्मभर विसरणार नाही."

साधू म्हणाला–"ह्याचा भित्रेपणा औषधपाण्याने अथवा नाहीसा होणार नाही. ह्याचे भविष्य विचित्र आहे. उलट ह्याच्या भित्रेपणामुळे एक महान कार्य त्याच्या हातून घडणार आहे."

ह्या गोष्टी नंतर शाम एकदा गावच्या जमिनदाराच्या वाड्यासमोरून जात होता. तेव्हां त्याला जमिनदाराचे पाळलेले कुत्र्याचे पिल्लू दारात बसलेले दिसले. ते दिसायला इतके गोंडस होते की; शामने जवळ जाऊन त्याला उचलून घेतले व गोंजारू लागला. तेवढ्यात आतून बाहेर येत असलेल्या जमिनदाराने ते पाहिले व त्याला रागावत हाकलून लावले.

कर्म धर्म संयोगाने त्याच रात्री जमिनदाराच्या वाड्यात चोर चोरी करण्यास आले. त्यांना पाहूनही ते पिल्लू शेपूट पायात घालून न भुंकताच दूर पळून गेले. ते समजताच जमिनदाराला शामबद्दल शंका आली. त्याला वाटले त्यानेच ह्याला काही खायला घातले असावे. त्याचा न्याय निवाडा करण्याकरीता त्याने शामवर आरोप केला व त्याला कोर्टात नेले.

न्यायाधीशाने जमिनदाराचे सर्व म्हणणे ऐकून घेतले व शामला गीतेवर हात ठेवून खरं काय ते सांगायला सांगितले.

शामने गीतेवर हात ठेवतानाच त्याचा हात न्यायधीशाच्या हाताला लागला. तात्काळच त्याच्या स्वभावात, बदल पडू लागला. न्यायाधीश न्याय करायला भिऊ लागले. पूर्वी अपराध्याला कठोरात कठोर शिक्षा देण्यासही तो घाबरत नसे परंतु आता शामचा स्पर्श होता क्षणीच तो घाबरू लागला. तो म्हणू लागला–"मला खरा पुरावा दोन्ही पक्षांकडून मिळाला पाहिजे तरच मी न्याय देईन; त्यामुळे आजचे कामकाज बंद. असे म्हणत तो कचेरीतून निघून गेला. ते पाहून जमिनदाराचे डोके भडकले. त्याला कळेना की, शामच्या बाबतीत असे काय गुढ आहे?

त्या राज्यातील राजाचा मंत्री सुगुणवर्मा ह्याच्याशी जमिनदाराची मैत्री होती. त्यामुळे जमिनदाराने शाम बद्दलच्या सर्व गोष्टी मंत्र्याला सांगितल्या. त्याने शामच्या हस्तस्पर्श होताच, मांजर, कुत्रा व न्यायाधिश याच्यात कसा बदल झाला ते सविस्तर सांगितले. मंत्र्याने काहीवेळ विचार केला व शामला राजधानी मध्ये येण्यास सांगितले.

जेव्हां शाम मंत्र्याला भेटायला आला. तेव्हां मंत्री एका पहिलवानाशी गप्पा मारीत होता. शामने हस्तांदोलन करण्याकरीता त्याचा हात हातात घेतला. घेताक्षणीच तो पहिलवान पळपुट्यासारखा पळून जाऊ लागला.

मंत्र्याने शिपायांकडून त्याला पकडून आणले व पळून जाण्याचे कारण विचारले.

पहिलवानाने लाजेने मान खाली घातली व भीतीने थरथरं कांपू लागला. मंत्र्याला म्हणाला–"काय कारण कळत नाही मला एकाएकी खूप भिती वाटू लागली आहे. वाटते आहे की कोणीही येऊन मला पराजित करेल. असे म्हणत तो परत पळून जाऊ लागला.





ह्या प्रयोगाने मंत्र्याचा जमिनदाराने सांगितलेल्या गोष्टीवर चांगलाच विश्वास बसला. शामच्या हाताचा चांगलाच प्रभाव आहे. तो ज्या ज्या गोष्टीला हात लावतो. ती व्यक्ति भित्री व भेकड बनते.

ही गोष्ट मंत्र्याने राजाला जाऊन सांगितली राजाला हे ऐकतांच खूप संताप आला. राजा म्हणाला–"हा कुणी शापग्रस्त दिसत आहे. हा राज्यातील सर्व प्रजेला भेकड बनवेल ह्याला तावडतोब फांशी द्या."

शामला फांशी देण्याची गोष्ट ऐकताच आजी छाती पिटून रडू लागली व मंत्र्याकडे येऊन त्याच्या पाया पडत म्हणाली–"हा माझा एकच आधार आहे. त्याला कसेही करून वाचवा. मी त्याला घेऊन राज्याच्या बाहेर निघून जाईन. मी त्याच्या प्राणांची आपल्याकडे भीक मागते."

मंत्र्याने शामच्या आजीला समजावत म्हटले–"आजी, तुम्ही निश्चिंत रहा. तुमच्या नातवाला काहीही होणार नाही.

त्यानंतर मंत्र्याने राजाला निवेदन करीत म्हटले–"महाराज, शामबद्दल लगेच निर्णय घेणें योग्य होणार नाही. तरी ह्याला एका महिन्यानंतर फांशी देणेच योग्य व चांगले. तोपर्यंत ह्याच्या हाताचा प्रभाव दुसऱ्यावर न पडेल." असा कडक पहारा ठेवावा.

राजाने मंत्र्याचे म्हणणे मान्य केले.

एक महिनाही गेला नाही. तोच राजाला एक चिंता लागून राहीली. शेजारच्या कलिंग राज्याचा राजा मोठ्या सैन्यानिशी त्याच्यावर हल्ला करणार आहे. हा निरोप सुंदरपुरच्या सरहद्दीवर रहाणाऱ्या शिपायाने त्याला आणून सांगितला.

सुंदरपुर लहानसे राज्य होते. व कलिंग राज्याबरोबर लढाई करणे म्हणजे सोपे काम नव्हते. त्यामुळे राजाने घाबरून मंत्र्याला बोलावणे धाडले.

"महाराज, कलिंग देशाचा राजा महेष याच्यावर उपाय करण्याकरीता मी एक योजना आधीच आखून ठेवली आहे. ती ऐकताच तुम्हाला खूप आनंद होईल–मंत्र्याने राजाला सांगितले.

मंत्र्याने शामच्या बरोबर दोन सैनिकांना पाठवून त्याच्या हातात कलिंग देशाच्या राजा करीता एक पत्र देत म्हटले–"तुला हे पत्र घेऊन देशाच्या सरहद्दीवर असलेल्या महेष राजाला नेऊन द्यावयाचे आहे."

तावडतोब शामने जाऊन ते पत्र छावणीत असलेल्या महेष राजाच्या हातात नेऊन दिले. राजा महेषला वाटले की, ते पत्र शरण प्रित्यर्थ आल्याचे असेल. कारण सुंदरपुर राज्य लहान आहे. त्याला माहीत होते. परंतु त्याने पत्र उघडून वाचले व त्याला खूप राग आला त्याने सैनिकांना हुकूम सोडला–"ह्या मूर्खाचे डोके उडवा."

हे ऐकताच शाम घाबरून थरथर कापू लागला. व दोन्ही हात जोडत त्याच्या पाया पडत म्हणू लागला–"मला माहीत नाही की, ह्या पत्रात काय उल्लेख आहे. मला फक्त पत्र पोचविण्याचे कामच सांगितले होते ते मी केले. असे म्हणत त्याने राजाचे दोन्ही पाय हाताने धरले.

क्षणात चमत्कार घडला वाघासारखा धावून जाणारा राजा मांजरीसारखा घाबरत शामला म्हणू लागला–"आम्ही सुंदरपुरवर हल्ला करण्याची चूक केली. मंत्र्याला जाऊन सांग की; आताच्या आत्ता मी माझे सैन्य घेऊन परत जात आहे. आम्हाला क्षमा करावी."

असे म्हणतच त्याने आपली छावणी हलविली व घाबरून सैन्यासह निघून गेला. शामने स्वतःह्याच्या भित्रेपणानेच राज्यावर आलेले संकट घालवले. परंतु ह्याच बरोबर त्याचा भित्रेपणा सुद्धा नाहीसा झाला. मंत्र्याने त्याला सुंदरपुर राज्यातील सैन्यात भर्ती केले व त्याने पुढे अनेक शत्रुंशी मुकाबला करून आपली बहादुरी दाखविली.

सुंदरपुरच्या राजाने मंत्र्याच्या हुशारीची वाखाणणी केली व एवढ्या मोठ्या येणाऱ्या संकटाला दूर केल्याबद्दल त्याचा राज्यात मोठ्या थाटामाटाने सन्मान केला.





# मुलाचे साहस

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असतां एकदा बोधिसत्वांनी काशी राज्यातील एका गावात शेतकऱ्याच्या घरी जन्म घेतला. त्याच्या आई-वडीलांनी त्याचे नाव राम ठेवले. तो कोड-कौतुकात वाढू लागला.

लहानपणापासून त्याची बुद्धी तल्लख होती. त्याच्या बरोबरीच्या मुलात तो हुषार व विचारी होता. आईवडिलांचा तो खूप लाडका व आजोबांचा जीव की प्राण.

त्याचे आजोबा खूप म्हातारे होते. थकल्यामुळे घरात काहीच काम करू शकत नव्हते. परंतु बाकीच्यांनाच त्यांची सेवा शुश्रुषा करावी लागे. ही गोष्ट रामच्या आईला आवडत नव्हती.

एकदा रामच्या आईने नवऱ्याला म्हटले– शुश्रुषा करता करताच एक दिवस मरून जाईन. सर्व दिवसभर त्यांचेच काम करत बसा. असे काही दुसरे काही कामच नाही. शेवटी हे असे किती दिवस चालणार!"

"जो पर्यंत ते जिवंत आहेत तोपर्यंत, त्यांची सेवा करणे हे तर आपलं कर्तव्य आहे. गळा दाबून त्यांचा जीवतर घेता येणार नाही" थोड्याशा रागानेच रामच्या वडिलांनी सांगितलं.

"मारून टाकण्यात तरी काय चूक आहे? त्यांच्या जगण्याने घड त्यांना सुख नाही की आपल्याला असे झिजून जगण्यापेक्षा एकदाचे मेलेले बरे" आवाज चढवत त्याची बायको म्हणाली.

शेतकऱ्याला प्रथम बायकोचे म्हणणे आवडत नसे, त्याला वाटे वडीलांना दुःख देण्यासारखे दुसरे पाप नाही. शेवटी शेवटी तो बायकोच्या आधीन जाऊ लागला. व तिचे म्हणणे खरं मानून शेवटी वडिलांना मारून टाकले तर पाप लागणार नाही ह्या विचाराने तो उपाय शोधू लागला.

एकदा शेतकऱ्याने आपल्या वडिलांना म्हटले–"बाबा, शेतात विहिर खोदण्याकरीता शेजारच्या गावातील सावकाराकडून कर्ज घेत आहे. त्याकरीता आपल्या सहीची सुद्धा जरूर आहे. तेव्हां बैलगाडीत बसून तुम्ही माझ्याबरोबर चला."

त्याचे वडील ती गोष्ट खरी असेल असे समजून त्याच्याबरोबर निघाले ते पहाताच राम सुद्धा हट्टाने त्यांच्याबरोबर निघाला. आजोबांच्या जवळ जाऊन बसला.



वाटेत खूप दाट रान लागलं. त्याने गाडी वाटेत थांबविली व फावडं घेऊन वडिलांना व मुलाला म्हणाला–'तुम्ही दोघे गाडीतच बसा. आणि तो झाडीत गेला, वडिल गेल्याचे पहाताच राम सुद्धा गाडीतून खाली उतरला. त्यानेही एक फावडं हातात घेतलं व "आजोबा, तुम्ही येथेच थांबा. मी आता येतोच म्हणत वडिल गेले त्या दिशेने गेला.

थोड्या दूरवर रामचे वडील फावड्याने झाडाजवळ एक खड्डा खणत होते. ते पाहून रामने झाडाच्या दुसऱ्या बाजूला खड्डा खणण्याचे काम सुरु केलं.

जरावेळाने कसल्यातरी आवाजाने शेतकरी थांबला. व आवाजाच्या रोखाने जाऊ लागला. तेथे त्याने रामला पाहिले व म्हणाला–'अरे राम हा खड्डा कशाला खणतो आहेस? असे म्हणत त्याने आश्चर्याने तोंडात बोटं घातले.

"ज्या कामाकरीता तुम्ही खणता आहात, त्याच कामाकरीता मी खड्डा खणीत आहे." रामने तेवढ्याच जोरात वडिलांना सांगितले.

वडिलांनी धैर्य करून विचारले–" काय तुला ठाऊक आहे कां? मी कशाकरीता खड्डा खणत आहे?

मला कारण तर माहित नाही. परंतु तुम्ही जे काम करणार ते चांगलेच असणार. तेव्हा त्याचेच अनुकरण करणे योग्य नाही








कां. त्यात चूक काय? रामच्या भोळ्या भावड्या स्वभावाची त्याला कीव आली.

तो आपल्या मुलापासून ही गोष्ट लपवू शकला नाही व मुलाला सांगत म्हणाला– "राम, मी तुझ्या आजोबांना गाडण्याकरीता खड्डा खणीत आहे. ते मेल्यानंतर त्यांच्या अंतिम कार्याची जबाबदारी माझी आहे. कारण त्यांचा मी मुलगा आहे नां?"

"पण आजोबा तर अजून जिवंत आहेत"

"क्षणभंगुर जीवनाचा काय भरोसा ते खूप म्हातारे झाले आहेत नां?" वडिलांनी मुलाला समजावत सांगितले.

"जीव हा काही शाश्वत नाही बाबा" ह्या करीता मी सुद्धा माझ्या वडिलांकरीता हा खड्डा खणत आहे, कारण मुलगा असल्यामुळे अंतिमकार्याची जबाबदारी माझी आहे ना? राम भोळेपणाने म्हणाला.

मुलाच्या तोंडून हे ऐकताच त्याच्या डोळ्या समोर काजवे चमकले मुलाने त्याचे डोळे उघडले. त्याला आता कळून चुकले की; तो किती अघोरी काम करणार होता. त्याला त्याची लाज वाटू लागली. शेतकरी आपल्या मुला व वडिलांबरोबर गाडीत बसून घरी परत आला.

त्याची बायको त्या दिवशी खूप आनंदात होती. ती खूप छान गोडाचा स्वयंपाक करून त्या दोघांची वाट पहात होती. परंतु गाडीतून सासऱ्याला उतरतांना पाहून तिचा सारा आनंद मावळला.

शेतकऱ्याने आपण जाऊन परत येईपर्यंतची सर्व कहाणी बायकोला सांगितली.

ते ऐकताच ती डोके बडवित रडू लागली–"हाय् रे देवा! जग तरी कसे बदलले. आम्ही मुलांना किती प्रेमाने सांभाळ केला. तरी मुलगा आपल्या बापा करीताच खड्डा खणायला निघाला. अशा मुलाचे तोंडही पहाणे म्हणजे पाप आहे."

अग! पण हसले काम मी पण करायला चालली होतीस. माझा सांभाळ त्यांनी लाडानी नाही केला? ह्या गोष्टी नंतर शेतकऱ्याच्या बायकोने सासऱ्या विषयी पुन्हां चुकून नवऱ्याकडे तक्रार केली नाही.



## सैनिकांचा विद्रोह

ईस्ट इण्डिया कंपनीने जिंकलेल्या राज्यांचे रक्षण करण्याकरीता आपल्या सैन्यात भारतियांना भर्ती केले. परंतु भारतियांचे मासिक वेतन व भत्ता इंग्रज शिपायांच्या मानाने कमी होता. त्यांना अनेक प्रकारने अपमान केला जाई. इंग्रज शिपायी घोड्यावर बसून जात तेव्हां त्यांचे सामान भारतिय सैनिक नेत.





बंदुकाना काडतुसांचा उपयोग करावा लागे. त्याकरीता दातांने ती सोलावी लागत. परंतु त्यात जनावरांची चरबी मिसळत आहेत हे भारतीय सैनिकांना समजले. तेव्हां त्यांच्या धार्मिक विश्वासाला ठेच लागली व ते इंग्रजांच्या विरुद्ध भडकले.



भारतिय सैनिकांनी आपापसात विचार-विनिमय केला. आणि १० मे १८५७ ला मेरठ छावणीवर छापा घालून इंग्रज अधिकाऱ्यावर अचानक हल्ला केला व त्यांना बंदी केले.







ह्यानंतर ते सर्व भारतिय सैनिक दिल्लीवर चालून गेले. त्याने वाटेत भेटणाऱ्या सर्व छावण्यांमध्ये संदेश दिला. तेथील सर्व सैनिक प्रथम पासूनच असंतोषी होते. त्यामुळे हा विद्रोहाचा वणवा सर्वत्र पसरला.

दिल्लीला पोहोचताच भारतिय सैन्यांने लाल किल्ल्यावर ताबा मिळविला आणि बहादुर शाह जफर याला आपला राजा बनविले. दिल्लीचे ब्रिटीश सैन्य हारले. दिल्ली भारतिय सैन्याला मिळाली.





तिकडे बिठूर मध्ये दुसऱ्या बाजीरावाचा दत्तक मुलगा नानासाहेब ह्याला इंग्रजानी राज्याचा वारस म्हणून मान्यता दिली नाही. तरी पण वीर आणि साहसी अशा तात्या टोपेनी नानासाहेबाचा राज्याभिषेक करविला व इंग्रजाच्या विरुद्ध त्याला जाऊन मिळाला.

झाशी राज्याचा दत्तक मुलाला सुद्धा इंग्रजानी वारस म्हणून मानले नाही व झांशीवर आपले वर्चस्व स्थापण्या करीता आपल्या सैन्याला पाठविले. झांशीची राणी लक्ष्मीबाईने त्यांच्या विरुद्ध स्वतः हाच्या नेतृत्वाखाली लढ्याला तोंड दिले. युद्धात इंग्रजांचे सैन्य पराजित झाले. त्यांच्या अधिकाऱ्यांना कैद केले.





राणीने बंदी झालेल्या सैनिकांना आदरपूर्वक वागविले व त्यांना सूचना दिली की, "आम्ही तुम्हांला पाहुण्या-सारखे ठेवू परंतु तुम्ही तुमच्या अधिकाऱ्यांना सांगायचे पाहिजे की; त्यांनी आमच्या परंपरेचा अपमान करू नये." तरी पण अचानक एका प्रसिद्ध ब्रिटीश सैन्यांचा अधिकारी सर ह्यु रोज ह्याने भरपुर सैन्यानिशी झांशीला घेराव घातला.

राणी लक्ष्मीबाईने शर्थीने लढ्याला तोंड दिले. तरी पण इंग्रजांच्या अनेका सैन्यापुढे व आधुनिक शस्त्रास्त्रापुढे त्यांना टिकाव लागला नाही. व झांशीचा किल्ला इंग्रजांनी काबीज केला. सरते शेवटी राणी आपल्या दत्तक पुत्राला पाठीशी बांधून किल्ल्याच्या बाहेर सुरक्षित पडली.





नाना साहेब आणि तात्याटोपे दोघांनी झांशीच्या राणीशी संगनमत होऊन ग्वालीयरवर चढाई केली. इंग्रज समर्थक सिन्धा किल्ला सोडून पळून गेले. ग्वालीयरच्या सैन्याने व राणीने ब्रिटीशांचा समूळ नायनाट केला.

तावडतोब सर ह्यू रोज ससैन्यानिशी ग्वालियरवर चाल करून आला. दोन्ही सैन्यात भयंकर युद्ध झाले. राणीला स्वतःचा बचाव करून पळून जावे लागले. इंग्रजांनी तिचा पाठलाग केला. बाटील राणीने बऱ्याच शर्थीने सैन्याला तोंड दिले. शेवट पर्यंत इंग्रजाना राणीला पकडता आले नाही. लढून लढून ती बरीच जखमी झाली होती.





शेवटी जखमी राणीने १७ जून १८५८ मध्ये एका बागेत आपला प्राण सोडला. तिच्या मृत्युची वार्ता समजताच शत्रुचे सैन्य तेथे येऊन पोहोचले. परंतु ते येण्या-पूर्वीच तिचा अंतिमसंस्कार राणीच्या लोकांनी केला होता. अशा तऱ्हेने झांशीची राणी लक्ष्मीबाई इतिहासात अजरामर झाली. तिचे उदात्त चरित्र व विरांगनेचे रूप अमर झाले.



# चांगले डोळे उघडले

उज्वलगिरी हे मारवाड राज्यातील एक मुख्य ठिकाण होते. सौंगध हा उज्वलगिरि राजाचा प्रमुख मंत्री होता. त्याच्या देखरेखाखाली राज्य कारभार चालत असे. राज्यातील कायदे, न्याय रक्षण यावर राजा प्रसन्न होता. एक योग्य शासक म्हणून सौंगध राजाचा विश्वास-पात्र बनला होता.

एकदा सौंगध आपल्या इतर अधि-काऱ्यांच्या समवेत गप्पा गोष्टी करीत होता. तेव्हां गावातील काही नागरिकांनी येऊन तक्रार केली—"प्रभो, नगरात अपराध जास्त होऊ लागले आहेत. दिवसाढवळ्या लोक चोऱ्या माऱ्या लुटालूट करू लागले आहेत. रात्री तर चोरांचेच राज्य असते. प्रजेला आपला जीव व वस्तुबद्दल खूप घोर लागलेला आहे. तरी कृपा करून काही बंदोबस्त तावडतोब करावा."

सौंगध ह्या गोष्टी ऐकून रागाने लाल झाला. व म्हणाला—"तुम्हां लोकांना माहीत आहे की, मी येण्यापूर्वी इथे इतकी अंदाधुंदी माजली होती. कैक लोकांना कैदेत बंद केले होते. ठिकठिकाणी सुरक्षितते करता पहारा होता. आता अपराधी लोकांची संख्या कमी झाली आहे. परंतु एवढ्या मोठ्या शहरात हजारो लोक नविन येतात जातात तेव्हां थोड्या फार फरकाने ह्या चुका होणारच.

"नाही नाही, प्रभो, अशी गोष्ट नाही. ह्यापूर्वी नक्कीच कित्येक दिवस नगरात शांतता होती. बहुतेक अपराध चोऱ्या कोणी करीत नव्हते. परंतु काही दिवसांपासून परत अपराधींची संख्या वाढू लागली आहे. दिवसा लोकांच्या वस्तु पळविल्या जातात. दुकानदारांचे सामान लुटले जाते. रात्रीची गोष्ट तर सोडाच.

गंगा प्रसाद





सौंगध जास्तच चिडला व म्हणाला–"माझ्या ह्या गोष्टींवर अजिबात विश्वास होत नाही. मला वाटते की; माझ्या विरुद्ध कट करण्या करीता हा कांगावा करण्याची काही चाल आहे."

सौंगधचा मुख्य सल्लागार नागवर्मा त्यावेळेस त्याच्याच जवळ थमलेला होता. तो शांतपणे सर्व गोष्टी ऐकत होता. जेव्हां लोक निघून गेले. तेव्हां त्याने सौंगधला म्हटले–"ह्यांच्या म्हणण्यामध्ये काहीतरी तथ्य असावे. जर ह्याचांच आपल्याबद्दल असा विचार असता तर ते आपल्याकडे तक्रार घेऊन आलेच नसते.

"आता पूर्वीच्या दिवसांत कायदे कानून व राज्यव्यवस्था स्थापन करण्यामध्ये जी सफलता मिळाली. त्याच्यात आताच्या बदलाने नाराजी येणे सहाजिकच आहे. ह्या कारणामुळे चोर त्याचा जास्त फायदा उठवत असावेत. आपण त्यावर पांघरूण घालणे बरोबर होणारे नाही.

नागवर्मांचे बोलणे त्याने उडवून लावले. व त्याला रागाच्या आवेशात येऊन म्हणाला–"ते काही नाही! मी मनापासून म्हणतो ह्या गोष्टींना काही आधार असल्याशिवाय ह्यागोष्टींवर माझा विश्वास बसणे शक्य नाही. नागवर्मा गप्प बसला.

एका आठवड्याने नगरातील प्रतिष्ठीत सावकाराने सौंगधला जेवायला निमंत्रण दिले. जेवणे मध्यरात्रीपर्यंत चालू होती. चविष्ठ गोड पदार्थामुळे सौंगध जरा जास्तच जेवला व चालतच घरी जायला निघाला. त्याने आपली पालखी परत पाठवून दिली. व नागवर्मा व इतर काही लोक सौंगध बरोबर पायीच निघाले.

रस्त्यावर चिटपांखरूही नव्हते. शांतता चोहीकडे होती. अंधार दाट झाला होता. ते पुढे जाऊन एका कोपऱ्यावर वळले नाही तोच दोन जणांनी येऊन सौंगधला व इतरांना हाणमार केली व ते तेथून सुसाट पळून गेले. थोड्यावेळातच सौंगधला कळले की, त्याच्या गळ्यातील सोन्याचा मुल्यवान हार नाहीसा झाला आहे.

सौंगधने नागवर्मा व आपल्या इतर लोकांना चारांचा पाठलाग करण्याकरीता पाठवले. व स्वतःही त्यांचा शोध घेण्या-करीता पाठोपाठ जाऊ लागला.

सौंगध थोडा पुढे गेला नाही. तोच आडव्या गल्लीतून एक माणूस घाबरत भीतीने कांपत समोर आला. त्याच्या गळ्यात तसाच एक रत्नहार चमकतांना त्याला दिसला. सौंगध व त्याच्या बरोबर येणाऱ्या माणसाला पाहून तो जागच्या जागी उभा राहिला.

सौंगध त्याला दरडावत म्हणाला–"प्रथम तो गळ्यातला रत्नहार काढून दे. त्या माणसाने तो रत्नहार काढून त्याला दिला व वेगाने तेथून पळून गेला.

नागवर्मा ते सर्व पाहून सौंगधला म्हणाला–"श्रीमान्! आपण तर राज्याचे रक्षणकर्ते आहात. जर तुम्हीच कोणालाही दरडावून धमकी घालून दागीने काढून घेतलेत तर न्यायाचे रक्षण कोण करणार? जर ही गोष्ट गावात पसरली तर आपली किर्ती धुळीला मिळेल."

"कां? चोराकडून आपला हार काढून घेतला तर त्यात अन्याय कोणता?" ज्या चोराचा आपण शोध काढत होतो. तोच आपल्या समोर आयता आला.

"पण आज तर आपण तो रत्नहार घालूनच आला नव्हतात. त्यातले काही



हिरे निघाल्यामुळे आजच तुम्ही तो हार माझ्यासमोर सोनाराला हिरे बसविण्या करीता दिला होतात." नागवर्मानी आठवण करून देत म्हटले.

नोकरांनी सुद्धा सौंगधला आठवण करीत सांगितले की; मीच आपल्या सांगण्यावरून त्या सोनाराला आपल्या घरी घेऊन आलो होतो.

सौंगधला आश्चर्याबरोबर कुतुहल वाटू लागले तो माणूस कोण होता की; त्याने स्वत:हाचा रत्नहार मुकाट्याने काढून आपल्याला कां दिला.?

नागवर्माने ह्या गोष्टीचा खुलासा करीत सांगितले–"खरे तर, श्रीमान्! तो माणूस नगरातील सज्जन माणूस होता. गावांतील चोरांच्या सुळसुळाटाला घाबरलेला होता. तेव्हां आपल्यालाही चोर समजुनच जिवाच्या भीतीने त्याने घाबरून गळ्यातील रत्नहार काढून दिला व सुसाट पळून गेला."

पुन्हां नागवर्मा त्याला समजून सांगत म्हणाला–"चोरांच्या हल्लयाने आपल्या मनांत एकच शंका उत्पन्न झाली की; आपला हार चोरांनी पळविला. राज्यातील प्रत्येकजण एक दुसऱ्याला शंकेखोर दृष्टीने पाहू लागला आहे. आपण सुद्धा एका चांगल्या गृहस्थाला चोरच समजलात. सर्व जनतेला चोरांचा किती त्रास भोगावा लागत असेल. ह्यावरून आपणच अंदाज करू शकता."

नागवर्माच्या बोलण्याने सौंगधचे डोळे उघडले. त्याला आता वाईट वाटू लागले की; नागरीक आपल्याकडे चोरांची तक्रार घेऊन किती आशेने आले होते. परंतु त्याचे ऐकून न घेता आपण त्यांना रागाने हांकलून लावले.

सौंगधने दुसऱ्या दिवशी दवंडी पिटविली. व लोकांचा विश्वास संपादन केला. त्या सज्जन माणसाचा रत्नहार त्याला परत केला. त्याने बरोबर न्याय व प्रजेचे रक्षण करण्याकरीता पाऊल उचलले.

प्रजेत काही दिवसांनी शांती व रक्षण यांचा चांगला मिलाफ झाला.





# दुष्टपणाचे फळ

उल्हास लहानपणासून खूप खोडकर होता. तो कोणाच्याही खोड्या काढीत असे. माणसांच्याच नाही तर खोड्या काढण्यात त्याचा हद्द मुक्या प्राण्यांपर्यंत गेली होती. सर्वजण त्याच्या तशा त्रासाला कंटाळले.

दुर्दैवाने एके दिवशी त्याची नजर एका अशक्त अशा कुत्र्याच्या पिल्लावर पडली. तो तहानभुकेने व्याकुळ झाला होता. त्याची एकूण एक हाडे बाहेर दिसत होती. त्यामुळे उल्हासच्या वडिलांनी त्याची तशी अवस्था पाहून त्याला रोज थोडे खायला घायला सुरवात केली. तेव्हांपासून उल्हास त्या पिल्लालाच त्रास देऊ लागला. त्याच्या नेमका खाण्याच्या वेळेस त्याचे भांडेच उचलू लागला. त्यामुळे भुकेने तो कुई कुई ओरडे त्याला सतावून मग तो खाणे त्याला देई. ते पिलू खाणे मिळताच उपकार झाल्याप्रमाणे कृतज्ञतेने आपली शेपटी हाल्वीत असे.

उल्हास त्या पिल्लांला झाडाच्या फांदीवर उंचावर नेऊन बसवे आणी पिल्लू भीतीने जोरजोरात ओरडू लागल्यावर आनंदाने टाळ्या वाजवे. त्याचे वडिल त्याच्या अशा वागण्यावर त्याला खूप रागवित असत.

तो हळूहळू लहानाचा मोठा झाला. परंतु खोडकर व हट्टी स्वभावामुळे जास्त शिकला नाही. त्याच्या गावी काही वर्षे पाऊस न पडल्यामुळे दुष्काळ पडला. त्याच काळजीने त्याच्या वडिलांनी अंथरूण धरले. आणि काही दिवसांतच ते मरण पावले. एकटा उल्हास आपल्या पोटपाण्याकरीता गांव सोडून शहरात आला.

सुदैवाने त्याला शहरात एका रंगशेटच्या घरी नोकरी मिळाली. महिना जेवण धरून त्याला पंचविस रुपये जास्त मिळू लागले.

रंगशेट खूप सज्जन आणि धार्मिक विचाराचे होते. ते आपल्या नोकरांवर खूप दया प्रेम दाखवित असत.

रंगशेटचा शेखरनावाचा एक दहा वर्षाचा मुलगा होता तो उल्हासला गोष्टी सांगण्या-करीता भंडावून सोडीत असे. गोष्टी सांगण्यामुळे त्याचे काम रेंगाळे व त्याला मालकाची बोलणी खावी लागत.

मालकाला संशय आला की, तो काम करावयाचे टाळत आहे. तेव्हां त्याने त्याला रागावत विचारले—"तुझे कामात हल्ली मन लागत नाही. असेच जर होऊ लागले तर तुला कामावरून काढून टाकले जाईल.

त्या भीतीने उल्हासने खरे कारण काय ते सांगून टाकले. रंगशेट आपल्या मुलाला शेखरला बोलावून खूप रागावले.

त्या दिवसांपासून शेखरने उल्हासला जास्तच त्रास द्यावयास सुरवात केली.

थंडीचे दिवस होते. दांत कुडकुडण्या इतकी थंडी पडली होती. शेखर पहाटे पहाटेच उल्हासकडे गरम कपडे घेऊन आला. आणि म्हणाला—"अश्या थंडीत ह्या उबदार कपड्याने खूप मजा येते. तू जर हे जुने कपडे काढलेस तर, मी तुला हे गरम कपडे घालायला देईन."

गरम कपड्याच्या आशेने उल्हासनी आपले अंगावरचे कपडे काढले व एक टॉवेल गुंडाळून तो समोर उभा राहिला. तो मनातल्या मनात म्हणत होता की, "शेखरबाबू किती दयाळू आहेत."

तेवढ्यात शेखरने आपल्या टॉमी कुत्र्याला हांक मारले व उल्हासवर तुटून पडण्यास सांगितले.

उल्हास थंडीपेक्षां कुत्र्याच्या भीतीने कांपू लागला. शेखरच्या दुष्ट वागण्यावर दुःख करावे का आश्चर्य करावे तेच त्याला समजेना. कुत्र्याचा आवाज येताच तो जीव मुठीत धरून पळू लागला. तो पुढे कुत्रा मागे बराच वेळ पळत राहिले. शेखर कुत्र्याचे नाव घेत टाळ्या वाजवत उड्या मारत होता. उल्हास पळून दमून शेवटी रडकुंडीस आला.

तेव्हां शेखरने कुत्र्याला आपल्या जवळ बोलावले व उल्हासला त्याचे कपडे देत म्हणाला—"तुला आता खूप गरम होत असेलानां तेव्हां हे ओले कपडेच चांगले" हे घे अंगात घाल.

ते खरच ओले होते. त्यामुळे बर्फा सारखे गार लागत होते. उल्हासने ते कपडे ठेवून दिले व आपले जुनेच अंगात घातले. त्याला शेखरच्या दुष्टपणाचा खूप राग येत होता. त्यामुळे त्याने ताबडतोब मालकांकडे जाऊन शेखरबद्दल सांगण्याचे ठरविले.

त्याच वेळेला दुसरा एक नोकर शेखर-बद्दल तक्रारच करीत होता. मालक उलट त्यालाच धमकावत होते. शेखरने तुमच्या कामाच्या वेळेस तुमची खोडी काढली तर मी त्याला सोडणार नाही. परंतु कामा-व्यतिरिक्त त्याने खोडी काढली तर तो लहानच आहे नां. ? दरवेळेस सारखेचे येऊन तक्रार करण्याचे काम नाही."

मालकाचे ते बोलणे ऐकूनच उल्हास आल्या पावली परत गेला.

रंगशेटकडे बरेच नोकर चाकर होते. परंतु शेखर जास्त त्रास उल्हासलाच देत असे. त्यामुळे सर्व नोकरांना उल्हासची किंव येई.



एकदा एका नोकरांनी शेखरला एक कुत्र्याचे पिल्लू आणून दिले. व तो उल्हासला म्हणाला—"आता तुला शेखर त्रास देणार नाही. त्याकरीता मी त्याला पिल्लू आणून दिले."

उल्हासला आपल्या मित्राच्या बुद्धीचे कौतुक वाटले. परंतु कुत्र्याच्या पिल्लाचे नाव काढताच त्याला त्याच्या बालपणच्या गोष्टी आठवू लागल्या. त्याला आता कळले की; एकाच्या खोडकर स्वभावामुळे दुसऱ्याचे कसे हाल होतात. लहानपणच्या क्रुर वागण्याची शिक्षा आपल्याला भोगायला लागत आहे. देवाच्या दारी सुद्धा कसा न्याय आहे. "जसे करावे, तसे भरावे."



त्याला शेखरच्या कुत्र्याच्या पिल्लाची आठवण झाली. जर शेखर माझ्याशी इतका क्रूर वागला, तर त्या कुत्र्याच्या पिल्लाला काय करेल असे वाटून शेखरकडून ते पिल्लू मागून घेऊन आपले पाप धुवून काढावे असा विचार केला.

तो ताबडतोब शेखरकडे गेला. तेव्हां शेखर आपल्या शिकारी कुत्र्याला बरोबर घेऊन त्या पिल्लाच्या खोड्या काढत होता. व पिल्लू कुई कुई असा आर्तनाद करीत होते.

ते पाहूनच उल्हासच्या मनात पिल्लाविषयी प्रेम निर्माण झाले. आता त्याला वाटू लागले की; लहानपणी आपल्यात दया व प्रेम अजिबात नव्हते. त्याने शेखरला रागावत म्हटले–"जर तुला त्याला त्रास देण्यात एवढा आनंद वाटत असेल, तर तो त्रास मला दे. त्या बिचाऱ्या मुक्या प्राण्याच्या वाटेस जाऊ नकोस. त्याला सोडून दे."

"नाही सोडत, तू कां. मध्ये पडतोस? जा पाहू येथून. शेखरने जास्तच जोराने पिल्लाला आवळीत म्हटले.

उल्हासने मध्ये जाऊन पिल्लांला जवळ घेण्याचा विचार केला परंतु शेखरने त्याला अजिबात सोडले नाही. तेव्हां न रहावून उल्हासने शेखरला जोरदार थप्पड लगावली.

"नोकराची येथवर मजल! माझ्या मुलावर हात उगारला." मालकाने उल्हासला बोलावून घेतले.

उल्हास शांतपणे येऊन उभा राहिला. त्याने धीटपणे उत्तर देत म्हटले–"मालक, शेखर ह्या पिल्लाचा अतोनात छळ करीत होता. तसाच माझा सुद्धा करीत होता. तेव्हां सुद्धा मी त्याला काहीही न करता सर्व सहन केले व आपल्याला येऊन सांगितले. परंतु ह्या मुक्या पिल्लाबरोबरची त्याची क्रूर थट्टा माझ्याच्याने पहावली गेली नाही व मी त्याला थप्पड दिली." असे म्हणत असतानाच त्याच्या डोळ्यातून अश्रु येऊ लागले. तो मालकाला आपण केलेल्या बालपणच्या क्रूर खोड्या सांगत म्हणाला–"मी माझ्या क्रूर खोड्याची शिक्षा भोगली. त्यातून मोक्ष मिळण्याकरीता ह्या कुत्र्याच्या पिल्लावर प्रेम दया करून मी ह्यांतून माझे पुढील जीवन सुख व शांतीने घालवू पहातो."

उल्हासच्या ह्या बोलण्याचा रंगूशेठवर प्रभाव पडला. त्याने उल्हासच्या हातात शंभर रुपये देऊन त्याच्या गौरव केला, व त्याचा हातात त्या पिल्लाला देत म्हणाला–"ठिक आहे, ह्या पिल्लाचा प्रेमाने सांभाळ कर. आणि ह्यापुढे जर शेखरने तुला त्रास दिला तर मला ताबडतोब सांग.

रंगूशेठ उल्हासवर रागावले किंवा चिडले नाही. परंतु आपल्या मुलावर हात उगारल्याबद्दल त्याला बक्षिसी दिली. ह्याचे शेठच्या बायकोला नवल वाटले. तिने नवऱ्याला म्हटले–"तुम्हाला नोकरांपुढे आपला मुलगा म्हणजे काहीच वाटत नाही. उलट नोकराने आपल्या मुलाला मारल्याबद्दल त्याला बक्षिसच दिलेत. हा कोणता न्याय?

"हो, हा खूप मोठा न्याय आहे" शेटजी शांतपणाने आपल्या बायकोला म्हणाले. "उल्हास सुद्धा लहानपणी शेखरसारखाच क्रूर व दुष्टपणाने खोड्या काढीत असे. आता त्याला त्याचे प्रायश्चित भोगावे लागते आहे. त्याच्याच सारखे शेखरला भोगावे लागू नये' हिच माझी इच्छा. त्या कारणाकरीतां प्रसन्न होऊन मी त्याला बक्षिस दिले आहे."

पिल्लावर प्रेम करून उल्हासच्या जीवनात एकदम बदल झाला. त्यावर्षी त्याच्या गावात पाऊस पण खूप झाला. तो आपल्या गावी परत गेला. व शेती चांगल्या तऱ्हेने करू लागला. त्याच्या शेतात धान्य खूप पिकले. त्याच्या गुणांवर प्रभावित होऊन गावातील एका प्रतिष्ठीत माणसाने आपल्या एकुलत्या एक मुलीचे लग्न त्याच्या बरोबर लावून दिले. तेव्हां पासून त्याचे पशु पक्षावरचे प्रेम जास्तच वाढले. तो सुखाने आपले आयुष्य घालवू लागला.





# शेरास सव्वा शेर

शंगापूर मध्ये वल्लभ नावाचा एक सावकार रहात होता. त्याचे किराणा सामानाचे दुकान होते. तो गल्ल्यावर बसल्या बसल्या लोकांना कर्जाने पैसे देत असे. ते परत मिळाले नाही तर दामदुप्पट किंमत वसूल करीत असे. कोणालाही किंमती वस्तुवरच कर्ज देत असे.

नामदेव त्याच गावात रहाणारा गरीब शेतकरी होता. गरीबीमुळे तो नेहमी कोणा कोणाजवळून कर्ज काढीत असे. एकदा तो वल्लभ सावकाराकडे येऊन त्याला म्हणाला—"वल्लभ दादा, मी संकटात पडलो आहे. तू कितीही व्याज घे, परंतु मला पन्नास रुपये दे. एका आठवड्याभरात तुला परत करीन.

वल्लभ भयंकर कंजूस होता. त्याला माहित होते की, नामदेवला पैसा दिला तर व्याज दूरच राहिले मुद्दल मिळायची मारामार परंतु त्याला तो नाराज व्हावा असे वाटत नव्हते. म्हणून म्हणाला—"तू तर आज पहिल्यांदाच उधार मागत आहेस पण तुझी शप्पथ योगायोग पहा. माझ्याकडे आज एक दमडी देखील नाही. नाहीतर तुला मी खाली हाताने पाठवलेच नसते."

नामदेवला त्याच्या बोलण्याने खूप दुःख झाले. की; त्याने आपल्याला पन्नास रुपये न देऊन आपल्यावर अविश्वास दाखवला. थोडा थोडा त्याचा राग सूडाच्या भावनेने पेटला. त्याने निश्चय केला की; कसल्याही तऱ्हेने त्याच्या कडून पन्नास रुपये मिळविन तरच नावाचा नामदेव. तो अक्कल लढवू लागला की, कशा तऱ्हेने रुपये वसुल करावेत, विचार करकरून त्याला शेवटी एक उपाय सुचला.

एकदा वल्लभ आपल्या दुकानातील गल्ल्यावर बसला असताना नामदेव धावत तेथे आला व वल्लभच्या अगदी जवळ जात म्हणाला—"वल्लभ दादा, जरा लवकर सांग पांच दाहे किती होतात? वल्लभने विचार केला की; आकडे मोड माहित नसेल म्हणून विचारत असेल म्हणून त्याने गुणाकार करून सांगितले "पन्नास"

"तुझी अक्कल शेण खायला गेली काय?" पन्नास नाही वेड्या साठ होतात. नामदेवनी खोट्या उंच आवाजात म्हटले.

"तू किती मूर्ख आहेस, साठ नाही-पन्नास होतात." वल्लभ जोरजोरात ओरडत म्हणाला.

पन्नास-साठ, पन्नास-साठ असे म्हणत दोघेही जोरजोरात ओरडून भांडू लागले. ते पाहून आजूबाजूचे लोक एकत्र जमले.

त्या लोकांना उद्देशून तो त्यांना म्हणू लागला—"लोकहो माझ्या गोष्टीचा निवाडा करा, हा एक नंबरचा लुच्चा वल्लभ माझे दहा रुपये हडपायचा प्रयत्न करीत आहे. मी पूर्ण साठ रुपये याला दिले होते परंतु हा मला पन्नासच सांगत आहे. तरी तुम्ही न्याय करून माझे मला पूर्ण पैसे मिळवून द्या."

नामदेवचे हे उलटे बोलणे ऐकूनच वल्लभ हबकूनच गेला. त्याच्यावर डोळे काढीत तो म्हणाला—"अरे कसा दुष्ट आणि हरामखोर निघालास, तू रे केव्हा तुझे पैसे मला दिलेस?" फिरून लोकांना म्हणाला "बंधुनो हा खरोखरी खोटे बोलत आहे. याने माझ्याकडे एक पैसाही ठेवला नाही."









तेव्हां त्याचे बोलणे मध्येच तोडत नामदेव म्हणाला–"तुझा सर्वांसमोरचा तमाशा बंद कर. कोणाला माहित नाही असं नाही की; तू लोकांचेच पैसे हडप करून गबरगंड झाला आहेस. आताच सर्वांसमक्ष पन्नास म्हणत होतास ते ही गिळंकृत करायला बघतोस काय? मी चांगलाच धडा शिकलो. माझे पन्नास परत दे. परत कधी म्हणून तुझ्याकडे व्याजाने ठेवणार नाही.

नामदेवने अशा तऱ्हेने म्हटले की; सर्वांचा त्याच्यावर विश्वास बसावा.

त्यामुळे तेथे एकत्र झालेल्या सर्व लोकांनी वल्लभला दोष द्यायला सुरवात केली. सर्वजण म्हणू लागले–"तू प्रथम पन्नास द्यायला तयार होतास, ते आम्ही आमच्या कानांनी ऐकले. आता सर्वांसमोर नाही म्हणतोस. ह्या सारखा अपराध दुसरा कुठला नाही. परक्याचे पैसे लुबाडायला पहातोस काय तो पन्नासावर थांबला. तेव्हां त्याचे पैसे मुकाट्याने दे."

जर हे भांडण असेच वाढत गेले तर मार दिल्याशिवाय सुटका नाही. असा विचाराने घाबरून जाऊन वल्लभने नामदेवच्या हातात पन्नास रुपये ठेवले.

हातात पैसे येताच नामदेव जोरजोरात हसू लागला. व सर्व लोकांच्या समोरच त्यातले पंचवीस रुपये परत करीत वल्लभला म्हणाला–"ही युक्ती मी तुला चांगला धडा मिळावा ह्या करीता केली होती. हे घे पंचवीस रुपये परत आणि हे दुसरे पंचवीस रुपये मी तुझ्याकडे कर्जाच्या रूपे ठेवत आहे. आता मला पैशाची अत्यंत जरूरी आहे. तरी तू मला टाळत होतास. जेव्हा पैशाची जरूरी असते, तेव्हा त्याचा उपयोग केला नाही, तर त्या पैशांपासून काय लाभ.

"मी पाहिजे तर हे सर्व पैसे ठेवून घेऊ शकतो. परंतु मी गरीब आहे पण अप्रामाणिक नाही."

वल्लभ लाजेने मान खाली घालून बसला. इतर लोक नामदेवच्या हुशारीचे कौतुक करीत हसत आपापल्या वाटने परत गेले.





युद्धभुमिवर दोन्ही सैन्यांच्या मधोमध श्रीकृष्णाने अर्जुनाचा रथ नेऊन उभा केला.

अर्जुनाने कौरवांच्या सैन्यावरून नजर फिरविली. वडील बांधव गुरुवर्य, आचार्य आणि भावांप्रमाणे असलेले प्रिय मित्र सर्वजण त्यांच्याबरोबर लढण्याकरीता तयार झाले होते. त्यांना पहाताच त्याचे मन विदीर्ण झाले–"काय हे! राज्य मिळविण्याकरीता आपल्या प्रिय बांधवांचाच वध करावयाचा? नाही, नाही? ह्यांची हत्या करून मिळविलेले राज्य मला नको. मी असे करण्याकरीता अजिबात लढणार नाही."

तो निरुत्साहीत होऊन रथाच्या पाठीमागे टेकला त्याच्या हातातून धनुष्यबाण गळून खाली पडले. त्याचे मन दुःखीत होऊन शोकसागरात बुडून गेले.

श्रीकृष्णाने अर्जुनाची मन:स्थिती पाहून त्याला समजावित म्हटले–"हे अर्जुना! युद्धभुमीवर विवेक घालवून अस्त्र-शस्त्राचा त्याग करणे म्हणजे क्षात्रिय धर्माचा अपमान केल्या सारखं आहे. राज्याकरीता वेळेचा मान ठेऊन कर्तव्याचे पालन करणे म्हणजेच सर्वात मोठा धर्म आहे.

"खरे पहाता परमेश्वरच हा कर्ता आहे. फक्त मनुष्य त्याचे निमित्त मात्र आहे. अधर्म व अन्याय ह्यांच्या नायनाट करून सत्य व न्याय ह्यांची स्थापना करणे हे नर-नारायण ह्यांच्या हातातील खेळणे आहे."



जेव्हां जेव्हां जगातील दुष्ट लोकांची संख्या वाढते. तेव्हां सत्य व धर्माचा नाश होतो. तेव्हां दुष्टांचा संहार करून सत्य व धर्माची स्थापना करण्याकरीता प्रत्येक युगात विष्णु अवतार धारण करतो. तेव्हां त्याच अवतारात मी आहे असे समजून माझे स्मरण कर व मला शरण येऊन मी सांगते त्या अनुसाराने वाग. तू तुझे कर्तव्य कर त्याचे फळ माझे समज."

ह्या उपदेशाने अर्जुनाचे मन पालटले तो श्रीकृष्णच नारायण आहे असे समजू लागला. त्याकरीता श्रीकृष्णाने त्यांची शंका निवारण करण्याकरीता आपले विराटदर्शन अर्जुनाला करविले.

कृष्णाच्या विराट रूपात त्याला जगातील सृष्टीची स्थिती व प्रलय एका पाठोपाठ नजरेस पडले. कर्ता, कर्म व क्रिया ह्या तिन्ही स्थित्यंतरात त्याला परमेश्वराच्या अगाध लिला दिसल्या. सर्व सृष्टी नाहीशी करणारा महाकाल पण त्याला दिसला.

ते सर्व पाहून अर्जुनाचे मन शांत झाले. त्यांचे शंका समाधान झाले. श्रीकृष्णच माझ्याकडून करून घेत आहेत. मी केवळ एक यंत्र आहे." त्या विचारानेच अर्जुनाच्या शरिरात एक प्रकारचे चैतन्य पसरले. तो उत्साहाने उठला. त्याने आपले गांडीव धनुष्य व तुणीर घेऊन शंख वाजविला.

दोन्ही बाजूनीं सैन्य एकमेकांवर सिंहासारखे तुटून पडले. अठरा दिवस घनघोर युद्ध झाले. युद्धांत पाण्डवाचा जय झाला.

शान्तीदूताच्या रूपाने श्रीकृष्णाने जी भविष्यवाणी केली ती खरी झाली. भीमाने आपली प्रतिज्ञा पूर्ण केली. त्याने द्रौपदीचा सुटलेली केसांचा अंबाडा घातला.

अभिमन्युच्या रूपाने कालनेमीनें वीरगति प्राप्त केली. कर्णाच्या अंगातून सहस्त्र कवचाचा अंश निघून शिवात विलीन झाला. अर्जुन व कृष्ण हे दोघे नर-नारायणाच्या अवताराने पूर्ण झाले. विष्णूजीं भू-देवीला दिलेल्या वचनाप्रमाणें पृथ्वीवरचा पापाचा भार कमी झाला.

धृतराष्ट्राचे हृदय दुर्योधनाच्या मृत्यूच्या शोकानें विव्हळ झाले. त्यामुळें त्यानें आपल्या मुलाच्या वधाचा बदला घेण्याकरीता भीमाला भेटण्याची इच्छा व्यक्त केली श्रीकृष्णाने ते अंतर्मनाने जाणले व एक लोखंडाचा भीमाचा पुतळा बनवून त्याच्या समोर नेऊन उभा केला. धृतराष्ट्राने त्याला मिठीत घेऊन मारण्याकरीता दाबले तेव्हां लोखंडाचे तुकडे तुकडे झाले.

गांधारीने पुत्रशोकाने त्याला शाप दिला—"हे कृष्णा, कौरवाच्या पाठोपाठ तुझा यादव-वंशाचापण समूळ नायनाट होईल."

श्रीकृष्णाने हसत म्हटले—"गांधारी ! तू महासती आहेस तुझे वचन खोटे ठरणार नाही. नियती कार्य घडवेल तेच तुझ्या तोंडून बाहेर पडले."

द्रौपदीच्या झोपलेल्या पांची मुलांचा वध द्रोणाचार्याचा मुलगा अश्वत्थामाने केला होता. त्यामुळे द्रौपदीच्या सांगण्यावरून अर्जुन व श्रीकृष्णाने अश्वत्थामाला द्रौपदी समोर आणून उभे केले.

द्रौपदीने अश्वत्थामाला सोडून देत म्हटले—"तुला झीजून झीजून मरण येणेच उत्तम." श्रीकृष्णाच्या सांगण्यावरून अर्जुनानें अश्वत्थामाच्या डोक्यातील काही भाग काढून टाकला. त्याने तो वेड्या सारखा मानसिक रोगाने भ्रमिष्ठ झाला.



अश्वत्थामाने पांडवाचा समूळ नायनाट करण्याच्या इच्छेने उत्तरेच्या पोटातील गर्भावर अस्त्राचा प्रयोग केला होता. त्यामुळे तिच्या पोटातून मेलेला मुलगाच बाहेर आला. श्रीकृष्णाने आपल्या पायाने दाबून त्या बालकाची प्राणाची परिक्षा घेतली. आणि त्याला नवे जीवदान दिले. त्यामुळे त्याचे नाव परिक्षित ठेवले गेले. त्यानेच पुढे पांडवाचा वंश सांभाळला.

बाणांच्या गादीवर पडलेले पितामह भीष्म इच्छा मृत्युमुळे उत्तरायणा करीता वाट पहात होते. त्याने मृत्युच्या तोंडांत असताना सुद्धां युधिष्ठिराला राजधर्माचा उपदेश केला. उत्तरायण येताच त्यांनी













देह त्याग केला व ते नक्षत्रांमध्ये जाऊन विलीन झाले.

युधिष्ठिराचा राज्याभिषेक झाला. त्याच बरोबर अश्वमेध यज्ञाची तयारी सुरू झाली.

जेव्हां श्रीकृष्ण व यादववीर कुरूक्षेत्रात आले होते. तेव्हां द्वारके मध्ये त्यांचे प्राबल्य नसल्यामुळे अंधाधुंदी माजली होती. द्वारकावासी घमेंडी व अविचारी बनले होते. युद्धाच्या सुरवातीलाच बलराम तिर्थाटना-करीता द्वारकेमधून बाहेर गेला होता.

एकदा द्वारकेमध्ये विश्वामित्र ऋषी आले. तेव्हां द्वारकावासी घमेंडी व मूर्ख लोकांनी सांबाला एका गर्भार बाईचा वेष घालून त्यांच्या समोर नेले व गमतीने विचारले–"स्वामी, सांगा ह्या गर्भारशी बाईला मुलगा होईल कां मुलगी?"

विश्वामित्रांनी चढ्या स्वरात क्रोधाने शाप देत म्हटले–"मूर्ख व दुष्ट यादव-वंशीयो ह्रिच्या गर्भातून एक मुसळ निर्माण होईल. ते सर्व यादव वंशाचा नाश करेल."

ते सर्व उलट चेष्टा करत होते. परंतु सांबाने स्त्री वेष फाडून टाकला. तेव्हां खरोखरी एक मुसळ बाहेर पडली. ती पाहूनच सर्व यादववंशी लोक घाबरून गेले.

काही दिवसांनी युद्ध संपल्यावर श्रीकृष्ण हस्तिनापूरहून द्वारकेला परत आले. तेव्हां यादव लोकांनी ती घटना श्रीकृष्णाला सांगितली. श्रीकृष्णाने त्या मुसळीचे अत्यंत बारीक बारीक तुकडे करून समुद्रात फेकून द्यायास सांगितले.

त्यातील एक बारीक तुकडा समुद्रातील माशाने गिळला. ती मासोळी एका व्याधाच्या हाती लागली. व व्याधाने त्या मासळीच्या पोटातील तो लोखंडाचा तुकडा आपल्या बाणाला बसविला. अखेर त्या बाणानेच श्रीकृष्णाचा अंत झाला.

इतर सर्व तुकडे पाण्याच्या प्रवाहा-बरोबर वहात जाऊन काठाला एकत्र येऊन पडले. तेथं गवताच्या रूपाने उगवले.

काही वर्षांनी द्वारकेतील सर्व यादव पुरुष लोक गमती जमती करीता समुद्र किनाऱ्यावर गेले असतांना सर्वांनी मनसोक्त दारू प्याली. व प्रत्येकाला धुंदी चढली. प्रत्येकजण आपापल्या बढाया मारू लागला. शेवटी प्रत्येकाने जवळचे गवत उपटून एकमेकांस मारण्यास सुरवात केली व त्याने सर्वजण मरण पावले.



ऋषिंचा शाप खरा झाला. त्या मुसळानेच यदुवंशाचा सर्वनाश झाला.

जेव्हां बलरामाला हि घटना समजली. तेव्हां तो विवंचण होऊन जंगलामध्ये जाऊन समाधिस्त झाला. त्याने योगाच्या बलाने आपले शरीर त्याग केले व शेष नागाच्या रूपाने वैकुंठात जाऊन पोहचला.

श्रीकृष्णाने द्वारका वसवण्याकरीता समुद्राकडे जमिन मागितली होती. ती समुद्राला सात दिवसाच्या आत परत करावयाची होती. त्यामुळे कृष्णाने अर्जुनाकडे निरोप धाडला–"तू तावडतोब द्वारकेला येऊन येथील मुले, म्हातारे व बायका यांना घेऊन इंद्रप्रस्थला घेऊन जा"

श्रीकृष्णाने तत्पश्चात आपला प्रिय सखा उद्धव याला परमतत्वाचा उपदेश दिला व आपले खरे रूप दाखविले.

शेवटी श्रीकृष्ण समुद्रकिनारी जाऊन आपल्या बासरीवर दिव्य असे वेणुगान वाजवू लागला. त्याच्या बासरीवरचे स्वर ऐकूनच हिन्दोल, यमुना-कल्याणी व देव गान्धार राग गियाले. सर्व आसमंत दरवळून उठला. समुद्राचे पाणी शांत झाले. त्यानंतर विश्रांती करीता श्रीकृष्णाने जवळच्याच एका झाडाच्या सावलीत उभे राहून आपले पाय पसरले. एका व्याधाने दूरूनच पायाला हरणाचा पाय समजून बाण सोडला. तो बरोबर पायाच्या तळव्याला लागला. तो बाण तोच होता. माशाच्या पोटातून मुसळीचा तुकडा काढून व्याधाने बाणाला लावला होता. श्रीकृष्णाचा शेवटही त्याच मुसळाच्या तुकड्याने झाला व पुर्ण यादव वंशाचा संहार झाला.

एकदा हिंडत हिंडत दुर्वास ऋषि द्वारकेला आले होते. तेव्हां त्यांनी श्रीकृष्णा-









कडे खाण्यासाठी खीर मागितली. नंतर रागाने त्याला स्वतःह्याच्या अंगभर खीर लावायला सांगितली. तेव्हां श्रीकृष्णाने चुकून आपला पायांचा तळवा सोडून सर्व ठिकाणी खीर लावून घेतली. तेव्हां दुर्वासानी श्रीकृष्णाला सांगितले. तुला फक्त तळव्यापासूनच प्राणांची भीती व अपाय होऊ शकतो. शरिराला बाकी भाग माझ्या वरदानाने लोखंडाचा झाला आहे.

तळव्याला बाण लागताच त्यातून रक्ताच्या धारा वाहू लागल्या. थोड्या वेळाने शिकारी आपली शिकार घेण्याकरीता जवळ आला. तेव्हां श्रीकृष्ण वेदनेने कण्हत असलेला पाहून त्याला रडू येऊ लागले.

श्रीकृष्णाने त्याचाला समजावत म्हटले– "तू माझ्याकरीता दुःख करू नकोस. रामावतारात मी शाडाचा बुंध घेऊन वालीला मारले होते. तेव्हां तू त्यावेळेस वालीचा मुलगा अंगद होतास. त्यामुळे ह्या जन्मात माझ्यावर तू सुडाचा बदला घेतला आहेस. कर्माची फळें भोगावीच लागतात. त्यामुळें तू काळजी करण्याचे कारण नाही. असे म्हणत त्याने रामावतारातील स्वतःह्याचे स्वरूप त्याला प्रत्यक्ष दाखविले. रामाचे दर्शन होताच त्याला आपले पूर्वायुष्य आठवले. तो रामतल्लीन होऊन गेला.

तेवढ्यात श्रीकृष्णाचा सारथी त्याच्या शोधार्थ तेथे येऊन पोहोचला व श्रीकृष्णाला त्या स्थितीत पाहून हुंदके देऊन रडू लागला. श्रीकृष्णाने त्याला दिलासा देत म्हटले– "तू तावडतोब द्वारकेमध्ये जाऊन यादव लोकांना द्वारकेमधून निघून जावयास सांग. अर्जुनाला जाऊन माझा निरोप सांग, त्याने यादव वंशातील सर्व स्त्रियांना हस्तिनापूरात घेऊन जावे व उद्धव व अक्रूराला माझा आशिर्वाद कळवावा."

श्रीकृष्णाने परत एकदा आपल्या मुरली मधून स्वर काढले. तो एक









अद्भुत व अपूर्व असा राग होता. त्याने नंतर शरीराच्या अगाध लिला समाप्त करून विष्णुच्या दिव्य रूपात तो वैकुण्ठाला गेला.

श्रीकृष्णानं देहाचा त्याग केल्या बरोबर. समुद्राचे पाणी उसळू लागले. सगळे द्वारका पाण्यात बुडाले.

ह्यानंतर नविन युगाचा प्रारम्भ झाला— "कलीयुग, श्रीकृष्ण स्वर्गात गेल्यानंतर उद्धवाने त्याच्या आदेशाने प्रत्येक लोकांच्यात श्रीकृष्णाच्या भक्तिचा प्रसार केला.

श्रीकृष्ण मनुष्य रूपात विष्णुचा अवतार होता. व आपल्या अनेक अगाध लिलांच्या द्वारे लोकांच्यात ईश्वरभक्तिचा संचार करण्यास आला होता. तो विष्णुच्या अंशाचा भाग होता. त्यामुळे तो त्रिकालदर्शी सर्वज्ञ होता. त्याच्या अवताराचा मुख्य हेतू म्हणजे. दुष्टांचा संहार करणे. सदाचरण करणाऱ्याचे रक्षण करणे. त्याच बरोबर एक नविन आदर्श लोकांपुढे ठेवणे. त्यांनी स्वतः ह्याच्या मोठ्या विचारांनी एक चांगला आदर्श सर्वांसमोर ठेवला.

कलीयुगाचा आरंभ झाला. तेव्हां त्यांना कळून आले की; कलीयुगात माणसांच्या हातून इतकी क्रूर पापे घडतील की माणसाची तपस्या क्षीण होत जाईल. त्यामुळे त्यांनी माणसाच्या मुक्तिकरीता सरळ मार्गाचा अवलंब केला. ती भक्तिमार्ग.

कृष्णावतारातील एक महान भेट म्हणजे गीता. महासागरात बुडणाऱ्या कलीयुगातील माणसांना एकमेव सहारा असल्यासारखं होईल. ह्या महान ग्रंथात स्वतः देवाच्या तोंडून निघालेले अमृत वचन सर्व वेद वेदातील सार तत्व आहे.

गीतेच्या महानतेच्या बद्दल कोण्या पंडित विद्वानांनी सांगितलेले बरोबरच आहे. वेद वेदान्त ह्या गाई आहेत. श्रीकृष्ण त्याचा दुध काढणारा गवळी आहे. व अर्जुन मूल आहे. जो गीता रूपी अमृत पान करत आहे.





# सुलतानाची सुनावणी

"अरनाच्या राजमहालात चोरी" ही गोष्ट म्हणता म्हणता सर्व राज्यात वणव्या सारखी पेटली.

सुलतानचे डोळे क्रोधाने निखाऱ्यासारखे लाल झाले. त्याचे अधिकारी भीतीने थरथर कांपू लागले.

सुलतानाला स्वतःह्याच्या मूल्यवान गोष्टींची चोरी झाली असती तरी काही वाटले नसते. परंतु राजमहालात चोरी झाली ही गोष्ट अजिबात आवडली नाही.

तो डोळे रागाने लालभडक करीत म्हणाला— "ह्याचा अर्थ आपल्या राज्यातील अधिकारी आंधळे आहेत. जर चोर महालात शिरून दिवसाढवळ्या चोरी करू लागले तर राज्यातील परिस्थिती कशी काय असेल?"

त्यांनी संरक्षण अधिकाऱ्यांना बोलावून खूप दटावले— "याद राखा! दोन तीन तासांच्या आत सर्व मालासहीत चोराला माझ्या समोर आणून उभे केले नाहीत तर, तुम्हांला सर्वांना फांशी दिले जाईल."

"मला कळले आहे की; तुम्ही चोराला पकडून दाखविण्या करता एखाद्या भिकाऱ्याला पकडून आणता आणि त्याला चोर म्हणून दाखवता. त्यामुळे ह्यावेळेस मला चोर सर्व मालासकट पकडून आणून दिला पाहिजे नाहीतर, तुमच्या जिवाची काही खैर नाही."

सर्व संरक्षण अधिकारी ह्या सुनावणीने घाबरून गेले. जिवाची पर्वा कोणाला नव्हती. त्यामुळे सर्वांनी एकत्र येऊन एक निश्चय केला. की; कसेही करून ह्यावेळेस खऱ्या चोराला पकडून आणलेच पाहिजे.

प्रधान अधिकाऱ्याने आपल्या सर्व सहकाऱ्यांना बोलावून विशिष्ट निर्देश केले. व वेष बदलून राज्यात सर्व दिशांना जायला सांगितले.

"संध्याकाळी दक्षिणेकडे असलेल्या दारूगुत्याशी सर्वांनी एकत्र जमावे असे ठरले.

त्यांच्यातील रहमत खाँ अधिकारी ह्याने एका भिकाऱ्याचा वेष केला. तो नगरातील उत्तरेकडे दुपारपर्यंत चोराच्या शोधार्थ हिंडत राहीला व भटकून भटकून खूप दमून तहानेनं व्याकूळ झाला.

तेथे जवळच एक बाग होती. त्यात एक पाण्याने भरलेले स्वच्छ तळे होते. रहमत खाँ तेथे गेला व पाणी पिऊन आपली तहान भागवू लागला. जेव्हां तो पाणी पिऊ लागला, तेव्हां बागेतल्या पहारेकऱ्याने पाठीमागून येऊन त्याची मानगुट पकडली व त्याला दोन तीन फटके लगावले आणि रागवत म्हणाला– "अरे मूर्खा, चोरासारखा इथे कोणाला विचारून शिरलास आजकाल डोकेबाज चोर तुझ्यासारखेच भिकाऱ्याचा वेष धारण करून हिंडत असतात."

रहमत खाँ खरा संरक्षण अधिकारी होता. तरीपण त्याला आपण कोण ह्याचा सुगावा लागू द्यायचा नव्हता. म्हणून त्याच्या लाथा खाऊन सुद्धा तो राग गिळून गप्प बसला.

उलट दिनपणाने त्याला म्हणाला–"मी कोणी चोर डाकू नाही, परंतु एक अभागी भिकारी आहे. तहानेने जीव व्याकुळ झाला होता. म्हणून दोन घोट पाणी पिण्याकरीता इथे आलो. माझ्यावर दया करा व मला आणखी मारू नका.

"अरेरे! असे आहे काय? पाहारेकऱ्याने व्यंगात्मक चेहऱ्याने म्हटले. आणि त्याला आणखीन दोन-चार लाथा मारल्या.

रहमतला मार खाण्यावाचून गत्यंतर नव्हते. तो लाथा खात गप्प राहिला.

जेव्हां पहारेकऱ्याचे मारणे थांबले नाही व तो मारतच राहीला, तेव्हां न राहवून त्याने आपला वेष काढून टाकला.

"शेवटी तू मला किती मारणार आहेस? मी कोणता अपराध केला आहे? तहान लागलेली असताना पाणी पिणे हा काय गुन्हा आहे? आणि तुला मारण्याचा अधिकार कोणी दिला? जर तू मला चोरच समजत असलास तर संरक्षण अधिकाऱ्याकडे मला घेऊन चल. खर खोटं ठरवून मग मला दण्ड दे."

पहारेकऱ्याला त्याच्या म्हणण्याचा सुद्धा खूप राग आला.

"तू मला न्याय शिकवायला आलास? असे म्हणत त्याने त्याला ढकलून बागेच्या बाहेर काढले. आणि शिटी वाजवत दुसऱ्या बाजूने निघून गेला.

त्यानंतर चोरांच्या शोधार्थ इकडे तिकडे हिंडत जिथे संध्याकाळी भेटण्याचे ठिकाण ठरवले होते त्या ठिकाणी तो येऊन पोहोचला. इतर अधिकारी सुद्धां एक एक करत जमा झाले. रहमतची अवस्था पाहून सर्वांना अत्यंत आश्चर्य वाटले.

रहमतने जेव्हां आपली सर्व हकीगत सांगितली. तेव्हां सगळयांना भयंकर राग आला. त्या सर्वांनी मिळून त्या पहारे-





कऱ्याला धडा शिकविण्याचे ठरविले. आणि वेष बदलून ते बागेकडे निघाले.

बागेचा पहारेकरी एका दहा वर्षाच्या मुलाबरोबर एक गुप्त रहस्यमय गोष्टी विषयी बोलत बसला होता. तेवढ्यात सर्व अधिकाऱ्यांनी पाठीमागून जाऊन त्याला घेरले व पकडले. काहींनी त्यांची मानगुट पकडली. काहींनी त्याला लाथाबुक्या घावयास सुरवात केली.

अचानक हल्ल्याने पहारेकरी घाबरून गेला. जवळच उभ्या असलेल्या त्या दहा वर्षाच्या मुलाने आपल्या मामाला मारत असलेले पाहून रडत त्या लोकांना विनविले– "साहेब माझ्या मामाला मारू नका. त्यांनी जी चोरी करून माल आणला आहे. तो मी तुम्हांला सर्वच्या सर्व दाखवतो."

अधिकाऱ्यांना त्या लहान मुलांच्या बोलण्याचे खूप आश्चर्य वाटले व मनांतून आनंदपण झाला.

"कुठे आहे ते सामान? लवकर सांग." एका मुख्य अधिकाऱ्याने त्याला एक फटका लगावून दरडावत विचारले. त्या मुलाने रडत रडत त्या अधिकाऱ्याला बागेच्या एका झाडीच्या कोपऱ्यात नेले. तेथे वस्तू पाहून त्याचा आनंद गगनात मावेनासा झाला खरे तर रहमत मुळेच हे सारे घडले होते.

रहमतने पहारेकऱ्याला दटावत म्हटले– "जर आज तू एका तहानलेल्या भिकाऱ्याला लाथाबुक्या घातल्या नसल्यास तर तुझी चोरी पकडली गेली नसती. असे वाटते की, कोणी मुलाने तुझ्यात शिरून महालातील चोरी करवून घेतली. व तसेच त्याने भिकाऱ्याला मारण्याचे कुकर्म तुझ्याकरून करवून घेतले."

रहमतचे बोलणे ऐकून पहारेकऱ्याने त्याला ओळखले. व स्वतःहाच्या करण्यावर पश्चाताप करू लागला.

अधिकाऱ्याने चोर व चोरीचा माल सुलतानाच्या हाती सोपविला. सुलतानाने रहमतला त्याच्या हुशारी बद्दल इनाम दिले व त्याला खास रक्षण अधिकाऱ्याच्या जागी नेमले.



# दोन मूर्ख व्यापारी

आनंदपुर नगरचे जमिनदार मोठ्या उदार स्वभावाचे होते. त्यांच्याकडे कामधंद्याकरीता जो कोणी पैसा उधार मागावला जाई. त्याना ते कधीही रिकाम्या हाताने पाठवत नसत. परंतु त्या माणसाची उत्तम व्यापाराविषयीची बुद्धिमत्तेची परिक्षा ते पहात. जेव्हा त्यांचा विश्वास होई की, ही व्यक्ति व्यापारधंदा करण्यास योग्य आहे तेव्हा त्याला ते कर्ज देत.

एकदा त्यांच्याकडे कर्ज मागायला दोन मूर्ख व्यापारी आले. त्यांनी जमिनदाराला विचारले–"महाशय, आम्ही दोघे कोंबडींच्या अंड्याचा धंदा करणार आहोत. त्यामुळे आम्हांला कमीत कमी एक हजार रुपयांची जरुरी आहे."

जमिनदाराला वाटले की त्या दोघांना अंड्याविषयी किती माहीती आहे हे पहावे म्हणून त्याने विचारले–"कोंबडीच्या अंड्याविषयी तुम्हाला काय काय माहित आहे?"

"महाशय! मला आजपर्यंत हेच एवढेच कळले नाही की, अंड्याच्या आत हवा व प्रकाशाशिवाय पिल्लू रहाते कसे? एका व्यापाराने विचारले."

"आणखीन एक गमतीची गोष्ट आहे साहेब" कोंबडीच्या पिल्लाला बाहेर येण्यासाठी अंडे फोडावे लागते. परंतु अंडे न फुटता पिल्लू आत कसे जाते हे खूप आश्चर्यच नाही का?

जमिनदार हे ऐकून मनात हंसू लागला. आणि थांबून म्हणाला तुम्ही लोक अंड्याचा व्यापार करू शकणार नाही."

असे म्हणत त्याने त्यांना कर्ज न देता परत पाठविले.



## चांदोबातील नवलाई



### पंख असलेली जहाजे

अमेरिकेतील निस्कोन्सिन विश्व विद्यालयातील वैज्ञानिकांनी एका अशा पंख असलेल्या जहाजाचा शोध लावला आहे. की ते जहाज पाण्यावर मासे जसे पंख हलवून पोहतात. तसेच पाण्यावर चालेल.

### आवाजाने रोगाचे निदान

नाडी पाहून काय रोग झालेला आहे हे पहाणे ही पूर्वीची पद्धत आहे. परंतु सोव्हिएट रूसच्या वैज्ञानिकांनी असा शोध लावला आहे की, रोग्याच्या आवाजाचे निरिक्षण केले की, रोगाचे निदान काय ते लागू शकते.





### व्हिडीओ खेळांचे दुष्परिणाम

व्हिडीयो खेळामुळे भयंकर हानी होऊ शकते. ती अशी की घातक असे मानसिक आजार होऊ शकतात. वैज्ञानिकांच्या अनुसंधानद्वारे नुकताच असा शोध त्यांनी लावला आहे.

## तुम्हांला माहीत आहे का?

१. भारतातील सर्वात मोठा धबधबा कोणता ?
२. हिमालयातील दऱ्याखोऱ्यांमधील सध्या असलेले हिन्दुचे पवित्र तीर्थस्थान कोणते ?
३. अहमदाबाद जवळून वहात जाणाऱ्या नदीचे नांव काय ?
४. आपल्या देशातील सर्वात जास्त क्षेत्रफळ असलेला मोठा प्रदेश कोणता ?
५. भारतात व्हिक्टोरीया स्मारक प्रदर्शनशाळा कुठे आहे.





# गंपूला गोष्टींची अद्दल

गंपूला गोष्टी सांगण्याची जशी, तशी त्याचा नातू शिवाला खेळायची खूप हौस होती. तो आपल्या नातवाला नेहमी रागे भरत असे व म्हणे–"अरे बाळा! दिवसभर कसले रे खेळतोस! तरीपण आजोबांची नजर चूकवून तो घरातून पळ काढीत असे आणि रात्रीच घरी परत येत असे. एकदा आजोबांनी त्याला जबरदस्तीने पकडून ठेवले व त्याला गोष्टी सांगण्यास सुरवात केली. गोष्टीत ते इतके तन्मय झाले की, शिवाने समोरून केव्हां पोबारा केला ते सुद्धां त्यानां कळले नाही.

गंपूने शिवाला अनेक तऱ्हेने गोष्टीत रस निर्माण करून ऐकवण्याचा प्रयत्न केला. परंतु तो नेहमीच निसटून पळून जात असे. त्याला आजोबांच्या गोष्टी म्हटल्याच की, कटांळा येई.

गंपूला समजेना की, आपल्या गोष्टीने शिवाला काय कंटाळा येतो त्याने आपल्या बायकोला, मुलाला व सुनेला बोलावून विचारले–"काय माझ्या गोष्टी ऐकण्याचा तुम्हांला कंटाळा येतो कां?"

"नाहीं, उलट मोठ्यांनीं सांगितलेल्या गोष्टी खूप गमतीदार असतात. आमच्या मनांत तर त्या ऐकाव्या अशी फार इच्छा असते पण हा गाढव शिवा कां ऐकत नाही कोण जाणे? आम्हांलाच कळत नाही."

ही चांगलीच संधी मिळाली ह्या विचाराने त्याने त्या सर्वांना आपल्या गोष्टी ऐकाव्या म्हणुन म्हटले–"तर तुम्ही सर्वजण माझ्या गोष्टी ऐका मी तुम्हांला अशा तऱ्हेने गोष्टी ऐकवीन की; तुमच्या कामात त्यामुळे व्यत्यय येणार नाही."

अशा तऱ्हेने वार्ता वळत असतांना आपल्या बायकोला. स्वयंपाक करीत

श्वेतप्रभा



असतांना सुनेला व भाजीपाला व बागेत काम करीत असतांना आपल्या मुलाला त्याने गोष्टी सांगण्यास सुरवात केली.

खरे म्हटले तर गंपूच्या गोष्टीचा लहा-नानाच नाही तर, मोठयांना सुद्धा कंटाळा येत असे. तेव्हां घरातल्यांनी आपल्यावरची ही गोष्टींची ब्याद टळण्याकरीता शिवाला पकडून आजोबांच्या समोर आणून बसवून आपापल्यावरचे संकट सोडविले

अशा तऱ्हेने थोडे दिवस निघून गेले. शिवाने डोके लढवून आजोबांच्या बरोबर एकमत जुळवून घेतले ते म्हणजे त्यांनी दर दिवशी आपल्याला एकच गोष्ट सांगावयाची व खेळावयास पाठवायची अशीअट घातली.

गंपूनी नातवाची अट मान्य केली, त्यांनी आपल्या जास्त बुद्धीने व चातुर्याने आपल्या नातवाला फसवायला सुरवात केली. ते इतकी गोष्ट वाढवून सांगत की संपण्याचे नावच निघत नसे त्यामुळे शिवाला केव्हां केव्हां तर रडायला येई. ते पांच सहा गोष्टी एकत्र जोडून सांगत. त्यामुळे त्याला खेळावयास जायला मिळत नसे.

त्यास सुमारास त्या गावात एक नविन मुलगा आला तो शिवाला खूप आवडला.

एकदा त्या नविन मुलाने शिवाला विचारले—"तू जरा लवकर खेळायला कां येत नाहीस? म्हणजे आपल्याला खूप वेळ खेळायला मिळेल नां!"

त्यावर शिवाने आजोबांच्या गोष्टीने आपल्या खेळात कसा व्यत्यय येतो ते सांगितले. तेव्हां त्या नविन मुलाने उत्साहाने विचारले—"अरे खरेच कां! तुझे आजोबा गोष्टी सांगतात. मला तर गोष्टी ऐकण्याची खूप हौस आहे."

"तर तू माझ्या आजोबांनी सांगितलेल्या गोष्टी कां ऐकत नाहीस? मी दुसऱ्या कोणत्यातरी मुलाबरोबर खेळ खेळीन. शिवा अत्यंत आनंदाने म्हणाला.

"ठिक आहे, मला माझ्या घरी कोणी गोष्टी सांगत नाहीत. त्यांनी आपल्या घरच्या लोकांबद्दल तक्रार केली.



दुसऱ्या दिवशी त्यांनी त्या नविन मुलाबरोबर आपल्या आजोबांची ओळख करून दिली, आणि म्हटले—"आजोबा! हा माझा मित्र. ह्याला गोष्टी ऐकायला खूप आवडतात."

ते ऐकून आजोबांना खूप आनंद झाला. त्यांनी शिवाला सोडून देऊन नविन मुलाला पकडले. व एका राजकुमार व राजकुमारीची गोष्ट सांगावयास आरंभ केला. एकदा राजकुमारीला एक मांत्रिक उचलून घेऊन पळून गेला. त्यावर राजकुमाराने बरेच वर्ष कष्ट हाल सोसून मंत्रविद्या शिकून घेतल्या व त्या मांत्रिकाचा वध करून राजकुमारीला सोडवून आणले व तिच्या-बरोबर लग्न केले.

ही गोष्ट ऐकून नविन मुलाने गंपूला विचारले—" ह्यानंतर दुसऱ्या कोण्या मांत्रिकाने पुन्हां राजकुमारीला पळवून नेले नाही कां?"

"पुन्हां पळवून नेले तर आपल्याला काय करायचे? गंपूने हसत हसत म्हटले."

कारण आपला राजकुमार चांगला माणूस आहे. परोपकारी आहे. विद्वान प्रविण आहे. असा माणूस हे ऐकून गप्प बसणार नाही की, एका राजकुमारी बरोबर लग्न केले आणि त्याचे कर्तव्य संपले. तो नक्कीच असे संकट राजकुमारीवर आले तर परत मदतीला जाईलच नां.? नविन मुलाने सांगितले.

हा प्रश्न ऐकून आजोबा संतुष्ट झाले व म्हणाले—"हो! तू तर एक चांगलाच प्रश्न टाकलास" असे म्हणत क्षणभर थांबून पुन्हां सांगू लागले. "त्यावेळेस मिथिला राज्यात एका मांत्रिकाचा अत्याचार फार वाढला. त्याने शंभर राजकुमार व शंभर राजकुमारीनां कालीमातेसमोर बळी देण्याचा निश्चय केला." असे सांगत "त्या मांत्रिकाचा संहार प्रथम राजकुमाराने केला. आणि तो पुष्कळ वर्षांनी परत आपल्या देशात परत आला" असे सांगून त्यांनी गोष्ट झटक्यात संपवली.

परंतु नव्या मुलाने पट्दिशी विचारले– "आजोबा तेवढी वर्षे राजकुमारी आपल्या राज्यात् गुपचुप बसली कां.? आपले राज्य मंत्र्याच्या हातात सोपवून पतीच्या शोधार्थ गेली असली तर पुढे पुष्कळच आपत्ती तिच्यावर येऊन कोसळली असेल नां?"

गंपूने पुन्हां गोष्टीस सुरवात केली. परंतु संपताना नविन मुलाच्या मनांत शंका निर्माण होत. त्यामुळे गोष्ट कधी पुरी होऊच शकत नसे.

शेवटी गोष्ट सांगून गंपू थकला व म्हणाला आता उरलेली गोष्ट उद्या सांगेन."

"उद्या पर्यंत मी थांबणार नाही. मला आत्ताच गोष्ट सांगा" नविन मुलगा म्हणाला.

गंपूने दिर्घ श्वास घेत म्हटले–"बाळा, आत जाऊन प्रथम पाणी आण. माझी तहान भागवतो मग गोष्ट पुरी करतो."

तो नविन मुलगा पाणी आणण्यास आत गेला न गेला तोच संधी पाहून गंपू घराबाहेर सटकला व पाय फुटेल तिकडे पळून जाऊ लागला. वाटेत जो कोणी भेटे त्याला तो आपल्या नातवाच्या शोधार्थ जात आहे म्हणून सांगू लागला. शिवाला जेव्हां समजले की; आजोबा आपल्याला शोधत येत आहेत. तेव्हां तो एका ठिकाणी लपून बसला पण कोणी एकाने त्याला पकडून आजोबांच्या ताब्यात दिले.

गंपू दम टाकत त्याला म्हणाला–"बाळा शिवा! घाबरू नको! मी तुला गोष्ट सांगण्याकरीता आलो नाही. तू घरी ज्या नविन मुलाला आणून ठेवले आहेस. त्या मुलाला पुन्हा कधीही घरी येऊ नकोस म्हणून सांग. मी तुला ह्यापुढे कधीही गोष्ट सांगणार नाही."

शिवाला समजेना की; आजोबांच्यात अचानक बदल कशामुळे झाला. परंतु त्याने आजोबांचे म्हणणे मान्य केले.

ह्यानंतर गंपूने पुन्हां म्हणून गोष्ट कधी सांगितली नाही. त्यांना समजले की, कोणाची इच्छा नसतानां जबरदस्तीने लादले गेलेले काम स्वतःहालाच नंतर किती कष्टदायक होते.






[ १६ ]

[हसन गौरी बरोबर पिंगळ अक्षय किल्ल्याजवळ पोहोचला. दरवाजा उघडू लागला. वाळवंटी लुटारूंनी दाराच्या पाठीमागे लावलेल्या सुरुंगाचा स्फोट झाला. बरेच सैनिक ठार झाले. काही जखमी झाले. त्यानंतर पर्वतावर वाळवंटातील लुटारू भैरवनाथ व हसन मध्ये घनघोर युद्ध झाले. अचानक पिंगळला पद्मपाद दृष्टीस पडला–ह्यापुढे...]

पिंगळने कधी कल्पनाच केली नव्हती की, ह्या जन्मात पुन्हां पद्मपादची फिरून भेट होईल. आणि ते सुद्धा अवंती नगर सोडून कित्येक मैल दूर असलेल्या ह्या वाळवंटी प्रदेशांतील पहाडावर.

ही गोष्ट त्याला खूप आश्चर्यकारक वाटत होती. दुसऱ्या क्षणीच त्याला शंका येऊ लागली. म्हणून त्याने जवळच उभ्या असलेल्या हसनगौरीकडे दृष्टीक्षेप टाकला त्याच्या चेहऱ्यावर सुद्धां तसेच भाव प्रकट झाले होते.

हसन गौरीला सुद्धा त्याचा संशय येत होता. त्याने पिंगळचा खांदा पकडीत आपल्याकडे खेचत त्याला म्हटले–"पिंगळ! हा पद्मपाद कोण आहे? हाच तर तो वाळवंटातील लुटारू भैरवनाथ नाही नां?

पिंगळ काही म्हणणार तेवढ्यात पद्मपाद त्यांच्यामधे येऊन उभा राहिला. व



त्याने हसनगौरीकडे अंगुलीनिर्देश करीत पिंगळला विचारले–"पिंगळ! हा कोण आहे?" हा प्रश्न ऐकून पिंगळ एकदम घाबरला. त्याच्या घाबरण्याचे कारण समजुन हसत हसत पद्मपादने विचारले. पिंगळ! काय तू सुद्धा माझ्यावर शंका करतोस कां?

पिंगळला समजेना काय बोलावे, त्याने आपली दृष्टी पद्मपादवरून हसन गौरीकडे वळविली. व तो क्षणभर गप्प राहिला. तेव्हां हसन गौरीने-पद्मपाद उभा होता तिथे समोर येऊन म्हटले–"महाशय! मला माहीत नाही तुम्ही कोण आहात ते? परंतु...." असे म्हणत तो थांबला. हसन गौरीच्या बोलण्यावर पद्मपाद खळखळून हंसू लागला.

नंतर पिंगळच्या जवळ जाऊन स्नेहभराने त्याच्या पाठीवर थाप देत म्हणाला– "पिंगळ, तुम्ही दोघेजणांनी अशी तर मनांत शंका केली नाही नां? की आता पर्वतात पळून जाणारा वाळवंटातील लुटारूंचा मुख्य नेता मीच आहे की काय म्हणून? वेळ आली की, माझी सर्व कथा तुम्हाला सांगेन. माझ्या जीवनाचे सध्या एकच ध्येय आहे की, तुम्हांला मदत करणे. ह्यावेळी मी खूप आनंदात आहे. आज मला इथे पाहून तुला आश्चर्य वाटले नां? त्यामुळेच तुझ्या मनांत अशी शंका येणे सहाजिकच आहे.

"नाही! पद्मपाद! तसे कारण नाही." असे म्हणत त्याने हसन गौरीकडे वळून त्याला म्हटले–"हा नवाब साहेबांच्या उंटांच्या दलाचा मुख्य आहे. हे भैरवनाथ नावाच्या वाळवंटी प्रदेशातील लुटारूंच्या शोधाकरीता हा सारा प्रदेश धुडांळून काढत आहेत."

ते ऐकताच पद्मपाद हसन गौरीकडे पहात म्हणाला–"महाराज, जर तुम्ही वाळवंटातील रक्षण करणारे असाल तर, समोर दिसणाऱ्या गुहांमध्ये बरेच व्यापारी लोक अडकून पडले आहेत, त्यांना वाचविणे तर आपले कर्तव्य आहे. त्या भैरवनाथाने बऱ्याच व्यापाऱ्यानां पकडून तेथे बंदी केले आहे. ते सर्वजण बिचारे आपापला माल घालवून बसले आहेत. आणि त्यांच्या जिवावर पण बेतले आहे.

हे सर्व सांगुनही हसन गौरीचा विश्वास बसला नाही. ते पाहून पिंगळ म्हणाला– "हसन भाई, पद्मपादला माझ्याकडे सोपवून जां. तुम्हांला काळजीचे अजिबात कारण नाही. मी ह्याच्याकडून सर्व गोष्टी ऐकून घेईन आणि जर कां हा लुटारूंचा नेता भैरवनाथ असेल तर ह्याचे हात-पाय बांधून तुमच्या ताब्यात ह्याला देईन."



पिंगळच्या बोलण्याने त्याचे थोडे समाधान झाले. नंतर तो थोडे सैन्य घेऊन गुहांमधील व्यापाऱ्यांचे रक्षण करण्याच्या विचाराने तेथून निघाला.

"पिंगळ, ह्या अपरिचित अशा वाळवंटात तुझी माझी भेट होणे ही आश्चर्याचीच गोष्ट आहे. पण मला सांग! अवंती नगरचे आपले रहाते घर सोडून तू इतक्या लांब कोणत्या कारणा-करीता आलास?" पद्मपादने विचारले.

"पद्मपाद, माझी गोष्ट खूप दुःखभरी आहे. मी तुझ्याकडून मिळालेली अदभुत् पिशवी, धन-संपत्ती व मला नेहमी मदत करणारा भल्लूककेतू ह्यांच्या पासून वंचित झालो. ह्या सर्वाचे मुळ कारण माझे दुष्ट स्वभावाचे थोरले भाऊ. आपल्याकडून निघून घरी पोहोचल्यावर आज पर्यंतची कहाणी ऐकावयाची तर त्याला पुष्कळच वेळ लागेल. जर आपण दुसऱ्या कोणत्या मांत्रिकाला जिंकण्याकरीता इथे आला असाल तर मी तुम्हांला मदत करण्यास तयार आहे. तुम्हीच माझे हितचिंतक आहांत. म्हणून तुम्हालां मदत करण्यास मला अतिशय आनंदच होईल."

पिंगळच्या म्हणण्याने त्याला संतोष वाटला. व त्याच्या दुःखद गोष्टीमुळे त्याची करुणा आली. की, पिंगळला दिलेली



जादूची पिशवी व धनसंपत्ती त्याने घालवून टाकली. पद्मपादला हळहळ वाटू लागली. खरे तर, भल्लूक पर्वताच्या जवळ महामांत्रिकाला पराभूत करण्याच्या कामी पिंगळची खूपच मदत पद्मपादला झाली होती. ती तो आजपर्यंत विसरला नव्हता.

"पिंगळ! मी अजून कोणा मांत्रिकाला वश करण्याच्या इच्छेने इथे आलो नाही. महामांत्रिकाच्या समाधीतून ज्या अदभुत् शक्ति असलेल्या वस्तू माझ्याकडे असतील तोपर्यंत मला काहीही धोका असण्याची शक्यता नाही. जर माणूस आपली ध्येय पुरी करतो तेव्हां तो अंर्तमुखी बनतो. मी आत्मसंतोष प्राप्त करण्याच्या ध्येयाने देशाटनाला निघालो आहे व ह्यावेळेस एका यात्रेकरुंच्या जमावा बरोबर मी हिंडत हिंडत इथे येऊन पोहोचलो. परंतु काल रात्रीच आमच्या जमावावर त्या लुटारुंनी संपत्तीच्या आशेने हल्ला केला. व आमच्यातील बऱ्याच लोकांना त्यांनी जायबंदी केले. त्यात बरेचजण अवंती नगरचे सुद्धा रहिवासी आहेत. तुझ्या परीचयाचे सुद्धा त्यातील बरेच जण असावेत.

ह्या गोष्टी ऐकून पिंगळला अतिशय आश्चर्य वाटले. त्यांनी शंकेखोर नजरेने पद्मपादकडे पहात म्हटले—"पद्मपाद! तू तर मोठा महामांत्रिक आहेस. जर ते दुष्ट वाळवंटी लुटारू तुमच्या जमावावर हल्ला करून येत होते. हे तू पाहिलेस तर तुझ्या मंत्रसामर्थ्याने त्यांना काहीही कसे करू शकला नाहीस. नुसतेच पहात राहिलास. मनात आणले असतेस तर एका मिनिटांत त्याचा संहार करू शकला असतास नां?"

पिंगळचे बोलणे ऐकून पद्मपादला हंसू येऊ लागले. तो त्याला म्हणाला—"पिंगळ, मी जेव्हां ह्या यात्रेकरूं बरोबर निघालो. तेव्हां त्या लोकांना मी माझा परीचय फक्त एक यात्रेकरु म्हणूनच करून दिला होता. मी जर त्यानां मांत्रिक आहे असे सांगितले असते तर, त्यांनी मला त्यांच्यात-सहभागी होऊनच दिले नसते. त्यामुळे मी ते लुटारू त्याना लूटून नेत आहेत हे पाहून सुद्धा गप्प बसलो व त्याच्यावर मंत्रातंत्राचा उपयोग न करता ह्या दगडकपारीमधून लपून राहीलो."

"पद्मपाद! तुझे वागणे मला खरोखरी गंमतीचे वाटते. आपल्या जवळ, भूगोल, अंगठी व वज्रहिऱ्याची मुठ असलेली सुरी ह्या अदभुत् शक्ति असलेल्या गोष्टी असतांना तुम्हांला तिर्थक्षेत्रे हिंडून पहाण्याचे काय कारण? मनांत येईल तेव्हां ह्यांचा उपयोग करून तुम्हांला त्या त्या गोष्टी प्रत्यक्षात साकार करून पहाता येतील. असे असतांना एक क्षुलक यात्री बनून सर्व कष्ट-यातना झेलून प्रवास करण्याचे काय कारण? घरातल्या घरात सर्व तिर्थक्षेत्राचे दर्शन तुम्हाला घडू शकते आता तुमच्या डोळ्या समोर तुम्हांला दुसऱ्यांच्या यातनां तरी पहायला मिळाल्या नसत्या नां? आणि तुम्हांला त्यानां वाचवता सुद्धा आले असते" पिंगळ खेदाने म्हणाला.

"अरे पिंगळ, तू अजून माझ्यावर शंका तर करत नाहीस नां? मीच त्या दलाचा मुख्य आहे म्हणून." असे म्हणत पद्मपादने पिंगळच्या डोळ्यात डोळे घालून आश्चर्याने विचारले. सर्व पुण्यक्षेत्रे मी महामंत्राच्या बळाने पाहिली तर चालून पहाण्याचे पुण्य कार्य माझ्याकडून कसे होईल. त्यातच तर मोठे पुण्य आहे.



बराच वेळ त्यांच्या गप्पा चालल्या असतानांच दुसऱ्या बाजूला हसन गौरीच्या सैनिकांचा आरडाओरडा व बरोबरीने व्यापारी लोकांची रडारड अक्रोश वगैरेने तेथील वातावरण एकदम बदलले. पद्मपाद व पिंगळने आपले बोलणे मधेच थांबविले. तेवढ्यात एक सैनिक त्यांच्याच बाजूला पळत येत असतांना त्या दोघांनी पाहिला. तो जवळ येत त्यानां म्हणू लागला—"भैरवनाथला पकडण्याकरीता हसनगौरीने आपल्या दोघांची मदत मागितली आहे."

पिंगळने पद्मपादकडे मोठ्या दयार्द्र नजरेने पहात म्हटले–"पद्मपाद, ह्या हसन गौरीने ह्या वाळवंटातून मला तहान भुकेने तडफडतानां पाहून वाचविले आहे. त्याचे उपकार म्हणून त्याला आपण मदत करणे योग्य ह्या अंधारात त्या लुटारूंना काबूमध्ये आणणे म्हणजे मनुष्य प्राण्याचे काम नाही. तो वाळवंटी प्रदेशातील लुटारू भयंकर दुष्ट जातीचा आहे. ह्या समोरच्या किल्ल्यातील एकूण एक सैन्याचा त्याने खातमा केला व आम्हांला ही मारण्याकरीता षडयंत्राचा उपयोग केला. तेव्हां ह्या लोकांना पकडण्या करीता व आम्हांला मदत करण्याकरीता तुम्ही तुमच्या मंत्र सामर्थ्यांचा उपयोग करा. व ह्या प्रदेशांत येणाऱ्या यात्रेकरुंचे संरक्षण होईल असे पहा. हे आपले उपकार मी जन्मभर विसरणार नाही. ह्या प्रदेशातील सुलतान सुद्धा आपल्या मदतीमुळे तुमच्यावर खुष होईल."

"पिंगळ, तू म्हणत असलास तर मी त्यांना अवश्य मदत करेन. पण सर्व यात्रेकरूंना समजेल की; मी एक मांत्रिक आहे. त्यानंतर त्याच्याबरोबर प्रवास करणे माझ्या अवाक्या बाहेरचे आहे. तरी पण क्षेत्र पहायला इतर अनेक वाटा आहेत. असे म्हणत पद्मपादने एक दगड हातात घेतला. व तलवारीने त्याचे छोटे-छोटे तुकडे केले. पद्मपादच्या त्या करण्याकडे पाहून त्याला विस्मय वाटला. त्याने पद्मपादचे खांदे दोन्ही हाताने हातात धरून गद्गद् हलवत विचारले–"पद्मपाद! तू हे काय करतो आहेस? तिकडे ते लुटारू यात्रेकरूंना लुटून पळून जात आहेत प्रथम त्यांचा शेवट कसा होईल ते पहा नां?"

पद्मपादने मंदहास्य करीत आपल्या मुठीतले ते तुकडे पिंगळला दाखवित म्हटले–"तू म्हणतो आहेस नां? ह्या अंधारात त्या लुटारूंचा पाठलाग करणे मानवाला अशक्य आहे. तेव्हां मला काही मंत्रातंत्राचा उपयोग तर केला पाहीजे नां? त्यामुळे अंधारात पाहू शकणारे लांडगे व वाघ यांनां मी त्या लुटारूंना पळवून आपल्याकडे आणण्याकरीता तयार करत आहे. हे बघ माझ्या हातात जे बारीक-बारीक दगडाचे तुकडे आहेत ते वाघ व लांडगे आहेत. असे म्हणत त्याने आपल्या तळहातावर दगड ठेवून मंत्र म्हणून फुंकले व चोहीकडे फेकले.

म्हणता म्हणता चोहीकडून दगडा-कपाऱ्यातून अनेक वाघ व लांडगे पळत-पळत बाहेर पडले.

ते अदभुत् दृष्य पाहून पिंगळ अवाक् होऊन पाहू लागला. तोपर्यंत हसन गौरी व पहाडातील गुहांमधून सुटलेले यात्री, व व्यापारी त्याच्याजवळ येऊन पोहोचले.

व्यापाऱ्यांना मनोमन वाटत होते की; आता आपले जगणे असंभव आहे कारण तेथे वाळवंटातील लुटारू भैरवनाथ याचे आधिपत्य होते. त्याचा पराभव करणारा














दुसरा कोणीच तेथे नव्हता. परंतु असे अचानक सुटका झाल्याचे पाहून सगळयांच्या आनंदाला पारावार उरला नाही.

त्यांच्या बरोबर येत असलेल्या हसन गौरीने हवेत हात हलवत येत म्हटले– "पिंगळ, हे कसे काय आश्चर्य आहे! ह्या पहाडात एकही वाघ किंवा लांडगा अजुन पर्यंत कोणी पाहिला नाही अचानक आज इतके वाघ व लांडगे एकाएकी कुठून उद्‌भवले? असे म्हणत तो पिंगळकडे विस्मयाने पाहू लागला.

"पद्मपाद, आता तुझे गुपीत गुप्त ठेवण्यात काही प्रयोजन नाही. तेव्हां ह्यानां सर्वांना खरी गोष्ट काय ते सांगू कां? तुला तर काही धोका नाही नां? पिंगळने विचारले.

पद्मपादने स्वीकृति सुचक मान हलविली आणि आपल्या अंगरख्यातुन ती जादुभरी अंगठी काढून एका उंच दगडावर ठेवली. तत्क्षण तेथे रात्रीचा दिवस भासू लागला चोहीकडे प्रकाशमय झाले.

पिंगळने तेथे जमलेल्या सर्वांना थोडक्यात पद्मपाद कोण आहे व महान मांत्रिक असल्याचे सांगितले.

नंतर हसनगौरीकडे वळून म्हणाला– "हसन, तुला आता त्या लुटारू पासून धोका नाही. त्यांना घाबरण्याचे काही कारण नाही. पद्मपादने जे वाघ व लांडगे पाठवले आहेत ते आता त्या भैरवनाथ व लुटारूंना आपल्याकडे हांकीत घेऊन येतील.

पिंगळचे म्हणणे संपत नाही तोच घाटाच्या मध्यभागी गडबड गोंधळ व रडारड ऐकू येऊ लागली. त्याच बरोबर वाघाच्या डरकाळ्या व लांडग्याचे आवाज येऊ लागले.

पहाता पहाता असंख्य वाळवंटी लुटारू चोही कडून वाघ व लांडग्यापासून आपला जीव वाचवित. घडाघड पळत त्यांच्याच बाजूला येत असलेले त्यानां दिसले. ते सर्वजण पिंगळ व पद्मपाद जिथे उभे होते तिकडे येऊ लागले. (क्रमशः)



# स्वावलंबन

विक्रमादित्याने आपला हट्ट सोडला नाही.

तो झाडाजवळ गेला, प्रेत खांद्यावर काढून घेतले आणि नेहमी प्रमाणे मौन होऊन स्मशानाच्या दिशेने चालू लागला. तेव्हां प्रेतात बसलेला वेताळ त्याला म्हणाला–"राजा, तू इतकी मेहनत करीत असलेला पाहून तुझा भोळपणा आहे कां प्रारब्ध आहे? हेच समजत नाही, अत्यंत दयाळू व दानशूर सुद्धा केव्हां केव्हां कठोर व स्वार्थी बनतात. ज्यांनी तुला ह्या काम करण्याला प्रवृत्त केले. ते सर्व कार्य सफल होताच तुझ्या बरोबर उलट व्यवहार करतील. ही गोष्ट कितपत खरी आहे ह्याचे उदाहरण म्हणून तुला मी समरसेन राजाची गोष्ट सांगतो" असे सांगून वेताळ गोष्ट सांगू लागला.

धर्मपुर राज्याचा कारभार राजा समरसेन पहात होता. त्याच्या राज्याला



जोडलेले दुसरे दोन भाग एक रामपुर व श्रीपुर अगदी जवळ जवळ होते. रामपुरचा अधिकारी प्रताप हा खूप स्वार्थी होता.

श्रीपुरच्यात्य अमरची लोकप्रियता पाहून प्रताप मनातल्या मनांत जळू लागला. व कोणत्याही प्रकाराने त्याचा अपमान करण्याकरीता संधी पाहू लागला.

रामपुर उंचावर नसून खालच्या अंगाला वसलेले गाव होते. त्यामुळे पाऊस भरपूर पडून रामपुर पाण्याने बुडत असे. हा प्रकार थांबवण्याकरीता अमर नेहमी गंभीरपणे त्यावर विचार करी.

एकदा वसंतऋतु असतांना रामपुर गावात एक स्वामीजी आले. व गावाची सुख समृद्धी पाहून, संतुष्ट होत म्हणाले–"महिन्यातुन तिनदा पाऊस पडून तुमचे गांव असेच संपन्न राहो."

हे ऐकताच अमर घाबरून जात म्हणाला–"स्वामी! आपण असा आशिवाद देऊ नका. आम्ही पावसालाच घाबरतो आहोत." असे म्हणत पावसामुळे होणारी हानी त्यांनी सविस्तर सांगितली.

त्यावर स्वामी म्हणाले–"मी एकदा सर्व गांव फिरून पहावा म्हणतो तू पण चल."

अमरने स्वामीनां सारा गांव हिंडून दाखविला. व पावसाने पाणी कुठे कसे एकत्रित होते व कसे नुकसान होते ते सांगितले.

स्वामी एकक्षण विचारमग्न झाले व म्हणाले–"तुमची समस्या सोडविणे म्हणजे काही कठीण काम नाही. तू गावाच्या चारी बाजूला असा खंदक खणून काढ की; तो खूप खोल व रूंद असेल. तसेच गावाजवळ एक मोठा तलाव बांधून काढ. त्याचे पाणी सर्व गावातून ओढ्या वाटे खंदकात पडेल व खंदकातले पाणी वाहून बाहेर निघून जाईल. ह्या सर्व कामा-करीता तुला दिड लाख रूपये लागतील. तेव्हां ही सर्व रक्कम तुला ह्या देशाचा राजा समरसेन ह्याच्याकडून मिळेल.

स्वामींनी सांगितलेला सल्ला अमरला पसंत पडला. त्याने त्याच क्षणापासून योजना आरंभ करायचा निश्चय केला.

तेवढ्या अवधीत प्रतापला समजले की, स्वामींनी अमरला चांगला सल्ला दिला आहे. म्हणून त्याने झटपट स्वामींना आपल्या गावात पाचारण केले. व त्यांना निवेदन करून म्हटले–"मुनी, आम्हांला असा सल्ला द्या की माझा गांव सुखी व समृद्ध राहील."

श्रीपुर उंचावर वसलेले होते. त्यामुळे त्या गावाला पाण्याच्या पुराची भीती नव्हती. तेथील सर्व लोक आनंदान जीवन घालवत होते.

स्वामींनी सारा गांव हिंडून पाहून घेतला व प्रतापला म्हणाले–"ह्या गावातले रहाणारे खूप भाग्यवान आहेत. ह्या गावात व गावच्या समोवताली सुद्धा नार-ळाची कैक झाडे आहेत. ह्या झाडांचा उपयोग करून अनेक वस्तू बनवून देश विदेश मध्ये विकल्या जातील. व मोठा व्यापार होईल. ह्या यंत्रसामुग्री करीता पांच लाख रूपये लागतील. तू ह्या देशाचा राजा समरसेन याच्यांकडे हे पैसे मागून घेऊन अनेक लोकांना काम देऊन त्याचे हाल दूर करशिल."

तिकडे अमर राजाला भेटायला म्हणून राजधानीच्या गावी जायला निघाला. हे कळताच प्रतापसुद्धां राजधानीकडे निघाला.



प्रताप आपल्या बुद्धीमतेच्या बळावर राजाकडून धन मागण्याकरीता अमरच्या आधी राजधानीला जाऊन पोहोचला व तेथील स्वतःह्याच्या माहितीतल्या खजिन-दाराला जाऊन भेटला.

खजिनदाराने प्रतापचे सर्व म्हणणे शांतपणे ऐकले व म्हणाला–"तू खर सांग! इतक्या वर्षांनी नारळाच्या झाडांचा उपयोग करून व्यापारधंदा करण्याचे तुझ्या डोक्यांत अचानक कसे काय आले?"

"माझी नारळाची असंख्य झाडे आहेत. त्याची पाने व झापे सर्व फूकट जात आहे जर गावांत ह्याचा उद्योगधंदा सुरू केला तर माझ्या नारळांच्या झाडांचा



चांगला उपयोग होऊन चांगली किमत मला मिळू लागले." प्रताप म्हणाला.

"हा उद्योगधंदा करून तुला ज्यास्त लाभ होईल असे वाटते नां? खजिनदाराने विचारले.

"होय हो! तुमचे म्हणणे अगदी खरे आहे. मांझा पण हाच विचार आहे." प्रताप झटकन् म्हणाला.

"तू खर काय ते सांगितलेस! म्हणून मी तुला एक चांगला सल्ला देतो. सर्वांना माहित आहे की; हा राजा अत्यंत दयाळू आहे. परंतु त्यांची खुबी काही वेगळीच आहे. त्यांचा असा तर्क आहे की, जो माणूस जेवढी किमत मागेल तेवढी तो देत नाही. म्हणून तुला पांच लाख रूपये हवे असतिल तर तू बारा लाख मांग. तेव्हां तुला सहा लाख मिळतील."

"पण मला सहा लाख रूपये नको आहेत. मला फक्त पाचच लाख हवेत म्हणून मी दहालाखच मागतो." प्रताप म्हणाला.

"तू तुला सहा लाख मिळतील असे पहा, तेव्हां एक लाख त्यातील उरतील. ते आपण अर्धे अर्धे वाटून घेऊ" खजिनदाराने उपाय सांगितला.

खजिनदाराने सांगितलेल्या उपायाने प्रताप खुष झाला. खजिनदाराने त्याला आठवडाभर राजधानीत रहाण्यास सांगितले.

तेवढ्या अवधीत अमर राजधानीत पोहोचला. हे समजताच प्रतापच्या डोक्यात विचारांचे थैमान सुरू झाले, अमर गावाच्या कामाकरीता स्वत: आला होतो. त्यामुळे कामापेक्षा जास्त लाभ त्याला मिळेल. तो तर गावांतल्या सर्व लोकांना लाभ होईल अशा गोष्टी करीता धन मागावयास आला होता. त्यामुळे त्याला ते धन न मिळेल असे करून, उलट दिशा दाखवावयास पाहिजे. असा विचार करून प्रतापने अमरला रस्त्या मध्येच गाठले व त्याला भेटत म्हणाला—"दादा! तू तर माझ्या शेजारच्या गावाचा आहेस. म्हणून मी तुला खरी गोष्ट काय ते सांगतो. मला माहित झाले आहे की; मोठी रक्कम मागण्याने राजा नाराज व असंतुष्ट होतो. आणि असे ही समजले की; जो कमी पैसे मागतो त्याला दुप्पट किमत मिळते. तेव्हां तू राजाकडे कामाकरीता एक लाख रूपये माग. म्हणजे राजा तुला दोन लाख देईल. त्याने तुला गावात खंदक व तलाव वगैरे खोदता येईल. तो खर्च करून तुझ्याकडे पन्नास हजार रूपये उरतील तो तुला लाभ.

परंतु प्रतापचे सर्व म्हणणे त्याने मौनपणे ऐकून घेतले. त्याला ते बिलकुल आवडले नाही. परंतु राजाकडे पैसे मागतांना ह्याचा जरूर विचार करावयास हवा असा त्याने निश्चय केला.

चार दिवसानीं अनेक गावांहून राजधानीत आलेल्या लोकांना राजाने दरबारात बोलविले. व आपापल्या समस्या सांगायला सांगितल्या.

गावकरी लोक एकापाठीमागून एक आपल्या तक्रारी सांगत होते राजा त्यांनी मागितल्या धनापैकी प्रत्येकाला अर्धे धन देण्यास मंजूरी देत होता. अमर हे सर्व मन:पूर्वक ऐकत होता.

अमरच्या आधी एकांनी आपल्या गावात खंदक खोदाईच्या कामाकरीता राजाकडे तीन लाख रूपये मागीतले. तेव्हां राजाने त्याला दिड लाख मंजूर केले.

जेव्हां अमरची पाळी आली. तेव्हां त्याने राजाला आपली समस्या सांगत





म्हटले—" महाराज! माझ्या गावाच्या चारी बाजूला खंदक खणायचा आहे, तेव्हां मला पन्नास हजार रुपयांची जरूर आहे."

राजाला अत्यंत आश्चर्य वाटले त्याने विचारले—" आताच आधीच्या माणसाला खंदक खोदण्याकरीता मी एक लाख पन्नास हजार रुपये मंजूर केले. तू इतकी कमी किमत कशी मागतो आहेस? तुझे गांव लहान आहे की; काय?"

" प्रभु! आमचा गाव तसा लहान नाही. परंतु आमच्या स्वतःहाच्या कामा-करीता राजावर पूर्णपणे विसंबून रहाणे बरोबर नाही. तसे पाहिले तर खंदक खोदण्याच्या कामाकरीता आम्हालाही दिड लाख रुपये हवे आहेत. परंतु आमच्या गावातील सर्व लोक श्रमदान करावयास तयार आहेत. अशा परिस्थितीत एका लाखात आमचे काम पूर्ण होईल. तेव्हां अर्धी रक्कम आम्ही सर्व ग्रामवासी लोकांकडून देणगीच्या रूपाने जमा करू. आणि फक्त पन्नास हजारच आपल्याकडे मागतो आहोत." अमरने राजाला सांगितले.

अमरचे म्हणणे ऐकून राजाला खूप आनंद झाला. तो म्हणाला—" तुमचा गाव एक आदर्श गाव आहे. तू सगळ्या गावचा आदर्श अधिकारी आहेस. म्हणून मी तुमच्या गावाकरीता दोन लाख रूपये मंजूर करतो."

त्यानंतर राजाने इतर आलेल्या सर्व गावअधिकाऱ्याना म्हटले—" मी तुमच्या गावां संबधी केलेल्या मंजुरीचा विचार बदलून टाकला आहे. सद्याच्या परिस्थितीत कोणाला एकही पैसा देऊ इच्छीत नाही. मी तुमच्या सर्वांच्या तक्रारी ऐकून घेतल्या काही दिवसांनी प्रत्येकांच्या गांवी एक एक अधिकारी पाठवेन. तोच गांव बघून काय तो निर्णय घेईल. तेव्हांच तुम्हांला मदत करण्याकरिता मी पैसा देईन. पण तुम्ही एका गोष्टीकडे ध्यान द्या. पुढे तुम्हांला जी रक्कम मदती करता देईन. ती कर्जाच्या रूपाने असेल. ती रक्कम पूर्ण होईपर्यंत प्रत्येक गावातल्या माणसाला प्रत्येक वर्षी शंभर रूपये कर रूपाने फेडले पाहिजेत.

ते ऐकताच सर्व ग्रामाधिकारी लोकांच्यात खळबळ माजली. राजाने कोणाकडेच लक्ष दिले नाही. तो सिंहासनावरून उतरला व आपल्या महालात निघून गेला.

येथवर गोष्ट सांगून वेताळ म्हणाला— " राजा, दानशूर म्हणून प्रसिद्ध असलेल्या राजाचा व्यवहार आपल्याला अस्वाभाविक वाटत नाही कां? रामपुरचा अधिकारी अमर ह्याला दोन लाख रूपये दान देणाऱ्या राजाने दुसऱ्यांना उधारीने सुद्धा पैसे दिले नाहीत. हे काय त्याच्या कंजुषीचे प्रतिक म्हणता येईल. खरे तर राजाच्या वागण्यात अचानक असा बदल झाला ह्याचे काय कारण सांगता येईल? त्यांनी आपला विचारच बदलून कां टाकला? या प्रश्नाचे उत्तर माहित असुनही तू दिलं नाहीस तर परिणाम तुला माहीतच आहे, तुझ्या डोक्याची शंभर शकले होऊन तुझ्याच पायावर लोळू लागतील."

विक्रमादित्य म्हणाला—"राजाच्या मनांत अचानक बद्दल होण्याचे कारण तो कंजुष होता म्हणून नाही. तर अमरच्या सांगण्याने त्याला खऱ्या गोष्टीचा उलगडा झाला. तो असा की, अनेक गावचे अधिकारी आपल्या स्वतःच्या स्वार्थाकरीता राजाकडून दामदुप्पट पैसा काढत होते. परंतु अमरचे म्हणणे ऐकल्या बरोबर त्याने खोलवर विचार केला. म्हणून राजाला गावातील सर्व लोकांकडून कराच्या रूपाने पैसा मिळवणे भाग पडले. जर अमरने सांगितल्या प्रमाणे पूर्ण जनता कोणत्याही गोष्टीकरता सहकार्य देईल. तर राजाला देशाच्या उन्नति करता अनेक योजना अमलात आणता येतील. ही सर्व गोष्ट प्रजेतील लोकांच्या डोक्यात शिरण्याकरीता राजाने गांवातील लोकांना कराच्या रूपाने फेडण्याकरीता अशी कठीण अट घातली."

अशा तऱ्हेने राजाचे मौन भंग होताच वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हां झाडाला जाऊन लोंबकळू लागला. (कल्पित)



# अंगरक्षक

चंदनपुरच्या राजाला स्वतःहाच्या संरक्षणाकरीता एका माणसाची जरुरी होती. त्या जागेकरीता बरेच जण आले त्यातले चार योग्य समजून मंत्र्याने त्या चौघांची परिक्षा घेण्याचे ठरविले. ते सर्वजण साहस व पराक्रमामध्ये तोडीस तोड होते. परंतु मंत्र्याने त्यातील चाणाक्ष व कार्यदक्ष असलेल्याची निवड करण्याचे ठरविले.

त्याने चौघांना प्रश्न विचारला–" राजा आपल्या परीवारासह शिकार खेळायला गेला असतांना वाट चुकला व एकटाच भटकत भटकत एका झाडाखाली येऊन विश्रांती घेण्याकरीता पडून राहीला, कोणीतरी तुमच्या पैकी एक जण तेथे आहे समजा तेवढयात जर एखाद्या वाघाने मागुन येऊन तुमच्यावर हल्ला केला. तर तशा परिस्थितीत तुम्ही काय कराल ?"

" मी मोठ्याने गर्जनाकरीता वाघावर तुटून पडेन " त्यातील एक जण म्हणाला. दुसरा म्हणाला–" मी माझी तलवार झटक्यात उपसून वाघाच्या पाठीमागे जाऊन त्याच्यावर वार करेन " तिसरा म्हणाला–" मी वाघावर हल्ला करून त्याला मारून टाकेन-"

चौथा मंत्र्याचे ऐकून मंदहास्य करीत म्हणाला–" मी तेथे समक्ष असताना वाघ राजावर कधीच हल्ला करून येणार नाही !" त्यांच्या विश्रांतीच्या वेळेस मी डोळयात तेल घालून चोहीकडे लक्ष ठेवून पहारा देत राहीन !

मंत्र्याने चौथ्याला राजाच्या अंगरक्षकाच्या पदावर नेमले.





# तोडीस तोड

एकदा जमिनदार साहेबांनी आपल्या गावकऱ्यांच्या समोर असे जाहिर केले की–" जो माणूस अनर्थाचे मुळ कारण काय, हे सांगू शकेल त्याला शंभर सोन्याची नाणी बक्षीस मिळतील."

अनेकांनी अनर्थाचे मुळ कारण गर्व म्हणून सांगितले. तर काहींनी अहंकार, आणि काहींनी अज्ञान. प्रत्येकाने आपापली उत्तरे सांगितली. परंतु जमिनदाराला कोणाचेच उत्तर पसंत पडले नाही.

तेवढ्यात गोपाळ नावाचा गावातील तरूण उठून उभा रहात म्हणाला–" साहेब ! ह्याचे बरोबर उत्तर मला माहीत आहे. पण तुमची बक्षीसाची रक्कम अगदीच मामुली वाटते. म्हणून मी उत्तर द्यायला थोडा संकोच करीत होतो.

तेव्हां जमीनदाराने किमत वाढवित म्हटले–"मला जे उत्तर बरोबर वाटेल, त्याला मी दोनशे सोन्याची नाणी बक्षीस देईन. त्यानंतर गोपालनी सांगितले–" ह्या जगात अनर्थाचे मुळ कारण पैसा व संपत्ती आहे " पुढे त्याचा विस्तार करीत तो म्हणाला की, ह्या जगात युद्ध, अन्याय, अत्याचार व हत्याकांड वगैरे सर्व पैशांमुळेच घडतात.

जमिनदाराने गोपालचे सर्व तर्क ऐकून म्हटले–" मी तुझ्या उत्तराने खुष आहे, आणि तू त्याचे सोदाहरण पटवून दिलेस. ते सुद्धा मला खूप आवडले. तू एक महान लेखक आहेस. असे म्हणत त्यानी त्याला दोनशे सोन्याची नाणी बक्षीस दिली.

त्या गावकऱ्यांच्या मध्ये एक कुत्सित नावाचा माणुस होता. त्याचे खरे नाव अजून पर्यंत कोणालाच माहित नव्हते. म्हणून त्याला सर्व लोक कुत्सित म्हणूनच हांका मारीत. तो सर्वांचे लक्ष आपल्याकडे केंद्रित करीत म्हणाला–" गोपाळने सर्वांनाच

बनविले आहे. त्याने जर अनर्थाचे मूळ कारण पैसा सांगितले, तर त्यांनेच जमिन-दाराकडून बक्षिसाच्या रूपाने पैसे कां घेतले? शिवाय तेवढाच पैसा न घेता अधिक वाढवून पण घेतला. ह्याचा अर्थ त्याचा त्याच्या उत्तरावर विश्वास नाही. जो स्वतःह्यावर विश्वास ठेवू शकत नाही. तो आपल्या सर्वांकडून विश्वास कसा संपादन करणार. हा सरळ सरळ धोका फसवणूक आहे नाही तर काय?

त्यावर जमिनदाराने गोपाळला विचारले- "तू ह्या प्रश्नाचे काय उत्तर देशिल?"

"माणूस अनर्थाचे मूळ कारण पैसा आहे हे माहीत असून सुद्धा त्याची अभिलाषा करतो. तो सर्वात जास्त अनर्थकारी सिद्ध होतो." गोपाळने उत्तर दिले.

हे उत्तर ऐकून कुत्सित सोडून सर्वांनी टाळ्या वाजविल्या. कुत्सितने गोपाळला विचारले-"पैसा हा अनर्थ मानून सुद्धा जो पैशांची लालच दाखवतो. तो मूर्ख म्हटला जातो. मग काय तू मूर्ख आहेस?"

गोपाळने कुत्सितच्या डोळ्यांत खोलवर पहात म्हटले-" तू काय तुझे आयुष्य शाश्वत आहे असे समजतोस?"

"कधीच नाही!" कुत्सित म्हणाला.

"मग असे सांग, मरण तुला सांगून येईल कां न सांगता? गोपाळने विचारले.

"सगळ्यानांच मरण न सांगता येते" कुत्सित जरा नाराजीनेच म्हणाला.

"तर तू थोडे दिवस अजून जिवंत रहावयाची इच्छा करतोस कां मरण्याची? गोपाळने विचारले.

"तू सांग! तू काय करशिल? उलट प्रश्न करीत कुत्सित म्हणाला.

"मी तर मुर्खंच आहे! त्यामुळें जिवंत रहाणेच पसंत करतो; पण तुझ्या बाबतीत कायं ते मला कळायला पाहिजे नां? चेहरा व्यंगात्मक करीत गोपाल म्हणाला.

ते ऐकून सर्व गांवकरी हसू लागले. तेव्हां अपमानाने कुत्सितने मान खाली घातली. ह्यानंतर जमिनदाराने मोठ्या समारंभाने गोपालचा सत्कार केला.





## वाकडी बुद्धी

ब्रह्मदत्त काशी येथे राज्य करीत असतां बोधिसत्व काशीजवळील एका गावातील ब्राह्मणाकडें शिष्याच्या रूपाने येऊन राहिले. त्या ब्राह्मणाचे नांव शंकरशास्त्री. त्यांनी वेदंभ नावाच्या महामंत्राची सिद्धी प्राप्त केली होती.

जेव्हां सर्व ग्रह आकाशात एकत्र येतील, तेव्हां त्याच्यांकडे पाहून जर ह्या मंत्राचे पठण केले, तर आकाशातून सोने, चांदी, प्रवाळ, रत्न, माणिक, नीळ, मोती, सात प्रकार पावसासारखे जमिनीवर पडतील.

अशा मंत्रसिद्धि ब्राह्मणाकडे आश्रयाला बोधिसत्व शिष्यच्या रूपे येऊन राहिले. एकदा शिष्यांला घेऊन ते जंगलामध्ये गेले.

त्या जंगलात पांचशे दरोडेखोर रहात होते. त्यातील काहींनी त्या ब्राह्मणाला व शिष्यांला रस्त्यात अडवले. त्याच्यांत असा नियम होता की; जर दोन वाटसंरु त्या रस्त्यांनी एकत्र गेले, तर त्यातील एकाला ते मुक्त करीत. त्यांनी घरी जाऊन जो पैसाअडका असेल, तो घेऊन यावयाचा व तो त्या लुटारूंना देऊन आपल्या बरोबर आलेल्याची सुटका करावयाची. जर ते वाटसरू बाप व मुलगा असतील तर वडीलांची सुटका होई. वडीलांनी घरी जाऊन रक्कम आणून आपल्या मुलाची सुटका करावयाची.

अशा प्रकारे आई व मुलगी असेल तर आईला, भाऊ भाऊ असतील तर एका भावाला व गुरू व शिष्य असतील तर शिष्याला अशा प्रकारे एकाला ही संधी दिली जात असे.

त्या दिवशी त्या लुटारूंनी त्या ब्राह्मणाला धरून ठेवले. व त्यांच्या शिष्याला घरी जाऊन पैसा अडका आणण्यास पाठवले. तेथून निघतांना शिष्यानीं आपल्या गुरूला.



नमस्कार करीत म्हटले–" गुरूवर्य ! आपण काळजी करू नका. मी एक-दोन दिवसांतच परत येईन. परंतु माझी आपल्याला एक विनंती आहे. आजच सर्व ग्रहांचा कुट योग आहे. तरी आपण कृपा करून आपल्या मंत्राची सिद्धि-चुकून सुद्धा करू नका, जर चुकून रत्नांचा पाऊस पडला, तर आपली व ह्या दरोडेखोरांची सुद्धा अपार हानी होईल."

अशा तऱ्हेने गुरूंना वारंवार सांगून शिष्य तेथून निघून गेला.

सुर्यास्त झाला. डांकूनी ब्राह्मणांला बांधून ठेवले होते. पौर्णिमेची रात्र होती. सर्वत्र चंद्राचा प्रकाश पडला होता. ब्राह्मणांनी आकाशांत विस्मयांनी पहात मनांत तर्क केला की; थोडया वेळातच ग्रहांचा कुट-योग होणार आहे.

तो मनात विचार करू लागला–" मी एवढा सिद्धि प्राप्त झालेला ब्राह्मण. ह्या लुटारूंच्या हातात असे असमर्थपणाने कशाला राहू व ह्या लोकांचा त्रास कशाला सोसू ?" मी स्वतःच मंत्रसिद्धिने ह्यानां धनप्राप्ती करून देऊन सुटका करून घेऊ शकतो व मुक्तता मिळवून सुखी राहू शकतो. प्राणावर बेतले असतांना ह्या विद्येचा उपयोग केला नाही. तर ती विद्या काय कामाची ? काय सांगता माझ्या शिष्याला धन प्राप्ती करीता किती कष्ट व वेळकाळ लागेल.

असा विचार करून त्यानी त्या लुटारूंच्या प्रमुखाला आपल्या जवळ बोलाविले.

त्याने विचारले–" तुम्ही लोकांनी मला बांधून कां ठेवले आहे ?"

" महापुरुषा " कशाला. काय ? फक्त संपत्ती मिळण्याकरीता. सर्वांनी एका सुरात सांगितले.

" ठिक आहे, हेच कारण आहे नां ! तर मी सांगतो तसे करा. तुम्हांला जेवढे धन पाहिजे तेवढे मी आत्ताच्या आत्ता देतो. पण प्रथम मला बांधलेले मोकळ करा. मला स्वच्छ स्नान करू द्या. नविन वस्त्रे घालू द्या. सर्वतऱ्हेची फुले आणून माझ्यापुढे ढीग करा. माझ्या चोहो बाजूला सुगंधित द्रव्य, धुप दीप वगैरे लावून ठेवा. आणि मग बघा गंमत ! काय होते ते ?"

ब्राह्मणांनी लुटारूंना समजावत सांगितले.

लुटारूंनी ब्राह्मणांने सांगितल्याप्रमाणे केले. त्यानंतर ब्राह्मणांनी आकाशाकडे पहात आपल्या अंदाजाने ध्यान लावून वेद-मंत्र म्हणावयास सुरवात केली.

थोडया वेळांतच सोने चांदी रत्नांचा पाऊस पडू लागला. लुटारूंनी सर्व धन गाठोडयातून बांधून घेतले व ते जंगलात निघून गेले. त्यांच्या पाठोपाठ ब्राह्मण पण जाऊ लागला.

त्यानां वाटेतच दुसऱ्या दरोडेखोरांच्या टोळीने अडवले.

पहिल्या दरोडेखोरांच्या टोळीतल्या प्रमुखाने त्यानां विचारले–" तुम्ही आम्हांलाच कशा करीता पकडता आहात ?"

दुसऱ्या टोळीने सांगितले–" कशाकरीता म्हणजे ? धना करीताच !"

"बस ! तर तुम्ही ह्या ब्राह्मणाला धरा ! हा आकाशातून संपत्तीचा पाऊस पाडू शकतो. तसेच हे सर्व धन त्यानेच आम्हांला दिले आहे." असे म्हणत ब्राह्मणाला हातात देऊन ते लोक निघून गेले.



दरोडेखोरांच्या दुसऱ्या टोळीने ब्राह्मणाला पकडून ठेवले. व त्याला त्रास देत म्हणू लागले–" आम्हांला पण धन दे रे ! महापुरुषा ! नाहीतर तुझ्या जिवाचे काही खरे नाही ! तू वाचण्याकरीता काहीतरी ढोंग करशिल पण तुला आम्ही सोडणार नाही. तेव्हां तू वेळ वाया न घालविता आम्हांला धनाच्या राशी मिळवून दे व स्वतःहाचा जीव वाचव."

त्यावर ब्राह्मण म्हणाला–" बंधुनो ! मी माझ्या मंत्राच्या बळाने जे धन मिळवून दिले. त्याची सिद्धी वर्षातून फक्त एकदाच करता येते. तेव्हां पुढच्या वर्षी शिवाय शक्य नाही. माझ्या इच्छेवर चालणारा